

# डॉन संथ वहातच आहे

(मिखाईल शोलोखोव्ह लिखित "And Quiet Flows the Don" चा अनुवाद)

## भाग २

भाषांतरकार
नरेंद्र सिंदकर




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.




# डॉन संथ वहातच आहे

(मिखाईल शोलोखोव्ह लिखित "And Quiet Flows the Don" चा अनुवाद)

## भाग २

भाषांतरकार
नरेंद्र सिदकर




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

प्रथमावृत्ती – १९८५.

प्रकाशक :
श्री. सूर्यकांत द्वा. देशमुख
सचिव,
महाराष्ट्र राज्य
साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मंत्रालय, मुंबई ४०००३२



मुखपृष्ठ–
श्री. सुहास बावडेकर



मुद्रक :
प. म. महाबळ
प्रॉम्प्ट सर्व्हिस
६५६, 'गणेश प्रसाद' गणपती पेठ,
सांगली. ४१६ ४१६

किंमत रु. ३५/–




# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या वतीने अनेक उत्तम ग्रंथ भाषांतरित करुन घेऊन ते प्रकाशित करण्यात येतात. या योजनेत साहित्य, शास्त्र, विज्ञान, कला इत्यादी विषयांवरील ग्रंथ मंडळाने प्रकाशित केले आहेत. रशियन लेखक श्री. शोलोखोव्ह यांची नोबेल पारितोषिक विजेती कादंबरी "अँड क्वाएट फ्लोज द डॉन" अनुवादित करण्याचे मंडळाने ठरविले. या कादंबरीचे भाषांतराचे काम रशियन नभोवाणी केंद्रातील अधिकारी श्री. नरेंद्र सिंदकर यांनी स्वीकारले. मोठ्या पुस्तकांचे भाषांतर करताना अनेक अडचणी उद्‌भवतात. विशेषत: अनेक पात्रे असलेल्या कादंबरीत पात्रांच्या नावाच्या उच्चारात फरक होतो. श्री. सिंदकर यांनी प्रयत्नपूर्वक हे टाळले आहे. काही ठिकाणी अशा चुका झाल्या असल्यास त्या नजरेआड होऊ देणेच योग्य होईल असे वाटते. श्री. प्र. श्री. नेरुरकर यांनी या पुस्तकास विस्तृत प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल त्यांचा तसेच श्री. सिंदकर यांचा मी मंडळाच्या वतीने आभारी आहे. या कादंबरीचा पहिला भाग प्रकाशित झाला असून आता भाग २ चे प्रकाशन करण्यास मंडळास आनंद होत आहे. वाचक या पुस्तकाचे स्वागत करतील अशी आशा आहे.

४२. यशोधन,
मुंबई – ४०००२०
दिनांक – १ डिसेंबर, १९८५.

**सुरेंद्र बारलिंगे**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.

# डॉन संथ वहातच आहे

## *थोडी तोंड ओळख*

### प्रास्ताविक

श्री. नरेन्द्र सिदकर यानी जगविख्यात रशियन लेखक मिखैल शोलोखोव् यांच्या 'अॅण्ड क्वाएट फ्लोज् द डॉन' या महाकादंबरीचा मूळ रशियन भाषेतून मराठी अनुवाद केला आहे व 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळा' तर्फे तो प्रकाशित होत आहे. यापूर्वी सुद्धा साहित्य संस्कृती मंडळाने महान रशियन कादं–बरीकार काऊण्ट लिओ टॉल्स्टॉय यांच्या 'वॉर अॅण्ड पीस' या महाकादंबरीचा मराठी अनुवाद संक्षिप्त रुपात मराठी वाचकांसाठी सादर केला आहे. मी स्वत: शोलोखोव् यांच्या या कादंबरीचा इंग्रजी अनुवाद समोर ठेवून श्री. सिदकर यानी खूप मेहनत घेऊन पूर्ण केलेल्या या मराठी अनुवादाचा आढावा घेणार आहे व साहित्य निर्मितीच्या विविध प्रक्रियांची या कादंबरीशी संलग्नता जोडणारी चिकित्सा घडवून आणण्याचा, या कादंबरीचा व रशियन साहित्याचा एक अभ्या–सक या नात्याने प्रयत्न करणार आहे.

### लेखक म्हणून शोलोखोवची जडणघडण

इ. स. १९२३ साली शोलोखोव्ने आपलं पहिलं कथालेखन केलं. १९२६ साली त्याचा 'टेल्स फ्रॉम द डॉन' हा कथासंग्रह प्रसिद्ध झाला. १९२५ साली त्याने 'अॅण्ड क्वाएट फ्लोज् द डॉन' लिहायला सुरुवात केली. त्यावेळी तो वीस वर्षांचा

होता. रशियातील डॉन प्रदेशात शोलोखोवचं बालपण गेलं. त्याचं तारुण्य 'यादवी युद्धा' (Civil War)च्या धकाधकीत गेलं. डॉन प्रदेशातील व्हेशेन्स्काया खेडं (Veshenskaya) हे शोलोखोव्हच्या जीवनाशी अतूटपणी निगडीत झालं आहे. जसे टॉल्स्टॉयच्या जीवनाशी 'यास्नाया पोल्याना' (Yashaya Polyana) हे खेडं निगडीत झालं होतं. आपल्या डॉन प्रदेशावरच्या प्रेमातूनच शॉलोखोव आपली ही महाकादंबरी लिहायला उद्युक्त झाला. 'अॅण्ड क्वाएट फ्लोज् द डॉन' चा उत्तर वयात मागे वळून विचार करताना शोलोखोव् म्हणाला होता, 'ज्या लोकात मी जन्मलो व ज्यांना मी ओळखत होतो त्या लोकांबद्दल मला लिहायचं होतं.'

डिसेंबर १९६५ ला स्टॉकहोम येथे नोबेल पारितोषिक स्वीकारताना शोलोखोव्ने जे भाषण केलं होतं त्यावरून त्याची कलेबद्दलची जीवनदृष्टी दिसून येते. तो म्हणतो, "वाचकाशी प्रामाणिकपणे बोलायचं, लोकांना सत्य सांगायचं, मग ते कितीही कटू असो, माणसांच्या हृदयात भविष्यकाळाबद्दलची आणि तो भविष्यकाळ निर्माण करण्याच्या स्वतःच्या सामर्थ्यावरची श्रद्धा बळकट करायची, जगभर शांतता नांदावी म्हणून सक्रीय लढवैय्या व्हायचं, आणि स्वतःच्या लेखनाने अशा लढवैय्यांची संख्या वाढवायची. प्रगतीची स्वाभाविक आणि उदात्त ओढ लागलेल्या लोकांना एकत्र करायचं. कला माणसांच्या मनावर व हृदयावर प्रचंड प्रभाव पाडतात. मला वाटतं की त्या माणसाला स्वतःला कलावंत म्हणवून घेण्याचा हक्क आहे. जर तो, ही माणसाच्या अंतरात्म्यात सौंदर्य निर्माण करण्याची शक्ती, माणसाच्या भल्यासाठी मार्गी लावील."

शोलोखोव्च्या साहित्याचे एक ज्येष्ठ अभ्यासक श्री. न्यॅकिमेन्को म्हणतात त्याप्रमाणे शोलोखोवचं सामर्थ्य वास्तवतेतून तो घेतो – वास्तवता तिच्या ऐतिहासिक स्वरुपात, वास्तवता तिच्या विकसनशीलतेत, वास्तवता दैनंदिनी जीवनाची. त्याचे नायक ठाम भौतिक वस्तूंच्या जगात वावरतात. ते स्वतःच वास्तवता असतात. व्यक्तिचित्रणाच्या नेमकेपणाने ही वास्तवता अशी काही निर्माण केलेली असते की त्या प्रत्येकाला एक अपूर्व व अनुकरणदुर्लभ असं स्वतःचं व्यक्तिमत्व लाभलेलं असतं. १९३२ साली शोलोखोव्बद्दल मॅक्झिम गॉर्कीने म्हटलं होतं की युरोमधील सूज्ञ लोक शोलोखोव्चं साहित्य एक वास्तवता म्हणूनच स्वीकारतात. कलेची पाळंमुळं जनतेत असतात, या जाणीवेतून शोलोखोव् आपलं लेखन करीत होता. स्टॉकहोमला केलेल्या आपल्या भाषणात हा मुद्दा मांडताना शोलोखोव् अभिमानाने म्हणतो, "ज्या ऐतिहासिक वाटेवरून माझे लोक गेले ती

मळलेली वाट नव्हती. नवी वाट शोधणारे, जीवनाचे उद्गाते म्हणूनच ते पुढे गेले. माझे ध्येय एक लेखक म्हणून नेहमीच, माझ्या सर्व साहित्यातून या कष्टकऱ्यांच्या, इमारती उभारणाऱ्यांच्या आणि शूरवीरांच्या राष्ट्राचा सन्मान करण्याचेच राहिले आहे. त्यानी कुणावरही कधीच हल्ला केलेला नाही. उलट जे त्यानी निर्माण केलंय त्याचं रक्षण करणं नेहमीच त्याना ठाऊक आहे. रक्षण करणं आपल्या स्वातंत्र्याचं आणि सन्मानाचं. त्यानी स्वतः होऊन निवडलेल्या मार्गाने स्वतःच भवितव्य घडविण्याच्या आपल्या हक्काचं. माझ्या पुस्तकांनी लोकांना अधिक चांगलं अंतःकरणातून शुद्ध करायला मदत केली तर मला आवडेल माणसासाठी प्रेम निर्माण करणं, मानवतेच्या आदर्शासाठी आणि मानवतेच्या प्रगतीसाठी होणाऱ्या लढ्यात सक्रीय भाग घेणं यासाठी जर खरोखरच मी यशस्वी झालो असेन तर मी स्वतःला एक आनंदी माणूस समजेन."

मिखेल अॅलेक्झाण्ड्रोविच शोलोखोव्चा जन्म डॉन प्रदेशातील रुझिलिनो शेतवाडीवर व्हेशेन्स्काया या खेड्यात २४ मे १९०५ रोजी झाला. पुढे १९३७ साली आपल्या मतदारांना उद्देशून शोलोखोव म्हणाला होता, "मी डॉनमध्ये जन्मलो आणि वाढलो. याच ठिकाणी मी माणूस आणि लेखक म्हणून घडलो. आमच्या महान कम्युनिस्ट पक्षाचा सभासद म्हणून शिक्षण घेतलं. मी माझ्या महान, बलवान देशाचा एक देशभक्त आहे. आणि डॉन प्रदेशाचा मी एक देशभक्त आहे हे जाहीर करताना सुध्दा मला अभिमान वाटतो. शोलोखोव्ची आई अनास्तासिआ डॅनिलोव्हना चेर्निकोव्हा एका कुणबी कुटुंबातील होती. शोलोखोव्च्या पहिल्याच पुस्तकाला (कथासंग्रह) प्रस्तावना लिहिणारा व व्हेशेन्स्काया येथे शोलोखोव्च्या घरी राहिलेला, रशियाचा ज्येष्ठ लेखक ए. एस.– सेराफिमोविच शोलोखोव्च्या आईबद्दल लिहितो, "त्याची आई एक विलक्षण बाई आहे. पूर्णपणे निरक्षर तथापी बळकट, सजीव, भेदक मन असणारी. आपल्या मुलाला पत्र लिहिता यावे म्हणून तिने स्वतःलाच सज्ज केलं आणि लिहाय–वाचायला शिकवलं. त्यानंतर तिच्यामध्ये आणि मुलामध्ये आनंददायक पत्र–व्यवहार झाला. उघडच मौलिक निर्माणक्षम देणगी त्याला आईकडूनच मिळाली. जिने त्याला महान लेखक केलं." १९४२ साली व्हेशेन्स्काया खेड्यावर नाझी विमानानी केलेल्या बॉम्ब हल्ल्यात ती ठार झाली. शोलोखोव्चा बाप, अॅलेक्झांडर मिखेलोविच शोलोखोव्, रॅझॅन परगण्यातील होता. विकत घेतलेल्या कोझॅक जमिनीवर तो धान्य पेरायचा, शेतावरचा निरोप्या म्हणूनही त्याने काम केलं. वाफेवर चालणाऱ्या गिरणीचा तो व्यवस्थापक होता. तो १९२६ साली मरण

डॉन संथ वहातच आहे.

पावला. व्हेशेन्स्काया खेड्यातील माध्यमिक शाळेत चार इयत्ता पुऱ्या करून कसाबसा शोलोखोव् शाळेबाहेर पडला. रशियामध्ये यादवी युद्ध सुरु झालं होतं. डॉन प्रदेशातील वर्गलढ्यात तो सामील झाला. पंधराव्या वर्षी शोलोखोव्नं आपल्या आत्मचरित्रात लिहीलंय "१९२० पासून रासनखात्यात मी दीर्घकाळ नोकरी केली. सर्वत्र डॉन प्रदेशात प्रवास केला. १९२२ सालापर्यंत गोऱ्या टोळ्या (White band) या प्रदेशांचं नियंत्रण करीत होत्या. त्यांचा पाठलाग केला व तेही आमचा पाठलाग करीत असत. स्वाभाविकच आमची सर्व प्रकारच्या लफड्यात गुंतवणूक झाली .. डॉन प्रदेशातच शोलोखोव्ने वर्ग लढ्याचा अनुभव कोवळ्या वयात घेतला. त्याच्या पहिल्या वहिल्या कथा व नंतर त्याने लिहिलेली, डॉन संथ वहातेय' ही कादंतेरी या अनुभवावरच आधारलेली आपल्याला आढळून येते.

यादवी युद्ध संपल्यावर शोलोखोव् १९२२ च्या अखेरीला मॉस्कोला गेला. त्याच्या डोळ्यासमोर लेखक होण्यांचं स्वप्न होतं. तो मॉस्कोला आला तेव्हा ते शहर नुकतंच भूक आणि विनाश यातून सावरत होतं. रशियन क्रांती आणि यादवी युद्ध यांच्या यातनांतून ते बाहेर पडत होतं. नविन आर्थिक धोरण ( New Economic Policy ) त्याचवेळी सुरू झालं होतं. ३० ऑक्टोबर १९३० रोजी प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या 'तीन' ( थ्री ) या कथेत मॉस्को नगरीचं त्याला झालेलं दर्शन त्याने व्यक्त केलं आहे. पहिल्यांदा त्याला मॉस्को नगरीचं कठीण परिस्थितीला तोंड द्यावं लागलं. त्याने हमाल, फातरफोड, कारकून अशी कामे केली. त्याचवेळी तरुणांच्या एका वर्तमानपत्रासाठी सुद्धा तो लेखन करीत होता. परंतु लेखक म्हणून त्याची खरी कारकिर्द १४ डिसेंबर १९२४ रोजी सुरू झाली. त्या दिवशी मॉस्को- मधील एका प्रमुख मासिकात त्याची 'द बर्थमार्क' ( जन्मखूण ) ही कथा प्रसिद्ध झाली. कालांतराने त्याच्या कथांचे 'टेल्स फ्रॉम द डॉन' व 'द अझूर स्टेप्पी' हे संग्रह प्रकाशित झाले. मोठमोठ्या नामांकित मासिकातून त्यांच्या कथा येऊ लागल्या. सेराफिमोविच हा साहित्यातील शोलोखोव्चा देवपिता होता. त्याने त्याच्या पहिल्या कथासंग्रहाला प्रस्तावना लिहिली व तो उद्याचा रशियातील महान लेखक होईल म्हणून त्याचे भाकीत केले. १९३८ साली आपल्या देवपित्याच्या ( godfather ) पंचाहत्तराव्या वाढदिवशी शोलोखोव्ने त्याच्याबद्दल लिहीलं होतं, " मी खरोखर सेराफिमोविचचा कृतज्ञ आहे. कारण त्यानेच प्रथम माझ्या साहित्यिक कारकिर्दीच्या सुरुवातीला मला पाठिंबा दिला. त्यानेच मला प्रथम मान्यता आणि उत्तेजन दिले ... ... ... आमची पहिली भेट 'फर्स्ट हाऊस ऑफ

सोव्हिएट्स' मध्ये झाली. सेराफिमोविचने मला धीर देऊन सांगितलं की मी लिहीणं आणि अभ्यास चालू ठेवला पाहिजे. त्याने मला प्रत्येक बाबतीत लक्षपूर्वक काम कर व कधीही घाई करू नकोस असं सांगितलं. मी नेहमीच त्याच्या उपदेशाप्रमाणे चालण्याचा प्रयत्न करीत आलो आहे.'

शोलोखोव्ने लिहायला सुरुवात केली तो काळ सोव्हिएत साहित्यातील ऐतिहासिक महत्त्वाचा होता. अनेक तरूण त्याच काळात एकाच वेळी लिहायला लागले. ते सर्व तरुण सैनिक होते आणि यादवी युद्धातील अनंत हाल अपेष्टांना तोंड देऊन ते माघारे परतले होते. त्यांना खूप कांही सांगायचं होतं. सोव्हिएत साहित्यात त्यानी जी लेखननिर्मिती केली ती वैशिष्टयपूर्ण होती. " युद्ध आणि क्रांती हा आमचा अत्यंत महत्त्वाचा भावनिक अनुभव होता. आमच्या जीवनाचे एकमेव ध्येय हा अनुभव कलेतून व्यक्त करण्याचा होता. " श्रेष्ठ सोव्हिएत लेखक फेदिन याने नंतर लिहीलं होतं. अॅलेक्झांडर फयॅदयेव हा रशियन लेखक म्हणतो " आम्ही आमचा व्यक्तिगत अनुभव आणि आमचं व्यक्तिमत्त्व घेऊन लाटे मागून लाट असे साहित्यात आलो. नवे जग आमचे आहे या जाणीवेने आणि आमच्या त्याच्यावरील प्रेमाने आम्ही एकत्र आलो होतो." या जाणीवेचा नितांत प्रत्यय शोलोखोव्च्या सर्वच साहित्यात आपल्याला सतत येत रहातो. थॅकिमेन्को म्हणतो त्याप्रमाणे शोलोखोव्च्या कथांतून नेहमी दोन परस्परविरोधी शक्तींचे संघर्ष टिप-लेले असतात. समाजवादाच्या उगवत्या जगातील लोक आणि चिवटपणे भूत-काळाला चिकटून राहणारे लोक यांच्यातील संघर्ष-कुलक ( Kulaks ) आणि व्हाईटगार्ड. दोन विसंगत तत्त्वांचा झगडा तो नाटयमयतेने वर्णन करतो. एक मानवता व दुसरं संपत्तीवर आधारलेली प्रतिष्ठा.

## ' डॉन संथ वहाते आहे ' आकार घेते

१९२५ साली मॉस्को सोडून शोलोखोव् आपल्या डॉन प्रदेशात परत आला. तेव्हापासून त्याने आपलं जीवन फक्त लेखनासाठी वाहून घेतलं. लगेच दुसऱ्या वर्षी त्याने आपल्या युद्धपूर्व आणि युद्ध काळातील कोझॅक लोकांचं जीवन वर्णन करणाऱ्या सुप्रसिद्ध कांदबरीचा पहिला खंड लिहायला घेतला. खरं म्हणजे ' आणि संथ वाहतेय डॉन ' त्याने लिहायला घेतली तेव्हा तो वीस वर्षांचा होता. दोन वर्षापूर्वीच त्याची लेखन कारकिर्द सुरू झाली होती. त्या लेखनाकाळाबद्दल आपल्या आत्मचरित्रात तो लिहितो, ' १९२५ च्या शिशिरऋतूत मी ' आणि संथ वाहतेय

पडलेला असतो. पण हे बंडखोर 'लाल सैन्या'शी हात जुळवणी करीत नाहीत. या बंडखोरांची दिशाभूल करण्यात आलेली असते. संभ्रमाच्या भोवऱ्यात त्यांची फर–फट झालेली असते. त्यांना कामकरी वर्गाच्या क्रांतिविरुद्ध होणाऱ्या लढाईसाठी वर्गद्रोहीपणाने प्रवृत्त केलेले असते. या घटनेतच त्यांच्या पुढे होऊ घातलेल्या शोकांतिकेची बीजे असतात हे वाचक चाणाक्षपणे ओळखतो. शोलोखोव् 'इतिहासाच्या एका प्रवाहावर काव्यमय शिक्कामोर्तब' करतो. याचे कारण इतिहासांच्या जडण–घडणीची मूलभूत तत्त्वे तो चांगल्या प्रकारे ओळखतो. आपल्या कादंबरीसाठी. म्हणूनच तो समर्थपणे एक कथनशैली निवडतो. पात्रांची समूहरचना करतो. आपल्या प्रमूख पात्रांची वैयक्तिक सुखदुःखे लेखकाला प्राप्त झालेल्या विविध अभिव्यक्ती साधनांतून साकार करीत जातो. मॅक्झिम गॉर्की यानी मध्यस्थी केल्यावर 'आणि संथ वाहतेय डॉन' चा तिसरा खंड प्रसिद्ध झाला व लगेच शोलोखोवने चौथा खंड लिहायला घेतला.

शोलोखोवला चौथा खंड लिहायला प्रदीर्घ काळ लागला. " सगळं काही बराच काळ माझ्याजवळ कच्चं टिपलेलं होतं. " तो नंतर म्हणाला, " परंतु त्यावर मी सतत पुनः पुनः काम करीत होतो. " शेवटी १९३४ – ३५ साली एकदाचा कादंबरीचा अंतिम आकार ठरला. " आणि संथ वाहते डॉन " ही कादंबरी चार खंडात प्रसिद्ध होईल असे लेखकानेच जाहीर केले. ग्रिगरी मेलेखोवला कोणकोणत्या प्रसंगातून कसे न्यायचे याची रुपरेखा कादंबरीकाराच्या मनात स्पष्ट झाली होती. तिसऱ्या खंडाच्या शेवटी व्हेशेन्स्कायाजवळ बंडखोरांच्या तुकडीचे नेतृत्व मेलेखोव करीत असतो. तिथून तो उत्तरेकडे, बालाशोव्हकडे हल्ला करतो. पण त्याला ' व्हाईट ' सैन्याबरोबर नोव्होरोसिस्ककडे माघार घेणे भाग पडते. नंतर दक्षिणेकडे ' व्हाईट ' सैन्याचा पूर्ण धुव्वा उडतो आणि कोझॅकांचा सशस्त्र लढा संपुष्टात येतो. तेव्हा मेलेखोव लाल सैन्यात सामील होतो. पोलंडच्या आघाडीवर तो पहिल्या घोडदळासह लढतो. त्यानंतर काही काळाने तो लुटारुंच्या टोळीत सामील होतो. सामाजिक व ऐतिहासिक वास्तवाच्या संदर्भात आपण ग्रिगरी मेलेखोव ज्या परिस्थितीतून निर्माण झालेला दाखवलाय, त्याबद्दल लिहिताना शोलोखोव् निक्षून सांगतो, " मेलेखोवची नियती ही विशुद्धपणे एक वैयक्तिक घडामोड आहे. ते काही मध्यम–कुणबी कोझॅकांचं कोणतं वैशिष्ट्य आहे असं सुचविण्याचा माझा मुळीच इरादा नाही. मी त्याला अर्थातच ' व्हाईट ' लोकांपासून वेगळा करतो. परंतु मी त्याचा ' बोल्शेविक ' होऊ देणार नाही. तो बोल्शेविक नाहीय. "

१९३७ च्या अखेरीला १९३८ सालच्या प्रारंभाला सातवा भाग 'नोव्ही मिर' मध्ये प्रसिद्ध झाला. १७ डिसेंबर १९३८ ला आपली आठव्या भागाची कच्ची प्रत तयार झाल्याचे लेखकाने सांगितले. आपल्या कादंबरीच्या अंतिम भागावर काम करायला या काळातच शोलोखोव्हने सुरवात केली. २० मार्च १९३९ रोजी झालेल्या एका मुलाखतीत शोलोखोव् म्हणाला " मी नक्कीच ती फेब्रुवारीत लिहून पूर्ण करीन'. त्याप्रमाणे १९४० साली ' नोव्ही मिर ' च्या दुसऱ्या व तिसऱ्या अंकात कादंबरीचा आठवा आणि शेवटचा भाग प्रकाशित झाला. १९३० ते ४० काळातील सोव्हिएट साहित्यात परंपरेला छेद देणारे नवे बदल घडून येत होते. नवा सोव्हिएट माणूस घडत होता व त्याचे दर्शन देण्याची उत्सुकता सोव्हिएट साहित्याला लागली होती. जीवनाच्या विलक्षण विविध अंगांनी हा नवा सोव्हिएट मानव सोव्हिएट साहित्यातून प्रकट होत होता. हा समाजवादी मानव आपल्या, गुणवत्तेने कसा विकसित होत होता याचे प्रतिबिंब विश्वव्यापी ऐतिहासिक संदर्भात काही पुस्तकातून, दैनंदिन वास्तवाच्या चित्रणासह, प्रत्ययकारिकतेने उमटत होते या काळातील साहित्यातून प्रकट होणारी कथानकांची व साहित्यप्र कारांची विविधता नव्या सोव्हिएट माणसाच्या चैतन्यगर्भ विकसनशील जीवन वैभवाची अनुभूती वाचकांना समृद्धपणे देत राहते. हा नवा सोव्हिएट मानव केवळ वर्तमान काळा–चाच अर्थ व त्या काळातील आपले स्थान शोधत नव्हता किंवा तो नजिकच गुदरलेला क्रांतीचा आणि यादवी युद्धाचा भूतकाळ धुंडाळीत नव्हता. तर तो आपल्या लोकांच्या संपूर्ण इतिहासाचाच काळजीपूर्वक अभ्यास करीत होता. इतिहा–सातील लोकोतरांचा मागोवा घेत होता. आणि ' संथ वाहते डॉन ' च्या शेवटच्या भागात ऐतिहासिक विकसनशीलतेचे नियम प्रत्ययकारिकतेने व ठामपणे देण्याचा, अवघड प्रयत्न कलात्मकतेने कादंबरीकाराने केलेला सूज्ञ वाचकाला जाणवल्या–वाचून रहात नाही. या महाकाव्याचे रूप धारण करणाऱ्या महाकादंबरीचा महान चित्रफलक कादंबरीकार विविध घटनांनी, विविध पात्रांनी व विविध रंगांनी पण विलक्षण ताकदीने नटवून सजवून टाकतो, आणि तरीही त्यातील बैणिक तरलता व काव्यात्मकता तो टिकवून ठेवतो. मानवी परस्परविरोधी भावनांचे व विकारांचे सुखदु:खदायी खेळ जसे तो प्रभावीपणे चित्रित करतो त्याचप्रमाणे त्यांच्या शोकांतिक जीवनातील वैय्यर्थाला अर्थकारी संपन्न विनोदाची जोडही द्यायला तो विसरत नाही. गॉर्कीने एकदा कादंबरीकार फेदिनला लिहिलं होतं, " कला ही जर प्रामाणिक व विमुक्त असेल तर ती कधीच जुजबी नसते. नव्हे, ती एक जीवन आणि मनुष्याबद्दलचा पवित्र ग्रंथ असते. " कलेची ही उत्तुंग संकल्पना डॉन संथ वहातच आहे.

शोलोखोव्च्या कादंबरीला निश्चितपणे लागू होते. ती कामकरी, कष्टकरी माण–साच्या प्रेमाने व आदराने ओतप्रेत भरलेली असते.

## ग्रिगरी मेलोखोवची शोकांतिका :

डॉन कोझॅक ही सर्वसामान्य कुणब्यांपेक्षा एक वेगळी जमात होती. त्यांना सरंजामी दास्यत्व कधी ठाऊक नव्हतं. त्यांचं शिक्षण वेगळं होतं तसंच त्यांना लहानपणापासूनच लष्करी सेवेसाठी तयार करण्यात आलं होतं. त्यांना धीटपणाचं आणि लागेल ती वस्तू हस्तगत करण्याचं बाळकडूच झारच्या राजवटीत पाजण्यात आलं होतं. झार सरकारने त्यांना आपण एक विशेष जातिजमातीचे लोक आहोत याचा अभिमान बाळगायला नेहमीच उत्तेजन दिलं होतं. ' मुझिक ' आणि नागरी कामगार वर्गाचा तिरस्कार करायला शिकवलं होतं. झार आणि देश याचे आपण एकनिष्ठ सेवक आहोत असा अभिमान त्यांच्या रोमारोमात भिनला होता. लहान–पणापासूनचा ग्रिगरी मेलेखोवच्या मनात 'कोझॅक' हा एक अतिशय गौरवाचा किताब आहे असं बिंबविण्यात आलं होतं. झारचे अधिकारी, कोझॅक जमीनदार, बडे शेतकरी ( Kulak ) आणि अन्य सत्ताधीश मोठ्या कौशल्याने व दक्षता–पूर्वक कोझॅकांची ही जातीय अलिप्तता पोसत होते व जपत होते. तिचे प्रत्यंतर प्रकर्षाने नंतर यादवी युद्धात आलं. क्रांतिकारी रशियामध्ये डॉन कोझॅक यानी सवता सुभा व स्वतःची 'कोझॅक परंपरा' प्रस्थापित करण्याची अलगतावादी चळ–वळ केली. जमिनीचा भलामोठा तुकडा देऊन कोझॅकांना वश करण्यात येई. कोझॅक 'बाहेरच्या' कुणब्यांचं आणि भूहीन रहिवाशांचं शोषण करीत. गरीब आणि मध्यम कोझॅक आपल्या कुटुंबियांच्या मदतीने आपली जमीन आपणच कसीत असत. मेले–खोव कुटुंब मध्यम कोझॅक होते. त्या कुटुंबाचा प्रमुख पॅनोलिय प्रोकोफोविच म्हणतो "यंदाचा हंगाम सोडून दिला तरी आपल्याकडे दोन वर्षे पुरेल इतके धनधान्य भरलेले आहे." उलट इलियनिचना म्हणते, "मी आणि माझा म्हातारा रात्रंदिवस आम्ही गुलामासारखे शेतावर खपत होतो." लिस्टनिट्स्कीसारख्या कोझॅक सेनापती व अधिकाऱ्यांजवळ हजारो एकर जमीन होती. आपल्या तातास्कीं खेड्यात कुलक मिरॉन कोर्शुनोव्हने प्रचंड संपत्ती आणि सत्ता हस्तगत केली होती. त्याने कायमचे मजूर कामाला लावले होते. जमीन विकत घेतली होती. जनावरांची जोपासना केली होती. व्यापारी मोखोव आणि त्याचा भागीदार आटेपिन तर सावकारी व्याजाने कर्जाऊ रक्कम देऊन गरीबातील गरीब कोझॅकांना पिळून काढीत होते.

'आणि संथ वाहते डॉन ' मध्ये शोलोखोव रशियाच्या क्रांतिकाळातील कोझॅक जीवनाची ही विसंगती व विषमता उघड करून देतो. मिखैल कोशेव्हाय सारखा कोझॅक, आपली स्वत:ची जमीन कसता येत नाही म्हणून वेठबिगार मजुराचे काम करतो. क्रोतल्यारोव सारखे कोझॅक आपली जमीन सोडून मोखोवच्या गिरणीत काम करतात. ते अर्ध कुणवी अर्ध - कामकरी होतात. या गरीब खेडूतांमध्ये एक खोल असंतोष धुमसत असतो. 'नेव्ह' या टोपण नावाच्या मोखोवच्या गिरणीतील कामगाराला १९०५ साली झालेल्या श्रमिकांच्या उठावाची आठवण असते. धनिकांचा द्वेष त्याच्या नसानसात भरलेला असतो. पुन: एक क्रांती घडून येणार आहे आणि शोषकांचा समूळ उच्छेद होणार आहे याचा त्याला भरंवसा वाटत असतो.

यादवी युद्ध आणि क्रांती आली. सगळा देश पेटून उठला. पण तत्पूर्वी ग्रिगरी मेलेखोवने सामाजिक प्रश्नांचा कधीच विचार केला नव्हता. मेलेखोव कुटुंब श्रीमंत नव्हतं. पण खाऊन पिऊन सुखी होतं. समाजात त्या कुटुंबाला आदर मिळत होता. ग्रिगरीचं आपल्या शेत जमिनीवर प्रेम होतं. तीवर तो कामही करीत होता. त्याचा बाप पॅन्टेली प्रोकोफेविच झारच्या लष्करात सिनियर सार्जंण्ट होता. म्हणजे त्या कुटुंबाच्या सन्मानाची ती अधिक बाजू होती. ग्रिगर सुद्धा सैन्यात दाखल होतो पण रणांगणावर लढत असताना सुद्धा त्याला त्याची शेतजमीन आठवत रहाते. कोझॅक कुटुंबपद्धती ही पितृसत्ताक होती. बाप हा घरादाराचा एकमेव मालिक होता. लहानपणापासूनच कोझॅक मुलावर, त्याने बापाची आज्ञा पाळणे व त्याची भीती बाळगणे याचे संस्कार होत असत. ग्रिगरीच्या बापाने भर गावात आपली अवज्ञा केल्याबद्दल मुलाची पाठ आपल्या कुबडीने फोडून काढली होती. वरिष्ठ कोझॅकांना कनिष्ठ कोझॅकांना शिक्षा करण्याचा अधिकार होता. ग्रिगरी धैर्यशाली व संवेदनशील होता. आपल्या कुटुंबाशी त्याने चांगलं जुळवून घेतलं. गावात अक्सिन्याशी त्याची भानगड होती यामुळे त्याने कुळाला कलंक लावला होता. पण बापाने त्याचे लग्न ठरविल्यावर तो निमूटपणे नताल्याशी लग्न करायला बोहल्यावर उभा राहिला. तसं पाहिलं तर ग्रिगरीच्या बोलण्या चालण्या वागण्यातून त्याच्या अंगी असलेल्या माणुसकीचा प्रत्यय वाचकाला निरंतर येत रहातो. त्याच्या कुटुंबातील भांडणं असोत, युद्धातील पेचप्रसंग असोत किंवा दैनंदिन जीवनातील बारकावे असोत, ग्रिगरीला त्याची न्यायबुद्धी, आत्मप्रतिष्ठा व त्याचं जीवनावरचं उत्कट प्रेम काही कधी सोडून जात नाही. ज्या जगात ग्रिगरी वावरतो त्या जगाचा तो एक अवश्यमेव घटक आहे

असेच कादंबरीकार नेहमी सूचित करतो. अक्सिन्या व नताल्या या दोन्ही स्त्रियांशी तो संबंध ठेवतो व त्या दोघींवरही तो प्रेम करतो. पण प्रत्येकीवरील त्याच्या प्रेमाची तऱ्हा वेगवेगळी आहे. अक्सिन्या आपल्या मनुष्य घातक सौंदर्याचा अभिमान बाळगणारी आहे. उच्छृंखल आहे. उलट नताल्या शांत, संयमशील, श्रद्धाळू व प्रेमळ पत्नी व माता म्हणून आपल्या मनात ठसते. अक्सिन्याचे लेफ्टनंट लिस्ट- निट्स्कीशी लागेबांधे आहेत. हे ध्यानात आल्यावर ग्रिगरी तिला गुरासारखी बदडून काढतो आणि तरी रणांगणात आघाडीवर लढत असताना त्याला सारखी अक्सिन्याची आठवण येत रहाते. ग्रिगरीला राजकारणचं ज्ञान जेमतेमच असतं. भाबडेपणाने तो झार व देश यानाच प्राणपणाने मानीत असतो. एक कोझॅक म्हणून आपले लष्करी कर्तव्य तो एकनिष्ठेने पार पाडीत असतो. मात्र जेव्हा मिलिटरी इस्पितळात त्याला सैनिक गरांझा भेटतो व त्याला बोल्शेविकांचं तत्व- ज्ञान समजावून सांगतो तेव्हा त्याचे डोळे लखकन उघडतात. बोल्शेविक गरांझाने आपल्या चतूर युक्तिवादाने त्याला युद्धाचं वैय्यर्थ पटवून दिलेलं असतं. त्या रात्री ग्रिगरीची झोपच उडते. मध्येच भर रात्री गरांझाला झोपेतून जागा करून तो रागारागाने त्याला विचारतो, " तू म्हणतोस की धनिकांच्या फायद्यासाठी आप- ल्याला मृत्यूच्या खाईत लोटलयं ? पण मग लोकांचं काय ? त्याना समजत नाही? युद्ध कसं थांबवता येईल यावर त्याने जोरदार वादविवाद केला. मग तो गरांझाला म्हणाला, " म्हणजे प्रत्येक गोष्ट उलटीची सुलटी केली पाहिजे. असं तुझं म्हणण आहे ? आणि नवं सरकार आल्यावर तू युद्धाचं काय करणार आहेस ? तू युद्धाचं मूळ कसं उपटून काढणार आहेस ? युगानुयुगे माणसे लढत आली नाहीत काय ?" गरांझाकडे प्रत्येक प्रश्नाला उत्तर होतं. मग त्याचे आभार मानून त्याचा निरोप घेताना ग्रिगरी म्हणतो, " अच्छा, खोखोल, माझे डोळे उघडल्याबद्दल तुझे आभार मी आता पाहू शकतो. माझी समज तितकी चांगली नाहीय . . . "

ऑक्टोबर क्रांतीच्या पहिल्या महिन्यामध्ये ग्रिगरी बोल्शेविकाना 'व्हाईट' लोकांविरुद्ध येऊन मिळाला. नंतर पुढे त्याने आपला मार्ग बदलला तरी त्याच्या विचारांना जोरदार चालना मिळाली हे लक्षात घेतले पाहिजे. याकिमेंको 'शोलोकोव्ह' या आपल्या पुस्तकात ग्रिगरीच्या व्यक्तिमत्वाची चिकित्सा करताना लिहितात, "मध्यम कुणबी वर्गाची पार्श्वभूमी असलेल्या एका माणसाला आपल्या महाकादंबरीचा नायक करुन शोलोखोव यांनी क्रांतीच्या काही मूलभूत समस्या उलगडून दाखविल्या आणि तिची सामाजिक व राजकीय अनुभूती दिली."

'श्रमिक कुणबीची, व्याख्या लेनिनने अचूक दिली होती, त्याने लिहीलं होतं, "कुणबी हे अर्ध-मजूर व अर्ध-संपत्तीधारक आहेत." ग्रिगरी मेलेखोवच्या मानसिकतेत या सत्याचा प्रत्यय वाचकाला येतो. लोकांविरुद्ध लढताना ग्रिगरीच्या मनातील सुंदर व कोमल भावभावनांचा चुराडा होतो. आपल्या पत्नीशी अप्रामाणिक राहिल्याबद्दल त्याला टोचून बोलताना नताल्या विचारते, "तुला शरम नाही वाटत?" जणू कुणी एक भाबडी पोर बालिशपणे आपल्याशी बोलतेय अशा अविर्भात ग्रिगरी हसतो आणि म्हणतो, "हं ! शरम ! . . . शरम कशाशी खातात हे मी विसरून गेलोय ज्याच्या सगळ्याच जीवनाचा बट्टयाबोळ झालाय त्याला शरम कशी काय वाटणार?" एकदा त्याची आई वैतागून ग्रिगरीला म्हणते, 'तुझ काळीज लांडग्याच असलं पाहिजे." त्याची बहिण दुनिया हीचंही तेच मत असतं. शोलोखोवने ग्रिगरीची रशियन लांडग्याशी तुलना करून त्याच्या जीवनाची शोकांतिका अधिक उत्कट व परिणामकारक केली आहे. त्याच्या जीवनात घडणाऱ्या आत्मविघातक अदला–बदलींची व चंचलतेची चुणूक दाखविली आहे. ग्रिगरीच्या अंत:करणातसदैव अंत-र्कलह उफाळलेला असतो. त्याच्या अंतर्यामातील नाना तऱ्हेचे अंतर्विरोध त्याचा छळ मांडतात, त्याची झोपमोड करतात. त्याला त्यांच्यावर उपाय सापडेनासा होतो. ते त्याला उध्वस्त करतात. नताल्याला आवेगाने तो एकदा म्हणतो, मुलांची मला क्वचितच काळजी वाटते आणि मी माझा स्वत:चा विचार केलेला नाही. लढाईने मला आतून कोरडं केल आहे. मी टणक झालोय . . माझ्या अंत:करणात डोकावून पहा . . आणि तुला दिसून येईल की एखाद्या कोरड्या विहरीसारखेच ते काळंकुट्ट आहे. . ". खरोखरच मेलेखोवच्या जीवनाची शोकांतिका गडद काळ्या रंगाची आणि यातून रिक्त कोरडी अशी आहे.

## ' आणि संथ वाहतेय डॉन ' मधील स्वभाव चित्रण :

प्रभावी व्यक्तिचित्रण हे रशियन साहित्याचं पूर्वापार वैशिष्टय नेहमिच टिकून राहिलेलं आहे. शोलोखोव देखील आपली व्यक्तिचित्रणे सजीव व गतिमान अशी रेखाटतो. १९२८ साली ए. एस. सेराफिमोविच यानी शोलोखोवच्या लेख-णीचं स्वभावचित्रणाचं सामर्थ ओळखलं होतं. यावेळी यानी लिहीलं होतं, "किती तरी काळजीपूर्वक काढलेल्या रेखा चित्रासारखी तो ( शोलोखोव ) आपली पात्रे ' लिहीत ' नाही. उसळणाऱ्या रंगबहार गर्दीसारखे लोक याच्या पुस्तकातील पानात फेकले जातात. तिथे प्रत्येक माणसाला आपलं स्वत:चं नाक असतं. स्वत:च्या

आठचा असतात. त्यांच्या कावळ्याच्या पायांबरोबर स्वतःचे डोळे असतात. स्वतःचे शब्दोच्चार असतात आणि प्रत्येकजण आपल्या विशिष्ट पद्धतीने चालतो व आपले डोळे वळवतो." शोलोखोवची लेखनकला ही चित्रदर्शी आहे. पण त्याबरोबरच तो आपल्या पात्रांचे मानसशास्त्रीय चित्रणही अचूक व नेमके करीत रहाते. जणू काही प्रत्येक पात्राचा वाचकाला साक्षात्कार होत रहातो. आपल्या कादंबरीतील प्रत्येक पात्राची विशिष्ट भावावस्था, त्यांच्या आंतरिक भावनांचं निश्चितरूप शोलोखोव ताकदीने टिपतो. या बाबतीत त्याची तुलना टॉल्स्टॉयशी करता येईल. माणसाच्या केवळ बाह्य रूपातच तो अडकून रहात नाही तर त्याची जी अंतर्बाह्य छाप त्याच्या जाणीवेत उमटलेली असते तिचा शोध घेत शोलोखोव आपली पात्रनिर्मिती करतो. विशेषतः त्याच्या कादंबरीतील नायकाबद्दल हे विशेषच जाणवतं. ग्रिगरी मेलेखोव हा तसा एक नायक आहे. ग्रिगरीच्या जळजळीत निळसर डोळ्यांचं जसं तो रंगतदार वर्णन करतो तशीच त्याची कौटुंबिक स्वभाव वैशिष्ट्येही तो त्यातील आनुवंशिक बारकाव्यासह रेखाटतो. वेगवेगळे अनुभव घेताना पात्राचा स्वभाव कसा बदलत जातो त्याचं सूक्ष्मतम दर्शन शोलोखोव कलात्मकतेने देतो. गंभीर आजारातून ग्रिगरी बरा होतो व सभोवार जगाकडे पाहतो तेव्हा त्याला एका नव्या जगाचा साक्षात्कार होतो. त्याच्या चेहऱ्यावर साधं बालसदृश्य हास्य उमटतं. त्याचा राकट चेहरा आणि लांडग्यासारखे जनावरी डोळे मऊशार हळुवार होतात. यादवी युद्धात, व्हेशेन्स्काया उठावात आणि नव्याने जन्माला आलेल्या तरूण सोव्हिएट राज्याविरूद्ध फोमिनच्या तुकडीत सामील झालेल्या ग्रिगरीची वेगवेगळी दर्शने शोलोखोव प्रत्यय-कारिकतेने देतो. शेवटचे ग्रिगरीचं दर्शन वाचकाला होतं ते त्याच्या लहान मुलाच्या-मिश्ताकाच्या- डोळ्यांतून. " मिश्ताकाने त्याच्याकडे भयभीत होऊन पाहिलं आणि त्याची नजर खाली गेली. त्याला जाणवलं की हा दाढीवाला आणि भयंकर दिसणारा माणूस त्याचा बाप आहे."

' आणि संथ वाहते डॉन , या महाकादंबरीचा चित्रफलक विशाल आहे. या फलकावर इतर अनेक पात्रांबरोबर ठळकपणे उठून दिसतो तो ग्रिगरी मेलेखोव. त्याच्या मनातील वादळ, शंका, चांचल्य, गोंधळ आणि संघर्ष रशियन जनतेच्या क्रांतिकारी लढ्याच्या पार्श्वभूमीवर कादंबरीकार चित्रित करतो. दोन परस्पर विरोधी जगाचा तो संघर्ष असतो. तो कोणता अमूर्त व गूढ असा अध्यामिक झगडा नसतो किंवा कोणत्या नैतिक तत्त्वांचा त्यात विजय किंवा पराजय झालेला नसतो. ग्रिगरी मेलेखोवला सामाजिक सत्य जाणून घेण्याचा ध्यास लागलेला असतो. यादवी युद्धात तो सामील होतो त्याच वेळी त्याला एकामागून एक निर्णय पटापट घ्यावे

लागतात. चुकामागून चूका त्याच्या हातून घडत रहातात आणि पावलापावला-गणिक त्याची वाट चुकत रहाते. एका व्यापक ऐतिहासिक घडामोडींच्या पातळीवर कादबरीकार ग्रिगरी मेलेखोव या पात्राची उभारणी करीत रहातो. त्यात माणसांचं अंत:करण हीच एक युद्धभूमी झालेली असते व तीवर नव्या जुन्याचे युद्ध पेटलेले असते. शेवटी ग्रिगरीची जी भयानक अवस्था होते ती इतिहासानेच त्याला दिलेली निष्ठूर शिक्षा असते. ग्रिगरीबरोबरच अक्सिन्या आणि नताल्या व ग्रिगरीची आई इलियनिचना ही स्त्री पात्रे कादंबरीत सजीव व गतिमान होऊन वावरतात. मातृत्वाच्या प्रबळ भावनांनी इलियनिचनाचं हृदय भरलेलं असतं तर अक्सिन्या व नताल्या उत्कट सर्वग्राही प्रेमाचं प्रतीक होऊन रहातात. त्यांच्या प्रेमाची उत्कटता व अलौकिकता ग्रिगरीचं व्यक्तिमत्व निस्तेज करीत रहाते. ऐतिहासिक विकसनशीलतेच्या शास्त्रीय ज्ञानातून कादंबरीकाराची सौंदर्यलक्षी जाणीव आपलं भरणपोषण करते आणि त्यातूनच सामाजिक, ऐतिहासिक व व्यक्तिगत वास्तवाचं लेखकाचं भान अतूट व अचूक रहातं. मॅक्झिम गॉर्कीने आपल्या साहित्य विचारातून दिलेली 'समाजवादी वास्तवतावादाची' संकल्पना (Socialist Realism) शोलोखोवच्या 'आणि संथ वाहते डॉन' या महाकादंबरीत पुरेपूर साकार झाल्याची प्रचिती वाचकाला येत रहाते.

गॉर्कीप्रमाणेच शोलोखोवच्या कादंबरीतील लहानमोठी पात्रे आत्मपरीक्षण करताना आढळतात. परंतु गॉर्कीहूनही वेगळी अशी स्वत:ची पद्धती शोलोखोव 'आणि संथ वाहते डॉन' या कादंबरीतील पात्रांना अंतर्मुख करण्यासाठी वापरतो. ही पात्रे नेहमी आंतरिक स्वगत (inner monologues) बोलतात. ग्रिगरी स्वत:शीच स्वत:बद्दल बोलतो तद्वतच तो स्वत:बद्दल इतरांशीही मोठ्याने बोलतो. स्वभावत: तो बहिर्मुख आहे पण परिस्थिती त्याला अंतर्मुख बनवून आत्मपरिक्षणाला उद्युक्त करते. साहजिकच या पद्धतीने लेखक आपल्या पात्रांचे मानसिक विश्लेषण सूक्ष्मपणे करतो व त्यांच्या स्वभावातील परस्पर गुंतागुंतीचे अंतर्विरोध तपशीलवार टिपतो. पुष्कळदा या कादंबरीतील मुख्य पात्रांच्या मनातील विचार स्वयंकथनपद्धतीने तसेच तृतीय पुरुषी सुद्धा प्रकट होतो. स्वाभाविकच त्या त्या पात्रांचे त्यालाही ठाऊक नसलेले त्याचे आंतरिक विश्व त्यातून विस्तृत उलगडले जाते. या कादंबरीचा चौथा खंड त्या दृष्टिने लक्षणीय ठरतो. या महाकादंबरीवर आणि तिच्यात प्रकट झालेल्या मानवी वास्तवावर या खंडात शिक्कामोर्तब होतं. या खंडातील प्रत्येक घटना, प्रत्येक दृश्य, प्रत्येक तपशीलसुद्धा, अर्थपूर्ण आहे असे याकिमेन्को म्हणतो ते खरेच आहे. ग्रिगरी मेलेखोवचं जीवन संपुष्टात येतं तसा

वाचकही त्याचं जीवन अधिकाधिक जाणून घ्यायला अधीर होतो. याकिमेन्को या खंडाचे विश्लेषण करताना म्हणतो, "संपन्न, अभिव्यक्त होत जाणारी प्रतिमा–सृष्टी हा शोलोखोवच्या गद्यलेखनाचा विशेष गुण आहे. प्रत्येक ओळ प्रत्येक वाक्यप्रयोग स्पंदन पावतो. जिवंत असतो. प्रत्येक संतुलन संपूर्णपणे अधिकृत, सुस्पष्ट व गतिमान असते. एका प्रबळ मानवी भावनेने ती ओथंबून भरलेली असते. ती वाचकाच्या सगळ्या हृदयतारा छेडीत रहाते." कादंबरीची अखेरची प्रकरणे एका उदात्त दुःखवेदनेने व्यापलेली आहेत. गिगरीचं दुर्दैवी जीवन संपुष्टात येत असतं. तो एक जिवंत मरण जगत असतो. त्याच्या सुखदुःखात वाचकही समरस झालेला असतो. कधी कधी ग्रिगरीच्या जीवनाचा कालपट पाहून त्याला धडकी भरते. ग्रिगरीच्या जीवनाचं वास्तव त्याला भयभीत करतं. तो स्वतःलाच पुनःपुन: प्रश्न विचारीत असतो. ग्रिगरी मेलेखोवच्या शोकांतिकेचं मूलभूत कारण कोणतं असावं? या शक्तिमान भावना व विकारप्रबळ व बुद्धिमान माणसाच्या वाट्याला असा बदनाम जीवनान्त का यावा?

## 'आणि संथ वाहते डॉन'चा मराठी अनुवाद:

'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळा'ने मिखैल शोलोखोव यांच्या या महाकादंबरीचा अनुवाद मराठी भाषेत प्रसिद्ध करावा ही खरोखरच मराठी साहित्यातील महान घटना आहे यात संशय नाही. मॉस्को या रशियाच्या राजधानीत गेली अनेक वर्षे वास्तव्य करून राहिलेले श्री. नरेंद्र सिंदकर यानी हा मराठी अनुवाद मूळ रशियन कादंबरीवरून समर्थपणे केला आहे असे म्हणता येईल. या संपूर्ण महाकादंबरीचा शेकडो पात्रांचा व घटनांचा पल्ला लक्षात घेता नरेन्द्र सिंदकर यांनी केलेली ही मराठी अनुवादाची कामगिरी विशेष लक्षणीय ठरते. शोलोखो–वच्या या कादंबरीतील एकूण पात्रांची संख्या आठशेहूनही अधिक भरते. विशेषत: या कादंबरीतील स्थळ, पात्रे, प्रसंग व ऐतिहासिक जुने नवे संदर्भ, ग्रामीण व नागरी जीवन, उच्चभ्रू तसेच तळागाळातील लोकभाषेचे ढंग व लोकबोलीतील वाक्यप्रयोगांचे बारकावे, स्त्रीपुरुषांच्या ग्रामीण व कौटुंबिक स्तरावरील बोलण्या–चालण्याचा विशिष्ट प्रकार, लोकाचार व लोकम्हणी, लोकसंस्कृती या सर्व लोक–जीवनाचे रशियातील व विशेषतः डॉन परिसरातील जिवंत व बोलके वास्तव नरेंद्र सिंदकर यांनी केलेल्या या महाकादंबरीच्या मराठी अनुवादात प्रकर्षाने उमटते व तीच अनुवादकाची एक अनुवादक म्हणून खरी कमाई ठरते. रशियन भाषेचा मी स्वतः अभ्यासक नसल्यामुळे रशियन भाषेतून इंग्रजीत

झालेला या कादंबरीचा अनुवाद डोळ्यासमोर ठेवूनच मी गेले कित्येक महिने श्री. सिदकर यांनी मराठीत केलेल्या या अनुवादाचा तुलनात्मक अभ्यास करीत आहे. उत्तम अनुवादकाचं असं लक्षण सांगितलं जातं की त्याने अनुवाद केलाय हेच मुळी त्याचा अनुवाद वाचताना लक्षात येत नाही. ज्या अभिजात साहित्यकृतीचा अनुवाद परभाषेवरून स्वभाषेत एखादा अनुवादक करीत असतो त्यावेळी ती साहित्यकृती तो सर्वार्थाने व सर्वांगाने पुनः जगत असतो. वस्तुतः तो द्विज बनून दोन जन्मांच्या फेऱ्यातून जात असतो. एक त्याचा जन्म त्या अभिजात साहित्यकृतीची संपूर्ण अंगकाठी आत्मसात करण्यात खर्ची पडतो, व त्याचा दुसरा जन्म त्यातून त्याला येणाऱ्या अनुभूतीची पुनराभूती प्रत्यक्ष भाषेच्या माध्यमातून साकार करण्यात गुंतलेला असतो. दोन जन्माच्या या सर्जनशील प्रक्रियेतून तो जाणीवेने जात असतो. 'डॉन संथ वाहतच आहे' असं शीर्षक श्री. सिदकर आपल्या मराठी अनुवादाला देतात आणि ते समर्पकच ठरतं. या महाकादंबरीची विभागणी पाच पर्वांमध्ये झालेली आहे. नुसत्या पहिल्या तीन पर्वांतच दीडशेहून अधिक पात्रे वावरताना आपल्याला विविध स्थळी, विविध काळी व विविध प्रसंगातून भेटतात. त्यांच्या नावांची यादी द्यायची झाली तरी सुध्दा पानामागून पाने भरून जातील आणि एका मर्यादित प्रस्तावनेत या सर्व पात्रांच्या स्वभाववैशिष्टयांचे व वैचित्र्याचे बारकावे नेमके टिपणे अवघड व अनावश्यकही आहे. मूळ महाकादंबरीच्या महा अरण्यात मराठी वाचक स्वतःला ज्या समरसतेने व समझोत्याने धुंदफुंद होत झोकून देईल त्याप्रमाणे त्याला त्या अरण्यातील विस्मयकारक व मनाला व बुद्धीला कलानुभुतीने व जीवनानुभूतीने व्यापून टाकणाऱ्या स्थळकाळपात्रांचा परिचय आपोआपच समृद्धपणे होत जाईल. नरेन्द्र सिदकर यांनी केलेला हा मराठी अनुवाद शोलोखोवच्या मूळ रशियन भाषेतील लेखनाची मराठी प्रतिकृती ठरल्यावाचून रहात नाही. सर्जनक्षम साहित्यिक पातळीवर श्री. सिदकर अनुवादक म्हणून 'संथ वाहते डॉन' मराठीत सजीव साकार करतात व हे त्यांचे यश म्हटले पाहिजे.

प्रत्यक्ष आपल्या पतीला शय्यासोबत देत असताना आक्सीनीयाच्या मनात ग्रिगरीबद्दलच्या विचारांचे जे वादळ घुमत होते त्याचे वर्णन सिदकर यानी केलेल्या मराठी अनुवादात कसे उमटते ते 'पर्व पहिले' पृ. १०४ वर शेवटच्या परिच्छेदात वाचावे. तसेच त्याच पर्वात पृ. १२०, पृ. १५९ वरील संवाद व वर्णने वाचावीत. उदाहरणार्थ 'कझाक आणि रशियन अस्मिता व्यक्त करणारा पुढील संवाद पहाः-

भगदाडे पडलेल्या दातांतून ओझेरोव तिरस्काराने पचकन थुंकला. वाऱ्यावर उडणाऱ्या थुंकीकडे बघत तो पाय फाकून उभा राहिला.

' मी कझाक आहे ...! पण तू ...? तू कोण आहेस? जिप्सी?'

' तू आणि मी - - - दोघे रशियन आहोत !'

' थापा मारतोयस! '

आफोनकाने मुद्दाम आरोप केला.

' कझाक रशियनांच्याच कुळातले आहेत ! ठाऊक आहे तुला ?'

' मी तुला सांगतो ! कझाक कझाकांच्या कुळातील आहेत ? '

' खूप पूर्वी वेठबिगार जमिनदाराकडून पळून आले आणि डॉनवर त्यानी वस्ती केली. त्यानाच पुढे कझाक म्हणायला लागले. '

' अरे जा न ऽ आपल्या वाटेनं !'

पुढील आणखी एक नमुना पहा : (पर्व दुसरे. पृ. १८०)

संध्याकाळी नाईक व्होडका घेऊन आला ! दोन दिवस चंगळ केली ! पण नंतर आम्हाला त्यातली गोम कळली ! त्या पोरानं रांडीच्यानं आम्हाला जर्मनीतल्या सगळ्यात गाजलेल्या दंगलखोराचं चित्र दिलं होतं ! मी आपलं ते माझ्या बिछाऱ्यावर लावलं होतं ! त्या माणसाला पिकलेली दाढी होती ! मोठा खानदानी वाटत होता. शेटजी बिटजी सारखा दिसत होता ! जुमलेदारानं ते पाहिलं आणि विचारलं,

'काय रे ए भडव्या! कुठनं आणलं हे चित्र?'

मी त्याला सांगून टाकलं. तशी शिवीगाळ करीत माझ्या कानफटात द्यायला लागला.

'तुला ठाऊक आहे रे कोण आहे हा? हा त्यांचा आतामन कार्ल–च्यायला विसरलो सालं नाव-! काय बरं होतं?'

'कार्ल मार्क्स!' रुंद हसत स्तोकमनने सुचवले.

पृष्ठ ३२३ वरील 'तिसऱ्या पर्वा'तील कझाक जीवनाचे चित्रण, त्यांच्या श्री. सिंदकर यांनी मराठीत अनुवादीत केलेल्या लोकगीतांसह कसे लक्षवेधी ठरते ते पहाः-

जून महिन्याच्या उकडत्या सायंकाळी कझाक शेगडीभोवती गाणे म्हणत होते.

कझाक दूरच्या गेला मुलखाकड
खडचा रानावर फेकीत घोड
कायम ठेवून मागं खेडं
परत यायचा पुन्हा न इकडं

लोचदार मध्यमाच्या स्वरात शोकार्त हुंदका होता तर खर्जातून प्रगाढ मुलायम दुःख प्रकटले होते.

मध्यमाने शोकाची तीव्र पट्टी आता गाठली होती.

त्याची होती कझाक नवरी नव्या नवतीची उषा
उरी फोल ही घेऊन आशा निरखी उत्तर दिशा
सांज सकाळी वाट पाहते येईल साजणं घरी
कझाक दिलवर कधी न माझा जाईल सोडून दुरी

अनेक आवाजानी गाण्याचा भरणा केला आणि घरी बनविलेल्या 'बीअर' प्रमाणे ते समृद्ध झाले आणि भिनू लागले.

कडे पठारा पल्याड तेथे घुमताती वादळे
धरणी गोठून बर्फाखाली तडतडुनी तळमळे
देवदारू फिर राने झुकती खिन्नपणे तेथली
कझाक हाडे पडली, वरती हिमचादर ओढली

कझाकाची साधी कहाणी आवाज सांगत होते आणि एप्रिल महिन्यातील पाघळत्या धरणीवरील आकाशात चंडोलाने भरारी घ्यावी त्याप्रमाणे आपल्या कंपित स्वरांनी मध्यमानी ती कहाणी पेलली होती.

मरणादारी कझाक पडला ज्योत विझत चालली
काकुळतीने परी आर्जवे करितो शेवटली
थडग्यावरती माझ्या बांधा सान एक चौथरा
वरी वृक्ष अन् गावाकडला डाळो धवल फुलोरा

पुढील आणखी एक उतारा पहा: (पृ३४२: पर्व तिसरे)

'आणि खरोखर घडले होते काय? आपल्यासारखाच एक असणाऱ्या दुसऱ्या माणसाला ठार मारण्याचे कसब ज्यानी संपादन केलेले नव्हते ते सैनिक मृत्युक्षेत्री कवटाळत्या प्राणांतिक भयापोटी एकमेकांवर तुटून पडले होते. परस्परावर त्यांनी आंधळेपणाने घाव घातले होते. एकमेकांना झोडपून काढले होते. एकमेकांना आणि

एकमेकांच्या घोड्याला त्यांनी घायाळ केले होते आणि नंतर आपल्यातील एकाचा जीव घेणाऱ्या गोळीचा आवाज ऐकून ते मोहरा वळवून पळून गेले होते! नैतिक-दृष्टया लुळे होऊन ते घोडयावरून पसार झाले होते!

आणि ह्याला म्हटले जात होते शर्थीचा पराक्रम!
आणखी एक नमुना मला द्यावासा वाटतो (पृ. ३९२ : पर्व तिसरे)

'ज्युनिअर कॅप्टन कालमिकोव एक गुबगुबीत ठेंगणा अंमलदार होता. त्याचा तोंडावळा आणि नाव त्याच्या मंगोल वंशाची साथ देत होते. तावातावाने हातवारे करीत तो म्हणाला,

'हे युद्ध आपल्यासाठी नाय! मी चारशे वर्षं उशिरा जनमलो. प्येतर ठाउकाय'? स्क्वाड्रन कमांडर तेरसित्सेवला तो सांगत होता. 'प्यो' तर ऐवजी तो 'प्ये' तर असे ठासून म्हणत होता. 'ह्या युद्धाचा शेवट पहायला काही मी जगत नाय!'

'तुझं ज्योतिष राहू दे' आपल्या कॉकेशन चुग्यांखालून तो बोलला.

'ह्या ज्योतिषाच्या गोष्टी नव्हत! माझा हा शेवट आधीच ठरलेलाय! मी कुळकर आहे! इथं मी फालतू आहे! आज आपल्यावर भडीमार चालू असताना मी श्रमिष्टपणे थरथरत होतो. गनिम दिसत नाय हे आपल्याला सहनच होत नाय. मला वाटणारी दळभद्री भावना हे एक प्रकारचं भयचाय! कित्येक मैलां-वरून त्यानी तुमच्यावर भडीमार करण्याचा आणि रानमाळावर शिकारी मागं लागलेल्या माळढोकासारखं तुम्ही घोडी फेकीत रहायचं!'

ग्रिगरी मेलेखोवच्या संतप्त मनोवृत्तीचे दर्शन पुढील उताऱ्यात पडते ते असे:–
(पृ. ४४६: पर्व तिसरे)

'चकचकीत गणवेशातील हा जमाव आणि उंची सुगंधाची जंगी लाट ग्रिगरीच्या दिशेला वळली. दाढी वाढलेला, दुर्मुखलेला, ज्वरग्रस्त डोळ्यांचा ग्रिगरी आपल्या खाटेजवळ उभा होता. त्याच्या उंच गालफडावरील पिंगट कातडीच्या सूक्ष्म थरथरण्यातून त्याची क्षुब्धता प्रकट होत होती.

'हेच ते!' त्याच्या मनात येत होते. 'आमच्या घरच्या खेड्याखेड्यांतून आम्हाला हुसकून मरणाच्या खाईत फेकून देण्यात ज्याना मौज वाटते तेच हे

लोक! आह! डुकरीचे! मढी उचलली त्यांची! आमच्या पाठीवरच्या ह्या उवा आहेत उवा! दुसऱ्या माणसांचा धान्यदाणा आम्ही टापांखाली तुडवला आणि अनोळख्यांना ठार मारले ते काय ह्यांच्यासाठी? पिकाच्या खुंटातून मी सरपटत गेलो आणि ओरडलो! आणि आमचं भय? आमच्या घरादारापासून ह्यांनी आम्हाला तोडलं! बराकीतून फाके मारायला लावलं!' त्या जळजळीत विचाराने त्याचे डोके फुटायच्या बेताला आले. संतापाने त्याचे ओठ थरथरू लागले. 'त्यांची माजलेली चकचकीत थोबाडं पाहून घ्या! तुमच्या आयला! तुम्हालाच तिकडं पाठवतो! पाठीवर बंदुक देऊन घालतो घोड्यावर! उवांचा भारा लादतो पाठीवर! कुजलेला पाव आणि कीडे पडलेलं मांस खायला लावतो तुम्हाला!'

तर ग्रिगरी आपल्या जिल्ह्यातील पहिल्या खेड्यात पोचतो व काही मैलावर राहिलेल्या योगोदनोये या आपल्या खेड्याकडे चालू तेव्हा लागतो नदीच्या वळुं–जीखाली गावातील पोरे कझाक गीत गात होती. 'त्याचा नरेंद्र सिंदकर यांनी केलेला मराठी अनुवाद कसा मराठमोळा होऊन उतरतो पहा:
(पृ४४८-पर्व तिसरे)

**रानामागुन चमकत आले तलवारी भाले**
**कझाक शंभर दौडत दौडत आले मिशीवाले**
**तरूण अंमलदार तयांचा बिनिवरती स्वार**
**पाठीवरती कझाक घेऊन दौडतसे शंभर**

सणसणीत दाणेदार स्वच्छ सुराने गाणे पुढे नेले–

**चला गड्यांनु भिऊ नगा या**
**माझ्या मागुन या**

इतर गाणारांनी द्रुत लयीत सूर पकडला.

**अलंगावरी खुशाल सगळे चालुन जाऊ या**
**अलंगास त्या भिडेल पहिला**
**कझाक पट्टा तो**
**मानमरातब मिळविल सगळे कीरत**
**मिळविल तो**

अर्थातच नरेन्द्र सिंदकर यांचा 'डॉन नदी संथ वहातच आहे' याचा समग्र अनुवाद सगळाच सरळ, सरस व समाधानकारक उतरला आहे असे म्हणता येणार

नाही. पण अशा असमाधानाच्या बाबी अल्पप्रमाणातच आहेत, एवढीच या अनु–वादाची कमतरतेची बाजू आहे. उदाहरणार्थ या मराठी अनुवादाचे 'पहिले पर्व' शब्द योजना व वाक्यरचनेच्या अंगाने क्लिष्ट होत जाताना दिसते. असे अनेक शब्द विशिष्ट रशियन संदर्भात अनुवादकाने मराठीत आणले आहेत की ज्यांचा नीट अर्थबोध बिगर रशियन वा इंग्रजी भाषेच्या मराठी वाचकाला सहजपणे होणे अवघड झाले आहे. 'चरवणीचे फाटक' 'बळुंजीचे फाटक' 'बळदात गेला' 'गोटचाळ काठावर' 'आवाडातून' 'झगाराखालून' 'खडूळ' 'डांगेतून 'घाटा' 'टांगूलाच्या टोकावर' 'झिंजाडले' 'घमतड' 'गाठचाळ मूठ' 'दांडेरी' 'टेल्याटिकोव्य' 'दाताळचानं' 'बुडुखाला' 'पोडळाभोवती' 'इष्टापुरीच्या डहाळीशी' 'ढीस देह' 'सायवानात' 'डाचाळ' 'उफलून' 'प्रपाणा' 'सुजीर' 'मथलेले स्मित' 'राशिजलधर' 'मंडल घेत होती' 'पगजाळे' 'खबाड' 'बीदीनाळे' 'फोंडाऱ्यात' 'किचडतळ' 'अपरे ओठ' 'रेकल्यातून' 'उपलाणे घोडे' 'खरपट माया' 'खमाविशी' 'खकाण उडाला' 'पतझडीच्या मोसमात' 'पडली रहायची' 'चुलवणीचे दार' 'पेंदेबांधणी' 'उटंगळ' 'निखदणी' 'फसाटीला' 'द्रिशक' 'उटव्यात' विधूळवाटचा' 'चांदमारी' कुंमेरी' 'भ्रू–मध्याचा मुका' 'मारमानेच्या बिळात' 'कोठंब्रोला' 'सालोत्री' 'ढेलचीत' 'दारकसावर' (काही वाक्यरचना पहा: माथ्यावर अचूक ठेवून दिलेल्या टिंब्याने दणकट आणि निबर रखवालीच्या पहारे सैनिकालाही स्तिपान तिनताड उडवीत असे.) 'जिजाबाच्या' 'छायाळ निवाऱ्यात' 'गाव आखरीला असलेल्या' 'सुंदर दीर्घ पायापर्यंत' 'थकिस्त' 'दाभाडाची हालचाल' 'ओकाडे' 'बांदाडीला' 'तणस–वीण गवताळचात' 'बुरकुले बसलेल्या' 'फोंडवलीच्या सोनेरी लवीच्या पुंजक्याशी बागडत होती.' 'त्याचा बांबू सुंकारीत थरथरत होता.' 'घोडखवडे' 'गुंजाडनखे' 'रबलंद' 'निमूर' 'नमद्यांवरील 'राघावळी' 'चोभ्यामागे' 'सुकाट मुठीने' 'चकमकीचे गारमणी' 'दांड बरड' 'डुचके डोळे' 'वाऱ्याच्या झकारा' 'कांडीवर' अशा प्रकारच्या शब्दप्रयोगांमुळे व वाक्यरचनेतील दोषामुळे अनुवादाचे स्वरूप काहीसे बेडौल व कुरूप होत रहाते. अनुवादकाने मूळ रशियन शब्दांना जे मराठी शब्दरूप दिले त्यांचा शब्दकोष त्यांच्या अर्थासह व संदर्भासह कादं–बरीच्या शेवटी दिला असता, किंवा ज्या पृष्ठांवर असे शब्दप्रयोग होतात त्या पृष्ठाखाली टिकाटिप्पणी दिली असती (क्वचित काही पृष्ठांवर तशी ती दिलेली आढळली) तर अर्थ सुलभतेच्या दृष्टीने वाचकाला ती उपकारक ठरली असती.

## लोकांचा लेखक :

१९५५ साली रोस्टोव्ह आणि कामेन्स्क परगण्यातील तरूण लेखकांसमोर बोलताना शोलोखोव म्हणाला होता, ' लोकांसाठी लेखकावर असलेली जबाबदारी फार फार मोठी असते. आपण सगळे मिळून आणि विभक्तपणे आपण प्रत्येक जण लोकांची सद्‌सदविवेकबुद्धी बनले पाहिजे आणि मला हेच तुम्हाला सांगायचं आहे माझ्या तरूण मित्रांनो तरूण लेखकाला लिहिणं नेहमीच सोप नसतं. खरं म्हणज अगदी प्रामाणिकपणे बोलायचं तर पुष्कळदा त्याच्यावर चांगलीच अवघड वेळ येऊन ठेपलेली असते. परंतु तुमच्या मनात ज्याने अजून आकार घेतलेला नाही ते शब्दांत मांडण्याची घाई करू नका. तुम्ही जे पुस्तक निर्माण कराल त्याला प्रतिसाद मिळाला पाहिजे आणि ते दीर्घजीवी झाले पाहिजे.' आणि मग आपल्या भाषणाचा नसमारोप करताना शोलोखोव म्हणतो, ' तुम्हाला पुन: एकदा मला इशारा द्यायचा आहे. पहिल्यांदा तुम्हाला कितीही कष्ट पडले तरी सहजसोप्या यशाच्या मागे लागू का. काहीं झालं तरी तुम्ही आमची जागा घेणार आहात. तुम्ही आमची आशा तुम्ही आमचं भवितव्य. तुमच्यापैकी पुष्कळांना वर्तमानकाळ आहे आणि तुम्हा सगळ्यांनाच भविष्यकाळ आहे. लेखकाचा भविष्यकाळ. तुम्ही सुंदर लोकांचे संदर प्रतिनिधी आहात.'

कॉन्स्टॅन्टिन फेदिन हा थोर रशियन लेखक शोलोखोवबद्दल लिहितो. ' धैर्य हा शोलोखोवच्या लेखनाला अविभाज्य घटक आहे. त्याच्या लेखनाने सोव्हिएट साहित्याची प्रचंड सेवा केली आहे. जीवनातील अंतर्गत अंतर्विरोध त्याने कधीच बाजूला काढलेला नाही मग कोणत्याही कालाचं तो वर्णन करीत असेना का. त्याचे ग्रंथ भूत आणि भविष्यकाळातील संघर्ष त्यातील संपूर्णतेसह दाखवतात तरूण असताना लेव्ह टॉलस्टॉयने आपल्याला जे दंडक घालून घेतले होते त्याची एखाद्याला आपोआपच आठवण व्हावी—खोटं सांगायचं नाही. प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष. आणि टाळाटाळ करून कधीच खोट सांगायचं नाही. शोलोखोव काहीच टाळत नाही. तो संपूर्ण सत्य लिहितो तो शोकांतिकेचं नाटकात रूपांतर करीत नाही किंवा नाटकाला हलक्या फुलक्या लेखनाचं स्वरूप देत नाही. वरवरचे समाधान देणाऱ्या रानफुलांच्या घोळक्यात त्याच्या शोकांतिक घटना दडून रहात नाहीत. पण सत्याचं सामर्थ्य एवढं मोठं असतं की जीवनातील कडवटपणा किंवा दु:ख, मग ते कितीही भयानक असो, त्यावर ते मात करतं. सुखाकडे नेणारी इच्छाशक्ती, सुखप्राप्तीची लालसा, आणि ती सफल झाल्याचा आनंद

त्यावर विजय मिळवितो. मला वाटतं वस्तुस्थिती ही अशी आहे. तिच्या संपूर्ण आकलनासह आपण 'आशावादी शोकांतिके'ची ( Optimistic tragedy ) कल्पना उगीच नाही स्वीकारलीय. हा काही केवळ शब्दावरचा खेळ नाहीय. एका कलावंताने चितारलेल्या वस्तुस्थितीच्या शोकांतिकेची सखोलता ध्यानात घेऊन आपण त्याचं पुस्तक तरीही एका प्रकाशमय साक्षात्काराच्या जाणीवेने मिटतो. 'आणि संथ वाहतेय डॉन' चा समारोपाचा महान खंड हा थेट तसा एक ग्रंथ आहे. कॉन्स्टान्टिन फेदिन पुढे लिहीतो, 'मी शोलोखोवच्या गद्यलेखनाच्या इतर ठळक गुणवत्तेचं वर्णन असं करीन. रशियन महाकाव्याच्या राष्ट्रीय परंपरेला ते जीवनदायी सातत्य देतं. त्याचा अर्थ असा नव्हे की आमच्या अभिजात लेखक पूर्वजांनी जे रस्ते व पायवाट मळवल्या त्यावरूनच आपल्याला चालायला पाहिजे. शोलोखोवने आपल्याला एका भावनात्मकतेने प्रतीत होणाऱ्या वस्तुस्थितीचे प्रत्यंतर देऊन ठेवले आहे आणि ते म्हणजे आपल्या काळाशी जडणाऱ्या लेखकाच्या सेंद्रीय एकात्मतेतून व नातेसंबंधातूनच कलेची प्रगती साध्य होते. आपण लेखनातील आशय ज्याला म्हणतो तो लेखक ज्या काळात जगत असतो, त्याबद्दलच्या त्याच्या ज्या कल्पना असतात, त्यांच्या संपूर्णतेपासून अविभक्त असतो. आपण जेव्हा शोलोखोवचा ग्रंथ हातात घेतो तेव्हा त्यातील धारणा, कल्पना आणि मानवी आकांक्षांसह आपण आपला स्वतःचा काळच हातात धरतो.'

डॉन संथ वहातच आहे! आणि डॉन परगण्यातील प्राचीन डॉन लोकगीते अजूनही कझाकांच्या ओठांवर टिकून आहेत. यापुढेही अनंतकाळ ती तशीच टिकून रहाणार आहेत.

**प्र. श्री. नेरूरकर**

**१३ फुलराणी**
**साहित्य सहवास**
**वान्द्रे (पूर्व) मुंबई ४०००५१**

# पर्व चवथे

## १

एकोणीसशे सोळा. आक्टोबर. रात्र. पाऊस. आणि वारा. आल्डर माजलेल्या दलदलीच्या कडपट्टीवर आलंग. पुढच्या अंगाला काटेरी तारांची गुंतवळ. आलंगातून गोठत जाणारी चिखलराड. टेहळणी ठाण्याचा ओला पत्रा मंदपणे चमकतोय्. तंबूतून कुठे इकडे तिकडे उजेड.

अंमलदारांच्या एका राहुटीच्या दाराशी एक दणकट अंमलदार अंमळ थबकला. त्याची ओली बोटे पाणकोटाच्या बिरड्यावर घसरत होती. त्याने गडबडीने ती सोडवली. कॉलरीतील पाणी झटकून टाकले. तयारीपाशी चिखलात तुडवल्या गेलेल्या कुस्कटाच्या गळंगात आपले बुटाचे तळवे घासले. मगच दार ढकलून उघडले आणि डोके झुकवून राहुटीत प्रवेश केला. घासलेटाच्या लहानशा बत्तीतून ओघळणारी उजेडाची पिवळी फीत त्याच्या तोंडावर तवंगासारखी चमकली. जाकिटाची बटणे सुटलेला एक अमलदार लाकडी खाटेवरून उठला. आपल्या विस्कटलेल्या, पिकलेल्या केसावरून हात फिरवित त्याने जांभई दिली.

" पाऊस ? "

" पडतोय् ! "

आलेल्या माणसाने पाणकोट काढीत उत्तर दिले. दाराजवळच्या मेखेवर त्याने तो पाणकोट आणि चिंब झालेली टोपी अडकवली.

" इथं चांगले उबेत आहात, तोंडवाफेने इथं चांगलाच उबारलंय ! "

" आताच आम्ही चूल पेटवली. कटकट अशीय की जमिनीतून पाणी झिरपून येतय्. पाऊस आपल्याला बाहेर काढणार ! तिच्यायला त्याची ! तुम्हाला काय वाटतं बुनचुक ? "

हातावर हात चोळीत बुनचुक खाली वाकला आणि ओणवा होऊन चुलीजवळ उकीडवा बसला. " जमिनीवर फळकुटचा टाका. आपल्या ह्या राहुटीत आपण मस्त कोरडे आहोत. अनवाणी पायानंही इकडं तिकडं फिरू शकतो.

" लिस्तनिस्तकी कुठाय् ? "

" झोपलेत ! संत्री ठाण्याची पाहणी करून ते परत आले आणि तसेच आडवे झाले ! " " त्याला उठवायला काही हरकत नाही ना ? " " उठवा ! बुद्धिबळाचा डाव टाकू या ! "

भुवईवरचे घामाचे थेंब बुनचुकने तर्जनीने निपटून टाकले. त्या बोटाकडे लक्षपूर्वक पाहिले आणि हळूच हाक मारली.

" येवगेनी निकोलाएविच ! "

" झोप लागल्येय ! " सुस्कारा सोडून पिकल्या केसांचा अंमलदार म्हणाला.

" येवगेनी निकोलाएविच ! "

" कायाय ? " कोपरावर देह उंचावित लिस्त्निस्तकीने विचारले.

" बुद्धिबळाचा डाव खेळणार ? "

येवगेनीने खाटेवरून पाय खाली सोडले आणि आपल्या मऊ गोऱ्या तळव्याने सीना खसखसा चोळला.

पहिला डाव संपत आला होता.

एवढ्यात कॅप्टन कालमिकोव आणि लेफ्टनंट चुबोव ह्या पाचव्या स्क्वाड्रन-मधील दोन अंमलदारानी तिथे प्रवेश केला.

" बातमी ! " दारवठ्यातच काल्मिकोव ओरडला, " रेजिमेंट बहुधा मागं काढून घेतील. "

" कुठं ऐकलं ? " अविश्वासाचे स्मित करीत पिकल्या केसांच्या अंमलदार ज्युनिअर कॅप्टन मेरकुलोवने विचारले.

" विश्वास नाही पेत्या काका ?"

" खरं सांगायचं तर नाही ! "

" बताश कमांडरने आताच आम्हाला टेलीफोनवरून कळवलं. त्याला कुठून ठाऊक ? तर् कालच तो ' डिव्हिजनल स्टाफ ' कडून आला. "

" आंघुळ करायला मजा येईल ! " असे उत्कट आनंदी स्वरात म्हणून स्वत:ला भूर्जवृक्षाच्या डहाळ्यानी झोडपल्यागत चुबोवने आपले कुल्ले थोपटले.

" इथं एक घंगाळ ठेवायला हवं. इथं पाणी चिक्काराय ! " मेरकुलोवने स्मित केले.

" गृहस्थहो, इथं अगदी ओल आहे ! भयंकर ओल आहे ! "

लकडभिंती आणि गिचगिचीत मातीची जमीन इकडे चौफेर दृष्टी टाकीत काल्मीकोव कुरकुरला.

" इथं आमच्या ढुंगणाच्यापाशीच सगळं रेंदाड आहे. "

" अरे रेंदाडात आहात ह्यासाठीच परमेश्वराला धन्यवाद द्या. अब्राहमच्या उरापोटी असल्यागत इथं सुखात आहात " बुनचुक मध्येच म्हणाला,

" सदरेवर एल्गार चालू आहे. इथं आपण आपली आठवड्याला ' एखादी ' फेर झाडतो. "

" ह्या बिळात कुजत पडण्यापेक्षा एल्गार परवडला ! "

" एल्गारात साफ होऊन जावेत म्हणून काय त्यानी कझाक बाळगले नाहीत पेत्याकाका ! उगाच साळसूदपणाचा आव कशाला ? "

" मग तुझ्या मते कशासाठी बाळगलेत ? "

" ऐन वेळ आली की कझाकांच्या पाठींचा आश्रय घ्यायचा हाच जुना डाव सरकार खेळणार ! "

" पाखंडीपण सांगतोय्स ! " काल्मीकोवने हात झटकून टाकीत म्हटले.

" पाखंडीपण ? का ? "

" का म्हणजे ? आहे म्हणून ! "

" अरे दे सोडून काल्मीकोव ! सत्य ते सत्यच ! "

" कसलं सत्य ? "

" का ? हे सत्य आहे हे सगळ्यांना ठाऊकाय् ! तुलासुद्धा कबूल करायला काय हरकताय् ? "

" सभ्य गृहस्थहो ऐका ... . . ऐका ... ... ! " चुबोव ओरडला आणि नाटकीपणाने लवत बुनचुककडे बोट दाखवित म्हणाला, " कोर्नेट बुनचुक आता सोशल डेमोक्रॅटिक ' स्वप्नगाथेंच्या अर्थाचं विवरण सुरू करतील ! "

" तुम्ही विदुषकाची भूमिका वठवायचा प्रयत्न करताय् का काय ? " तीक्ष्ण नजर चुबोवच्या दृष्टीला भिडवीत बुनचुकने छदमी हास्य केले.

" प्रश्न अर्थात तुमचा आहे म्हणा ! ज्यानं त्यानं आपापलं काम करावं. मी तुम्हाला हे सांगतोय् की गेल्या वर्षीच्या अर्ध्यानंतर आपण युद्ध पाहिलेलं नाही.

अलंगाच्या लढाईचं तंत्र सुरू झाल्यापासून कझाकांची रेजिमेंटस् आसऱ्यांच्या जागावरून बाटली गेली. आणि नेमकी घडी येईस्तो त्याला निवांतपण तिथं ठेवून दिलंय्. "

" आणि मग ? " प्यादी उंट - घोडे गोळा करीत लिस्तनिस्तकीने विचारले.

आणि मग आघाडीवर जेव्हा असंतोष माजेल – अन् तो माजणार हे ठरलेलच आहे. लढाईचा सैनिकांना वीट यायला लागलाय्. पळून जाणाऱ्यांचा आकडा वाढतोय्. त्यावरून हे उघड आहे आणि मग बडाळी दडपून टाकायला कझाकांना आणलं जाईल. दगडासारखंच कझाकांना सरकारनं हाताशी धरून ठेवलंय्. नेमकी वेळ आली की क्रांतीचं टाळकं त्या दगडानं फोडायचा सरकार प्रयत्न करील ! "

" माझ्या मित्रा तुझी कल्पना तू जरा मोकाट सोडलयेस ! तुझे आडाखे जरा ढिसाळच आहेत," लिस्त्निस्तकीने त्याच्या म्हणण्याला हरकत घेतली.

" पहिली गोष्ट म्हणजे पुढ काय काय होईल ते भाकीत करणं कठीणाय् ! आगामी असंतोषबिसंतोष तुला काय ठाऊक ? पण असं समजूया की दोस्तांनी जर्मनीचा धुव्वा उडवला आणि युद्धाचा मोठा झकास शेवट झाला तर कझकांना तू कसली भूमिका देणार ?

बुनचुकने रुक्ष स्मित केले " ह्या घडीला तरी युद्ध संपेलसं दिसत नाही. आणि झकास शेवट तर नाहीच नाही ! "

" मोहीम सावकाश चालू आहे – – " " ह्याहीपेक्षा ती सावकाश चालेल" बुनचुकने ठासून सांगितले.

" रजेवरून कधी परत आलास ?" काल्मीकोवने विचारले.

" परवाचे दिवशी ! "

बुनचुकने ओठाचा चंबू केला, धुराचा एक गोळा बाहेर सोडला आणि चट्टयाचे थोटूक फेकून दिले.

" कुठं घालवली रजा ?"

" पेत्रोग्रादमध्ये "

" मग राजधानी काय म्हणतेय् ? तिच्यामारी सालं ! पेत्रोग्रादमध्ये एवढासा आठवडा जरी घालवायला मिळाला तर काय बहार येईल ! "

"जीवाला सुख देणारं फारसं काही सापडायचं नाही !" आपले शब्द काळजीपूर्वक तोलीत बुनचुक म्हणाला. "तिथं अन्नाचं दुर्भिक्ष आहे, कामगार वस्त्यातून उपासमार नाराजी आणि उकळता असंतोष आहे."

ह्या युद्धातून आपण काय सुखानं बाहेर पडत नाय्. तुमचं काय मत आहे मंडळी ? प्रश्नार्थक नजरेने चहुबाजूला बघत मेर्कुलोवने विचारले.

"रुसो जपानी युद्धातून १९०५ ची क्रांती जन्मली. ह्या युद्धाचा शेवट नवीन क्रांतीनं होईल अन् नुसती क्रांती नाही तर यादवी युद्ध !"

जणूकाही त्याला आता अर्ध्या वाक्यावर अडवणार असा काहीतरी आविर्भाव लिस्तनिस्तकीने केला. मग तो उठून उभा राहिला. आणि कपाळाला आठ्या घालून राहुटीत फेऱ्या घालू लागला. क्रोध आवरलेल्या आवाजात तो म्हणाला, "ह्या माणसासारखी पात्रं आम्हा अमलदारांत असावीत हे पाहून मी चकित होतो !" त्याने बुनचुककडे बोट करून दाखवले,

"चकित मी अशासाठी होतो मी आपला देश आणि हे युद्ध ह्याबद्दल ह्याची काय भावना आहे ह्याचा आजतागायत मला नीट उलगडा होऊ शकलेला नाही. परवाच हा अगदी गुळमुळीत बोलला. पण त्याचं बोलणं आम्हाला इतपत समजण्याइतकं स्पष्ट होतं, की ह्याला आपला पराभव व्हायला हवाय्. काय बुनचुक माझी समजूत बरोबर आहे ना ?"

"आपला पराभव व्हावा ह्याला मी अनुकूल आहे."

"का पण ? तुझी राजकीय मतं काहीही असोत पण आपल्या स्वतःच्या देशाचा पराभव व्हावा अशी इच्छा करण हा माझ्या मते देशद्रोह आहे. कोणत्याही सभ्य माणसाला ही गोष्ट लांछनास्पद आहे !"

"सरकारविरुद्ध 'ड्यूमा'तल्या सोशल डेमोक्रॅटिक सभासदांनी कशी चळवळ केली आणि तसं करून देशाच्या पराभवाला कसा हातभार लावला ते तुम्हाला आठवतं ना ?" मेर्कुलोव मध्येच म्हणाला.

"त्यांची मत तुला मान्य आहेत बुनचुक ? " लिस्तनिस्तकीने विचारले.

"आपला पराभव व्हावा ह्याला मी अनुकूल आहे, असं म्हणतो तेव्हा त्यांची मत मला मान्य आहेत हे उघडच आहे. 'रशियन सोशल डेमोक्रॅटिक लेबर पार्टी' चा मी सभासद आहे. तेव्हा ड्यूमातील माझ्या पार्टीच्या लोकांची मतं मला 'मान्य नसणं' हास्यास्पद आहे. येवगेनी निकोलायविच, तू एवढं शिक्षण घेऊनही राजकीयदृष्टचा एवढा अडाणी असावास ह्याचं मला फार मोठं आश्चर्य वाटतं."

" सर्वप्रथम म्हणजे राजसत्तेला निष्ठावान असणारा मी शिपाईगडी आहे. 'सोशलिस्ट डेमोक्रॅट्स्' नजरेला पडले तरी माझ्या तळपायाची आग मस्तकाला जाते ! "

" सर्वप्रथम म्हणजे तू महामूर्ख आहेस आणि दुसरं म्हणजे एक आत्मसंतुष्ट लष्करी पशू आहेस. " असे मनातल्या मनात म्हणून बुनचुकने आपले स्मित दिसू दिले नाही.

" सैन्यात माणसाच्या वाट्याला मोठी विलक्षण परिस्थिती येत असते. " दिलगिरी प्रकट करावी असे मेर्कुलोव म्हणाला. " आम्ही सगळ्यानी स्वतःला राजकारणापासून दूर ठेवलय्. तसं म्हटलं तर आम्ही खेड्याच्या वेशीबाहेरच आहोत. "

कॅप्टन काल्मीकोव आपल्या उतरत्या मिशा कुरवाळीत बसला होता. त्याचे हिंस्त्र मंगोलियन नेत्र चमकत होते. मेर्कुलोवने भिंतीवर लावलेले चित्र टक लावून बघत चुवोव बिछान्यावर पडला होता.

मागदालीनचा तोंडवळा असणाऱ्या एका अर्धनग्न स्त्रीचे ते चित्र होते. आपल्या अनावृत उरोजांकडे बघून ती तंद्रालू आणि धुंद स्मित करीत होती. आपल्या डाव्या हाताच्या दोन बोटांनी तिने एक कुचाग्र बाजूला केले होते. आणि करंगळी सावधपणे मागे धरली होती तिच्या अर्धोन्मीलित पापण्याखाली तिच्या लोचनांच्या दीप्तीने मार्दवता आलेली एक छाया पडलेली होती. किंचित् उचलेल्या तिच्या एका स्कंधावर तिची ओघळणारी कंचुकी अडखळलेली होती. आणि कंठाखालील खळगीत प्रकाशाची नाजूक छटा रेंगाळली होती. तिच्या विभ्रमात इतकी काही स्वाभाविक नजाकत आणि इतका काही खरेखुरेपणा होता, मुलायम रंगच्छटा इतक्या विलक्षण रमणीय होत्या, की शेजारी चाललेल्या संभाषणाच्या ओघाची दखलही न घेता त्या वजनदार पण धुराने पिवळसर पडलेल्या चित्रावर खूष होऊन चुबोव स्वतःला नकळत स्मित करीत होता.

" झकास ! " दृष्टी बाजूला काढून घेत तो उद्गारला. त्याचा उद्गार अत्यंत अनुचित क्षणी उमटला होता, कारण बुनचुक त्याच्या आधीच म्हणाला होता, " झारशाही नष्ट केली जाईल ह्याची पक्की खात्री बाळगा ! "

चुट्टा वळीत आणि छद्मीपणाने स्मित करीत लिस्तनिस्तकीने आधी बुनचुककडे रोखून पाहिले.

" बुकचुक ! " काल्मीकोव म्हणाला, " थांबा जरा लिस्तनिस्तकी ! बुनचुक, ऐकलंत का ? असं मान्य करु या की ह्या युद्धाला अखेर यादवी युद्धाचं रूप येईल. मग पुढं काय ? तूम्ही राजेशाही उलथून टाकाल पण तिच्या जागी कोणत्या प्रकारचं सरकार आणायचा तुमचा विचार आहे ? "

" कामगार वर्गाचं सरकार ! "

" लोकसभा म्हणता ? "

" त्याहीपेक्षा जास्त ! " बुनचुकने स्मित केलं.

" म्हणजे नेमकं काय ? "

" कामगारांची हुकूमशाही ! "

" अस्सं ! पण बुद्धीजीवी, शेतकरी ... ...? त्यांची काय कामं राहतील ?"

" शेतकरी आमच्या मागोमाग येतील. बुद्धीजीवींचाही काही भाग येईल. इतर ... तर त्याचं आम्ही हे असं करूं ! "

चपळाईने त्याने हातातील कागद चुरगळला आणि तो फेकून देत ओठ आवळून तो म्हणाला, " आम्ही हे असं करूं !"

" फार उंचावर भरारी घेताय् ! " लिस्तनिस्तकीने कुत्सितपणे म्हटले.

" आम्हाला फार उंचावर उतरायचंय् ! " बुनचुकने प्रत्युत्तर केले.

" खाली थोडं कुस्काट पसरून ठेवा म्हणजे उतरायला नाय आलं तरी पंचाईत नको ! "

" आघाडीवर यायला भरती झालात तरी कशाला आणि अंमलदाराच्या हुद्यापर्यंत चढत आलात तरी कशाला ? झक् मारायला ? तुमच्या मतांशी हा मेळ कसा काय घालणार ? अजब आहे ! हा माणूस युद्धाच्या विरुद्ध ! स्वतःच्या ह्याच्या ... ... काय ते तुम्ही म्हणता . . . ? . . . वर्गबांधवांच्या नाशाविरुद्ध ! आणि हा म्हणे अंमलदार ! " असे म्हणून काल्मीकोवने आपल्या बुटाच्या पायावर थाप मारली आणि मनापासून करमणूक होऊन तो हसला.

" तुमच्या मशीनगननं तुम्ही किती जर्मन कामगारांची कत्तल केलीत ? " लिस्तनिस्तकीने चौकशी केली.

बुनचुकने आपल्या खिशातून कागदांचे मोठे पाकीट बाहेर काढले आणि लिस्तनिस्तकीकडे पाठ करून तो त्या कागदांची वाचकरावाचकर करू लागला. मग

मेजाजवळ जाऊन त्याने जुनाटपणाने पिवळे पडलेले एक वर्तमानपत्र तेथे पसरले. आपल्या थोराड गोटीबंद हाताने त्याच्या घडया त्याने सारख्या केल्या.

"किती जर्मन कामगार मी ठार केले ? हा एक प्रश्न आहे. मी आपण होऊन आलो कारण एवीतेवी मला यावंच लागलं असतं. मला वाटतं, इथं अलंगात मी जे ज्ञान मिळवलंय ते पुढे कोणत्यातरी कामी येईल. हे ऐका"

आणि त्याने लेनिनचे शब्द वाचून दाखवले.

"आधुनिक सैन्याचे उदाहरण घ्या. संघटनेचे हे एक चांगले उदाहरण आहे. ही लवचिक आहे आणि त्याचबरोबर दशलक्षावधी लोकांना एकमेव एषणा देण्याला ती समर्थ आहे. म्हणूनच केवळ ही संघटना चांगली आहे. आज देशाच्या निरनिराळ्या भागातून हे दशलक्षावधी आपापल्या घरात राहात आहेत. उद्या लष्कर भरतीचा आवाज दिला जातो आणि ठरलेल्या केंद्रात ते जमा होतात. आज ते खंदकात पडलेले असतात. कधीकधी सलग महिनोगणती ते असेच पडलेले राहतात. उद्या अन्य विभूतून त्यांना हल्ला चढविण्यासाठी नेले जाते. काडतुसे आणि कुलपी गोळ्यापासून लपून राहून एक दिवस ते चमत्कार करतात. उद्या खुल्या हातघाईच्या लढाईत ते चमत्कार करतात आणि आज त्यांची बिनीची पथके जमिनीखाली सुरुंग पेरतात. उद्या पृथ्वीच्या डोक्यावरून उडत जाणाऱ्याच्या सल्ल्यानुसार ते खंडोगणती मैल आगेकूच करतात.

एकमेव उद्दिष्टाचा पाठपुरावा करण्यासाठी, एकमेव एषणेने प्रोत्साहीत होऊन दशलक्षावधी लोक आपल्या अन्योन्य व्यवहार आणि कृतीचे स्वरुप जेव्हा बदलतात, आपल्या कार्याचे स्थळ आणि पद्धती ते जेव्हा बदलतात, बदलती परिस्थिती आणि लढ्याची आवश्यकता ह्यानुसार आपली हत्यारे आणि शस्त्रे ह्यात ते जेव्हा बदल करतात तेव्हा ही संघटना असते.

बूर्ज्वाजीविरुद्धच्या कामगारवर्ग लढ्याला हेच लागू आहे आज क्रांतिकारक प्राप्तकाल नाही.

"पण 'प्राप्तकाल' ह्याचा अर्थ काय ?" चुबोवने मधेच पृच्छा केली.

आताच झोपेतून जागे केल्यासारखे बुनचुकने त्याच्याकडे रोखून पाहिले. तो प्रश्न आत्मसात करण्याचा प्रयत्न करीत त्याने आपले भव्य कपाळ पालथ्या अंगठ्याने चोळले. "मी म्हटलं की 'प्राप्तकाल' ह्याचा अर्थ काय?', "मला ते चांगलं समजलं ! पण ते समजावून सांगणं मला कठीण आहे ?' बुनचुकने एक साधे, लहान मुलासारखे स्मित केले. त्याच्या थोराड, व्यग्र चेहऱ्यावर

ते स्मित अप्रूप दिसत होते. शरद ऋतूत धाराधूत शेतातून लहानसा रुपेरी ससा उडचा मारीत निघून जावा तसे ते होते.

' प्राप्तकाल ' ही एक स्थिती आहे. परिस्थितीचा एक संयोग आहे. माझं बरोबर आहे ना ?

लिस्त्‌निस्तकीने ढोबळपणे मान हलवली, " पुढं वाच ! "

आज क्रांतिकारक प्राप्तकाल नाही. बहुजन समाजात ज्यामुळे क्षोभ निर्माण होतो किंवा ज्यामुळे त्याचे कार्य उफाळते अशी अवस्था आज नाही. आज तुम्हाला एक मतपत्रिका देण्यात येते तो घ्या. तुरुंगात जावे लागेल ह्या भीतीने आपल्या आसनाना जे घट्ट चिटकून राहतात अशा माणसांना आरामशीर खासदारी कामे मिळवून देण्याचे साधन म्हणून नव्हे तर आपल्या शत्रूविरुद्ध शस्त्र म्हणून ह्याचा वापर करता येऊ शकण्यासाठी संघटीत होण्याचे शिका दुसऱ्या दिवशी तुमच्या हातून मतपत्रिका काढून घेतली जाते. आणि तुम्हाला एक बंदुक आणि अभियांत्रिकी तंत्रातील अत्याधुनिकतेबरहुकूम घडवलेली एक सवेग वर्षणारी उत्कृष्ट मशिनगन देण्यात येते. मृत्यू आणि विध्वंसाचे हे शस्त्र घ्या युद्धाला भिणाऱ्या भावूक साळसुदांची काहीही दखल घेऊ नका. कामगार वर्गाचे विमोचन साध्य करण्यासाठी अस्त्र आणि शस्त्राने जे नष्ट केलेच पाहिजे असे अद्याप जगात खूपच पडून आहे आणि बहुजन समाजात क्रोध आणि विवषता जर वाढली, " क्रांतिकारक प्राप्तकाल जर निर्माण झाला तर नवीन संघटना निर्माण करण्याची तयारी करा आणि मृत्यू आणि विध्वंसाची ही उपयुक्त शस्त्रे तुमच्या स्वतःच्या सरकारविरुद्ध आणि तुमच्या स्वतःच्या बुर्ज्वाजीविरुद्ध वापरात आणा . . . . "

दारावर टकटक करून पाचव्या स्क्वाड्रनचे सार्जंटमेजर तिथे आल्याने बुनचुकच्यो वाचनात व्यत्यय आला.

काल्मीकोवकडे वळून तो सार्जंटमेजर म्हणाला " हुजूर, रेजिमेंटच्या ठाण्यावरुन अडली आलाय्.

काल्मीकोव आणि चुबोव ह्यानी अंगावर पाणकोट टाकले आणि ते बाहेर पडले.

मेर्कुलोव चित्र काढायला बसला.

खोल विचारात गढून गेलेला लिस्त्‌निस्तकी मिशावरून बोटे फिरवीत राहुटीत शतपावली घालू लागला.

थोड्याच वेळात बुनचुकही त्यांचा निरोप घेऊन बाहेर पडला. अलंगांच्या निसरड्या चिखलातून त्याने वाट धरली होती. डाव्या हाताने त्याने कॉलरीच्या कडा धरून ठेवल्या होत्या. उजव्या हाताने त्याने पाणकोट खाली ओढून धरला होता. त्या अरुंद अलंगांतून वारा धोधारत होता. खडक कंगोऱ्यांना लिपटत होता. शीळ वाजवीत भिरभिरत होता. त्याच्या चेहऱ्यावर एक अस्पष्ट स्मित होते.

आपल्या राहूटीत तो पोहोचला तेव्हा पावसात परत ओलाचिंब झाला होता आणि त्याच्या अंगाला कुजणाऱ्या आलडर पानांचा वास येत होता. मशिनगन तुकडीचा कमांडर झोपी गेला होता. पत्ते खेळण्यासाठी तीन रात्री जागून काढल्याच्या खुणा त्याच्या काळगेल्या तोंडावर अजून दिसत होत्या. साधा शिपाई म्हणून चाकरीला सुरुवात केल्यापासून बुनचुकने एक सामानाची थैली बाळगली होती. ती त्याने ढुंढाळली, दाराला लागूनच कागदांची एक चळत रचली आणि त्यांना काडी लावून दिली मासाचे दोन डबे आणि पिस्तुलाची बरीच, मुठी भरून काडतुसे त्याने खिशात टाकली. आणि तो परत बाहेर पडला. क्षणभर उघडलेल्या दारातून वाऱ्याचा झोत आला. त्यानं त्या जळलेल्या कागदांची करडी राख उधळली गेली. आणि धूर ओकणारा दिवा विझून गेला.

बुनचुक निघून गेल्यावर लिस्त्निस्तकी थोडा वेळ निःशब्दपणे येरझारा घालीत होता. नंतर तो मेजाजवळ गेला.

मेर्कुलोव अजून चित्र काढीत होता. चेहऱ्यावर नेहमीचे रुक्ष स्मित असणारा बुनचुकचा चेहरा त्याच्या पेन्सिलीच्या टोकाखालून उमटत कागदाच्या पांढऱ्या चौकोनातून टवकारून पाहू लागला होता.

" त्याचा चेहरा कणखर आहे! " लिस्त्निस्तकीकडे वळून मेर्कुलोव म्हणाला.

"बरं मग ? तुला काय वाटतं ?" येवगेनीने विचारले.

" सैतान जाणे ! " मेर्कुलोवने त्या प्रश्नातील मख्खी ओळखून उत्तर दिले. " चमत्कारिक माणूस आहे. आता अगदी साफ कबूल झालाय्. पण पूर्वी ह्याचा अर्थ कसा लावावा तो मला कळत नसे. कझाकात - विशेषतः मशिनगनवाल्यात तो भयंकर लोकप्रिय आहे. माहीताय् ? तुझ्या लक्षात नाय् आलं ? "

" आ . . ! . . हा . . हा ! लिस्त्निस्तकीने जरा गुळमुळीतच उत्तर दिले.

" मशिनगनवाले झाडून सगळे बोल्शेव्हिक आहेत त्याना आपल्याकडे ओढून घेणं त्यानं नक्कीच जमवलंय्. आज हातातली सगळी पानं जेव्हा त्यानं दाखवली

तेव्हा मी चाटच पडलो. कशासाठी त्यानं असं केलं असावं ? आपल्यापैकी कुणालाच त्याची मतं मान्य नाहीत हे त्याला ठाऊक आहे. तरी तो सगळं हे असं सांगून टाकतोय्. तो तसा भडकूही नाय्—खतरनाक आहे तो!

बुनचुकच्या अजब वर्तणुकीचा विचार करीतच मेर्कुलोवने आपले रेखाचित्र बाजूला ठेवले आणि तो कपडे उतरवू लागला.

आपले भिजलेले मोजे त्याने चुल्हयावर वाळवत घातले. घड्याळाला किल्ली दिली आणि चट्टा ओढीत तो आडवा झाला. त्याला चटकन् झोप लागून गेली मेर्कुलोवने खाली केलेल्या स्टुलावर लिस्त्निस्तकी बसला आणि बुनचुकच्या चित्राच्या दुसऱ्या बाजूला आपल्या जलद अक्षरात लिहू लागला.

हुजूरांचे सेवेसी,

ह्यापूर्वी मी आपल्याला कळविलेल्या अटकळीला आता संपूर्ण दुजोरा मिळालेला आहे. आज आमच्या रेजिमेंटच्या अंमलदाराबरोबर झालेल्या बोलण्यात (माझ्या स्वतःशिवाय पाचव्या स्क्वाड्रनचे कॅप्टन काल्मीकोव लेफ्टनंट चुबोव आणि तिसऱ्या स्क्वाड्रनचे कॅप्टन मेर्कुलोव हे हजर होते) कॉर्नेट बुनचुक ह्याने तो स्वतःच्या राजकीय मतानुसार आणि निःसंशयपणे त्याच्या पक्षाच्या सूचनांवरून पार पाडीत असलेल्या कामगिरीचा खुलासा केला. त्याने हा खुलासा करण्याचे कारण मला संपूर्णपणे उमगलेले नाही हे कबूल करणे मला भाग आहे. त्याच्याजवळ बेकायदेशीर प्रकारचे बरेच कागदपत्र होते. उदाहरणार्थ, जिनिवा येथ छापलेल्या 'कम्युनिस्त' ह्या बेकायदेशीर वर्तमानपत्रातील उतारा त्याने आम्हाला वाचून दाखवला. आमच्या रेजिमेंटमध्ये कॉर्नेट बुनचुक भूमिगत हालचाली करीत आहे, ह्यात शंका नाही. (स्वयंसेवक म्हणून ह्याच कारणाने तो ह्या रेजिमेंटमध्ये दाखल झाला असे आपण समजू शकतो) आणि मशिनगनवाल्यांवर त्याची सर्वप्रथम नजर आहे त्यांना फितवण्यात आले आहे. त्याचा धोकेबाज असर रेजिमेंटच्या नैतिक धैर्यावर प्रतिकूल परिणाम करीत आहे. खास खात्याला मी ह्यापूर्वीच कळविल्याप्रमाणे हुकुमाची तामिली करायला नकार दिल्याची प्रकरणे झाली आहेत.

तो रजेवरून (पेत्रोग्रादहून) नुकताच परतला असून आपल्याबरोबर त्याने बरेच घातपाती वाङ्मय आणले आहे. जास्तच जोराने तो आता आपल्या उद्योगाला लागण्याची कोशिश करेल.

उपरिनिर्दिष्ट गोष्टीच्या आधारे मी पुढील निष्कर्षाप्रत आलो आहे. की (१) कॉर्नेट बुनचुकचा अपराध पूर्णपणे शाबीत झालेला आहे (ह्या संभाषणाच्या वेळी हजर असणारे अंमलदार माझ्या शब्दांची शपथेवर ग्वाही देतील.) (२) त्याच्या क्रांतिकारक हालचाली थांबवण्यासाठी त्याला ताबडतोब अटक करून आघाडीवरील लष्करी कोडतापुढे उभा करणे आवश्यक आहे. (३) मशिनगनवाल्यांची तुकडी फोडली पाहिजे. जे जास्त धोकेबाज असतील त्यांना काढून टाकले पाहिजे. आणि इतरांना पिछाडीला तरी पाठविले पाहिजे, किंवा इतर रेजिमेंटस्‌मधून विखुरले पाहिजे.

माझा देश आणि राजसत्ता ह्यांची चाकरी करण्याची माझी मनःपूर्वक इच्छा आहे, ह्याची खात्री असो द्यावी. ह्याच पत्राची एक नक्कल मी 'एस्‌टी कॉर्प'ला रवाना केली आहे.

रंगण क्र. ७. कॅप्टन येवगेनी लिस्त्‌निस्तकी
२० ऑक्टोबर १९१६.

दुसऱ्या दिवशी सकाळी सकाळीच लिस्त्‌निस्तकीने आपला अहवाल अडलीबरोबर डिव्हीजनच्या ठाण्याकडे रवाना केला आणि न्याहरी केल्यानंतर तो अलंगात गेला.

अलंगाच्या निसरड्या वरंडीपलीकडे काटेरी तारगुंत्यात अडकल्यागत धुक्याची लक्तरे झिलाणावर लोंबली होती. अलंगाचा तळ इंचभर जाडीच्य किचडाने झाकला गेला होता. लहान लहान पिंगट झिरे जंग्यांतून झुरमुरत होते.

वरंडीच्या पत्र्यावर कझाकांनी चहाचे भांडे उकळत ठेवले होते. भिजून गेलेले आणि राडीचे पलिस्तर बसलेले पाणकोट त्याच्या अंगात होते. अलंगाच्या तालीला त्यांनी आपल्या बंदुका टेकून ठेवल्या होत्या. आणि टाचावर उकिडवे बसून ते धूर सोडीत होते.

"पत्र्यावर जाळ करायचा नाय म्हणून किती वेळा तुम्हाला बजावून सांगितलंय? समजत नाय काय रे डुकरांनो?" कझाकाच्या पहिल्या गटाजवळ आल्याबरोबर लिस्त्‌निस्तकी कडाडला.

त्यातील दोघेजण अनिच्छेने उठून उभे राहिले. बाकीचे तसेच धूर काढीत बसून राहिले. त्याच्या पाणकोटाचे काठ त्याच्या अंगाखाली गोळा झाले होते.

कानातून चंदेरी कडी हालणारा एक काळगेला दाढीवाला कझाक त्यात होता. भांड्याखाली मूठभर काठवण ढोशीत त्याने जबाब दिला, " पत्रं आम्हाला हौस थोडीच आहे? पण नायतरी आम्ही जाळ कसा पेटवावा हुजूर? ही राड पहा!"

" आधी तो पत्रा काढा!"

" आम्ही काय इथं उपाशी बसावं? बसावं का?" तोंडावर ढोबळ माताचे वण असलेल्या एका कझाकाने वर अंमलदाराकडे न पाहता कपाळाला आठ्या घालून विचारले.

" मी तुला सांगतोय! तो पत्रा आधी काढून घे!" आपल्या बूटाच्या चौड्याने येवगेनीने भांड्याखालील जळते काठवण ठोकरून दिले.

रागाने आणि बावरून जाऊन हसत हसत त्या दाढीवाला कझाकाने भांड्यातील पाणी ओतून टाकले. तो पुटपुटत होता.

" झाला तुमचा चहा पोरानुं......!"

ढांगा टाकीत निघून जाणाऱ्या त्या कॅप्टनच्या पाठमोऱ्या आकृतीकडे कझाक न बोलता टक लावून बघत होते. दाढीवाल्या कझाकाच्या डोळ्यात चिमुकल्या ज्वाळा झगमगल्या.

" आगाऊ रांडीचा साला!"

दुसऱ्या कझाकाने लांब सुस्कारा सोडला आणि बंदूक खांद्याला लटकावली.

पहिल्या जुमल्याचे सैनिक होते त्या क्षेत्रात मेर्कुलोवने लिस्त्निस्तकीली गाठले. जोरजोराने धापा टाकीत तो आला होता. त्याचे कोरे कातडी जकिन करकरत होते. त्याच्या तोंडाला परसदारच्या तंबाखूचा दर्प मारत होता. येवगेनीला बाजूला बोलावून तो घाईघाईने म्हणाला, " बातमी ऐकलीस? बुनचुक काल रात्री फरारी झाला?" " बुनचुक? काऽऽऽय?"

" फरारी --! -- कळलं? त्याच्याच राहूटीत असणाऱ्या मशिनगनने तुकडीच्या कमांडरनं मला सांगितलं की आपल्याकडून गेल्यावर तो परत आला नाय. तेव्हा आपली राहूटी सोडल्याबरोबर त्याने पोबारा केला असावा. तुझं काय मताय?"

आपला एकभिंगी चष्मा पुशीत आणि कपाळाला आठ्या घालून लिस्त–निस्तकी उभा होता. " तू बेचैन झालेला दिसतोस ! " त्याच्या चेहऱ्याकडे बघत मेर्कुलोव म्हणाला.

" मी ? वेड की काय ? मी कशाला बेचैन होऊ ? अनपेक्षित बातमी ऐकवून तू मला चकित केलंस एवढंच ! "

— — — —




# २

दुसऱ्या दिवशी सकाळी बावरलेली मुद्रा करून सार्जंट मेजर लिस्त्‌निस्तकीच्या राहूटीत आला आणि बराच वेळ त . . त . . प . . प . . करून त्याने त्याला माहिती कळवली.

" हुजूर आज सकाळी कझाकांना हे कागद अलंगात सापडले. हे जरा अवघडच आहे . . . . मी म्हटलं, आपल्याला हे कळवणंच सगळ्यात चांगलं. काही तरी भानगडाय ! "

" कसले कागद ? " आपल्या खाटेवरून उठत लिस्तनिस्तकीने विचारले.

सार्जन्ट मेजरने चुरगळलेल्या कागदाचा बोळा त्याच्या हाती दिला. सस्त्या कागदांच्या चत्कोर तुकड्यावर टंकलिखित मजकूर होता. लिस्तनिस्तकी वाचू लागला.

" सर्व देशातील कामगारांनो एक व्हावा ! "

" सैनिक साथी हो – "

दोन वर्ष हे दुष्ट युद्ध चालू आहे. दुसऱ्या माणसाच्या स्वार्थाचा बचाव करीत दोन वर्षे तुम्ही अलंगातून कुजलात. सर्व राष्ट्रांच्या कामगार आणि शेतकऱ्यांच्या रक्ताचे दोन वर्षे पाट वाहिले. ठार आणि जखमी असे लक्षावधी. विधवा आणि अनाथ लक्षावधी. हे ह्या कतलीचे परिणाम. तुम्ही कशासाठी लढत आहात ? कुणाच्या स्वार्थाचा तुम्ही बचाव करीत आहात ? नवीन प्रदेश बळकावण्यासाठी आणि पोलंड आणि स्वतःचे दास बनविलेल्या इतर राष्ट्रांची जशी दडपशाही ते करीत आहेत तशीच ह्याही प्रदेशातील लोकांची दडपशाही करण्यासाठी झारशाही सरकारने कोट्यावधी सैनिकांना तोफेच्या तोंडी दिले आहे. आपल्या गिरण्या

आणि कारखान्यातील माल ते जिथे विकू शकतील अशा बाजारपेठांची वाटणी जगाचे उद्योगपती करणार नाहीत. नफा वाटून घेणार नाहीत. त्याऐवजी शस्त्र-बळाने ते बाजारपेठांचे तुकडे करीत आहेत आणि त्यांच्या स्वार्थाच्या लढ्यात तुम्ही अडाणी लोक आपल्या मरणाकडे चालला आहात आणि तुमच्याच सारख्या श्रमणाऱ्या माणसांना ठार मारीत आहात. तुमच्या भावांचे रक्त सांडणे बस् झाले! श्रमिकांनो जागे व्हा !

"तुमच्यासारखीच फसवणूक झालेले ऑस्ट्रियन आणि जर्मन सैनिक तुमचे शत्रू नव्हत तर तुमचा स्वतःचा झार, तुमचा स्वतःचा उद्योगपती आणि जमीनदार तुमचा शत्रू आहे. त्यांच्यावर आपल्या बंदुका वळवा. जर्मन आणि ऑस्ट्रियन सैनिकांशी बंधुभाव साधा. जणू काही तुम्ही जनावरे असल्याप्रमाणे तुमची एक-मेकांपासून फारकत करणाऱ्या तारगुंत्याबाहेर हात काढून ते एकमेकांच्या हाती द्या. तुम्ही श्रमणारे बांधव आहात. श्रमाने रक्ताळलेले घट्टे अद्याप तुमच्या हातावर आहेत. वाटणी करण्यासारखे तुमच्याजवळ काही नाही. एकतंत्री राजवट नष्ट करा ! साम्राज्यवादी युद्ध नष्ट करा ! "

"सबंध जगातील श्रमिकांच्या एकजुटीचा विजय असो ! "

ते पत्रक वाचता वाचता लिस्तनिस्तकीचा पारा चढत गेला. विद्वेषाच्या भरात आणि अबरगतीच्या आवेगाने त्याच्या मनात आले. "आता हे झालं सुरू!"

ही हकीगत टेलिफोनवरून त्याने रेजिमेंटच्या कमांडरच्या ताबडतोब काना-वर घातली. "अशा परिस्थितीत आपला काय हुकूम आहे हुजूर ? " सगळे सांगून झाल्यावर त्याने विचारले. टेलिफोनच्या नळीतून जनरलचे घोगरे शब्द आले.

"सार्जन्ट मेजर आणि जुमलेदार घ्या. आणि ताबडतोब झाडून तपास करा. प्रत्येकाची झडती घ्या. अंमलदारसुद्धा सोडू नका. ह्या रेजिमेंटला सोडून द्यायचा त्यांचा केव्हा विचार आहे ते मी डिव्हीजन ठाण्याला विचारतो. त्यांना मी तगादा करतो. तपासात तुम्हाला काही आढळलं तर मला लगोलग कळवा!"

"मला वाटतं हे मशिनगनवाल्यांचं काम आहे."

"असं म्हणता ? ठीक ! आपल्या कझाकांची झडती घ्यायचा मी कमांडरला आत्ताच्या आत्ता हुकूम देतो. अच्छा !"

जुमलेदारांना आपल्या राहूटीत गोळा करून लिस्तनिस्तकीने त्यांना रेजि-मेंटच्या कमांडरच्या हुकूम कळविला.

" काय चावटपणा आहे! आम्ही काय एकमेकांच्या झडत्या घ्यायच्या? " मेर्कुलोव चिडून म्हणाला. " तुमची पाळी पहिली लिस्तनिस्तकी! " एक तरुण बिनमिशांचा लेफ्टनंट उद्गारला.

" नाही! आपण ते ठरवायला फासे टाकूया. "

" अकारविल्हे होऊ द्या! "

" मंडळी, थट्टा पुरे! " लिस्तनिस्तकी त्याना अडवीत म्हणाला " म्हातारा भलत्याच थराला गेल्याचं उघड आहे. आपल्या रेजिमेंटचे अंमलदार धुतल्या तांदळासारखे स्वच्छ आहेत. एकच कॉर्नेट बुनचुक होता. अन् तो फरारी झालाय. पण आपण कझाकांची झडती घेतलीच पाहिजे. कुणीतरी सार्जन्ट मेजरला घेऊन या. "

सार्जन्ट मेजर तीन 'सेंट जार्ज क्रॉसेस' असलेला प्रौढ कझाक होता. तो आत आला. खोकत त्याने अंमलदारांच्या तोंडाकडे बघितले " कंपनीत सशयास्पद इसम कोण आहेत, तुला काय वाटतं, कुणी ही पत्रकं इथं टाकली असतील? " येंवगेवीने सवाल केला. " आपल्या कंपनीत असा कुणी नाय हुजूर " त्या माणसाने ठासून जबाब दिला

" पण पत्रकं तर आपल्या हद्दीत सापडली. दुसऱ्या कंपनीतील कुणी माणसं आपल्या अलंगात आली होती? "

" नाय हुजूर! "

" चला प्रत्येक माणसाची झडती घेऊ या! " मेर्कुलोवने आपला हात उडवला आणि तो दाराकडे वळला.

झडती सुरू झाली. कझाकांच्या चेहऱ्यावर भावनेच्या निरनिराळ्या छटा प्रकट झाल्या. कुणी आश्चर्याने कपाळे चढविली, कुणी अंमलदाराकडे घाबरून बघू लागले तर कुणी आपली दरिद्री चीजवस्तू अंमलदार ढुंढाळीत असता हसू लागले.

" कसली शोधाशोध चालल्येय? काय चोरीबिरी झाली की काय? मला वाटतं कुणीतरी काहीतरी पाहचलंय! " एक तरतरीत दिसणारा सार्जन्ट म्हणाला.

झडतीतून काहीही निष्पन्न झाले नाही. फक्त एका कझाकाच्या पाणकोटाच्या खिशात त्या पत्रकाची एक चोळामोळा झालेली प्रत होती. घाबरटपणे ता कागदाचा बोळा फेकून देत मेर्कुलोवने विचारले " हे वाचलस का? " " मी चुट्टा

वळायला ते उचललं ! " जमिनीवर खिळवलेली नजर वर न करता तो कझाक स्मित करीत म्हणाला,

" दात विचकायला काय झालं ? "

लालबुंद होत आणि त्या माणसाकडे तरतरा जात लिस्तनिस्तकी कडाडला. चापाच्या चष्म्याखाली त्याच्या आखूड सोनेरी पापण्या क्षोभाने फडफडत होत्या.

त्या कझाकाचा चेहरा गंभीर झाला आणि वाऱ्यावर उडून जावे तसे ते स्मित मावळले. ' माफ करा हुजूर ! मला धड वाचायलाही येत नाय ! चुट्टया–साठी माझ्याजवळ कागद नाय म्हणून ते उचललं. तंबाखू आहे न् कागद नाय्. पडलेलं दिसल म्हणून उचललं ! " तो माणूस ओरडून दुखावलेल्या आवाजात म्हणाला. त्याच्या आवाजातील कटूता जाणवत होती.

लिस्तनिस्तकी थुंकला आणि परत फिरला. बाकीचे अंमलदार त्याच्या मागोमाग चालले होते.

दुसऱ्या दिवशी ते रेजिमेन्ट काढून घेण्यात आले आणि आघाडीच्या रेषे-मागे सुमारे साडेसहा मैलावर त्याना ठेवून देण्यात आले. मशिनगन पथकातील दोघांना अटक होऊन लष्करी कोर्टापुढे खेचण्यात आले. काहींची बदली राखीव रेजिमेन्टस्कडे करण्यात आली. काहीना दुसऱ्या कझाक डिव्हीजनच्या इतर रेजिमेन्टकडे पाठविण्यात आले.

थोड्या दिवसानंतर उरलेल्या रेजिमेन्टची जरा बरी व्यवस्था लावण्यात आली. कझाक आपले आपण खळखळून अंग धू पुसू लागले. एवढच नाही तर दाढचाही करू लागले. अलंगातील ' त्या ' पद्धतीचा त्यांना आता आश्रय करावा लागत नसे. ' ती ' पद्धत अशी होती, की तोंडावरचे केस जाळायचे आणि आगीने गाल होरपळू लागले रे लागले की त्यावरून ओला टुवाल फिरवायचा, आणि जळलेले केस निपडून काढायचे. जुमल्यातील एका न्हाव्याने आपल्या कुळाला एकदा विचारले होते की " डुकराला जाळतात तसा तुला जाळू का कसं ? " तेव्हापासून ह्या पद्धतीचे नाव ' डुक्कर झाळणं ' असे पडून गेले होते.

रेजिमेन्टने विश्रांती घेतली आणि वरकरणी ते कझाक मजेत आणि झाकीत असल्यासारखे दिसत होते. पण लिस्तनिस्तकी आणि इतर अधिकाऱ्यांना ठाऊक होते की हा उल्हास म्हणजे नोव्हेंबर महिन्यातील निरभ्र दिवस ! आज आहे तर उद्या नाही. आघाडीकडे परत जाण्याची गप्प रेजिमेन्टमध्ये उठली रे उठली की चेहऱ्यावरचे भाव बदलत. असंतोष, ताण आणि उदास दुजाभाव हे वर उसळून

येत. प्राणांतिक थकिस्तपणा आणि ताण जाणवू लागत आणि त्यातून नीतिधैर्याची डळमळ निर्माण होई. अशा परिस्थितीत सापडलेला माणूस एखाद्या इप्सिताने झपाटला तर किती भयंकर होऊ शकतो हे लिस्तनिस्तकीला उत्तम ठाऊक होते.

१९१५ त त्याने स्वतःच्या डोळयांनी हे पाहिले होते. सैनिकांच्या एका कंपनीला पाच वेळा हल्ला चढविण्यासाठी पाठविण्यात आले होते. त्यांची कधी नाही एवढी हानी होत होती. तरी ताज्या दमाने चढाई करण्याचे हुकूम परत परत त्यांना मिळत होते. अखेरीला उरल्या सरल्या कंपनीने त्या रणांगणातून आपली आपणच माघार घेतली आणि पिछाडीकडे चालती झाली.

त्याना रोखण्याचा हुकूम लिस्तनिस्तकीच्या स्क्वाड्रनला देण्यात आला होता. आपल्या फळीचे पंख फैलावून कझाकांनी ती माघार रोखण्याचा जेव्हा प्रयत्न केला तेव्हा सैनिकांनी गोळीबार सुरू केला. त्यातले जेमतेम साठजण उरले होते. मरण कुठे का भेटेना, त्याची फिकीर न करण्याचा निर्धार करून कझाकांच्या तलवारीखाली कोसळत मरणाकडे आणि सर्वनाशाकडे चालून जात. ह्या साठानी ज्या पागल बेगुमान शौर्याने स्वतःचा बचाव केला होता ते लिस्तनिस्तकीने टिपले होते.

तो प्रसंग त्याच्या आठवणीत घर करून राहिलेला होता. त्याने कझाकांचे चेहेरे फिरून एकदा न्याहाळले. त्याच्या मनात आले की हे सुद्धा माघारी फिरतील व निघून जातील का ? मरणाखेरीज त्यांना काहीही अडवू शकणार नाही. मग त्यांच्या श्रांत दुर्मुखलेल्या नजरा पाहून त्याने हे प्रांजळपणे कबूल केले की, " निघून जातील ! "

युद्धाच्या सुरुवातीपेक्षा आता कझाक आमूलाग्र बदलून गेले होते. त्यांची गाणीही नवीन युद्धातून जन्माला आलेली होती आणि एक खिन्न निरानंद भाव त्यातून प्रकटला होता. त्याच्या स्क्वाड्रनचा जिथे मुक्काम होता त्या कारखान्यातील प्रशस्त मांगराजवळून जाताना त्याला अनेकदा एक तळमळीचे अनिर्वचनीय शोक-पूर्ण गाणे ऐकू येत असे. निरनिराळ्या पट्टयात त्याचा आवाज घुमत असे. तिघा चौघांच्या आवाजात ते गाणे ऐकू येत असे. स्थिरावलेल्या बोजेदार खर्जावरून एक खणखणीत लोचदार सूर पलटया घेत तार सप्तकाला जाऊन भीडे.

भेट फिरुनी मायभूमि व्हायची ना आपुली
व्हायची ना आपुली

नाहि बागेतील बुलबुल दृष्टीला पडणे पुन्हा
स्वर पहाटेचा तयाचा ऐकू येणे ना पुन्हा
आसवे ढाळू नको तू प्रीय माझ्या मावले
ह्या रणी सारेच काही जात नाहीत छाटले ।

ते गाणे ऐकण्यासाठी लिस्तनिस्तकी थबकायचा आणि त्या गाण्यातील भाबडे दुःख त्याच्या अंतःकरणाला भिडायचे. काळजाच्या वाढत्या लयीवर एक तार खेचली जायची. त्या आवाजातील खर्ज ती तार छेडायचा आणि त्या तारेची वेदनांची थरथर व्हायची. सायंकाळच्या शारदीय उदासीनतेकडे टक लावून बघत लिस्तनिस्तकी जरा उभा असे. आपले डोळे आसवांनी ओलावत असल्याचे त्याला जाणवायचे.

माळावरुनी दौडत असता अंतर माझे सांगतसे
काहीतरी ते जाणवुनी उर आतुन मजसी बोलतसे
रणापायि जो घरून निघाला मुकला तो घरदाराला
जवान आता कधि माघारी नाही जायचा गावाला ।

खर्जातील सुरांनी शेवटचा भरणा केला न केला तोच तारसप्तकातील सूर उसळी घेऊन उठे. पक्षांच्या पंखाची फडफड व्हावी तसे आवाज फडफडून उठत. पुढची कथा ते द्रुतलयीत सांगू लागत.

शिशाचं काडतुस सणाणत आलं
उरात माझ्या येऊन घुसलं ।
कोसळलो घोड्याच्या मानेवर
रगत सांडलं आयाळीवर ।

रेजिमेन्ट विश्रांती घत असतानाच्या सबंध काळात जुन्या कझाक गीतातील स्फूर्तीदायक शब्द फक्त एकदाच लिस्तनिस्तकीच्या कानी पडले. संध्याकाळचा नित्याचा फेरफटका करून तो परत येत होता. मांगरावरून जाताना हसण्याचा कल्लोळ आणि अर्धवट बेहोश सुरांचे आवाज त्याच्या कानी पडले. वाणजिन्नस आणायला शेजारील गावी गेलेल्या गोटगस्तीनं येताना हातभट्टीची दारु आणून कझाकांना पाजलेली आहे हे त्याने ओळखले. 'कंट्री' पिऊन तर्र झालेला कझाक आता काहीतरी निमित्ताने वर्दळीवर येत होते, खिदळत होते. त्यांची रासवट

आणि भेदक शिट्टी, गाण्याचा दणदणीत बाज हे काही अंतरावर असतानाच त्याला ऐकू आले.

लढाईवर जो गेलाच नाय
त्याला भय घोर हे काय कळलंच नाय
दिसभर आम्ही पावसात भिजतो
रातभर आम्ही कुडकुडतो ।
रातीचं आम्ही काय झोपत नाय

एक पल्लेदार थरारणारी शिट्टी वर झेपावत उठली आणि तिच्या मागोमाग उठलेल्या, गेला बाजार, तीसांच्या गलक्यांत ती गुदमरून गेली.

खुल्या शेतात भय अन् बल
हररोज तशी घडिघडीला ।

त्यातील एक टारगट पोरगं लाकडाच्या तक्तपोशीवर नाचत कानठळ्या बसवणाऱ्या दिडक्या शिट्टया ठोकीत असल्याचे उघड होते. त्याच्या टाचांचा खडखडाट गाण्याच्या कल्लोळात बुडून जात होता.

गरजतो समिन्दर काळा
लागल्या जहाजा ज्वाळा
ते जाळ आम्ही विझवतो
तुर्कांस ठार मारतो
जय लाखवार जय जय हो
डॉनचे कझाक की जय हो !

स्वत:ला नकळत लिस्त्निस्त्कीने स्मित केले आणि आपली पावले त्या ठेक्याच्या लयीत टाकण्याचा तो प्रयत्न करू लागला. त्याच्या मनात आले "मला वाटतं पायदळाचें लोक कझाकांएवढे घरदारासाठी तळमळत नाहीत." पण निर्विकार बुद्धीने हरकत घेऊन प्रश्न केला, "पायदळीचे काय वेगळे लोक आहेत ?" पण अलंगात मारून मुटकून बसण्याला कझाकांची होणारी प्रतिक्रिया नि:संशय जास्त वेदनापूर्ण होती, कारण त्यांच्या चाकरीच्या मूळ स्वरूपानेच अखंड चलाणपलाणाला ते रुळून गेलेले होते, आणि दोन वर्षे ते अलंगाच्या युद्धतंत्रात गुंतले होते, किंवा

चढाईच्या निष्फळ प्रयत्नात दिवस ढकलीत होते. कधी नव्हे अशी नवलाई सैन्याला आली होती. त्याला जरूर होती ती समर्थ नेतृत्वाची, एखाद्या दणदणीत यशाची, त्याला गदगदा हलवील अशा प्रत्यक् झेपेची! अर्थात् इतिहासाला असे कालखंड माहीत होते. प्रदीर्घ आणि प्रकीर्ण युद्धाचे कालखंड! अशावेळी अत्यंत खंबीर आणि अत्यंत शिस्तीच्या सैन्याचे नीतिधैर्य डळमळीत झाल्याची उदाहरणे होती. सुवोरोव..! अगदी त्यालाही हा अनुभव आला होता. पण कझाक टिकाव धरतील. अगदी कोसळलेच तरी कोसळणारे ते अखेरचे असतील! ते म्हणजे एक चिमुकले स्वयंभू राष्ट्रच आहे. त्यांची परंपरा कारखाने कामगार किंवा नांगरमुठ्या भुरट्यांची नव्हे तर लढवय्याची आहे.

त्याचा जणुकाय भ्रमनिरास करण्यासाठीच म्हणून का काय एक चिरका भसाडा आवाज 'कालिनुशका' हे गीत आळवून म्हणू लागला. इतर कझाकांनी गाणे उचलले आणि कझाकांची तळमळ गाण्यात ओतलेली लिस्तनिस्तकीला परत ऐकू आली.

तरणा अंमलदार प्रार्थना करतो देवाची
कझाक तरणा विनंती करतो घरास जाण्याची
रे तरण्या अंमलदारा
मज जाऊ देई घरा
मज जाऊ देई घरा
माझ्या बाबाकडे जाऊ दे माझ्या आईकडे
माझ्या बाबाकडे जाऊ दे माझ्या आईकडे
मला जाऊ दे तरण्या माझ्या आता अस्तुरीकडे.

फरारी झाल्यानंतर चौथ्या दिवशी संध्याकाळी बुनचुक आघाडीच्या पट्ट्यातील प्रदेशात असलेल्या एका मोठ्या व्यापारी गावात आला. खिडक्यातून दिवे चमकूही लागले होते. गोठणीने डबक्यावर बर्फाच्या पातळ कवचाचे तवंग आले होते. मधूनच जाणाऱ्या पदातीच्या पावलांचा आवाज दूरवरून ऐकू येत होता. दिव्यांनी उजळलेल्या हमसडका टाळून निर्मनुष्य गल्लीबोळातून मार्ग काढताना बुनचुकचे कान टवकारलेले होते. गावच्या वेशीजवळ गस्ती हशमाला त्याने थोडक्यात चुकवले होते. आता कुपाट्यांच्या जवळून दबकत दबकत आणि आपल्या अतोनात गलिच्छ झालेल्या पाणकोटाच्या खिशात उजवा हात घालून तो

लांडग्याच्या सावधपणे पुढे चालला होता. एक सबंध दिवसभर गळंग्याच्या ढिगात लपून बसल्याने तो पाणकोट असा गैदी झाला होता.

सैन्याच्या एका पलटणीचा तळ गावात पडलेला होता. इथं अनेक पथके वस्तीला होती. गस्ती हशमाची गाठ पडण्याचा सतत धोका आहे हे त्याला ठाऊक होते. म्हणूनच खिशात वागवलेल्या पिस्तुलाच्या खडबडीत दस्त्यावरील पकड त्याने कधीही सैलावली नव्हती.

गावाच्या दुसऱ्या बाजूला असलेल्या एका निर्मनुष्य गल्लीत बुनचुक येरझारे घालीत होता. पेडकणातून नजर टाकीत आणि प्रत्येक क्षुद्र झोपडीची रुपरेखा न्याहाळीत तो भटकत होता. सुमारे वीसेक मिनिटानंतर तो कोपऱ्यावरील एका भिकार घराजवळ आला. झडपातील फटीतून त्याने डोकावून पाहिले आणि स्वत:शी स्मित करीत निर्धारपूर्वक फाटकातून प्रवेश केला.

दारावर त्याने टकटक केल्यानतर शाल पांघरलेल्या एका वयस्कर स्त्रीने दार उघडले.

" बारिस इवानोविच इथं राहतात ?"

" होय ! मेहेरबानी करून आत या."

तिच्या अंगावरून बुनचुक पडवीत शिरला. त्याच्या पाठोपाठ कडीची थंड खळखळ झाली.

लहानशा दिवटीचा प्रकाश असलेल्या त्या ठेंगण्या छताच्या खोलीत लष्करी गणवेश घातलेला एक वयस्कर गृहस्थ मेजापाशी बसला होता. त्या अंधुक प्रकाशात डोळे विस्फारीत तो उभा राहिला. आणि दबत्या आनंदाने त्याने आपले बाहू बुनचुकच्या दिशेने पसरले.

" कोणीकडून ?"

" आघाडीवरून "

" अस्सं ?"

बुनचुक घुटमळला. पण मग स्मित करीत आणि त्या गृहस्थाच्या लष्करी पट्ट्याला आपल्या बोटांच्या टोकांनी स्पर्श करीत त्याने हलक्या सुरात विचारले " एखादी खोली आहे का ? "

त्याहूनही लहान खोलीकडे तो बुनचुकला घेऊन गेला. अंधारातच एक खुर्ची त्याच्यापुढे केली. दुसऱ्या खोलीकडे जाणारा दरवाजा लावून घेतल्यानंतर त्याने खिडकीवर पडदा ओढून घेतला, आणि तो म्हणाला,

" सगळं संपवलंस ? "

" हो ! "

" तिथं एकूण कसं काय आहे ? "

" सगळं तयार आहे ! "

" जवान विश्वासू आहेत ? "

" अगदी ! "

" तू कपडेबिपडे बदल मग आपण बोलू या. तुझ्या फर्गोल आण इकडं तुला हात पाय धुवायला काय तरी देतो. "

हिरवटलेल्या तांब्याच्या बहुगुण्यात बुनचुक तोंड धूत असताना तो गणवेशा-तील माणूस आपले आखूड कापलेले केस थोपटीत संथ श्रांत आवाजात म्हणाला,

" सध्या ते आपल्याहून वरचढ ताकदीचे आहेत. आपल्याला वाढलं पाहिजे. आपला प्रभाव पसरवला पाहिले. युद्धाची खरी कारणं समजावून देण्यासाठी उसंत न घेता मला हे केलं पाहिजे. अन् आपण वाढत आहोत तू खात्री बाळग. ते जे जे हरतात ते ते अटळपणे आपल्याकडे येतं. वाढ झालेला माणूस हा पोराहून दणकट नक्कीच असतो. पण तो जसा म्हातारा अन् कमजोर होतो तसा तो पोरगाच त्याचा धुव्वा उडवतो. आणि आपला प्रसंग निव्वळ म्हातारपणच्या कमजोरीशी नाय् तर सबंध शरीराच्याच वाढत्या पक्षघाताशी आहे. "

बुनचुकचे तोंड धुणे संपले. एका जाडचा-भरडचा टुवालाने तोंड पुशीत तो म्हणाला, " तिथून निघून जाण्यापूर्वी माझी मतं मी अंमलदाराला सांगितली. ते जरा गमतीदारच होतं माहीताय् ? मशिनगनवाल्यांना ते घुसळून काढतील, एका दोघा पोरांना 'कोर्ट मार्शल' होईल. पण काय पुरावाचा नाय्, तेव्हा ते काय म्हणणार ? मला वाटतं, त्यांची वेगवेगळचा तुकडचातून पांगापांग करतील. ते आपल्या पथ्यावर पडेल. आपल्यासाठी त्यांना जमीन तयार करू द्या. तिथं काही झकास पोरायत ! गारगोटीसारखी टणकायत ! "

" स्तिपानची मला चिठ्ठी आल्येय. लष्करी बाबी समजणारा कुणीतरी तो मागतोय. तू जा. पण कागदपत्राचं काय ? जमवशील ते तू ? "

" काम कोणतंय् ? " बुनचुकने विचारले आणि टुवाल खिळचाला अड-कविण्यासाठी त्यानें चवडे उंचावले. पोरांचा मास्तर म्हणे ! तू काय वाढतच नाहीस काय ? " त्याचा यजमान हसून म्हणाला.

" त्याची काय गरज नाय् " बुनचुकने प्रत्युत्तर केले. " विशेषत: माझ्या ठिकाणी असणाऱ्या माणसाला त्याची जरूरी नाय्. नजरेत भरू नाय् म्हणून मी शेंगेसारखाच लहानसा हवा. "

पूर्वेच्या आकाशाला पहाटेचा करेडपणा चढेपर्यंन्त ते बोलत होते.

एक दिवसानंतर बाहेर पडलेला बुनचुक ओळखण्यापलीकडे होता. त्याने अंगात नवे कपडे घातले होते. चेहऱ्यावरचे रूप पालटले होते. त्याच्या हातातील कागदपत्राच्या संचावरून तो ओरशानस्की रेजिमेंटमधील क्रमांक ४४१ चा शिपाई निकोलाय उख्वातोव होता. छातीत जखम झाल्याने अपंग झालेला हा निकोलाय उख्वातोव गावातून बाहेर पडून स्टेशनकडे चालता झाला.

———

# ३

व्लादिमिर वोलइन्स्की ते कोवेल हा प्रदेश 'खास सेने' च्या ताब्यात होता. ही खास सेना वस्तुत: क्रमांक तेराची सेना होती. पण श्रेष्ठ पदावरील सेनानीही भाबड्या भयश्रद्धेच्या तावडीतून न सुटल्याने तिला 'खास सेना' असे म्हणत.

तोफखान्याची असाधारण जबर ताकद ह्या प्रदेशात एकवटण्यात आली. जर्मन अलंगाच्या दोन सफ्यांचा कबजा असलेल्या मुलुखावर, निरनिराळ्या शक्तीचे लक्षावधी गोळे नऊ दिवस कोसळत होते. आराबा जबर झाला. त्या भडिमाराच्या पहिल्याच दिवशी आपले टेहळे तेवढे मागे ठेवून जर्मनांनी पहिला सफा खाली केला. काही दिवसानंतर त्यांनी दुसरा सफाही खाली केला. आणि तिसऱ्या सफ्याकडे माघार घेतली.

दहाव्या दिवशी तुर्कस्तान बंदुकधारी फलटणीच्या पथकांनी कूच सुरू केली. हल्ल्याच्या लाटा चढविण्याच्या फ्रेंच पद्धतीचा त्यांनी अवलंब केला.

रशियन खंदकातून सोळा लाटा बाहेर उसळल्या. भिगारत आणि ओसरत विच्छिन्न काटेरी तारांच्या भयानक खचाभोवती उधाणत तो कबरा मानवी लोंढा पुढे होलाळत होता. आणि जर्मनांच्या बाजूने जळून कोळ झालेल्या आल्डर झाडाचे रुखें आणि वाळूचे ढिमे ह्यांच्या आडून तडाडणारी, झोतावणारी अखंड करोळी ऐकू येत होती. ह्या गदारोळातून मधूनच तोफखान्याचा धमामा दणाणून उठे आणि परत जर्मन मशिनगन्सच्या करोळीच्या प्रक्षुब्ध खडखडत्या हलकीच्या साथीवर उसळलेल्या नादाच्या सघन लाटेत सगळे बुडून जायचे.

सुमारे सव्वाएक मैल रुंदीच्या क्षेत्रात छिन्नविछिन्न कोराळी धारित्री काळ्या स्फोटांच्या चक्रीवादळात झोडपली जात होती. कुलपी गोळ्याच्या खचऱ्यातून

झेपावणाऱ्या लाटा तुटत फुटत फेसाळत हेलाळत होत्या आणि पुढे पुढे सरपटत होत्या.

फुटणाऱ्या कुलुपी गोळयांच्या काळया चिळकांडया अधिकाधिक झपाटयाने उसळत आल्या. तोफगोळयांचा विदारक धुधा तारसप्तकाला भिडला आणि मशिनच्या दुरटयाने वाढत्या जालीमतेने भूमीला झोडपून काढले. हल्ल्यावर आलेल्या फौजांचा त्या तारेजवळ पोचण्याआधीच निःपात करण्यात आला. सगळया सोळापैकी फक्त शेवटच्या तीन लाटा तारांच्या गुंतावळीपर्यन्त येऊन ठेपल्या. वाकडया तिकडया होऊन गेलेल्या तारांचे उध्वस्त मेढेकोट आणि जळीत मोर्च्या-पर्यन्त ते येतात न् येतात तोच त्यावर आदळलेल्या त्यांच्या लाटा फुटून गेल्या आणि त्याच्या ओहाळकनुधारा परत मागे वाहू लागल्या.

स्विनुखी खेटयाजवळच्या उग्र कोराळी मातीत नऊ हजार जीवांचे तर्पण करण्यात आले.

त्यानंतर दोन तासांनी ह्या हल्ल्याचा फेरबनाव करण्यात आला. तुर्कस्तान बंदुकधारी दलाच्या दुसऱ्या आणि तिसऱ्या डिव्हीजनच्या तुकडयांनी आगेकूच केले. त्रेपन्नावी पायदळ डिव्हीजन आणि तीनशेसातवी सैबेरियन रायफल ब्रिगेड ह्याची पथके जरंधरावर दळणवळण अलगाने पुढे सरकली. तिसऱ्या ग्रेनेडिअर डिव्हीजनच्या बटालियन्स उजव्या कमरग्यावर पुढे हालल्या.

खास सेनेच्या तिसाव्या सेनादलाचे सेनानी लेफ्टनंट जनरल गावरिलोव ह्याना ह्या प्रदेशात आणखी दोन डिव्हीजन्सची रवानगी करण्याचा हुकूम लष्करी ठाण्याकडून मिळाला. तीनशे विसावी चेमबार्स्की, तीनशे एकोणीसावी बुगुल्मा आणि तीनशे अठरावी चेरनोयार्स्क ही ऐंशीव्या डिव्हीजनची तीन रेजिमेंटस् रात्री त्यांच्या जागावरून काढून घेण्यात येऊन त्याच्या जागी लातव्हियन पाय–दळ आणि स्थानिक स्वयंसेवकांच्या ताज्या तुकडया आणण्यात आल्या. ह्या हालचाली जरी रात्री झाल्या तरी आदल्या संध्याकाळी त्यापैकी एक रेजिमेन्ट हूल म्हणून उलटया दिशेने हालवण्यात आली. ते आठ मैल गेले तेव्हा त्यांना मागे फिरण्याचा हुकूम मिळाला. ही रेजिमेन्टस् एकाच दिशेने पण वेगवेगळया वाटांनी पुढे सरकली.

ऐंशीव्या डिव्हीजनच्या डावीकडून एकाहत्तराव्या डिव्हीजनचे दोनशेत्र्यांशीवे पावलोग्रादस्की रेजिमेन्ट आणि दोनशे चौऱ्याशीवे वेंग्रोवस्की रेजिमेंट ही पुढे सरकत होती. त्यांच्या मागोमाग आणि त्यांच्या पावलावरच उराल कझाकांची रेजिमेंट आणि चव्वेचाळीसावी प्लास्तुन्स्की रेजिमेंट चालत होती.

बदली होण्यापूर्वी तीनशे अठराव्या चेरनोयार्स्क रेजिमेन्टचा स्ताखोद नदीवरील एका लहानशा वाडीत मुक्काम होता. सकाळी पहिले संचलन झाल्यावर जंगलातील ओस पडलेल्या तंबूतून हे रेजिमेंट पांगवण्यात आले. हल्ला चढ-वण्याच्या फ्रेंच पद्धतीचे धडे त्यांना चार दिवस देण्यात आले. आणि बटालियन ऐवजी अर्ध्या अर्ध्या कंपनीने कूच केले. ग्रेनेडिअर्सना काटेरी तारा कमालीच्या झपाट्याने तोडण्याचे शिक्षण देण्यात आले. हातबाँब फेकण्याची जादा तालीम त्यांना देण्यात आली. मग त्यांनी परत पुढे कूच केले.

जंगलातून, उघड्या रानातून, अराळचाच्या निशाण्यांनी डागाळलेल्या निबिड रानवाटेने, तीन दिवस ते चालले होते. वाऱ्याने चाळवलेले हलके, जोडगीर धुके देवदारांच्या शेंड्यांना बिलगले होते. मोकळ्या जागेतून वाहत होते आणि वाफाळत्या निळ्या हिरव्या झिलाणावर एखाद्या घारीसारखे तरंगत होते. पावसाची अखड पिरपिर चालू होती, आणि ती माणसे ओलीचिंब उदास होऊन गेली. चढाईच्या मुलूखापासून जवळच असणाऱ्या खेड्यात ते पोहोचले आणि जीवावरच्या प्रवासाची तयारी म्हणून एक दिवस विश्रांती घेतली.

ह्याचवेळी ऐंशीव्या डिव्हीजनच्या अंमलदाराच्या बरोबर जाणारे खास कझाक स्क्वाड्रनजवळच चालू असलेल्या रणधुमाळीच्या दिशेने पुढे सरकत होते. ह्या स्क्वाड्रनमध्ये तातारस्की खेड्यातील 'तृतीय-राखीव' कझाक होते. आणि दुसरा जुमला तर सर्वस्वी त्यांचाच होता.

थोटचा अलेक्सी शामीलचे दोन भाऊ गिरणीतील एकेकाळचा एंजिनवाला इवान अलेक्सिएविच, माताचे वण असलेला अफोनका ओझेरोव, एकेकाळचा आतामान मानित्स्कोव, शामीलचा शेजारी दिडक्या पायाचा इवलान्ती कालिनिन लंबुटांग्या कझाक ब्रोशेव, ठेंगणा आणि लांडग्यासारखा दिसणार जाखर करेलेव, स्क्वाड्रनचा जीव की प्राण असणारा गावारला लिखोविदोव आणि इतर अनेकजण होते. असाधारण हिंस्र चेहऱ्याचा कझाक लिखोविदोव आपल्या सत्तर वर्षाच्या आईकडून आणि सुमार रुपाच्या पण अनावर कोपिष्ट बायकोकडून हूं का चूं न करता मार खाऊन घेण्याबद्दल प्रसिद्ध होता. त्यांच्यापैकी काही कझाक लष्करी ठाण्याच्या कचेरीत अडली होते. दोन ऑक्टोबरला त्यांची जागा डलानानी घेतली आणि डिव्हीजन कमांडर कित्चेन्कोच्या हुकूमावरून ह्या स्क्वाड्रनला लढाईवर पाठविण्यात आले.

चेर्नोयार्स्क रेजिमेंटचे पहिले बटालियन कूच करण्याच्या तयारीत असतानाच ३ ऑक्टोबरच्या भल्या पहाटेस ह्या स्क्वाड्रनने खेड्यात प्रवेश केला. ओस पडलेल्या पडल्याझडल्या झोपड्यातून सैनिक पळत येऊन रस्त्यात रांगा धरीत होते.

एक ठेंगणा काळगेला कार्पोरल आघाडीच्या प्लटूनजवळ उभा होता. आपल्या नकाशापेटीतून चॉकलेट काढून तो वरचा कागद काढीत होता. त्याच्या गुलाबी ओठांचे कोपरे चॉकलेटने माखले होते. पहाळीच्या अंगावरून तो खाली चालत गेला तेव्हा चिखलाचे रपके बसलेला त्याचा फर्गोल मेंढीच्या शेपटीप्रमाणे त्याच्या पायामधून लगतलोळत गेला. कझाक रस्त्याच्या डावीकडे जमले. दुसऱ्या जुमल्या– तील एका रांगेत एंजिनवाला इवान अलेक्सिएविच कडेला होता. डबकी चुकविण्याचा प्रयत्न करीत तो जमिनीवर नजर खिळवून पावले टाकीत होता. पायदळाच्या रांगांतून कुणीतरी त्याला हाक मारली. त्याने आपली मान वळवून सैनिकांच्या अंगावरून नजर फिरवली.

" इवान अलेक्सिएविच ! जुन्या मित्रा . . . . "

एक ठेंगणा सैनिक आपल्या प्लतूनच्या बाहेर पडला आणि बंदूक मागे खांद्यावर टाकून त्याच्या दिशेने धडपडत धावत आला. पण तो झोळणा निसटला आणि बंदुकीचा दस्ता त्याच्या जेवणाच्या टमरेलावर खणखणला.

" मला ओळखत नाय् ? बिसरला पण ? "

धुरकट कबऱ्या दाढीमिशांच्या खुंटानी तोंड आणि हनुवटी झाकलेला हा ठेंगणा सैनिक म्हणजे 'गुड्डू' आहे हे इवान अलेक्सिएविचने मुष्किलीनेच ओळखले.

" तू रे कुठून उपटलास ? "

" ह्या ३१८ व्या चेर्नोयार्स्क रेजिमेंटात मी आहे. माझे जुने दोस्त इथं भेटतील असं कधीही वाटलं नव्हतं ! "

'गुड्डूचा लहानसा घाणेरडा हात आपल्या स्वतःच्या हाडकलेल्या पंजात अद्याप तसाच घट्ट दाबून धरून इवान अलक्सिएविचने आनंदाने आणि भावूकपणे स्मित केले. त्याच्या लांब टांगांशी मेळ राखताना 'गुड्डू ' तुरुतुरु चालत मान वर करून इवानच्या डोळ्यात रोखून बघत होता. त्याच्या स्वतःच्या खोल गेलेल्या त्रस्त बारीक डोळ्यांची नजर विलक्षण हळूवार आणि आणि आर्द्र होती.

" आम्ही हल्यावर निघालोय् . . . . ! "

" आम्हीं पण ! "

" पण तुझं काय चाललंय् इवान अलेक्सिएविच ? "

" सांगण्यासारखं काय नाय् ? "

" इथं असंच आहे. १९१४ सालापासून मी अलंगाच्या बाहेरच पडलो नाय. आपल्याला स्वतःचं ना घर ना दार. पण कुणासाठी तरी मला लढायला हवं. "

" घोडी वद्याला शिंगरू उधळायला . . . . ! "

" स्तोकमान आठवतो ? भला माणूस होता . . . . . आपला ओसिप दाविदोविच ! हे सगळं कशासाठी चाललंय ते आपल्याला सांगायचा ! जगात माणूस असलाच तर तो एक होता . . . . . !

" तो मला आठवतो का ? " आपली लहानशी मूठ हलवीत 'गुड्डू' ओरडला. दाढीमिशाचे खूंट वाढलेल्या त्याच्या लहानखुऱ्या तोंडाला स्मिताची घडी पडली. " माझ्या बापापेक्षा तो मला चांगला आठवतो ? आपला बाप तर कवडी किंमतीचा ! स्तोकमनची काही बातमी कळली नाय ? "

" तो सैबेरियात आहे ! " इवान अलेक्सिएविच सुस्कारा टाकून म्हणाला.

" काय ? " आपल्या उंच मित्राच्या बाजूने खालीवर टणटणा उडचा मारीत आणि आपले कोल्ह्यासारखे कान टवकारून 'गुड्डूने' विचारले.

" तो तुरूंगात आहे. काय सांगावं ? तो आता मेलाही असेल. "

काही वेळ न बोलता 'गुड्डू' चालत होता. आपली कंपनी कुठे जमा होते आहे तो ते मध्येच वळून बघत होता. मधेच इवानच्या करारी हनुवटीकडे, त्याच्या अधरोष्ठाच्या अगदी खालीच असलेल्या खोल आणि गोल खळगींकडे रोखून बघत होता.

" अच्छा ! " इवानच्या हातातून आपला हात सोडवून घेत तो म्हणाला, " आपली पुन्हा भेट होइलंस वाटत नाय् ! "

डाव्या हाताने त्या कझाकाने आपली टोपी काढून घेतली. आणि खाली वाकून गुड्डूला मिठी मारली. एकमेकाचा कायमचा निरोप घेतल्याप्रमाणे त्यांनी एकमेकांचे कसकसून मुके घेतले. आणि 'गुड्डू' मागे थांबला. त्याची मुंडी एकदम छातीवर पडली. त्यामुळे त्याच्या करडचा फर्गोलातून त्याच्या कानाची गुलाबी टोके तेवढी दिसू लागली. तो मागे वळला आणि . . . . . .

इवान अलेक्सिएवीच आपल्या रांगेतून बाहेर पडला आणि कंप पावणाऱ्या आवाजात त्याने हाक मारली " अरे ए भाऊ ! भाऊ ! तू चिडत होतास ? हो, का नाय ? आठवतं का ? दणक्या होतास . . . . . . आँ ?

'गुड्डूने आपला आसवांनी डागळलेला चेहरा वळवला. आणि सुटलेल्या फर्गोलातून आणि फाटक्या सदऱ्यातून दिसणारी आपली हाडाडलेली छाती पिटीत तो ओरडून म्हणाला, 'होतो ! मी टणक होतो ! पण माझा आता पिट्टा पडलाय! म्हातार घोडं आता उरी फुटवलयं ! '

तो आणखीही काही ओरडला पण कझाकांचे स्क्वाड्रन बाजूच्या गल्लीत वळले. आणि तो इवानच्या दृष्टीआड गेला.

" तो 'गुड्डू' होता नं ? " मागोमाग पावले टाकणाऱ्या प्रखोर शालीमने विचारले.

" तो एक माणूस होता ! " इवान अलेक्सिएवीचने भारावून उत्तर दिले. बंदुकीचा झोळणा नीट ओढून घेताना त्याचे ओठ थरथरत होते.

कझाक पावले टाकीत खेड्याच्या बाहेर पडले तेव्हा त्यांना जखमी भेटू लागले. आधी एखादा, मग जोडीने, मग एकदम अनेकांचा गट आणि अखेरीस जखमींची गर्दीच लागली.

गंभीर अवस्था असलेले सैनिक ठेचून भरलेल्या गाड्या सावकाश रखडत चालल्या होत्या. काठण्यांना हिसके देणारी तट्टे भयंकर सुकून गेलेली होती. त्याच्या ओढलेल्या पाठीवर जाम पिटल्याच्या खुणा होत्या. आणि कुठे कुठे जखमातून हाडके दिसत होती. खेंकाळत जीव खाऊन मेटाकुटीने ती गाड्या खेचीत होती, फेसानें पुंजाळलेली त्यांची मुस्काटे पार चिखलाला भिडली होती. मध्येच एकादे तट्टू थांबायचे, त्याचे भकाळीला गेलेले पुठ्ठे असहाय्यपणे वरखाली होत. गर्दन दीनवाणेपणाने लोंबलेली असे. चाबकाचा फटकारा बसला की ते जागचे हलायचे आणि झोकांड्या खात परत गाडी खेचू लागायचे.

" कुठले रेजिमेन्ट ? " इतरांच्या मानानें जरा मवाळ वाटणाऱ्या एका सैनिकाला स्क्वाड्रन कमांडरने विचारले.

" तुर्केस्तान सेना ! तिसरी डिव्हीजन ! "

" आजच जखमी झाला ? "

उत्तर न देता तो सैनिक चालता झाला. कझाक स्क्वाड्रन रस्त्यावरून बाजूला वळले. आणि त्याने जंगलात प्रवेश केला. ३१८ व्या चेर्नोयास्कं पायदळ कंपन्यांनी खेडे सोडले होते आणि ह्यांच्या मागोमाग ते रखडत येत होते. दूर अंतरावर सुन्न धाराधूत आकाशात जर्मन 'बलून' चा पिवळट करडा गोळा लोंबला होता.

" पोरांनु, ती तिथं तुमच्यासाठी जादू आहे ! "

" 'सासेजकी' सारखी ! "

" साला रांडीचा त्या तिथून आपल्या सैन्याच्या हालचालीवर डोळा ठेवूनाय ! "

" तुला काय वाटतं ? इतक्या उंचावर फुकाफुकी चढला होय ? "

" अग्गागा ! कसला उंचावराय ! "

" गोळाही तिथवर पोचायचा नाय ! "

जंगलात पहिल्या पायदळ कंपनीने कझाकांना गाठले. झांजड पडेपर्यन्त ठिबकत्या देवदाराखाली त्यांना दाटीवाटीने ठेवण्यात आले. पाऊस त्यांच्या कॉलरी खाली गळत आणि पाठीवर धावत होता. काडी ओढायची त्याना मना होती. पण तशी ती नसती तरी त्या पावसात काडी ओढणेही कठीणच होते. काळोख पडू लागल्यावर त्याना दळणवळणाच्या आलंगाकडे नेण्यात आले. आलंग फार खोल नव्हता. जेमतेम पुरुष उंचीचा होता. पाण्याने तो तुडूंब भरलेला होता. आणि रेद्यांचा चिंब झालेल्या देवदार फळांचा वास त्याला येत होता. तसाच पावसाचा मखमली गंध येत होता.

फर्गोलाचे काठ वर गोळा करून कझाक धूर साडीत उकीडवे बसले होते. संभाषणाचा घसटलेला धागा त्यांनी पुढे चालविला होता. कूच करण्यापूर्वी मिळालेला तंबाखूचा शिधा दुसऱ्या जुमल्याने वाटून घेतला आणि जुमल्याच्या सार्जन्टाभोवती ते कोंडाळे करून बसले. तिथे टाकून दिलेल्या तारेच्या पिंपावर बसून सार्जन्ट आपल्या सोमवारी ठार झालेल्या जनरल कोपिलोवस्कीबद्दल सांगत होता. शांतीकाळात त्याच्या ब्रिगेडमध्ये ह्या सार्जन्टने चाकरी केली होती. आपली कथा पूर्ण करायला त्याला सवडच झाली नाही. कारण जुमल्याच्या कमांडरने 'हुश्शार' चा हुकूम सोडला आणि बोटे भाजण्याची पर्वा न करता पट्ट्यातील शेवटचा धूर आधाशीपणे ओढून घेत कझाक उड्या मारून उभे राहिले.

अलंगावरून हे स्क्वाड्रन अंधारात जाणाऱ्या देवदाराच्या जंगलातून पुनश्च पुढे नेण्यात आले. थट्टामस्करी करून एकमेकाला धीर देण्याची कोशीश करीत ते पावले टाकीत होते. कुणीतरी शीळ घालू लागला.

एका लहानशा उघड्या रानात त्यांना मुड्द्यांची एक लांबलचक रांग लागली. खांद्याना खांदे लावून ते मुडदे निरनिराळ्या पण बहुतेक भयानक आणि

असभ्य ढबीने मांडलेले होते. विषारी वायूचा एक मुखवटा पट्टयातून लोंबलेला एक बंदुकवाला सैनिक त्यांच्यावर पहाऱ्याला उभा होता. शेकडो बूटांनी आणि गाड्यांच्या चाकांनी ती ओली माती घुसळून निघाली होती. कझाक त्या मुड्यांच्या जवळून गेले. त्या मुड्यांना कुजल्याची घाणही सुटू लागली होती. ती जबर डोके उठवणारी दुर्गंधी त्यांच्या नाकात शिरली.

स्क्वाड्रन कमांडरने स्क्वाड्रनला थांबविले. आणि जुमल्याच्या अंमलदारा–बरोबर तो त्या सैनिकापाशी गेला. मिनीट दोन मिनीट त्याच्याशी बोलत उभा राहिला.

इकडे कझाकांनी रांगा तोडल्या आणि ते त्या मुड्याजवळ गेले. त्यांनी आपल्या टोप्या उतरवल्या आणि मृताच्या रहस्यापुढे सगळ्याच जिवंत माणसांना अनुभवाला येणाऱ्या प्रच्छन्न थरथरत्या भयाच्या व कुतूहलाच्या भावनेने ते ते देह न्याहाळू लागले. ते मुडदे अंमलदारांचे होते. कझाकांनी मोजले ते सत्तेचाळीस भरले. त्यांच्या रुपचर्येवरून बघता त्यातील बहुतेक वीस ते पंचवीसातील पोरे होती. फक्त पार उजव्या टोकाला, कॅप्टनचे माकूल धारण केलेला जरा मोठा होता. त्याचे तोंड सताड वासलेले होते. त्याच्या अखेरच्या आरोळीचे मूक प्रति–ध्वनी आत खोलवर दडलेले होते. तोंडाच्या वरती दाट काळ्या मिशा लोंबल्या होत्या. फटफटीत मरणकळा पसरलेल्या चेहऱ्यावरच्या रुंद भुवयांना आठ्या पडलेल्या होत्या. काही मुड्यांच्या अंगावर घाणीने बरबटलेली कुडती तर काहीच्या अंगावर पाणकोट होते. दोघेजण बोडके होते. मृतावस्थेतही देखणा दिसणाऱ्या एक लेफ्टनंटच्या देहावर कझाकांच्या नजरा बराच वेळ खिळून राहिल्या. तो उताणा पडलेला होता. त्याचा डावा बाहू छातीवर आवळलेला होता. उजवा हात त्याने बाजूला लांबवलेला होता. आणि कायमची पकड घालून पिस्तूल धरुन ठेवलेले होते. ते हत्यार काढून घेण्याचा प्रयत्न कुणीतरी केल्याचे उघड दिसत होते. त्याच्या रुंद पिवळ्या मनगटाला ओरखडलेले होते. पण ते पोलाद आणि त्याचा हात असे काही एकजीव होऊन गेले होते की त्या दोघांची कधीही फारकत करणे शक्य नव्हते ! त्याची टोपी त्याच्या पिंगट कुरळ्या केसावरून मागे सरकली होती. लाडात आल्यासारखा त्याचा गाल धरतीच्या अंगावर दाबलेला होता. आणि त्याचे नारिंगी, निळसर ओठ दुःखाने विलक्षणच पिळवटले होते ! त्याच्या उजवी–कडील त्याचा शेजारी पालथ्या तोंडाने पडलेला होता. त्याच्या पाणकोटाचा पाठीवर ढीग जमला होता. त्याचा पाठ–पट्टा फाटून गेलेला होता. त्यामुळे खाकी रंगाची तुमान आणि क्रोम-लेदरचे आखूड बूट चढविलेल्या, पिळदार स्नायू

असलेल्या त्याच्या दणकट पायांचे दर्शन होत होते. त्याच्या डोक्यावर टोपीही नव्हती. आणि कवटीवर टाळूही नव्हती. कुलुपी गोळ्याच्या कपरीने कवटीचा वरचा अर्धा भाग सफा कापलेला होता. ओलसर केसांच्या चौकटीतील रिकाम्या मेन्दू-वाडग्यात पावसाचे गुलाबी पाणी चमकत होते. त्याच्या पलीकडे खुला कातडी कुडता आणि फाटलेला पाणकोट घातलेला एक दणकट ठेंगणा अंमलदार पडला होता. त्याचे दाभाड त्याच्या अनावृत छातीवर तिरकस टेकले होते. त्याच्या डोक्याच्या केसाखाली अरुंद पांढरी कपाळपट्टी चमकत होती. त्यावरील कातडे जळून त्याच्या लहान लहान नळ्या वळल्या होत्या. भुवई आणि जबड्याच्या दरम्यान हाडाचे निव्वळ तुकडे आणि घट्ट काळा न् लाल ठेचा होता ! त्याच्या पलीकडे अवयवांचे कसे तरी जमा केलेले तुकडे आणि एका पाणकोटाची लक्तरे होती. जिथे डोके असायला हवे तिथे चेचलेले तंगडे होते. त्यानंतर भरीव ओठांचा, लांबट बालीश चेहऱ्याचा एक अगदी पोरच होता. मशिनगनच्या काडतुसांची फैर त्याच्या छातीतून पार गेलेली होती. चार ठिकाणी त्याच्या पाणकोटाला भोके पडली होती. आणि जळालेल्या कापसाचे गळाठे त्या भोकातून बाहेर डोकावत होते.

" कुणाला ..... आपल्या मरण घटकेला तो कुणाला हाक देत होता ? आपल्या आईला ? " दातावर दात वाजणारा इवान अलेक्सिएवीच तत पप करीत म्हणाला आणि आंधळ्यागत ठेचकाळीत तिथून झटकन बाजूला वळला.

कझाक घाईघाईने आपापल्या जागावर परतले. मागे वळून न बघता ते अंगावर क्रूसाच्या निशाण्या करून घेत होते. अरुंद उघड्या रानातून जाताना बराच वेळ त्यांनी मुग्धता पाळली होती. त्यांनी जे पाहिले होते त्याच्या आठवणीं-पासून त्याना त्वरेने दूर निघून जायचे होते. काही वेळानंतर टाकून दिलेल्या तंबूच्या दाट कोंडाळ्यापाशी त्या स्क्वाड्रनला थोपविण्यात आले. चेर्नोयास्कं रेजिमेन्टकडून आलेल्या जासूदाला घेऊन अंमलदारांनी एका तंबूत प्रवेश केला.

इवानचा दंड घट्ट पकडून अफोनका ओझेरोव कुजबुजला ? " ते पोरगं...ते रे शेवटचं.... मला वाटतं आयुष्यात त्यानं कधी पोरीचा मुका घेतलेला नसंल.. .. न् त्याचा जीव घेतला ! तुला काय वाटतं ह्याबद्दल ? "

" कुठं ते असे गोळ्या खाऊन मेले ?" दुसऱ्या कझाकाने मध्येच विचारले

" ते हल्ल्यावर होते. पहाऱ्याला असलेल्या सैनिकाने मला सांगितले." थोडा वेळ थांबून दुसऱ्याने उत्तर दिले.

ती माणसे पाय फाकून उभी होती. जंगलात काळोख पसरला. वाऱ्याने ढग उधळून टाकले. ते पांगल्यामुळे सुदूरच्या तारकांचे जांभळट ठिपके प्रकटले.

इकडे कमांडरने अंमलदाराना तंबूत गोळा केले. आणि जासूदाला परत पाठवले. मेणबत्तीच्या कांडक्याच्या प्रकाशात त्याने लखोटा उघडून आतील मजकूर वाचला.

" दिनांक ३ आक्टोबर रोजी पहाटेस जर्मनानी २५६ व्या रेजिमेंटच्या तीन बटालियन विरुद्ध श्वासावरोधी वायू वापरला. आणि आपला अलंगाचा पहिला सफा काबीज केला. सफ्यातील तुमची जागा घेण्याशी तुम्ही ३१८ व्या चेर्नोयास्र्क रेजिमेंटबरोबर संपर्क स्थापन करुन अलंगाच्या दुसऱ्या सफ्यापर्यंत कूच करावे आणि गनिमावर प्रतिहल्ला चढविण्याची तजवीज करून आज रातोरात पहिल्या सफ्यावरून त्याला हुसकावून लावावे असा मी तुम्हाला हुकूम देत आहे. दुसऱ्या बटालियनच्या दोन कंपनीज् आणि तिसऱ्या ग्रेनेडिअर डिव्हीजनच्या फानागोरिईस्क रेजिमेंटची एक बटालियन ह्या तुमच्या उजव्या फळीवर राहतील. "

अंमलदारांनी परिस्थितीवर चर्चा केली आणि धूम्रपान केले. नंतर त्या स्क्वाड्रनने कूच केले.

तंबूच्या बाजूने कझाक विसावा घेत असताना चेर्नोयास्र्क रेजिमेंटचे पहिले बटालियन पुढे चालते झाले. स्तोखोद नदीवरील पुलापर्यन्त ते पोहोचले.

ग्रेनेडिअर्सचा मजबूत मशीनगन विभाग पुलाची राखण करीत होता. सार्जन्ट मेजरने बटालियन कमांडरला परिस्थिती समजावून दिली आणि पूल पार करुन गेल्यावर बटालियनच्या सुटचा कंपन्या करण्यात आल्या. दोन कंपन्यानी उजवीकडे आणि एकीने डावीकडे कूच केले. चौथी राखीव झाली. पल्लेदार सफा करुन कंपन्या आगेकूच करीत होत्या. ते निबीड जंगल कुलूपी गोळ्यानी जागजागी भोकणले होते. वाट पायाने चाचपडीत माणसे सावधगिरीने चालली होती. मधूनच कुणीतरी खाली आपटायचा आणि मग दबत्या स्वरात शिव्या घालायचा. अगदी उजव्या कडेच्या कंपनीत असलेला गुड्डू त्या लांबलचक रांगेच्या सहावा होता.

दोन अंमलदार दबत्या आवाजात बोलत त्याच्या अंगावरुन गेले. कंपनी कमांडर आपल्या दाणेदार कमावलेल्या कोमलऋषभाच्या स्वरात कुरकुरत होता.

" माझी जुनी जखम परत उलल्येय. च्यायला ते सालं खोड! काळोखात त्यावरुन धडपडलो. आता परत जखम उलून वहायला लागल्येय. चालणं अशक्य झालंय. मग वाटतं मला माघारी जायला लागणार. " कोमलऋषभ काहीवेळ

निपचीत होता. तो परत ऐकू आला. दूर अंतरावर तो जास्तच कोमल होत गेला. " पहिल्या अर्ध्या कंपनीचे अधिकार तुम्ही आपल्याकडे घ्या. बलदानोव दुसऱ्या कंपनीचे घेईल. आणि मी . . . देवाशपत माझ्यानं काय चालवत नाही. मला माघारी जायला हवं . . . "

एनसाईन बेलिकोवने आपल्या घरघरीत थैवत्ती आवाजात त्याला सुनविले.

" लढाई पुढे आली रे आली की, तुमच्या जुन्या जखमा कशा उलायला लागतात. समजत नाय् ! "

" एनसाइन्, खामोष ! " कंपनी कमांडरने आपला आवाज चढवला.

" द्या सोडून ! तुम्हाला हवं तर जाऊ शकता ! "

स्वत:च्या आणि इतरांच्या पावलांचे आवाज ऐकणाऱ्या 'गुड्डू'च्या कानावर मागच्या बाजूने झाडझुडतर कडकडल्याचे आवाज आले आणि त्याने ओळखले की, कंपनी कमांडर पिछाडीकडे निघाला आहे. एक मिनिटानंतर सार्जंन्ट मेजरबरोबर कंपनीच्या डाव्या फळीकडे निघालेल्या बेलिकोवची कुजबूज त्याच्या कानावर पडली.

" वास लागतो त्याना. साले बदमाश ! बाका वक्त आला रे आला की हे आजारी पडतात, नाहीतर त्यांच्या जुन्या जखमा उलायला लागतात–आणि तुमच्या आमच्यासारख्या अर्ध्याकच्च्या खिजमतगारांना बंदोबस्त ठेवायला लागतो ! हरामखोर ! असं वाटतं . . . . सैनिकांनी . . . . ! "

तो आवाज एकाएकी ऐकू येईनासा झाला. त्याच्या पावलांची रपरप तेवढी 'गुड्डू' च्या कानी आली. कानात कर्कश नादही घुमत होते.

" अरे ए ! शेजारी ! " त्याच्या डाव्या हाताला कुणीतरी कुजबुजले.

" काय ? "

" ठीकाय ना ? "

" ठीकाय ! " 'गुड्डू' ने उत्तर दिले. आणि तात्काळ तो धडपडला. आणि गोळ्याने पाडलेल्या आणि पाण्याने भरलेल्या खड्ड्यात कोलमडला.

" मिट्ट काळोखाय साला ! " डावीकडून त्याला आवाज ऐकू आला.

मिनीट दोन मिनीट एकमेकाना न दिसता ते जात होते. नंतर अचानक तोच फुसफुसता आवाज 'गुड्डू' च्या अगदी कानात कुजबुजला.

" आपण मिळून जाऊ या ! मग तेवढं हे नाय . . . "

ओलेचिंब झालेले बूट निसरड्या जमिनीवर सावधगिरीने टेकवीत ते नं बोलता चालत होते. एवढ्यात ठिपक्याठिपक्यांची चंद्रकोर ढगाआडून बाहेर पडली. एखाद्या बोटीप्रमाणे धुक्याच्या लाटांना लोटीत ती स्वच्छ आकाशात अवतीर्ण झाली. आणि अंधुक प्रकाशाचे खाली आऊर लोटले. त्या प्रकाशात देवदाराच्या सुया प्रस्फुरीत चमचमू लागल्या. आणि त्यांच्या फळांना जास्तच उग्र गंध येतोयसे वाटू लागले. भिजलेल्या मातीचे निःश्वास जास्तच थंड वाटू लागले.

एकाएकी थांबलेल्या आपल्या शजाऱ्याकडे ' गुड्डूने ' दृष्टी टाकली. फटकारा बसावा तसा तो मुंडी हलवीत होता.

" ते पहा ! " तो कुजबुजत म्हणाला.

त्यांच्यापासून तीन पावलावर एका देवदाराखाली लांबसंद पाय फाकून एक माणूस उभा होता.

" माणूस ! " हे शब्द कुजबुजत उच्चारले ते ' गुड्डूने '. निदान त्याला स्वतःला तरी तसे वाटले.

" कोणाय ? " बंदूक खांद्याला टेकवीत त्याचा साथीदार ओरडला. " कोणाय ? गोळी झाडतो ! "

देवदाराखालची आकृती निश्चल होती. देठावर कललेल्या सूर्यफुलाप्रमाणे त्याचे डोके बाजूला कललेले होते.

" तो झोपलाय ! " ' गुड्डू ' थरारून गेला. पण बळेच हसत पुढे झाला.

त्या खड्या आकृतीकडे ते गेले. मानेला ताण देऊन गुड्डू बघू लागला. त्याच्या साथीदाराने त्या निश्चल करड्या आकृतीला आपल्या बंदूकीच्या दस्त्याने ढोसले.

" अबे ए बं भोले ! झोपलाय काय गड्या ?" तो चेष्टेने म्हणाला. "अबे ए बं भोले ! " पण त्याचा आवाज एकदम विरून गेला. " अरं मुडदा ! " मागे हटत तो किंचाळला.

दातावर दात वाजणाऱ्या ' गुड्डूने ' मागे उडी मारली. दुसऱ्याच क्षणी तो जिथे उभा होता तिथे तुटलेल्या झाडाप्रमाणे ती आकृती कोसळली. त्यानी तो पालथा मुडदा उताणा केला. तेव्हा कुठे त्यांच्या लक्षात आले की, हा २५६ व्या

रेजिमेन्टमधील सैनिक आहे. विषारी वायूची बाधा झालेल्या त्या सैनिकाचा काळ त्याच्या फुप्फुसात होता. त्या काळापासून जीवाच्या आकांताने पळू बघताना ह्या देवदाराच्या झाडाने त्याला अखेरचा आसरा दिला होता. तो धिप्पाड रुंद खांद्याचा गडी मान टाकून पडला होता. खाली पडल्याने त्याचा चेहरा चिखलाने लडबडून गेला होता. विषारी वायूने स्वाहा केलेल्या डोळ्यांचा लगदा झाला होता. सजलेली मांसल जीभ लाकडाच्या काळ्या कोलीतासारखी दातात अडकून बसली होती.

" चल बाबा, पुढं चल ! पडू दे त्याला तिथं ! " ' गुड्डू ' चा हात पकडीत त्याचा साथीदार कुजबुजला.

आणखी काही पावलांवर त्याना आणखी एक मुडदा लागला. मग आणखी. पुन्हा आणखी. कुठे कुठे गुदमरून गेलेल्या सैनिकांचे ढीगच पडले होते. कुणी उकीडवे मेले होते. कुणी चरणाऱ्या जनावरांसारखे हाता गुडघ्यावर ओणवे मेले होते. अलंगाच्या दुसऱ्या सफ्याकडे जाणाऱ्या दळणवळण अलंगाच्या तोंडाशीच एक माणूस अंगाची मुरकुंडी वळवून पडला होता. तडफडताना त्याने चावलेली मूठ तोंडात कोंबली होती.

आपली रांग पकडण्यासाठी ' गुड्डू ' आणि त्याचा साथीदार धावत गेले. पण काळोखात त्यांची चुकामूक झाली. आणि ते कसे तरी आघाडीवर आले. थोडा वेळ भटकल्यानंतर त्यानी अंधारात नागमोडी वळणाने लुप्त झालेल्या अलंगाच्या काळोख्या भगदाडात उड्या घेतल्या.

" आपण तंबू शोधू या. काय तरी खायला सापडेल. " ' गुड्डू ' च्या साथीदाराने डळमळीतपणे सुचविले.

" ठीकाय ! "

" तू उजवीकडे जा. मी डावी धरतो. बाकीचे येईस्तो शोधू या ! " गुड्डूने काडी उजळली. आणि त्याला आढळलेल्या पहिल्याच तंबूच्या दारवट्यातून आत पाऊल घातले. पण गोफणगुंडा टकुऱ्यात बसल्यागत त्याने बाहेर धूम ठोकली. आत एकमेकांच्या अंगावर दोन मुडदे आडवे पडले होते. तीन तंबू त्याने निष्फळ धुंडले. चौथ्याचे दार त्याने धाडकन् उघडले. पण जर्मन बोलणारा एक विलक्षण खणखणीत आवाज ऐकल्यावर तो खाली कोसळायचाच काय तो बाकी उरला होता.

" कोणाय् ?"

अंगावर झिणझिण्या आलेल्या 'गुड्डू' ने आवाज न करता मागे उडी घेतली.

"तू काय रे? ओहोऽऽ! एवढा वेळ का लावलास ?" तंबूतून बाहेर येत आणि खांद्यावरचा पाणकोट बेफिकीरीने सारखा करीत त्या जर्मनाने विचारले.

"हात वर! वर कर! शरण ये! बंदूक रोखून 'गुड्डू' कर्कश ओरडला.

आश्चर्यमूढ झालेल्या त्या जर्मनाने हळू हळू हात वर केले. तो बाजूला वळला आणि त्याच्यावर रोखलेल्या बागनटाच्या तळपत्या टोकाकडे तो एक टक बघू लागला. त्याचा पाणकोट खांद्यावरून खाली पडला. त्यामुळे त्याचा कबरट हिरवा फर्गोल दिसू लागला. तो फर्गोल काखेशी चुरगळला होता. त्याचे थोराड, श्रमाचे घट्टे पडलेले हात त्याच्या डोक्यावर थरकापत होते. आणि कोणत्यातरी अदृष्य वाद्यपट्ट्यांना स्पर्श करावा अशी त्याची बोटे चाळवत होती.

त्या जर्मनाचा धिप्पाड कणखर बांधा, त्याच्या फर्गोलाची पितळी बटणे' आखूड बूट, बिनझापडांची एका बाजूला किंचीत् कलती ठेवलेली टोपी, इकडे टक लावून बघत आपला मोहरा न बदलता 'गुड्डू' उभा होता. एवढ्यात पाणकोटातून खेचून काढल्यागत त्याने आपला मोहरा बदलला आणि खाकरणे, खोकणे ह्याहून एक वेगळाच आवाज घशातून काढला. आणि त्या जर्मनाच्या दिशेने त्याने पाऊल पुढे टाकले. "पळ!" पोकळ, तुटक आवाजात तो म्हणाला. "जर्मना पळ! तुझ्याबद्दल मला काय आकस नाय! मी गोळी झाडणार नाय!"

अलंगाच्या भितीवर त्याने बंदूक टेकवून ठेवली आणि चौडे उंचावीत त्याने आपला हात त्या जर्मनाच्या उजव्या हातापर्यन्त लांबवला. त्याच्या आत्मविश्वासाच्या हालचालींनी त्या माणसाला धीर येऊन त्याने हात खाली केले आणि रशियन आवाजाचे अपरिचित उच्चार तो एकाग्रतेने ऐकू लागला.

मुळीच न चाचरता 'गुड्डू' ने आपला श्रमाने घट्टे पडलेला स्वतःचा हात त्याला देऊ केला आणि त्या जर्मनाची थंडगार लुळी पडलेली बोटे करकचून आवळली. नंतर त्याने आपला तळवा वर उचलला. त्यावर चांदणे पडले आणि त्यावरचे पिंगट घट्टे दिसू लागले.

"मी कामगाराय!" हिव भरल्यागत थरथरत गुड्डू बोलू लागला. "मी तुला कशाला मारू? पळ!" त्याने हळूच त्या जर्मनाच्या खांद्याला धक्का दिला. जंगलाचा काळा शेडा खुणेने दाखवीत तो म्हणाला, "पळ रे मूर्खा! आत्ता आमचे लोक इथं येतील ...!"

'गुड्डू' च्या लांबलेल्या हाताकडे टक लावून बघत तो जर्मन उभा होता. त्याचा देह किंचीत पुढे झुकला होता. त्या अगम्य शब्दांचा अर्थ जाणून घेण्यासाठी त्याने कान टवकारले होते. तेव्हा तो एक सेकंद, दोन सेकंद उभा राहिला. त्याचे डोळे 'गुड्डू' च्या डोळ्यांना भिडले. मग एकाएकी एक आनंदस्मित त्याच्या ओठावर थरारले. एक पाऊल मागे सरकून त्याने बाहू पसरले. 'गुड्डू' चे हात घट्ट दाबले. ते जोराने हलविले. आवेगाने हसत तो त्या रशियनाच्या डोळ्यात रोखून पहात होता.

"तू मला सोडून देतोयस ? हा हा ! आत्ता मला समजलं ! . . . तू रशियन कामगारैस ना ? माझ्या सारखाच सोशल डेमोक्रॅट ? काय ? हे एखाद्या स्वप्ना-सारखं आहे ! भाऊ मला कवी–कसा विसर पडेल ? . . . . . मला शब्द सुचत नाहीत . . . . पण तू मोठा उमदा धाडशी जवान आहेस . . . ."

परकी शब्दांच्या उकळत्या वर्षावात 'सोशल डेमोक्रॅट' हा परिचित शब्द लक्षात आला.

"होय. मी सोशल डेमोक्रॅट आहे. तू बरोबर ताडलंस. आता पळ . . . . ! अच्छा भाऊ ! हात मिळव !

आंतरीक प्रेरणेने एकमेकांना जाणून ते धिप्पाड बांधेसूत बव्हेरियन आणि ठेंगणा रशियन सैनिक एकमेकांच्या डोळ्यात बघत उभे राहिले. जवळ येणाऱ्या रशियनांच्या पाहणीचे आवाज जंगलातून येऊ लागले.

तो जर्मन कुजबुजला, "उद्याच्या वर्ग लढ्यात आपण एकाच अलंगात असू नाही रे भाई ?" मग त्याने एखाद्या कवऱ्या श्वापदाप्रमाणे वरंडीवरुन उडी मारली.

त्यानंतर एक दोन क्षणांनी रशियन सैनिकांची पहल येऊन थडकली. अंमल-दारासह असलेली चेक टेहळणी तुकडी आघाडीला होती. तंबूतून सरपटत जाणाऱ्या 'गुड्डू' च्या साथीदारावर ते अगदी गोळ्या चालवण्याच्या बेतात होते.

"आपली माणसे दिसत नायत ?" बंदुकीची नळी आपल्यावर रोखलेली पाहून काळ्या पावाचा रोट उराशी कवटाळीत तो पिसाटपणे किंचाळला.

'गुड्डू' ला ओळखून वॉरंट ऑफिसरने अलंगावर उडी घेतली. आणि आपल्या बंदूकीच्या दस्त्याने त्याच्या पाठीत धसमुसळेपणे ढोसले.

"तुझा खातमा करुन टाकीन. फोडून टाकीन तुझं नाकाडं! कुठे होता तू?"

'गुड्डू' ने सुस्त चाळवा चाळव केली. त्या तडाख्याचाही हवा तो परिणाम झाला नाही. भेलकांडत पुढे येऊन आपल्या अगदी स्वभावाविरुद्ध त्याने सद्–भावाच्या स्वरात दिलेले उत्तर ऐकून वारंट ऑफिसरही चाट पडला.

"आम्ही पुढे आलो ! एवढी दांडगाई करायचं कारण नाय !"

"च्युतेपणा करू नको ! आता काय पिछाडीला . . . आत्ता काय आघाडीला! हुकूम माहित नाय ? काय काल भरती झाला काय ?" थोडावेळ थांबून त्याने विचारले, "तंबाखू आहे का थोडी ?"

"चोथा झाल्येय !"

"बघू या थोडी !"

वॉरंट ऑफिसरने चुट्टा शिलगावला आणि प्लतुनच्या पिछाडीकडे गेला.

पहाट फुटायच्या थोडे आधी चेक टेहळणी हशम जर्मन नजरबाज ठाण्याच्या तावडीत सापडले. दुरटचाच्या वर्षावात जर्मनांनी नीरवतेच्या ठिकऱ्या उडविल्या. मोजका वेळ मधे जाऊ देऊन त्यांनी आणखी दोनदा वर्षाव केले. अलंगाच्या डोक्यावर लाल डोंब उफाळला. त्याच्या नाफरमानी ठिणग्या विरतात न विरतात तोच जर्मनांचा तोफखाना धडाडू लागला. रशियन सैन्याच्या खूप मागून कुठे तरी स्तोखोद नदी जवळून फुटणाऱ्या कुलपी गोळ्यांचे नाद येत होते.

पहिला बार उडता क्षणीच चेकांच्या मागून सुमारे शंभर पावलांवरुन पुढे सरकणारी कंपनी जमिनीला तोंडे भिडवून आडवी पडली. त्या डोंबाने जमिनीवर लालबुंद दीप्ती निथळत होती. त्या उजेडात 'गुडडू ने पाहिले की, सैनिक मुंग्या-सारखे झाडाझुडुपातून सरपटत होते. चिखलाबद्दलची त्यांची चिडचिड आता उरली नव्हती. उलट जीव बचावण्याच्या शोधात ते चिखलावर अंग दाबीत होते. दिसेल त्या रेंघाराप्यातून माणसे सरपटत होती. दिसेल त्या एवढ्यातेवढ्या मातीच्या ढिगाऱ्यामागे लपत होती. दिसेल त्या लहानशा भोका-बिळातून तोंडे खुपसत होती. पण वळवाच्या पावसागत थडथडत्या मशिनगन्सचा धूधा जंगलात जेव्हा पिसाटा-सारखा कोसळला तेव्हा ते हतबल होऊन गेले. आपल्या बाहुटचातून त्यांनी मुंड्या खुपसल्या. सुरवंटासारखे ते भूमीला लिपटले. आणि हातपाय न वाकवता चिखलात आपल्या निशाण्या उठवीत सापासारखे ते मागे मागे सरपटू लागले. फळांना झोडपीत देवदारांची चाळण करीत ती डमडम काडतुसे उसळ्या घेत, जंगल फाडीत, वरती टरकावीत सर्पासारखी फुत्कारीत होती.

अलंगाच्या दुसऱ्या सफ्यापर्यंत ते परत येऊन पोहोचले तेव्हा चेर्नोयास्कं रेजिमेंटच्या पहिल्या अर्ध्या कंपनीतील सतरा सैनिक गायब झाले होते. तिथून थोड्या अंतरावर खास स्क्वाड्रनचे कझाकही गोळा होत होते. चेर्नोयास्कं अर्ध्या कंपनीच्या उजव्या फळीवर त्यांनी आगेकूच केले होते सावधगिरीने ते पुढे सरकले होते. आणि जर्मनांच्या ठाण्यावर चळक मारून गाफील जर्मनांवर ते झेपावले असते. पण जर्मनांनी चेकावर आग्सेल सुरू केल्याबरोबर समग्र क्षेत्रातील जर्मन सावध झाले. बेनिशाण भडीमार चढवून गनिमाने दोन कझाकांना ठार आणि एकाला घायाळ केले होते.

आपल्या जखमी आणि मृत सैनिकांना परत नेताना कझाकांनी रांगा धरल्या. जाताना ते बोलत होते,

"ह्याना मूठमाती द्यायला हवी."

"दुसरं कुणीतरी देईल."

"जिवंत आहेत त्यांची फिकीर करा. मेलेल्याला सगळं सारखंच."

अर्ध्या तासात पुढचा हुकूम रेजिमेन्टच्या ठाण्यावरून आला. तोफखाना मुस्तअिद करून चेर्नोयास्कं रेजिमेन्ट आणि शिबंदीची कझाक स्क्वाड्रन ह्यांनी गनिमावर ताजा एल्गार चढवायचा आणि आलंगाच्या पहिल्या सफ्यातून त्याला पिटाळून लावायचा होता.

तोफखान्याची सुमार मुस्तअिदी दुपारपर्यंत चालली होती. संत्र्यांची ठाणी बसवल्यावर कझाक आणि पाऊखलकांनी राहुट्यातून विश्रांती घेतली. दुपारी त्यांनी आगेकूच सुरू केले. त्यांच्या जरंपरावरील प्रमुख रंगणातून आलेल्या तोफखान्याच्या धुध्याने ताजा एल्गार सूचित केला. अख्ख्या आघाडीवर रशियन आगेकूच करीत होते.

जरंधरावर चर्नोयास्कं रेजिमेन्टला जी जाऊन मिळाली होती त्या पांगत्या रांगेने कझाक आगेकूच करीत होते. वरंडीचे कांडाळे दिसते न दिसते एवढ्यात जर्मनांनी झंझावाती आग्येल मोकाट सोडला. न ओरडता हे स्क्वाड्रन पुढे धावले. जमिनीवर पालथे पडले. आपल्या बंदूका त्यांनी मोकळ्या केल्या आणि पुन्हा पुढे धाव घेतली. गनिमाच्या अलंगापासून पन्नास पावलांवर ते परत जमिनीवर पडले. आणि तसेच पालथे पडून राहिले. आता डोकी वर न करता ते गोळीबार करत होते. अलंगाच्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत जर्मनांनी तारांची जाळी लावलेली होती. आफोनका ओझेरोवने टाकलेल्या दोन हातबाँबनी त्या तारा उखडून पडल्या. दुसरा हातबाँब फेकावा म्हणून त्याने देह उंचावला. तेवढ्यात

एक काडतूस त्याच्या डाव्या खांद्यात घुसले आणि ओटीपोटातून ते बाहेर आले. जवळच पालथा पडलेल्या इवान अलेक्सिएवीचने अफोनका हतबलपणे तंगड्या झाडीत असलेला आणि निपचीत पडलेला पाहिला.

थोटचा अलेक्सीचा भाऊ प्रखोर शामील मारला गेला. मरणाऱ्यात तिसरा होता. पूर्वीचा अतामान मानित्सकोव, त्यानंतर क्षणाभराने शामीलचा फेंगडा शेजारी येवलांती कालिनीनला काडतूस लागले.

अर्ध्या तासात दुसऱ्या जुमल्याची आठ माणसे कामी आली. स्क्वाड्रनचे नेतृत्व करणारा कॅप्टन मारला गेला. दोन प्लतून अंमलदार कोसळले. आणि नेतृत्व हरवलेले कझाक मागे सरपटू लागले. आग्येलाच्या टप्प्यातून बाहेर पडल्यावर कझाकांनी घोळका केला. आणि त्यांना असे आढळून आले की आपल्या-पैकी निम्मेजण गहाळ झाले आहेत. चेर्नोयास्कच्या सैनिकांनीही माघार घेतली. पहिल्या बटालियनची हानी तर ह्याहूनही जबर होती. पण तरीही रेजिमेन्टच्या मुख्य ठाण्यावरून ताजा हुकूम आला. "परत नव्याने फौरन एल्गार चढवा वाटेल ते झाले तरी अलंगाच्या पहिल्या सफ्यातून गनिम पिटाळलाच पाहिजे. आपली पूर्वीची ठाणी काबीज करण्यावरच सबंध कारवाईची फत्ते अवलंबून आहे."

ते स्क्वाड्रन विरळ सफे करून फैलावले आणि त्यांनी परत आगेकूच केले. जर्मनाच्या कतलबाज आग्येलापुढे ते अलंगापासून शंभर पावलांवर पालथे पडले. परत जुमल्यांना गळती लागली. आणि भयभीत होऊन गेलेले सैनिक धरतीला चिपटले. मरणाच्या भयाने दिङमूढ होऊन गेलेल्या त्या सैनिकांना मुंड्या उचल-ण्याचीही हिंमत होत नव्हती.

संध्याकाळच्या सुमारास चेर्नोयास्क रेजिमेन्टच्या दुसऱ्या कंपनीची दाणादाण उडून तिने पळ काढला. "तोडले गेलो रे गेलो!" ह्या आरोळ्या कझाकपर्यन्त आल्या. ते उठले आणि धडपडत झाडाझुडपातून कडमडत हत्यारे टाकून देत मागे पळू लागले.

सुरक्षित ठिकाणी धावत येऊन पोहोचल्यावर इवान अलेक्सिएवीच दम खाण्यासाठी काडतुसाने चाळण झालेल्या एका देवदाराखाली मटकन खाली बसला. तेव्हा त्याला गावरिला लिखोविदोव त्याच्या दिशेने येताना दिसला. तो झिंगल्या-सारखा झोकांड्या खात येत होता. त्याची जमिनीवर टक लागली होती. हवेतल्या हवेत त्याचा एक हात कुणीतरी पकडू बघत होता. तर दुसऱ्या हाताची बोटे तोंडावरुन कोळीष्टक ओरबाडू बघत होती. त्याच्याजवळ बंदूकही नव्हती का

तलवारही नव्हती. त्याचे लांबलचक गर्दपिंगे केस घामात थबथबून कपाळाला लिपून बसले होते. तो धडपडत इवानकडे आला. आणि तिरळ्या नजरेने धरती न्याहाळीत त्याच्या पुढ्यात थांबला. त्याचे गुडघे कापत होते आणि किंचीत वाकले होते. ते पाहून इवानला असे वाटले की आता हा हवेतल्या हवेत उडी मारण्याच्या बेतात आहे.

इवान काहीतरी बोलू लागला, पण लिखोविदोवचा चेहरा थरकाप उडाल्याने फाटून गेला.

" थांब ! " तो किंचाळला आणि उकीडवा बसला. आपली बोटे ताठ करून भयभीतपणे चहूबाजूला बघत म्हणाला, " ऐक ! " मी तुला एक गाणं म्हणून दाखवणार आहे. देवाचा पक्षी घुबडाकडं जाऊन म्हणाला.

घुबडीणबाई, घुबडीणबाई, सांग बाई एवढे कसे,
मोठ्ठ्यात मोठ्ठं म्हाताऱ्यात म्हातारं कोबडं कुठलं असे?
गरुड म्हणू, तर तो झार असे
म्हणावी घार ! ती ' मेजर ' असे !
गिधाड ' कॅप्टन ' झाला असे.
लांबचोचवाले ही ' डराल ' ची फौज
कबूतर आहे ' रखवाली ' मौज
स्टर्लीग म्हणजे ' कालिमक ' वेगळे
डोमकावळे ते जिप्सी सगळे
नीलकंठ झाले ' हुजराती '
बदकं झाली ' पदाती ' !

" अरे ए ! हे बघ ! " इवान अलेक्सिवीच पांढरा फटक पडला. " लिखोविदोव, काय झालं " ? तुला बरं वाटतं नाय का ? "

" चूप ! " लिखोविदोवचा चेहरा लालबुंद झाला. परत आपले निळसर ओठ वेळावून त्याने वेडसर स्मित केले. आणि आपल्या चमत्कारीक गाण्याचा धोसरा सुरू केला.

इवान अलेक्सिवीच ताडकन् उठून उभा राहिला.

" चल चल ! स्क्वाड्रनकडं परत जाऊ या नाहीतर जर्मन पकडतील आपल्याला ! ऐकलंस का ? "

त्याचा हात झिडकारुन टाकून लिखोविदोव परत परत ते गाणे म्हणू लागला. त्याच्या तोंडातून ऊन लाळ गळत होती. मग एकाएकी आवाज बदलून तो भसाडे गाऊ लागला. ते गाणे नव्हते तर त्याच्या हसणाऱ्या तोंडातून फुटणारे लांडग्याचे उंच किंचाळणे होते. त्याच्या लांब तीक्ष्ण दातावर थुंकी चकाकत होती. काही तासापूर्वीच आपला मित्र असणाऱ्या ह्या माणसाच्या वेडसर तिरळ्या डोळ्याकडे, विस्कटलेल्या केसांच्या डोक्याकडं, मेणासारख्या कानाकडे इवान भयभीत होऊन बघत राहिला. एक प्रकारच्या बेगुमान दुःखीपणाने लिखोविदोव एक जुने कझाक गीत किंचाळून म्हणू लागला.

दणक्यात तुताऱ्या विजयाच्या वाजती
ओलांडून डॅन्युब कझाक पठ्ठे जाती
तुर्कीची उधळुन ती सुल्तानी सद्दी
त्या इसाइना स्वातंत्र्य मिळवुनी देती

" मार्तिन ! मार्तिन ! इकडं ये ! " जवळूनच लंगडत जाणाऱ्या मार्तिन शामीलला पाहून इवान ओरडला.

बंदुकीवर भार देत मार्तिन जवळ आला. " ह्याला परत घेऊन जायला मला मदत कर. काय झालंय पाहिलंस ? " आपल्या डोळ्यानी इवानने त्या वेड्याकडे खूण केली. " त्याच्या सोसण्यापलिकडं गेलं. रक्त त्याच्या डोक्यात गेलंय ! "

आपल्या बंडीच्या बाहीने शामीलने आपल्या जखमी पायाला पट्टी बांधली. लिखोविदोवकडे न बघता त्याने त्याचा दंड पकडला. इवानने दुसरा दंड पकडला. आणि ते निघाले. लिखोविदोवच्या आरोळ्या क्षीण होत गेल्या. शामीलने कळवळून कपाळाला आठ्या घातल्या आणि त्याला थांबायचे आर्जव केले.

" एवढा गोंगाट करु नको ! " त्याने विनवणी केली, " थांब, देवाची शपथाय ! खूप झालं आता पुरे कर ! "

तो वेडा गातच राहिला. त्या कक्षाकांच्या हातून निसटून जाण्याचा त्याने प्रयत्न केला. पुन: पुन्हा तो आपले हात कानशीलावर दाबून धरायचा. दातावर दात रगडायचा आणि वेडाच्या विदारक उद्रेकात त्याचे दाभाड थरथरून मुंडी बाजूला कलंडती घेई !

— — — —




# ४

'स्तोखोद' च्या खालच्या अंगाला सुमारे सव्वीस मैलावर घनघोर लढाई चालू होती. दोन आठवडे तोफा उसंत न घेता गर्जत होत्या. रात्रीच्यावेळी प्रकाश-स्रोताच्या किरणात नाफरमानी अस्मानांच्या अंधूक रंगीबेरंगी धांदोट्या लोंबत आणि त्या ज्वाळा आणि युद्धाचे स्फोट दुरुन न्याहाळणाऱ्यांना अतर्क्य अस्वस्थतेची लागण लागत होती.

बाराव्या कझाक रेजिमेंटचा तळ एका अरण्यमय दलदलीचे रंगणी पडला होता. विरुद्ध बाजूच्या उथळ अलंगातून दबा धरून बसलेल्या ऑस्ट्रियनावर ते दिवसा मधून मधून गोळीबार करीत. रात्री झिलाणांच्या आसऱ्याने ते झोपत किंवा पत्ते खेळत. नदीच्या खालच्या अंगाला जिथे लढाईची धुमश्चक्री अद्याप चालू होती, तिथून उडणारे भयानक नारिंगी स्फोट बघत फक्त संत्री तेवढे उभे असत.

अशाच एका शिरशिरत्या गोठवत्या रात्री आकाशात दूरची दृष्ये नेहमीपेक्षा जास्त ठळकपणे थरथरत असताना ग्रिगरी मेलीखोव आपल्या राहूटीतून बाहेर पडला. आणि दळणवळणाच्या अलंगातून त्याने जंगलाकडे जाणारी वाट धरली. एका ठेंगण्या टेकडीच्या काळ्या बोडक्यावर अलंगाच्या मागे ह्या जंगलाचा कबरा खराटा उभा होता.

त्या विस्तीर्ण गंधवती धरतीवर त्याने अंग लोटून दिले. राहूट्यातील हवा गुदमरवणारी आणि जाचणारी होती. आठ कझाक जिथे पत्ते खेळत बसले होते त्या मेणाच्या डोक्यावर तंबाखूचा पिंगा धूर केसाळ घोंगडीसारखा दाटलेला होता. पण जंगलातून टेकडीच्या माथ्यावर, उडत जाणाऱ्या अदृष्य पक्षांच्या पंखानी चाळवाव्यात अशा झुळका शांतपणे झुळझुळत होत्या. गोठवती थंडी लागलेल्या

गवतातून एक शोकपूर्ण गंध उठत होता. गोळचानी चाळण केलेल्या जंगलाच्या डोक्यावर अंधार साचून आलेला होता. आकाशात कृत्तिकेची धुमसती ज्वाळा जळत होती. आकाशगंगेच्या काठावर सप्तर्षी बसले होते. ध्रुव अखंड मंदावल्या दीप्तीने चमकत होता.

ग्रिगरी त्या ताऱ्याकडे टक लावून बघत होता. त्याची थंड मंद पण तरीही त्याच्या डोळ्याना विलक्षण झोंबणारी प्रभा बघून त्याच्या पापणीखाली गार आसवे उचंबळून आली,

आठवणींच्या आवेगाने सगळी गेलेली वर्षे त्याच्या मनात ठळकपणे उभी राहिली. यागोदनायाला तो आक्सिनीयाकडे गेला होता. ती रात्र त्याला आठवली. तिच्या आठवणीने त्याला एकाएकी वेदना झाल्या. तिच्या मुखाची लाडकी तरीही दुरावलेली रेषाकृती त्याच्यापुढे अस्पष्टपणे उभी राहिली.

वेदनेने कळवळलेला, गालावर आसुडाचे सुस्पष्ट वळ उमटलेला तिचा जो चेहरा त्याने अखेरीस पाहिला होता तो आठवायचा प्रयत्न करताच त्याचे काळीज जोराने धडधडू लागले. पण स्मृती पुन्हा पुन्हा दुसरा एक चेहरा दाखवित होती. किंचीत बाजूला कललेला विजयाने स्मित करणारा! पण परत आक्सिनीया खटचाळपणे आणि लाडीकपणे आपले मुख वळवून आपल्या मादक काळ्याकरंद डोळ्यांनी त्याच्याकडे बघत होती. तिचे उच्छृंखल, अतृप्त, लालेलाल ओठ लडीवाळपणे शब्दांपलीकडचे काहीतरी कुजबुजत होते. मग ती हळूहळू आपली नजर वळवायची. त्याच्यापासून तोंड फिरवायची. तिच्या पिंगट मानेवरच्या दोन कुरळ्या बटा त्याच्या नजरेस पडत. एक वेळ अशी होती की, त्याचा मुका घेणे त्याला केवढे प्रिय होते.

ग्रिगरी थरारून गेला. आक्सिनीयाच्या केसांचा सूक्ष्म, उन्मादक सुगंध आपल्याला जाणवतोय असे त्याला क्षणभर वाटून त्याच्या नाकपुड्या फुलल्या. पण छे ! तो गळून पडलेल्या पानांचा त्रासदायक गंध होता. आक्सिनीयाच्या मुखाचे लंबमंडल अंधुकले आणि निघून गेले. त्याने डोळे उघडले आणि धरित्रीच्या खडबडीत कातडीवर आपला तळवा दाबून विछिन्न ढगांच्या पलीकडे, उडता-उडता निश्चल झालेल्या निळ्या फुलपाखरांप्रमाणे ओठंगलेल्या ध्रुवताऱ्याकडे अपलक नजरेने टक लावून तो पडून राहिला.

दुसऱ्या आठवणींनी आक्सिनीयाची मुखचर्या पुसून टाकली. आक्सिनीयाशी तोडून टाकल्यानंतर तातारर्कीत आपल्या घरच्या माणसांबरोबर घालवलेले आठवडे

त्याला आठवले. पूर्वीच्या अक्षत थंडपणाचे उट्टे काढण्याचाच जणू प्रयत्न करणाऱ्या नतालियाच्या आधाशी जीवघेण्या मिठ्यांच्या रात्री आणि घरच्या माणसांनी अगत्य दाखवलेले त्याचे अगदी कोडकौतुक केलेले दिवस! आपल्या आद्य सेन्टजॉर्ज कवालिअरला सलाम करताना खेडूतांना वाटणारा आदर हे सारे त्याला आठवले. सगळीकडे, अगदी घरातसुद्धा ग्रिगरीला ते तिरपे, आश्चर्य आणि आदरयुक्त कटाक्ष आढळत होते. एक स्वच्छंदी आणि आनंदी पोरगा असणारा हाच तो ग्रिगरी ह्यावर आपला विश्वास बसत नाही. अशाप्रकारे ते त्याला निरखीत होते. बरोबरीच्या नात्याने म्हातारी माणसे त्याच्याशी बोलत. तो भेटला की टोप्या काढून हातात घेत. त्याची शेलाटी किंचीत पोक आलेली आकृती आणि छातीवर लावलेला क्रॉस इकडे बायकामुली उघड कौतुकाने बघत. गिरिजाघराला किंवा चौकाकडे बापलेक बरोबर जात तेव्हा त्याच्याबद्दल त्याच्या पांतिलेय प्रकोफि–एवीचला उघड अभिमान वाटायचा ते त्याच्या लक्षात आले होते. गारांझाने ज्याचे रोपण केले होते ते सत्य ह्या प्रशंसा, आदर आणि कौतुकाच्या सूक्ष्म, जटील विषाने त्याच्या जाणीवेवरून बुडवून धुवून टाकले. तातार्स्कीला परतलेला ग्रिगरी एक माणूस होता आणि तिथून आघाडीकडे परत आलेला तो वेगळाच माणूस झाला होता. आईच्या दुधातून शोषलेल्या, जन्मभर जोपासलेल्या त्याच्या स्वतःच्या कझाकी परंपरांनी श्रेष्ठतर मानवी सत्त्यावर मात केली होती.

"ग्रिगरी, तू एक भला कझाक होणार हे मला माहित होतं." किंचीत तर्र झालेला पातलेय त्याला निरोप देताना आपली काळी चंदेरी दाढी कुरवाळीत म्हणाला होता.

"तू बारा महिन्याचा झालास तेव्हा मी तुला आवाडात घेऊन गेलो आणि पूर्वीपासून चालत आलेल्या कझाक रीतीला धरून तुला उपलाण्या घोड्यावर बसवला. आठवतं का आई? अन् तू-तू लेका सैताना, तुझ्या इवल्याशा हातानं खुशाल घोड्याची आयाळ पकडलीस. तेव्हाच मी म्हटलं की तू भला होणार. अन् तसाच झालास हो!"

एक भला कझाक होऊन ग्रिगरी आघाडीकडे परतला. युद्धाच्या अनर्थकतेशी अद्याप त्याची मानसिक तडजोड झालेली नव्हती. तरीही आपली कझाकी शान तो इमानदारीने सांभाळीत होता.

१९१५ मे. ओलखोविच खेड्याला लागून असलेल्या हिरव्याकंच कुरणावरून तेराव्या जर्मन पोलादी रेजिमेन्टने मजल मारली होती. नाकतोड्यासारखी मशीन-गन्सची चिक् चिक् चालली होती. ओढ्याकाठी धमधमे लावलेल्या रशियन

कंपनीच्या अवजड मशीनगन्स दणक्यात गर्जत होत्या. जर्मन हल्ल्याचा मुख्य भार बाराव्या कझाक रेजिमेन्टने पेलला होता. कझाकांच्या सफ्यातून पुढे धावणाऱ्या ग्रिगरीने वळून पाहिले तेव्हा मध्यान्हीच्या आकाशात सूर्याचा ओतीव गोळा आणि दुसरा सूर्य कळकीच्या ओढ्यात त्याला दिसला. ओढ्यापलीकडे, चिनारांपलीकडे कझाकांची जनावरे होती. आणि समोर जर्मन सफा–गफीरावरील ताम्र-गरुडांची सोनेरी चमक. आग्मेलाचा जळीत नीळसर धूर वाऱ्याच्या एका झोताने फुगारला होता.

ग्रिगरी संथपणे मारगिरी करत होता. काळजीपूर्वक नेम धरीत होता. आणि ओरडून पल्ल्याच्या सूचना देणाऱ्या जुमल्याच्या कमांडरचा आवाज पुढची गोळी चालवण्याआधी ऐकून घेत होता.

बाहीवर येऊन बसलेला सोनकिडा त्याने सावधगिरीने काढून टाकला. मग हमला सुरु झाला. आपल्या बंदुकीच्या दस्त्याने ग्रिगरीने एक धिप्पाड जर्मन लेफ्टनंट खाली लोळवला. तिघांना जिते धरले आणि त्यांच्या डोक्यावरून गोळ्या झाडीत त्यांना ओढ्याच्या दिशेने पळायला लावले.

आणि मग १९१५ च्या जुलै महिन्यात एका कझाक जुमल्याबरोबर त्याने ऑस्ट्रीयनांनी काबीज केलेली बतारी परत मिळवली होती. ह्याच लढाईत तो वाट काढीत गनिमाच्या पिछाडीला गेला होता. आणि हलक्या मशिनगनचा दुरटा त्यांच्यावर चालवून आगेकूच करणाऱ्या ऑस्ट्रीयनांना सळो की पळो करून सोडले होते. एका तुंदिलतनू अंमलदाराला धरून त्याने त्याला मेंढरागत आपल्या जीन–कशावर लावला होता. त्या सबंध घोडा-फेकीत भयाने थरथरणाऱ्या आणि घाम फुटलेल्या पुष्ट शरीराचा स्पर्श त्याला जाणवत होता.

आपला कर्दनकाळ शत्रू असलेल्या स्तियान आस्तारवोव भेटला. तो एक प्रसंग त्या टेकडीच्या माथ्यावर पडल्या पडल्या ग्रिगरीला विशेष ठळकपणे आठवला.

बारावी रेजिमेन्ट आघाडीवरून काढून घेण्यात येऊन पूर्व प्रशियात पाठविण्यात आली होती. जर्मनांची नेटकी शेते कझाकांच्या घोड्यांनी टापांखाली तुडवली. जर्मनांच्या वस्तीवर कझाकांनी गोळ्या चालवल्या. ते गेले त्या सडकेने लालबुंद धूर उसळला आणि जळालेल्या भिंती आणि कौलारू छपरे धुळीला मिळाली. स्तोलिपीन गावाजवळ २७ व्या डॉन कझाक रेजिमेंटच्या फळीवर राहून ह्या रेजिमेन्टने एल्गार केला.

आपला भाऊ, स्वच्छ हजामत केलेला स्तिपान, आणि आपल्या खेडयातील इतर कझाक क्षणभर ग्रिगरीच्या नजरेला पडले. त्या रेजिमेन्टचा पराभव झाला आणि जर्मनांनी त्यांना घेराव दिला. गनिमाचे कडे तोडण्यासाठी बारावे स्क्वाड्रनचे धामे एका मागोमाग एक अंगेजणीने एल्गार करीत असताना स्तिपान ग्रिगरीच्या दृष्टीस पडला. मांडीखालचा घोडा मारला गेल्याने स्तिपानने खाली उडी घेतली होती आणि भोवऱ्यासारखा तो गरगरत होता. आकस्मित आनंदी निश्चयाने स्फुरलेल्या ग्रिगरीने घोडयाचे लगाम खेचले. स्तिपानला टापाखाली तुडवणे तेवढे बाकी ठेवून शेवटचे स्क्वाड्रन बाजूनी घोडी फेकीत गेल्यावर आपला घोडा स्तिपान जवळ आणून तो ओरडला, " माझे रिकीब पकड. "

स्तिपानने रिकाब सोट पकडले आणि ग्रिगरीच्या घोडयाच्या बाजूने तो अडीच एक फर्लांग धावत गेला. "इतक्या जोराने पिटाळू नको. जोराने पिटाळू नको. देवाची आणाय!" तोंड विस्फारून धापा टाकीत तो विनवण्या करू लागला.

जर्मन कट्टीला पडलेल्या भगदाडातून ते सुखरूप पुढे गेले. त्यांचे स्क्वाड्रन ज्या जंगलात मागे गेले होते त्या जंगलापासून दोनशे यार्ड अंतरावर ते आले होते. एवढयात एक काडतूस नेमके स्तिपानच्या पायात घुसले. वाऱ्याने ग्रिगरीच्या डोक्यावरची टोपी फेकली गेली आणि त्याचे केस त्याच्या डोळयात उतरले. ते मागे सारीत त्याने आजूबाजूला पाहिले, तेव्हा स्तिपान लंगडत लंगडत एका झुडताराकडे जाताना त्याने पाहिला. त्याने आपली कझाक टोपी भिरकावून दिली.

तो खाली बसला, आणि शेंदरी कझाक पट्टे असलेल्या तुमानीची बटण गडबडीने सोडू लागला. टेकडीमागून जर्मन्स धावत आले. स्तिपानला मरायची मुळीच इच्छा नसल्याचे ग्रिगरीने ओळखले. म्हणूनच तर तो कझाकी तुमान ओढून काढीत होता. कारण त्याला हे ठाऊक होते की कझाकाला जर्मन मुळीच दयामाया दाखवणार नाहीत. अंतरीच्या हाकेला ओ देऊन त्याने आपला घोडा फिरवला आणि त्या झुडताराच्या दिशेने तो दौडत आला. धावत्या घोडयावरूनच त्याने उडी घेतली.

" माझ्या घोडयावर चढ ! "

स्तिपानला घोडयावर चढायला ग्रिगरीने मदत केली. तेव्हा त्याच्या डोळयातील तुच्छतेची छटा ग्रिगरीला कधीही विसरणे शक्य नव्हते. त्याला घोडयावर बसवून आणि हातात रिकीब पकडून घामाने डबडबलेला ग्रिगरी

घोडयाच्या बाजूने धावू लागला. काडतुसांचा लोंढा त्यांच्या डोक्यावरुन सुसाटत जात होता. आणि परिपक्व बाभूळशेंगा तडकल्यासारखे बारांचे आवाज पाठीमागून येत होते.

वेदनेने विवर्ण होऊन पिळवटून गेलेल्या चेहऱ्याचा स्तिपान जंगलात जीनातून खाली घसरला आणि लंगडत लंगडत बाजूला गेला. त्याच्या उजव्या बुटातून रक्त गळत होते. आणि प्रत्येक पावलागणिक बुटाच्या तुटलेल्या तळव्यातून लालभडक धारेच्या चिळकांडया उडत होत्या. एका विशाल ओकवृक्षाच्या बुंध्याला तो टेकला आणि त्याने ग्रिगरीला खुणेने बोलावले.

"माझा बूट रक्तानं भरुन गेलायं." ग्रिगरी त्याच्याजवळ आल्यावर तो म्हणाला.

ग्रिगरी बाजूला बघत गप्प उभा होता. "ग्रिशा ! आज आपण जेव्हा एल्गार सुरु केला . . . . ग्रिगरी, ऐकतोयस् ना ? " ग्रिगरीच्या डोळयात बघण्याचा प्रयत्न करीत स्तिपान म्हणाला, " आपण एल्गार सुरु केला तेव्हा मी पाठीमागून तुझ्यावर तीनदा गोळया झाडल्या . . . . पण तुझा जीव घेणं माझ्या नशीबात नव्हतं. "

त्यांच्या नजरा एकमेकीना भिडल्या. खोल गेलेल्या खोबणीतील स्तिपानची तीक्ष्ण बुबुळे असह्यपणे चकाकत होती. ओठ न हालवताच जवळजवळ तो बोलत होता.

" तू माझे प्राण वाचवलेस . . . . ! मेहेरबानी... ! पण आक्सिनीयाबद्दल मी तुला माफ करु शकत नायं ... ! माझं मनच होत नाय ... मला भाग पाडू नको ग्रिगरी ! "

" मी तुला भाग पाडत नायं. " ग्रिगरीने उत्तर दिले. पूर्वीसारखेच कट्टर वैरी म्हणून ते एकमेकापासून पांगले.

मे महिन्यात ब्रुसिलोव सेनेच्या इतर पथकाबरोबर त्या रेजिमेंटने लुत्स्क् इथे आघाडीतून मुसंडी मारली होती. आणि दे मार, घे मार करीत गनिमाच्या पिछाडीला हैदोस घातला. ल्वोदजवळ ग्रिगरीने आपल्या स्क्वाड्रनची नायकी स्वतःकडे घेतली होती आणि ऑस्ट्रियनाचा गर्नाळी तोफखाना आणि अलीगोल बांधानी काबीज केले.

जवळजवळ एक महिन्यानंतर रात्रीच्यावेळी एक 'जीभ' काबीज करावी म्हणून तो बग नदी पोहून गेला होता. बेसावध संत्र्यावर त्याने झडप घातली आणि तो दणकट, ठोसर बांध्याचा जर्मन आणि अर्धनग्न ग्रिगरी ह्यांची अंधारात बराच वेळ झटापट होऊन अखेरीस ग्रिगरीने त्याला जेरबंद केला.

तो प्रसंग आठवून ग्रिगरीला हसू आले. अलिकडच्या आणि तशा अलिकडच्याही नसलेल्या लढाईत असे काय थोडेथोडके प्रसंग घडले होते ?

बेगुमान ताकद दाखवण्याचा प्रत्येक संधीचा फायदा करुन घ्यायचा, पागल साहसात प्राणांची बाजी लावायची, वेषांतर करून गनिमांच्या पिछाडीला जायचे, आणि चौक्या मारायच्या असे करुन ग्रिगरीने कझाकी प्रतिष्ठेचा सतत बचाव केला होता. युद्धाच्या सुरुवातीला परदुःखाची जी भावना त्याला गांजत होती ती कायमची निघून गेली होती. अवर्षणातील खाऱ्या झिलाणासारखे त्याचे काळीज कठीण आणि निबर झाले होते. ह्या खाऱ्या झिलाणात पाणी जसे मुरत नाही, तशी ग्रिगरीच्या काळजात कोणतीही कणव मुरत नव्हती. बेदरकार तुच्छतेने तो स्वतःच्या आणि इतरांच्या प्राणाशी खेळत होता. आणि अंगावर पराक्रम मिरवीत होता. सेंट जॉर्जचे चार कॉसेस आणि इतर चार पदकांचा तो धनी झाला होता. प्रसंगोपात होणाऱ्या कवायतींच्यावेळी असंख्य लढ्यातील दारुगोळ्याच्या धुरात मुरलेला ग्रिगरी रेजिमेंटच्या निशाणाजवळ खडा होत असे. पण पूर्वी आपण हसायचो तसे आता आपण हसू शकत नाही हे त्याने ओळखले होते, आपले डोळे खोल गेले आहेत, गालफडे सुळक्यागत निघाली आहेत, हे तो जाणून होता. एखाद्या बालकाचा पापा घेताना त्या स्वच्छ निष्पाप डोळ्यात आपण रोखून बघू शकत नाही, हे त्याने जाणले होते. आपले क्रॉसेस आणि पदके ह्यासाठी आपण कोणती किंमत चुकती केली आहे ते त्याने ओळखले होते.

डाव्या कोपऱ्याची उशी करून तो टेकडीवर पडला होता. त्याच्या पाण-कोटाचे काठ त्याच्या अंगाखाली मुडपले होते. त्याच्या स्मृतीने तत्परतेने भूतकाळ सजीव केला होता. आणि आठवणींच्या मांदियाळीत त्याच्या शैशवातील एक परता प्रसंग नाजूक निळ्या धाग्याप्रमाणे ओवलेला होता. क्षणभर त्याने त्यावर आपला मनश्चक्षू खिन्नपणे पण प्रेमाने रोखून धरला. मग तो परत वर्तमानात आला.

ऑस्ट्रियन अलंगात कुणीतरी कुशलतेने मॅनडोलीन छेडीत होता. वाऱ्यावर फुललेले ते नाजूक सूर स्तरवोद नदीवरून लगबगीने येत होते. आणि इतक्या वेळा मानवी रक्ताने न्हाऊन निघालेल्या भूमीवरून लटपटत जात होते. वर चांदण्या-जळत होत्या. पण अंधार गहिरा होत होता. आणि मध्यरात्रीचे धुके झिलाणावर

ओठंगले होते. लागोपाठ त्याने दोन चुट्टे ओढले. बंदुकीच्या झोळण्यावरुन राकट लाडाने बोटे फिरवली. मग त्या अगत्यशील धरतीवरुन तो उठला आणि आपल्या अलंगात परत गेला.

त्याच्या राहुटीतील माणसे अजून पत्ते खेळत होती. ग्रिगरीने आपल्या गवती बिछान्यात अंग टाकले. गचपण वाढलेल्या आठवणींच्या वाटेने पुन्हा एकदा भटकण्याचा त्याने प्रयत्न केला. पण त्याने काही हालचाल करायच्या आधीच झोपेने त्याचा ताबा घेतला होता. भाजून निघालेले अमर्याद माळरान, 'अमर' पुष्पाची किरमीजी सुरखाई, फांदरलेल्या अस्मानी थाइनच्यामधून उमटलेल्या घोडयांच्या बेनाल खूर निशाण्या, ह्यांची त्याला स्वप्ने पडत होती.

माळरान ओकेबोके आणि भयंकर सुन्न होते. कठीण गोटचाळ जमिनीवरून तो चालत होता. पण स्वतःचे पदाघात त्याला ऐकूच येत नव्हते. त्यामुळे तो घाबरून गेला. क्षणभर तो जागा झाला. आणि कोणत्यातरी आगळचा झाडपाल्याचा गंध क्षणैक जाणवलेल्या घोडयाप्रमाणे त्याने डोके वर उचलून आपले ओठ चावले. मग त्याला जी झोप लागली तिच्यात स्वप्नांचा व्यत्यय आला नाही.

दुसऱ्या दिवशी तो जागा झाला तो त्याला शोषून घेणारी व्याकुळतेची एक अतर्क्य भावना घेऊनच.

" आज एवढा रडवेला का दिसतोयस् ? काल रात्री घराचं स्वप्न पडलं का काय ?" अुन्युपिनने त्याला विचारले.

" बरोबर ओळखलंस. मला माळरानाचं स्वप्न पडलं . . . . मन कसं आंबुन गेलंय . . . . घरी जावसं वाटतं. झारच्या चाकरीचा वीट आलायं . . . ."

अुन्युपिनने अगतीकपणे स्मित केले. ग्रिगरीबरोबर राहुटीत तो सतत राहिला होता. तेव्हा एका दणकट जनावराला दुसऱ्याबद्दल वाटतो तसा त्याला ग्रिगरीबद्दल आदर होता. १९१४ त भांडण झाले त्यानंतर त्यांच्यात कोणतीही झटापट झालेली नव्हती. ग्रिगरीचा बदललेला स्वभाव आणि मनोभूमिका ह्यात अुन्युपिनचा अंमल ठळकपणे दिसून यावा असाच होता. युद्धानं अुन्युपिनचा दृष्टिकोन चांगलाच बदलला होता. सावकाश पण अविचलीतपणे तो युद्धाविरुद्ध वळला होता. देशद्रोही सेनानी आणि झारच्या राजवाडयातील जर्मन ह्यांबद्दल तो बरेच बोलत असे. एकदा तो पुटपुटला होता, " झारिना स्वतः जर्मन रक्ताची आहे तेव्हा त्यांच्या हातून काही भलं निघण्याची आशा करू नको. तिला मोका मिळाला, तर ती चुटकीसरशी आपल्याला, गनिमाला फुंकून टाकील . . . " गारांझाची शिकवणूक

त्याला समजावून सांगण्याचा प्रयत्न ग्रिगरीने केला होता. पण अन्चुपिन ते काही ऐकायला तयार नव्हता.

"गाणं ठीकाय पण आवाज बेसूर आहे." आपल्या टकलावर थापट्या मारीत कुत्सित हसत तो म्हणाला होता. भिंतीवर बसलेल्या कोंबड्यागत मिशा कोशेवोई असंच केकाटत असतो. त्या क्रांत्यातून खोडसाळपणाखेरीज काही तथ्य निघत नसतं. लक्षात ठेव, आपणा कझाकांना जर काय हवं असेल तर ते म्हणजे स्वतःचं सरकार. दुसरं कुठलं नाय! निकोलाय निकोलाएविचसारखा एक जबरदस्त झार आपल्याला हवाय. नांगरमुठ्यांचा न् आपला काय पण संबंध नाय. कदंब न् डुक्कर भाई भाई होत नसतात. नांगरमुठ्यांना स्वतःसाठी जमीन मिळवायच्येय. कामगारांना पगारवाढ हव्येय. पण ते आपल्याला काय देणार? जमीन तर आपल्यापाशी रग्गड आहे आणखी आपल्याला कशाची गरज आहे? आपला झार कुचकामाचा आहे. हे नाकारण्यात अर्थ नाय! त्याचा बाप जबर होता. पण १९०५ सारखी क्रांती दरवाजा ठोठावेस्तो हा बसून राहणार. मग सगळेच सैतान दरीत कोलमडत जातील. त्यातून आपल्या पदरात काय पडायचं नाय. एकदा त्यांनी झारला गचांडी दिली की ते आपल्यामागे हात धुवून लागतील. †

आधी आपल्याविरूद्ध ते जुना सूड उगवून घेतील. मग आपल्या जमिनी काढून घ्यायला लागतील. अन् त्या नांगरमुठ्यांना देऊन टाकतील. आपण सावध राहिलं पाहिजे!"

"तू नेहमी एकाच वाटेने विचार करतोस." ग्रिगरीने कपाळाला आठ्या घालून म्हटले. "फुक्कट बोलतोयस! तू अजून बच्चा आहेस. दुनिया पाहिली नाहीस. पण थोडा थांब मग कळेल कोण बरोबर आहे ते!"

वादविवाद बहुतेक इथंच आटपत असे. ग्रिगरी मूग गिळून बसायचा. मग अन्चुपिन संभाषण दुसऱ्या कुठल्यातरी विषयाकडे वळवायचा प्रयत्न करायचा.

त्यादिवशी ग्रिगरी एका नको त्या प्रकारात ओढला गेला. दुपारी नेहमी–प्रमाणे टेकडीच्या पलीकडच्या बाजूला जंगरसोई थांबली. दळणवळणाऱ्या अलंगातून

---

† (१) निकोलाय निकोलाएविच (१८५६–१९२९) ? ... पहिल्या महायुद्धात रशियन फौजांचा सरसेनापती. यादवी युद्धात हा परदेशात पळून गेला. तिथे रँगेल आणि बहुसंख्य राजवाड्यांबरोबर त्याने रशियन गादीवर हक्क सांगितला.

धक्काबुक्की करीत कझाक रसोईकडे गेले. तिसऱ्या जुमल्याचे जेवण घेऊन येण्यासाठी मिशा कोशेवोई गेला. येताना एका लांब कावडीला बांधून त्याने वाफाळत्या जेवणाचे टिनपाट आणले. राहुटीत पाय टाकतो न टाकतो एवढ्यात तो गरजला,

" हे चालायचं नायं भाऊ ! आपण काय कुत्रीबित्री आहोत का काय ! "

" काय झालं ? " अन्युपिनने विचारले.

" मुडदार मांस खायला घालतायंत आपल्याला ! " कोशेवोई चिडून उद्गारला. आपली झुलपं मागे झटकीत त्याने ते टिनपाट बिछान्यावर ठेवले आणि तिरप्या नजरेने अुन्युपिनकडे बघत तो म्हणाला,

" स्वतःच हुंगून बघ ह्याला कसली घाण मारत्येय ते ! "

आपल्या टिनपाटावर ओणावून अुन्युपिनने नाकपुड्या विस्फारल्या. दचकून मागे होत त्याने चेहरा वाकडा - तिकडा केला.

कोशेवोईनेही कपाळाला आठ्या घातल्या. अुन्युपिनकडे पाहून त्याच्याही नाकपुड्या आपोआप थरारू लागल्या.

" सडलंय मांस ! " अुन्युपिनने निर्णय दिला.

त्याने किळस येऊन ते टिनपाट ढकलून दिले. आणि ग्रिगरीकडे बघितले. ग्रिगरी आपल्या बिछान्यावरून उठला आणि आपले चोचदार नाक त्याने सुपाजवळ नेले. तो दचकून मागे झाला आणि संथपणे एक लाथ मारून त्याने जवळचा टिनपाट जमिनीवर उडवून दिला.

" असं का केलंस ? " अुन्युपिनने चाचरत विचारले.

" का ते दिसलं नाय ? बघ ! डोळे फुटले का काय ? ते कायाय ? " जमिनीवर पाझरणाऱ्या चिखल सड्याकडे ग्रिगरीने बोट दाखविले.

" ईऽऽऽ ! किडं ! अग आई गऽऽऽ ! अन् मला ते दिसलेच नैत ! काय झकास जेवण आहे तुम्हाला ! कोबीचा रस्सा नाय - हा शेक्याचा रस्सा ! काळजी-ऐवजी किडं !

वंगणाने डागाळलेल्या जमिनीवर लाल विटकरी मांसाच्या लाब्यांजवळ उकळलेले पांढरे किडे निर्जीवपणे पडले होते.

"एक ... दोन ... तीन .... चार .... " कोशेवोईने ते मोजले पण का कुणास ठाऊक दबत्या आवाजात त्याने ते मोजले.

क्षणभर तेथे शांतता होती. ग्रिगरी दातांच्या फटीतून पचकन् थुंकला. मग कोशेवोईने तलवार उपसली आणि तो म्हणाला,

" आपण हे सूप धरायचं, न् स्क्वाड्रन कमांडरकडे ते घेऊन जायचं. "

" कल्पना !" बंदुकीतून बागतटाचा पेच सोडवीत अन्युपिनने संमती दिली. "आम्ही हे सूप घेऊन जातो. ग्रिगरी, तू पुढं व्हायचं न रिपोर्ट करायचा !"

अन्युपिन आणि कोशेवोईने ते सुपाचे भांडे बानगटावर उचलले. मग आपल्या समशेरी उपसल्या. ग्रिगरी त्यांच्या मागोमाग निघाला. ते अलंगातून जात असताना चौकस कझाकांची एक ओळ करड्या हिरव्या लोणात त्यांच्या मागोमाग निघाली.

" कायाय ?"

" धोका ?"

" काय तरी सलुख्याचं असेल !"

" अँहँ ! सलुखं म्हणे ! आधी खायला बघा काय तरी !"

" त्यांनी सूप धरून चालवलयं ! त्यात किडं आहेत म्हणे !"

कोशेवोई आणि अन्युपिन अंमलदाराच्या राहुटीबाहेर थांबले. ग्रिगरी थांबला आणि डाव्या हाताने डोक्यावरची टोपी पकडून त्याने 'कोल्हे-बिळात' प्रवेश केला.

"चल हट् !" मागून ढकलणाऱ्या कझाकावर अन्युपिन डाफरला.

क्षणभराने ओव्हर कोटाची बटणे लावीत आणि चिंतेची छटा मिसळलेल्या आश्चर्याने मागे ग्रिगरीकडे वळून बघत स्क्वाड्रन कमांडर बाहेर आला.

" कायाय पोरानु ?" जमलेल्या कझाकांवरून नजर फिरवीत अंमलदाराने विचारले.

त्याच्यापुढे येऊन उभा राहात ग्रिगरीने उत्तर दिले,

"आम्ही कैद्याला घेऊन आलोय."

" कसला कैदी ?"

"हां ... अच्युपिनच्या पायाशी असणाऱ्या सुपाच्या टिनपाटाकडे त्याने बोट दाखवले.

"ह्रा आहे कैदी! तुमच्या कझाकांना काय खायला घालतायत् त्याचा वास घेऊन बघा!"

त्याच्या भुवया एकदम वर चढल्या. आकुंचित झाल्या आणि परत सरळ झाल्या. ग्रिगरीच्या चेहऱ्यावरील भाव स्क्वाड्रन कमांडरने लक्षपूर्वक न्याहाळले. मग आठ्या घालून त्याने खालच्या टिनपाटाकडे पाहिले.

"आम्हाला मेलेली घोडी तें खायला घालायला लागलेत." मिशा कोशेवोई चिडून उद्गारला.

"गोटगस्त्याला बदला! स्वत: गुद्र्याचं सूप हादडतोय अन् आमच्या सूपात किडं!" दुसऱ्याची गर्जना उठली.

आवाजाचा कोलाहल खाली बसेपर्यंत तो अंमलदार थांबला. आणि मग दटावून म्हणाला, "खामोष! खूप बोललात! आज मी गोटगस्तीला बदलतो. त्याच्या कामाचा तलाश करायला पंच नेमतो. मांस जर चांगलं नसेल ....!"

"त्याला 'कोर्टमार्शल' करा!" पाठीमागून एक आरोळी आली. परत आवाजाच्या हमशाधुमशात अंमलदाराचा आवाज बुडून गेला.

रेजिमेंटचे आगेकूच चालू असताना वाटेतच गोटगस्तील बदलणे भाग होते. कझाकांनी सूप 'धरून' स्क्वाड्रन कमांडर पुढे ते आणले. त्यानंतर काही तासांनी आघाडीवरून माघार घेण्याचा आणि हुकूमाच्या बरोबरच आलेल्या नकाशात दाखवलेल्या वाटेने कूच करून रुमेनियात सरकण्याचा त्यांना हुकूम मिळाला होता. रात्री सैबेरियन तिरंदाजानी कझाकांना उसंत दिली. दुसऱ्या दिवशी रेजिमेंट सवार होऊन कूच करू लागले.

एकामागोमाग एक पराभव खाणाऱ्या रुमेनियन्सना कुमक म्हणून जबरदस्त सफेबंदी रवाना करण्यात आली होती. रात्री हे रेजिमेंट जिथे मुक्काम करणार होते त्या खेड्यात पाठवलेले गोटमुखत्यार अशी बातमी घेऊन परत आले की, वस्तीला जागा शिल्लक नाही. तेव्हाच कझाकांना रुमेनियनांच्या पराभवाची जाणीव झाली. पाऊरवलक आणि तोफखानाही रुमेनियन आघाडीवर निघाला होता. त्यामुळे खेडेगावात दाटी झाली होती. तेव्हा पडाव शोधायला रेजिमेंटला आणखी पाच साडेपाच मैल जाणे भाग पडले.

सतरा दिवस कूच चालू होती. दाणा वैरणीच्या उपासमारीने घोडी रोडावून गेली. आघाडीच्या मागेच असलेल्या उध्वस्त मुलुखात कुठेही अन्नधान्य नव्हते. गावकरी आंतर प्रदेशातून पळून गेले होते किंवा जंगलारानातून लपले होते. झोपडयांच्या आ वासलेल्या दारातून ओक्याबोक्या उदासवाण्या भिंती दिसत होत्या. कधीतरी निर्मनुष्य रस्त्यातून दुर्मुखलेला भयभीत झालेला खेडूत कझाकांना दिसायचा पण सैनिक त्याच्या दृष्टीला पडले रे पडले की तो लपून बसण्यासाठी धूम ठोकायचा. त्यांच्या अखंड कूचामुळे ते थकून गेले. गारठून गेले. त्यांना आणि त्यांच्या घोडयांना जे सोसावे लागत होते त्यामुळे चिडचिडे बनले. घरांची कुहीटारु छपरे म्हणूनच ते ओरबाडून काढू लागले. लुटालुटीतून वाचलेल्या खेडयातून त्यांना जे काही किडुकमिडुक अन्नधान्य मिळेल ते पळवून नेण्याचा संकोच वाटेनासा झाला. अंमलदारांनी आपल्याकडून दमदाटी करुनही ते बधेनाशे झाले.

रुमेनियन सरहद्दीच्या जवळच त्यातल्यात्यात बरे असणाऱ्या खेडयातील कुणग्यातून थोडीशी बार्ली चोरण्यात उऱ्युपिनला यश आले. चोरी करताना मालकाने त्याला पकडले पण त्या सज्जन वयस्कर बेस अरेबियनला त्याने ठोसा देऊन खाली पाडले आणि बार्ली घेऊन तो घोडयाकडे गेला. घोडयाचे तगारे भरताना आणि थरथरत्या बोटांनी त्या जनावराच्या भकाळी गेलेल्या, हाडे निघालेली पुठे-थोपटताना अंमलदाराने त्याला तबेल्यापाशी पकडला.

" उऱ्युपिन ! इकडं आण ती बार्ली. सुव्वर साला ! गोळी खायच्येय ? "

धुमसत्या तिरप्या नजरेने उऱ्युपिनने त्या अंमलदाराकडे पाहिले. आणि आपली टोपी जमिनीवर फेकून दिली. रेजिमेंटमधील आपल्या उभ्या हयातीत प्रथमच त्याने अंतकरण विदीर्ण करणारी गर्जना केली.

" कोर्ट मार्शल करा मला ! गोळी घाला मला ! इथच्या इथं माझा जीव घ्या ! पण बार्ली द्यायचो नाय. माझ्या घोडयानं काय उपाशी मरावं ? आँ ? बार्ली देणार नाय. एक दाणा देणार नाय ! " उऱ्युपिन मध्येच घोडयाच्या डोक्यावरुन, आयाळीवरुन हात फिरवीत होता. घोडा आधाशीपणे चरत होता.

घोडयाच्या भयंकर सुकून गेलेल्या पुटांकडे बघत आणि मान हलवीत अंमलदार उत्तर न देता उभा राहिला. अखेरीस किंचीत गोंधळलेल्या सुरात तो म्हणाला, " घोडं अजून तापलंय. त्याला कशाला दाणा देतोयस ? " अंमलदाराचा आवाज चक्क बावरुन गेलेला होता.

" नाय. आतापर्यन्त निवलंय ते !"

जवळजवळ कुजबुजतच उन्युपिनने उत्तर दिले. आणि जमिनीवर सांडलेले दाणे गोळा करुन ते परत घोड्याच्या तगेऱ्यात घातले.

नोव्हेंबरच्या सुरुवातीला ते रेजिमेंट आपल्या नव्या जागेवर पोचले. त्रान्ससिलवानियन पर्वतावरुन वारा घोंघावत होता. दऱ्याखोऱ्यात गोठवणारे धुके जमले होते. पहिल्या गोठवणीत वाळून गेलेल्या जंगलांना देवदाराच्या सुयांचा उग्र गंध येत होता. आणि भुरभुरीत आगरू बर्फात उमटलेल्या जनावरांच्या खूर-निशाण्या सतत दिसत होत्या. युद्धाने भेदरून गेलेले लांडगे, सांबरे, बोकड आपली जंगली मैदाने सोडून मुलखांच्या आंतरभागी जात होती.

७ नोव्हेंबर रोजी '३२०' व्या टेकडीवर ७ व्या रेजिमेन्टने हल्ला चढवला. आदल्या संध्याकाळी अलंगावर ऑस्ट्रियनांचा ताबा होता. पण हल्ल्याच्या दिवशी सकाळी त्यांची जागा पश्चिम आघाडीवरून नुकताच आणलेल्या सॅक्सनी घेतली होती. गोटघाळ किंचीत् हिमाच्छादीत उराठीवर कझाक पायी पुढे जात होते. मधूनच एक दगड गडगडत खाली येऊन बर्फाची मुलायम धूळ उठे ! ग्रिगरी अुन्युपिनबरोबर चालता चालता ओशाळगतीने हसून म्हणाला,

" आज सकाळपासून मला काहीतरी घाबरल्यागत होतंय . . . ! जसा काय मी प्रथम लढाईला चाललोय !"

" काय म्हणतोस ?" बंदुकीचा झोळपट्टा पकडून बर्फाचा गोळा चोखत चालणाऱ्या अुन्युपिनने आश्चर्याने विचारले.

बेतरतीब सफ्यांनी कझाक उराठीवर पुढे पुढे चढत होते. एकही गोळी सुट-लेली नव्हती. गनिमाच्या अलंगात अशुभ शांतता होती,

उरांडीच्या मागे लाल खरबरीत तोंडाचा आणि नाकावरचे कातडे सोल-वटलेला एक सॅक्सन लेफ्टनंट उभा होता. आपल्या सैनिकांना उद्देशून तो आवेशाचे प्रोत्साहन देत आग्वेल भांडता ठेवायची गर्जना करीत होता.

" दोस्तो, ह्या निळ्या उगलीच्यांना आपण भरपूर खडे चारलेत. आमची गाठ पडल्यावर काय होतं ते दाखवू या त्यांना . . . . पण आस्ते . . . . सबूर . . . . इतक्यात फैर झाडू नका ! "

कझाकांनी आपल्या चालीचा वेग वाढवला. त्यांच्या पायाखालची भुसभुशीत गोटघाळ जमीन घसरत होती. वाऱ्या-पावसाने डागाळलेल्या आपल्या शिरटोपाच्या

कडा आत मुडपीत ग्रिगरी कसनसे हसला. त्याचे चोचदार नाक आणि वाढलेल्या दाढीच्या काळचा पीकाखालचे खोल गेलेले गाल पिवळट निळे दिसत होते. त्याच्या हिमाच्छादित भुवंयाखालचे डोळे कोळशाच्या कपच्याप्रमाणे क्षीणपणे चमकले. त्याचा नेहमीचा समतोलपणा त्याला सोडून गेला होता.

इतक्या अनपेक्षितपणे परत आलेल्या भयाची करंटी भावना झटकून टाकण्याचा त्याने प्रयत्न केला. डोळे किलकिले करून आणि अलंगाच्या हिमाच्छादित टोकांकडे आपली अस्थिर नजर वळवीत तो अुन्युपीनला म्हणाला,

" ते गप्प आहेत. आपण आणखी जवळ यावं असं त्यांच्या मनात दिसतंय. पण मला भय वाटतंय न् ह्याची मला शरम वाटत नायं. समज आपण पाठ वळवून पळालो तर ? "

"आज काय भुणभुण लावल्येस ?" अुन्युपिनने चिडून विचारले. हे पत्याच्या खेळागत आहे. स्वतःवरचा विश्वास उडाला की मुंडी कटाप झालीच ! तोंड पिवळं पडलंय तुझं ग्रिशा. तुझी तब्येत तरी ठीक नाय. नाहीतर आज तू गोळी खाणार ! बघ ! ते बघितलंस ? "

आखूड कोट आणि टोकदार गफीर घातलेला जर्मन एकाएकी अलंगातून क्षणभर सरळसोट उभारला आणि मग अदृश्य झाला.

ग्रिगरीच्या डाव्या बाजूला चालणारा एक देखणा सोनेरी केसांचा कझाक हातातील दस्तकी पुनःपुन्हा काढीत घालीत होता. तुरुतुरू ताठ पावले टाकीत आणि उगाचच मोठ्याने खोकला काढीत त्याने वारंवार हाच प्रकार अखंडपणे चालवला होता. रात्री एकट्याच जाणाऱ्या माणसाने स्वतःलाच धीर देण्यासाठी खोकावं तसाय ! ग्रिगरीच्या मनात आले. जरा पुढे गेल्यावर सार्जन्ट माक्साएवचे शिवे उठलेले गाल त्याला दिसले. मग येमेलियान ग्रोशेव आला. बानगट लावलेली बंदुक त्याने 'तय्यार' धरून ठेवली होती. ग्रिगरीला आठवले की काही दिवसापूर्वी येमिलीयानने वाटेत एका रुमेनियनापासून मक्याची थैली लंपास केली होती आणि कोठाराचे कुलूप खोलण्यासाठी ह्याच बानगटाचा त्याने वापर केला होता. माक्साएवच्या जोडीनेच मिशा कोशेवोई चालला होता. मिशा कोशेवोई अगदी माक्साएव एवढाच उंच होता. तो भसाभसा चुट्टे ओढीत होता. परतपरत नाक शिंकरून बोटे पाणकोटावर पुशीत होता.

" तहान लागल्येय " माक्साएव म्हणाला. " येमिलियान, माझे बूट चावतायत् ! " कोशेवोईने तक्रार केली.

ग्रोशेवने त्यांना रागेजून अडवले. " तुमच्या बुटाचं राहू द्या आता ! मिनीट-भरानं जर्मन आपल्यावर काडतुसांचा पाऊस पाडतील ! "

गनिमांकडून झालेल्या अगदी पहिल्याच सरबत्तीत पायाला गोळी लागून ग्रिगरी कोसळला. पडता पडता तो विव्हळला. जखमेवर पट्टी बांधावी असे त्याला क्षणभर वाटले. आपल्या पडशीतील प्रथमोपचाराची पट्टी काढायचा त्याने प्रयत्न केला. पण अस्तनीखालून कोपरातून वाहणाऱ्या रक्ताने तो एकदमच थकून गेला. एका शीळेथाड डोके लपवून तो पालथा पडला. आपल्या शुष्क जीभेने बर्फाचा मऊसूत काठ त्याने चाटला आणि त्या बर्फाळ मातीला तृषार्तपणे आपले थरथरते ओठ भिडवले. बंदुकीचा रुखा, तीक्ष्ण तडतडाट आणि तोफांचा प्रबळ गदारोळ हे ऐकताना असाधारण भयाने त्याचा थरकाप उडाला होता. डोके उचलल्यावर त्याला दिसून आले की, त्याच्या स्क्वाड्रनमधील कझाक धडपडत, कोलमडत उराठीवरून धावत येत होते. धावता धावता उराठीच्या वरच्या बाजूकडे ते कुठेतरी गोळ्या झाडीत होते. एका गूढ आणि निर्बुद्ध भयापोटी तो उठून उभा राहिला आणि जिथून रेजिमेन्टने हमला सुरू केला होता. त्या देवदार रानाच्या नागमोडी कडपट्टीकडे तोही धावत सुटला. ग्रिगरीने ग्रोशेवला गाठले. एका घायाळ जुमलेदाराला ग्रोशेव त्या खड्या उतारावरून फरफटत नेत होता, ग्रोशेवच्या खांद्यावर भार टाकून झिंगल्याप्रमाणे झोकांड्या खात जाणारा तो अंमलदार रक्ताच्या गुठळ्या थुंकीत चालला होता. जंगलात स्क्वाड्रनचा लोटच उसळला. त्यांच्या मागच्या करड्या उतारावर मुड्द्यांची लहान कबरी मुटकुळी पडली होती. उग्र मशिनगन्सच्या माऱ्याने पिटाळलेले घायाळ बेसहाय अवस्थेत खाली सरपटत येत होते.

मिशा कोशेवोईच्या खांद्यावर भार टाकून ग्रिगरीने जंगलात प्रवेश केला. उतरणीच्या मातीतून काडतुसे उशी घेत उसळत होती. जर्मनांच्या डाव्या फळी-वरील एक मशीनगन सणसणीत करोळी ओकीत होती. गोठलेल्या नदीत बलदंड हाताने भिरकावलेले दगड पातळ बर्फावरून उसळ्या घेत जावेत तसा तो आवाज येत होता.

" जाम कणीक तिंबली होती आपली ! " जवळजवळ जयघोष केल्यासारखेच अन्युपिन किंचाळला. एका देवदाराच्या लाल बुंध्यावर रेलून तो संथपणे जर्मनांवर गोळीबार करीत होता. अलंगाच्या कांडाळ्यावर त्याने वर्षाव चालवला होता.

" चूत्यांना धडा दिला पायजे. त्यांना धडा दिला पायजे." ग्रिगरीपासून आपला खांदा झटकून बाजूला करीत कोशेवोई ओरडला. " लोक सुव्वर आहेत !

सुखरूप आहेत. अंगातलं रक्त सांडून गेल्यावर त्यांना कळेल की त्यांना गोळ्या घालून का मारतायत् ते !"

"कशाला किंचाळतोयस् !" अन्युपिनने आठ्या घालून विचारले.

"तुला जर थोडी अक्कल असेल तर तुझं तुलाच समजून येईल. पण चुत्याला काय समजणार? त्याच्यापुढे माथेफोड केली तरी . . . . ! तुझी शपथ आठवत्येय ? शपथ घेतली होतीस का नाय ?" अन्युपिनने गुरकावले.

त्याला उत्तर देण्याऐवजी कोशेवाई गुडघ्यावर थबकन् बसला आणि थरथरत्या हाताने त्याने काही बर्फ उकरून काढला. शहारत खोकत त्याने तो आधाशीपणे गिळून टाकला.

———

# ५

ढगाच्या कबऱ्या तरंगाने तास ओढलेल्या आकाशातून शारदीय सूर्याचा रथ चालला होता. खूप उंचीवर वाऱ्याची सौम्य झुळूक ढगांना संथपणे पश्चिमेकडे हाकारून नेत होती. पण खेड्याच्या डोक्यावर, डॉन खोऱ्याच्या हिरव्याकंच मैदानावर, निष्पर्ण रानाच्या डोक्यावर वारा जोरात होता. वळुंजी आणि चिनारचे मुकुट लववीत होता. डॉन पिंजत होता, आणि पिवळट पडलेल्या पानांचे तांडे रस्त्यावरून हाकलीत नेत होता. क्रिस्तोनियाच्या मळणीच्या खळवावर कसेबसे रचलेले गवताचे उडवे त्याने फिस्कारून टाकले. त्याचा रासमाथा ढासळून टाकला आणि ती वाळकट मेढ पार उडवून दिली. दावलीवर घेतल्याप्रमाणे पयेणाचा एक सोनेरी कुंभेर ओरबाडून काढून त्याने तो भारा बाहेर आवाडात नेऊन टाकला. रस्त्यावर गरगरत भिरकावून दिला. आणि निर्मनुष्य रस्त्यावर सढळ हाताने विखरून टाकला. अखेरीस ती गबाळभाळी त्याने स्तिपान आस्तारवोदच्या छपरावरून भिरकावून दिली. उडणारा झगा गुडघ्याखाली दाबून धरीत अंगावर शाल न घेताच क्रिस्तोनियाची बायको आवाडात धावत आली. मळणीच्या खळ्यात धुडकूस घालणाऱ्या वाऱ्याकडे मिनीट दोन मिनीटं बघत उभी राहिली आणि मग परत आत गेली.

तीन वर्षाच्या युद्धाने खेड्यातील जीवनावर सुस्पष्ट निशाण्या ओढल्या होत्या. जी घरे पुरुषाच्या हाताला पारखी झाली होती, त्यांच्या मांगरांची दारे सताड वासलेली होती. आवाडे गलिच्छ झाली होती. आणि जिकडे तिकडे हळूहळू होत जाणाऱ्या ऱ्हासाच्या खुणा उमटल्या होत्या. क्रिस्तोनियाच्या बायकोच्या मदतीला फक्त तिचा नऊ वर्षांचा पोर होता. शेतीच्या कामाला अनिकुशकाच्या बायकोचा काडीचा उपयोग नव्हता. आणि आपल्या एकाकी अवस्थेमुळे स्वतःच्या

रुपाचे ती दामदुपटीने कोडकौतुक करीत होती. स्वतःची रंगरंगोटी करीत होती आणि पुरेसे मोठे कझाक तेथे नसल्याने चौदा चौदा वर्षांची पोरे जवळ करीत होती. एकेकाळी कुणीतरी भरपूर डांबर फासलेल्या तिच्या फाटकावर ह्या गोष्टीची साक्ष देणाऱ्या बोलक्या खुणा अजून तशाच होत्या.

स्तिपान आस्तारवोदचे घर तर पूर्णपणे वाऱ्यावर सोडून दिलेलेच होते. घरधन्याने खिडक्या फळ्या ठोकून बंद करून टाकलेल्या होत्या. छप्पर कोसळू लागले होते आणि त्यावर रानवेली माजल्या होत्या. दाराचे कुलूप गंजत चालले होते. निदाघ किंवा वृष्टी ह्यापासून आश्रय घेण्यासाठी मोकाट गुरे फाटकातून आत शिरून तण नि झाडझुडूप माजलेल्या आवाडातून भटकत होती. इवान तोमिलीनच्या घराची भिंत रस्त्यात ढासळू बघत होती. दुफाळी लाकडाचे टेकण लावल्याने ती ढासळली नव्हती एवढेच. ह्या दणकट बंधानीने जर्मन आणि रशियन घरे नष्ट केल्याबद्दल नियती त्याच्यावर सूड उगवत होती.

खेड्यातील सर्व रस्त्यात आणि गल्ल्याकुचातून हाच प्रकार होता. खालच्या आखरीला फक्त पांतिलेय मेलीखोवच्या घराने आणि आवाडाने आपले रुप टिकवले होते. तिथे सगळे काही खणखणीत आणि शिस्तवार असल्यासारखे वाटत होते.

पण सगळेच काही तसे नव्हते. कालदशेने कोठाराच्या छपरावरील जस्ती कोंबडी पडून गेली होती. कोठार एका बाजूने खचत चालले होते. आबाळीच्या इतरही खुणा जाणकाराच्या नजरेने टिपल्या असत्या. म्हाताऱ्याचे हात सगळीकडे पोचत नव्हते. पेरणीचे क्षेत्र कमीकमी होत चालले होते. आणि इतर गोष्टीबद्दल काय सांगावे ? सांगण्यासारखे काही नाही. नाही म्हणायला घरातील माणसांची संख्या मात्र कमी झाली नव्हती. तो पेरणी कमी कमी करीत होता आणि मेलीखोव कुटुंबच विलयाला गेले नाही एवढेच ! आघाडीवर रखडणाऱ्या पेत्रो आणि ग्रिगरीची गैरहजेरी भरुन काढण्यासाठीच की काय १९१५ च्या पतझडीच्या मोसमात नतालियाला जुळे झाले. ती अशी हुशार की एक पोरगा आणि एक पोरगी ह्यांना जन्म देऊन तिने पांतिलेय आणि इलिनिचना ह्या दोघांनाही खूष केले. नतालियाला गर्भारपण जड गेले. पायातील जीवघेण्या कळांपायी दिवसच्या-दिवस तिला धड चालवायचे नाही. मग एका मागे दुसरा पाय ओढत ती तुरतुरत चालायची. पण हे दुःख तिने हिमतीने सहन केले. तिच्या काळगेल्या कृश आणि सुखी मुद्रेवर ह्याचे कोणतेही चिन्ह कधी उमटले नाही. वेदना जास्तच तीव्र झाल्याने तिच्या कानशिलावर घामाचा शिखा उभा राहिलेला पाहूनच इलिनिचनला

तिच्या दुःखाची कल्पना येई. मग ती तिला " जा! पडून रहा. स्वतःला कशाला तोशीस लावून घेतेस? " असे म्हणायची.

'ती' वेळ जवळ आल्याचे सप्टेंबर महिन्याच्या एका निरभ्र दिवशी तिने ओळखले आणि ती रस्त्यात जायला निघाली.

" कुठं निघालीस? " इलिनिचनाने तिला विचारले.

" कुरणात. गायांना घालवते! "

कण्हत आणि पोटाखाली एक हात दाबून धरीत ती घाईघाईने चालत खेड्यापलिकडे गेली आणि रानकाटच्या झुडूपात शिरून तिथे पडून राहिली. झांजड पडत होते अशा वेळी आपल्या कॅनवासच्या एप्रनमध्ये जुळी घेऊन ती मागच्या वाटेने परत आली.

" अग बाई! अग मेले चांडाळणी! हे ग काय हे? न कुठं गेली होतीस? " अखेरीस तोंडातून शब्द फुटल्यावर इलिनिचना ओरडली.

" मला लाज वाटली. तेव्हा बाहेर गेले .... मला व्हायचं नव्हतं ..... बाबांच्या समोर .... मी स्वच्छ झाल्येय आई! त्यांनाही धुतलंय. घ्या ही...! " विवर्ण चेहरा झालेली नतालिया म्हणाली.

दुन्या सुईण आणायला धावली आणि दार्या चाळणीला अस्तर लावण्यात गढून गेली. आनंदाने हसणारी आणि रडणारी इलिनिचना तिच्यावर खेकसली,

" दाऱ्या ठेवून दे चाळण. चाळणीत ठेवायला काय मांजरीची पिल्लं आहेत? अरे देवा! दोन आहेत! देवा! देवा! एक पोरगायं! नतालिया बेटा, . . . ! तिला गादी घालून दे गं! "

आपल्या सुनेने जुळ्याला जन्म दिला हे ऐकल्याबरोबर पातिलेयने थक्क होऊन दोन्ही बाहू लांब पसरले.

मग आनंदाने टिपे गाळीत तो आपली दाढी हिसकू लागला. काहीही कारण नसताना जवळ येणाऱ्या सुईणीवर तो ओरडला,

" काय ग भामटे, थेरडे! " असे म्हणून त्याने हाताची मूठ तिच्यापुढे नाचवली, " खोटारडे! मेलीखोवचा वंश इतक्या लौकर आटपायचा नायं! माझ्या सुनेला कझाक न् मुलगी झाल्येय! तुझ्यासाठी सून आहे! देवा, भगवंता! तिच्या ह्या कृपेची फेड रे कशी व्हायची माझ्यानं? "

ते वर्ष सुफळ होते. गाईलाही जुळे झाले. मेंढीला जुळे झाले, बकरीला..... ही परिस्थिती पाहून चकीत झालेल्या पांतिलेयने स्वतःशी युक्तिवाद केला,

" हे वर्ष भाग्याचं आणि फळ देणारही आहे! सगळयांना जुळी झालीत! काय बरकत आहे! वारे वा! "

नतालिया वर्षभर मुलांना अंगावर पाजीत होती. सप्टेंबर महिन्यात तिने त्यांना अंगावरून तोडले. पण पतझडीचा मौसम संपायला येईतो तिची तब्येत सुधारली नाही. तिच्या खप्पड झालेल्या चेहऱ्यावर तिचे दात दुधाळपणे चमकत. तिच्या ओढलेपणाने अस्वाभाविक मोठे वाटणारे तिचे डोळे उबदार दीप्तीने तळपत होते. तिचे सगळे जीवन त्या अर्भकाभोवती केंद्रीत झाले होते.

ती स्वतःची आबाळ करू लागली आणि त्याना न्हाऊमाखू घालणे, दुपट्यात घालणे, त्यांच्यासाठी शिवण टिपण करणे अशा प्रकारे आपला सगळा फावला वेळ त्यांच्याबरोबर घालवू लागली. अनेकदा पलंगाखाली एक पाय लोंबता सोडून बसलेली असताना ती त्यांना पाळण्यातून उचलून घ्यायची आणि खांदे हलवून आपले भरलेले टरबुजाप्रमाणे पुष्ट फिकट पिवळे स्तन झटक्याने बाहेर काढायची आणि दोघांना एकदमच पाजायला घ्यायची.

" तुला आधीच खूप शोषल्येय ग त्यांनी! सारखी सारखी तू पाजतेस त्यांना! " आपल्या नातवंडांच्या पुष्ट चिमुकल्या पायावर चापट्या मारीत इलिनिचना म्हणायची.

" पाज त्यांना! दूध वाचवू नको! त्याचं काय विरजण नायं घालायचं आम्हाला! " मत्सरी रांगडेपणाने पांतेलेय मध्येच तोंड घालायचा.

डॉनच्या पुराचे पाणी ओसरून जावे तसे त्या काळात जीवन हळूहळू ओहटत चालले होते. दिवस रूक्ष आणि थकवणारे होते. धामधुमीत, कामात, क्षुद्र गरजांपोटी लहानशा आनंदात आणि युद्धावर गेलेल्यांबद्दल लागलेल्या प्रचंड अनिद्र घोरात खरत चालले होते. पोस्टाच्या शिक्क्याने पलिस्तर मारलेली तेलकट पाकीटातील दुर्मिळ पत्रे पेत्रो आणि ग्रिगरीकडून येत होती. ग्रिगरीचे ताजे पत्र कुणातरी दुसऱ्याच्याच हाती पडले होते. त्यातले निम्मे जांभळ्या शाईने काळजीपूर्वक नाहीसे करण्यात आले होते. आणि त्या राखी कागदावर समासात शाईने एक अगम्य खूण केलेली होती.

पेत्रोची ग्रिगरीपेक्षा जास्त पत्रे येत. दाऱ्याला लिहलेल्या पत्रात तिने चालवलेले प्रकार बंद करण्याबद्दल तो तिला दम देत असे. शपथा घालीत असे. त्याच्या बायकोच्या अनुचित चारित्र्याच्या वदंता त्याच्या कानावर पोचल्याचे

उध्वस्त होते. आपल्या पत्रांबरोबर ग्रिगरी घरी आपला पगार आणि त्याला 'क्रॉसेस' बद्दल मिळणारे भत्ते हा पैसा घरी पाठवीत असे. रजेवर घरी येण्याची वचनें देत असे. पण तो आला मात्र नाही. त्या दोन भावांचे मार्ग वेगवेगळ्या दिशेने गेले होते. युद्धाने ग्रिगरी गांजून गेला होता. त्याच्या मुखावरचा तजेला शोषला जाऊन मागे पिवळी कावीळ उरली होती. युद्ध थांबेपर्यन्त त्याच्याने धीर धरवत नव्हता. पण पेत्रो झपाट्याने आणि लीलया वर चढत गेला. हांजी हांजी करून त्याने आपल्या स्क्वाड्रन कमांडरची मर्जी संपादन केली. १९१६ च्या पतझडीच्या मोसमात त्याला दोन 'क्रॉसेस' देण्यात आले आणि सार्जन्टमेजरचा हुद्दा देण्यात आला. अंमलदार विद्यालयात आपली रवानगी करून घेण्याचे प्रयत्न आपण करीत असल्याच्या गप्पा पत्रातून तो आता सांगत होता. उन्हाळ्यात एका जर्मन अंमलदाराचे गफीर, झगा आणि स्वत:चा फोटो असे त्यानी घरी पाठविले. करड्या कार्डावरून रोखून पहाणारा त्याचा संतुष्ट चेहरा वय वाढलेले सांगत होता. त्याच्या पिंगट मिशांचे टोकांना आकडे वळले होते. आणि नकट्या नाकाखाली त्या सुप्रसिद्ध स्मिताने त्याचे निश्चयी ओठ विलग झाले होते. जीवनच पेत्रोवर प्रसन्न झाले होते. युद्धाने तो खूष होऊन गेला होता. कारण युद्धामुळेच असाधारण यश:शक्यता खुल्या झाल्या होत्या. ते नसते तर अंमलदाराची बढती मिळण्याचे आणि एक वेगळे अधिक मधूर जीवन लाभण्याचे त्या साध्या कझाकाच्या स्वप्नात तरी आले असते काय?

एकाच बाबतीत पेत्रोची जिंदगी असुखी होती. त्याच्या बायकोबद्दल गलिच्छ अफवा खेड्यात पसरल्या होत्या. १९१६ च्या पतझडीत स्तिपान आस्ताखोवला रजा मिळाली होती. रेजिमेंटला परतल्यावर पेत्रोच्या बायकोबरोबर कसे मस्त दिवस गेले ह्याच्या फुशारक्या तो सगळ्या स्क्वाड्रनमध्ये मारीत होता. पेत्रो अशा गप्पांवर विश्वास ठेवायचा नाही. त्याचा चेहरा काळा पडायचा. पण हसून तो म्हणायचा,

"स्तिपान थापेबाज आहे! ग्रिशानं जे केलं त्याबद्दल तो मला चोच मारण्याचा प्रयत्न करतोय!"

पण एक दिवस आपल्या राहुटीतून बाहेर पडताना योगायोगाने म्हणा किंवा बुध्या म्हणा स्तिपानच्या हातून एक भरलेल्या कशिद्याचा रुमाल खाली पडला. त्याच्यामागोमाग येणाऱ्या पेत्रोने तो उचलला आणि आपल्या बायकोची हस्तकला त्याने तत्क्षणी ओळखली. त्यांच्यात ते जुने वैर परत उद्‌भवले. पेत्रो संधी बघत होता. स्तिपानभोवती काळ घिरट्या घालीत होता. पेत्रोला शक्य झाले असते

तर स्तिपानच्या झोपडीवर आपली निशाणी उठवून त्याने त्याला 'द्नीना' च्या काठावर कायमचा झोपवला असता. पण थोड्याच दिवसात असे घडले की जर्मनांचे एक आवाडीचे ठाणे काबीज करायला ट्रेहळणी दुशम म्हणून स्तिपान जो गेला तो परत आलाच नाही. त्याच्याबरोबर गेलेल्या कझाकांनी सांगितले की, ते काटेरी तारा तोडताना एका जर्मनाने ऐकले आणि त्याने हातबाँब भिरकावला. ते कझाक त्या जर्मनापर्यंत जाऊन पोचले. आपल्या गुद्याने स्तिपानने त्याला लोळवला. पण मदतीला आलेल्या रखवालदारांनी गोळीबार सुरू केला आणि स्तिपान कोसळला.

कझाकांनी दुसऱ्या रखवालदाराला बागनटाने भोसकला. स्तिपानच्या मुष्टी प्रहाराने मूर्छित पडलेल्या जर्मनाला खेचून नेला. आणि स्तिपानलाही उचलण्याचा प्रयत्न केला. पण तो फारच जड होता. तेव्हा त्याला सोडून देणे त्याना भाग पडले. स्तिपान विनवण्या करत होता. " भाऊ, मला मरायला सोडून जाऊ नका ! साथीनू मला कारे सोडून जाता ? " पण तारेतून मशिनगनच्या काडतुसांचा वर्षाव झाला. आणि कझाक सरपटत पळून गेले. " भाऊ ! " स्तिपान त्याच्या दिशेने ओरडत होता. पण त्याचे काय होय ? दुसऱ्याच्या आधी स्वतःची कातडी बचावायची असते. स्तिपानची कर्मकथा ऐकल्यावर ठणकत्या जखमेवर चरबी चोळल्यागत पेत्रोला हलके वाटले. पण तरी त्याने निर्धार केला की रजा मिळाली की दाऱ्याच्या नरडीचा घोट घ्यायचा. तो काही स्तिपान नव्हता. तो हे खपवून घेणारा नव्हता. तिला ठार मारण्याचा विचार त्याच्या मनात आला पण ती कल्पना त्याने तात्काळ झटकून टाकली. " त्या कुत्तरडीला मारुन माझ्या आयुष्याचा सत्त्यानाश करुन घेऊ का काय ? तुरुंगात कुजायचं ? सगळ्या मेहनतीवर पाणी पाडायचं ? सगळ्याला मुकायचं ? "

त्याने फक्त तिला ठोकून काढायचे ठरवले. पण अशी ठोकून काढायची की परत काय बिशाद तिला शेपटी वर करायची इच्छा होईल?" तिचे डोळेच फोडून टाकतो. नागीण साली ! मग कुणी तिच्याकडं बघायचं नाय !" द्निना नदीच्या उभट चिखलाळ काठापासून जवळच असलेल्या अलंगात बसल्या बसल्या त्याच्या मनात आले.

पतझडीने झाडांचा आणि गवताचा चोळामोळा करून टाकला. सकाळच्या गोठवत्या थंडीने ती काळी पडली. धरती थंड होऊन गेली. शारदीय रात्री गडद झाल्या. लांबत गेल्या. अलंगातून कझाक आपले बिगर लष्करी काम करत होते. जर्मनावर गोळ्या चालवीत होते. गरम कापड मिळण्यासाठी सार्जंट मेजराबरोबर हुज्जत घालीत होते. त्याना धड पोटाला कधी मिळत नव्हते. पण ह्या परक्या स्नेहशून्य

देशात डॉनच्या काठच्या आपल्या मायभूमीबद्दलचा विचार डोक्यात घोळला नाही असा एकजणही नव्हता.

त्या पतझडीच्या मोसमात आपल्या बुभुक्षीत पतिहीन जीवनाचे सगळे उट्टे दाऱ्याने उगवून घेतले. एक दिवस सकाळी घरातील माणसे जागी होण्यापूर्वी पांतेलिय प्रखोफिएवीचला जाग आली. तो बाहेर आवाडात गेला. समोरचे दृष्य बघून तो अनावर झाला. आणि त्याने डोके घट्ट दाबून धरले. फाटकाची दारे बिजागऱ्यातून काढून रस्त्याच्या मधोमध टाकून दिलेली होती. तो अपमान होता! नामुष्की होती! म्हाताऱ्याने ताबडतोब दारे जागच्याजागी बसवली. आणि न्याहारी आटोपल्यावर दाऱ्याला बाहेर उन्हाळी रसोईघरात बोलावून घेतले. त्यांचे काय बोलणे झाले ते इतरांना कधीच कळले नाही. पण काही मिनीटानंतर केस विस्कटलेली दाऱ्या रडत रडत रसोई घरातून धावत बाहेर आलेली दुन्याला दिसली तिच्या डोईचा रुमाल वाकडातिकडा झाला होता. दुन्याच्या अंगावरुन जाताना तिने खांदे घुसळले आणि तिच्या आसवांनी डागाळलेल्या संतप्त मुखावरची भुवयाची काळी धनुष्ये थरारली.

" थांब मेल्या थेरड्या ! तुझी सव्याज फेड करून दाखवते ! " तिच्या सुजलेल्या ओठातून फुत्कार बाहेर पडला. पाठीवर तिचे पोलके फाटल्याचे आणि उघड्या पडलेल्या खांद्यावर छडीचे तांबडे लाल ताजे वळ उठल्याचे दुन्याने पाहिले. पावलाणावरुन धावत जाऊन ती झटकन् झटकन् घरात शिरली. इकडे उन्हाळी रसोईघरातून पांतिलेय लंगडत लंगडत आला. खविसासारखा तो संतापलेला होता. चालता चालता तो नवीन कातडी लगामाचा फास करीत होता. दुन्याला बापाचे शब्द ऐकू आले, " आणखी बेदम फोडायला हवी होती तुला कुत्तरडे ! छिनाल! "

घरात परत ठाकठीक झाले. काही दिवस दाऱ्या पाण्यापेक्षा शांत, लव्हाळ्यापेक्षा नम्र होऊन राहिली होती. रोज रात्री इतरांच्या आधी ती झोपी जाई. नतालियाच्या कणवेच्या नजरेकडे पाहून खांदे उडवीत आणि भुवया उंचावीत थंडे स्मित करायची. जणू ती म्हणायची, "ठीकाय ! पाहून घेऊ आपण !" चौथ्या दिवशी एक प्रकार घडला. त्याबद्दल दाऱ्या फत्ते झाल्यासारखी हसू खिदळू लागली. पण म्हातारा आठवडाभर अवघडून गेला होता. अपराधी मांजरासारखा केविलवाणा झाला होता. काय घडले ते त्याने आपल्या बायकोला सांगितले नाही आणि कबुली जबाबाच्या वेळीसुद्धा फादर विस्तारिओनपासून हा प्रकार आणि स्वतःचे पापी विचार गुप्त ठेवले.

जे घडले ते असे. दाऱ्याचा संपूर्ण पालट घडवून आणण्याची पांतिलेय्ची खात्री होती. त्याने आपली बायको इलिनिचनाला सांगितले, "दाऱ्याची गय करू

नको! खूप काम करायला लाव तिला. कामानं काय धाड नाय भरत. माजल्येय घोडी! रस्त्यात नाचायचं सुचतंय तिला!"

त्याने स्वतःच दाऱ्याला मळणीची खळी झाडून काढायला, मागच्या परसात सर्पण रचायला लावले. वैरणीचे मांगर साफ करायला तिला मदत केली. त्याच दिवशी दुपारी त्याच्या डोक्यात आले की पाखडणी यंत्र कोठारातून वैरणीच्या मांगरात हलवावे. तेव्हा मदतीसाठी त्याने सुनेला हाक मारली.

"दाऱ्या!"

"काय बाबा!"

"चल! पाखडणीचं यंत्र हलवू या!"

डोक्यावरचा रुमाल सारखा करीत आणि जाकीटाच्या गळपट्टीखाली जमलेले तूस झटकीत दाऱ्या बाहेर आली आणि मळणीच्या खळ्यातून कोठारात गेली. गाशा घातलेली कामावरची कुडती आणि फाटकी तुमान घातलेला पांतिलेय् पुढच्या बाजूला गेला. आवाड मोकळे होते. पतझडीच्या मोसमासाठी लोकर कातायला दुन्या आईला मदत करीत होती. नतालिया दुसऱ्या दिवशीच्या पावाची कणिक भिजवीत होती. सायंकाळची सूर्यास्ताची प्रभा खेड्यापलिकडे तळपत होती. सायंप्रार्थनेची घंटा वाजत होती. एक लहानसा पाटलरंगी आरस्पानी आकाशाच्या छताला निश्चळ लोंबलेला होता. डॉनच्या पलिकडे असलेल्या चिनारवृक्षांच्या कंदी बोडक्या फांद्याना काळा कोळसा झालेल्या शलाकेप्रमाणे कावळे चिकटले होते. सायंकाळच्या रित्या निश्चलतेत प्रत्येक नाद तीक्ष्ण आणि सुस्पष्ट होता.

वाफळत्या शेणाचा आणि कडब्याचा उग्र वास गुरांच्या गोठ्यातून येत होता. ते विटलेले पाखडणी यंत्र पांतिलेय आणि दाऱ्याने वैरणीच्या मांगरात आणून एका कोपऱ्यात लावून ठेवले. खाली सांडलेले काही तूस त्याने वेचून काढले. आणि तो बाहेर जायला निघाला.

"बाबा!" दाऱ्याने दबत्या स्वरात हाक मारली,

पाखडणीच्या यंत्राकडे परत जाऊन त्याने भाबडेपणाने विचारले.

"कायाय?"

पोलक्याची बटणे सुटलेली आणि केस बांधायला हात मागे नेलेली दाऱ्या त्याच्यासमोर उभी होती. भिंतीच्या फटीतून मावळत्या सूर्याचा तांबुस किरण तिच्या मानेवर पडला होता.

" इकडं बाबा ... इथं काय तरी आहे पहा . या . , . बघा ! " बाजूला मुरकत आणि म्हाताऱ्याच्या खांद्यापलिकडे उघडया दाराकडे चोरटया नजरेने बघत ती म्हणाली. तो थेट तिच्याजवळ गेला. एकाएकी तिने हात पसरले आणि दोन्ही हाताची बोटे एकमेकात गुंफून त्याच्या मानेला विळखा घातला. आपल्या–बरोबर त्याला ओढीत ती मागे सरकत कुजबूजली,

" इथं, बाबा . . . इथं . . . हे खूप मऊ आहे . . . ! "

" काय झालंय तुला ? पांतिलेयने घाबरून विचारले. "

मान डावी उजवीकडे हालवीत तिच्या बाहूतून निसटण्याचा त्याने प्रयत्न केला. पण त्याच्या दाढीत गरम निःश्वास सोडीत हसत कुजबूजत तिने जास्तच जोराने त्याचे डोके आपल्या मुखाकडे ओढले.

" सोड मला कुत्तरडे ! " आपल्या सुनेचे ताणलेले पोट आपल्या पोटाला स्पर्श करीत असलेले जाणवून तो म्हातारा धडपडू लागला. त्याला जास्त निकट आवळीत ती मागे पडली. आणि त्याला तिने आपल्या अंगावर ओढून घेतला.

" हात्त्यच्यायला ! पागल झाल्येय ही ! सोड मला ! "

" नकोय तुला ? " दाऱ्या धापा टाकीत म्हणाली. आपले हात सोडवून तिने त्या म्हाताऱ्याच्या छातीवर धक्का दिला.

"का तुझ्यानं व्हायचंच नाय? मग माझा न्यायनिवाडा करू नको. ऐकलंस?" .उडी मारून उभी राहात, तिने आपला झगा घाईघाईने सारखा केला. पाठीवर तूस झटकून टाकले. आणि त्या पिसाळलेल्या म्हाताऱ्याच्या तोंडावर ती कडाडली.

" त्या दिवशी का मारलंस मला ? मी काय म्हातारी झाल्येय ? तू तरणा होतास तेव्हा असाच होतास का नाय ? माझा नवरा ! वर्षभर तोंड नाय पाहयलं त्याचं ! मी काय करावं मग . . . . कुत्र्याशी झोपायचं ! थुत् तुझ्यावर. मेल्या लंगडया ! घे हे ! " असे म्हणून तिनं अवाच्य अविर्भाव केला. आणि भुवया उडवीत ती दाराकडे चालती झाली. दाराजवळ तिने परत निगूतपणे आपले कपडे न्याहाळले. जाकीटावरची आणि रुमालाची धूळ झटकली आणि पांतिलेयकडे वळून ती म्हणाली, " माझं ह्याच्याशिवाय चालत नाय. मला कझाक हवायं. तुझी नसेल इच्छा तर . . . . . . . मी माझा शोधून काढीन. तू आपलं थोबाड बंद ठेव! "

नितंब लचकवीत ती तरातरा मळणीच्या खळ्याच्या दाराकडे गेली. आणि मागे वळून न बघता नाहिशी झाली. इकडे पांतिलेय दाढीचे केस चघवीत वैरण मांगरात इकडे तिकडे अपराधी आणि गोंधळलेल्या नजरेने बघत उभा राहिला. कदाचित् तिचंच बरोबर नसेल ? तिच्या बरोबर मी पाप केलं असतं तर ? " आपल्याला काय झालंय त्याबद्दल आश्चर्यचकीत झालेल्या त्याच्या मनात असा दिङ्मूढ विचार आला.

———

६

नोव्हेंबर महिन्यात गोठवणीने बर्फमिठी आवळली. अगोटीचे हिम पडले. तातार्स्की खेड्याच्या वरच्या आखरीपुढील वाकणावर डॉन गोठून गेली. ठिसूळ करड्या कबूदी बर्फावरून मधून मधून कुणी कुणी परतीरावर जायचे साहस करीत. खालच्या अंगाला नदीच्या फक्त थडव्यावर बर्फाचा तलम पापुद्रा जमा झाला होता. मधोमध धोधाणा खळाळत वाहत होता. हिरव्या लाटा आपली कबरी माथी नाचवीत होत्या. 'काळ्या काठा' खालील डोहऱ्यातील सोममाशांनी हिम निद्रेसाठी सत्तर फूट खोलीपर्यन्त बुडी घेतली होती. बुळबुळीत कार्प मासे जवळ-पासच होते. फक्त 'बेल' मासे धारेच्या उलट्या दिशेने धडपडत होते. पांढऱ्या आमळ्यांचा पाठलाग करीत आटीवरून सुळकारे मारीत होते. स्टर्लेट रेवीत होते. मासेमार गोठणी जास्त कडकडीत होण्याची वाट बघत होते. मग त्यांना बर्फाला भोके पाडून त्यातून स्टर्लेटसाठी गळ सोडता आले असते.

नोव्हेंबर महिन्यात मेलिखोव कुटुंबाला ग्रिगरीकडून पत्र आले. रुमेनियाहून पाठविलेल्या पत्रात त्याने आपण पहिल्याच लढाईत जखमी झाल्याचे कळविले होते. एका काडतुसाने त्याच्या डाव्या दंडाचे हाड मोडले होते. तेव्हा जखम भरून येईपर्यन्त त्याला आपल्या स्वतःच्या कामेन्स्काया जिल्ह्याकडे परत पाठविण्यात येत होते. पहिलीच्या पाठोपाठ दुसरी एक आपत्ती मेलिखोव कुटुंबावर कोसळली. दीड वर्षापूर्वी पांतिलेयला पैशाची नड लागली, तेव्हा ऐवजाचा करार हमीखातर लिहून देऊन त्याने सेर्गेइ मोखोवकडून शंभर रुबल्स कर्जाऊ घेतले. उन्हाळ्यात म्हाताऱ्याला मोखोवच्या दुकानावरून बोलावणे आले.

आपल्या नाकावर सोनेरी एकभिंगी चष्मा दाबून त्याच्या कडावरून पांतिलेव्हच्या दाढीकडे डोळे उचलीत अत्योपिन गोडबोल्यांनी विचारले,

" अरे काय रे पांतिलेव प्रकोफिच, पैसे देण्याचा विचार आहे का नाय? "

अर्धरिकामी शेल्फे आणि चकाकत्या फळ्या ह्यावरून पांतिलेवची भ्रमिष्ट नजर भिरभिरली आणि तो चाचरत म्हणाला,

" जरा थांब एमिलियान कोनस्तेनतिनिच. जरा डोकं वर काढायला सवड झाली की देऊन टाकतो पैसं. "

पण त्या म्हाताऱ्याला डोके वर काढायला सवड काही झाली नाही. पीक-पाणी भिकार होतं. गुरे विकण्याच्या लायकीची नव्हती. जून महिन्यात हिमवृष्टी व्हावी तसे बेलिफ अचानक खेड्यातील सरकारी कचेरीत आले. त्यांनी ऋणकोला बोलावून घेतले आणि तडकाफडकी सांगितले,

" शंभर रुबल्स काढ ! "

फौजदाराच्या मेजावर एक पाल्हाळीक कागद पडला होता. फौजदार वाचीत असता ऐकून घेण्यापलीकडे काहीही करणे पांतिलेवला शक्य नव्हते.

-- अदालतीचा हुकुमनामा --

शाहंशहा खुदबदौलत जहांपन्हाचे हुकुमान्वये आज तारीख २६ आक्टोबर १९१६ रोजी दोनेत्स परगण्याचे सातवे खातेचा निसबत मी दंडाधिकारी, ह्यानी सार्जन्ट पांतिलेव मेलिखोव ह्याजविरूद्ध सेर्गेइ मोखोव ह्यानी ऐवजाचा करार जाल्या प्रो रुबल्स शंभर देणे असलेबद्दलचा केलेला कज्जा ऐकून घेतला असे. दिवाणी कायद्याचे कलम ८१, १००, १२९, १३३ आणि १४५ ह्या आधारे मी फर्मावितो ऐसा जे – अव्वल हुकुम.

तारीख २१ जून १९१५ चे ऐवज करार बरहुकुम प्रतिवादी सार्जन्ट पांतिलेव मेलिखोव ह्याने वादी व्यापारी सेर्गेइ प्लतोनोविच मोखोव ह्यास रुबल १०० चुकते करावे. आणि खर्चापोटी जादा तीन रुबल्स द्यावे. घेण्यात आलेला निर्णय कायम नसून अव्वल आहे.

दिवाणी कायदा कलम १५६, पोटकलम ३ चे आधारे हा हुकुम-नामा कायदेशीररीत्या जारी झालिया असून हुकुमनाम्याची तामिली ताबडतोब करण्यात यावी.

दनेत्स्क परगण्याचे सातवे खातेचा दंडाधिकारी, शाहंशह खुदबदौलत, जहां-पन्हांचे हुकुमावरून येणेप्रमाणे फर्मावितात ऐसा जे.

संबंधीत सर्व अधिकारी आणि कबेऱ्या ह्यानी मशारनिल्हे निकालाची तामिली तंतोतंत कायद्याचे बरहुकुम करावी. अदालतीचे निर्णयाची तामिली करण्याची जोखीम सोपविलेल्या अधिकाऱ्यास आपले कर्तव्याचे अंमलबजावणीत सर्व स्थानिक पोलिशी आणि लष्करी अंमलदारानी यथायोग्य कायदेशीर मदत न चुकता द्यावी.

हुकुमनामा ऐकून घेतल्यावर पांतिलेवने त्याच दिवशी पैसे घेऊन येण्याचे वचन देऊन घरी जाण्याची परवानगी मागितली. पण त्याने तडक कोर्शुनोवच्या घराची वाट धरली. चौकात त्याला थोटा अलेक्सी शामील भेटला.

" काय लंगडतोयस प्रकोफिच ? " शामीलने सलाम करून विचारले.

" नेहमीचंच आहे ! "

" कुठं लांब निघाला वाटतं ? "

" कोर्शुनोव कडं काम आहे ! "

" असं ? ती मंडळी मजेत आहेत. त्यांचा मुलगा मितका आघाडीवरनं परत आलाय म्हणे ! "

" असं ? "

" म्हणतात बुवा ! " डाव्या डोळ्याचे आणि गालाचे स्फुरण करीत शामीलने सांगितले. आपली चंची काढीत तो पुढं म्हणाला.

" चुट्टा ओढू या काका ! कागद माझा. तंबाखू तुझी ! " पांतिलेवने चुट्टा पेटवला आणि कोर्शुनोवकडे जावे किंवा नाही ह्याचा तो विचार करू लागला. अखेरीस जायचे असे ठरवून तो लंगडत निघाला.

" मितकालाही क्रॉस मिळालाय. तुझ्या पोराला तो गाठायला बघतोय. झाडावरच्या पाखरागत खेड्यात क्रॉसेस झालेत ! " पाठमोऱ्या म्हाताऱ्याकडे पाहून शामील ओरडत होता.

खेड्याच्या आखरीपर्यन्त पांतिलेव हळूहळू चालत गेला. कोर्शुनोवच्या घराच्या खिडक्याकडे बघत तो फाटकाकडे गेला. खुद्द मिरोज त्याला भेटले. म्हाताऱ्याचा शिव्यांचा चेहरा आनंदाने उजळून गेला होता.

" आनंदाची बातमी कळली ना ? " पांतिलेवच्या बाहूत बाहू अडकवीत कोर्शुनोवने विचारले.

" आताच अलेक्सी शामीलनं त्याबद्दल सांगितलं. पण मी तुझ्याकडं दुसऱ्या कामाला आलोतो ! "

" काम ठेव बाजूला ! चल घरात. पोराला भेट. थोडं पिऊन आनंद साजरा करतोय आम्ही. आपल्या प्रसंगाला हिच्याकडं सणासुदीसाठी राखीव एक बाटली होती ! "

" तू सांगायची जरूर नव्हती. मला आधीच बास आला ! " पांतिलेवने हसून नाकपुड्याचे स्फुरण केले.

दार धाडकन उघडून पांतिलेवने आत जावे म्हणून मिरोत बाजूला उभे राहिले. त्याने अंबऱ्यातून आत पाऊल टाकले आणि तात्काळ त्याची दृष्टी मेजामागे बसलेल्या मितकावर खिळून राहिली.

" पहा आमचा शिपाई गडी ! " मितकाच्या खांद्यांना कवेत घेत डबडबलेल्या डोळ्यांनी ग्रिशाका आजोबा उद्‌गारले.

" आलास काय रे कझाका ? "

पांतिलेवने मितकाचा लांबट हात हातात धरुन ठेवला. आणि एक पाऊल मागे सरकून तो चकीत होऊन त्याच्याकडे बघत उभा राहिला.

" काय एवढं बघताय ? " मितकाने हसत घरघरीत आवाजात विचारले.

" बघितल्याशिवाय राहवत नाय. मी इतका थक्क होऊन गेलोय ! एकाच–वेळी तुला व ग्रिशाला मी निरोप दिला तेव्हा तुम्ही पोरं होतात ! आणि आता बघा ! यंव रे यंव ! कझाक ! आता मात्र रेजिमेंटला एकदम लायक ! "

मितकाकडे एकीकडे आंसू भरल्या डोळ्यांनी बघत लुकिनिचका ग्लासात व्होडका ओतायचा प्रयत्न करीत होती. आपण काय करतोय इकडे लक्ष नसल्याने तिने काठावरून ती खाली सांडली.

" अगं ए मूर्खं ! काय करत्येस ? चांगली दारु फुकट घालवत्येस ? " मिरोज तिच्यावर ओरडले.

" तुमच्या आनंदासाठी ! आणि मितका तुझ्यासाठी, तुझ्या आनंदाच्या वरपरतणीसाठी ! " आपल्या डोळ्याच्या निळसर कवड्या पांतिलेवने वर चढवल्या आणि दम न घेता दणदणीत पेलाभर व्होडका पिऊन टाकली. त्याच्या पापण्या किंचित फडफडत होत्या. आपल्या तळव्याने ओठ आणि मिशा हळूहळू

पुसत त्याने ग्लासाच्या तळाशी नजर रोखली. आपली मान मागे फेकली, आ वासलेल्या काळ्या दाताच्या तोंडात व्होडक्याचा एक पोरका थेंब फेकला आणि मगच श्वास घेतला. आणि खारावलेल्या काकडीचा चावा घेत पापण्याची सुखातिशयाने फडफड केली.

लुकिनिचकाने आणखी ग्लासभर ओतली. त्याबरोबर त्या म्हाताऱ्याला गमतीदार झिंग आली. मितका हसत हसत त्याच्याकडे बघत होता. त्याचे बिडाल नेत्र क्षणात आकुंचित होऊन त्याच्या हिरव्या गर्ता होत तर क्षणात ते विस्फारून काळेभोर होत. आपल्या गैरहजेरीच्या काळात हा पोर निश्चितच ओळखण्या-पलिकडे बदलून गेला होता. ह्या धिप्पाड, काळ्या मिशांच्या कझाकात तीन वर्षांपूर्वी फौजी चाकरी करायला निघून गेलेल्या शेलाट्या पोराचे काहीही उरले नव्हते. तो खूपच तरारला होता. खांदे रुंद झाले होते. अंगाने भरला होता. त्याचे वजन आता एकशे ऐंशी पौंडाच्या खाली नक्कीच नव्हते. त्याचा चेहरा आणि आवाज निबर झाले होते. आणि वयाच्या मानाने तो मोठा दिसत होता. फक्त डोळे तसेच होते. उद्दीपक आणि बेचैन !

त्यावरुनच त्याची आई आपला जीव ओवाळून टाकीत होती. हसत होती. आपल्या पोराच्या आखूड राठ केसावरून ती आपला सुरकुतलेला हात फिरवीत होती.

" क्रॉस मिळीवलास तर ? " धुंदीत हसत पांतिलेवने विचारले.

" कझाकात क्रॉस कुणाला नाय मिळाला ?" मितका कपाळाला आठ्या घालून म्हणाला. मुख्य ठाण्यापाशी नुसत्या गटाळ्या घातल्याबद्दल कुचकोवला तीन क्रॉस मिळाले. "

" मानाचा आहे !" ग्रिशाकानी त्वरा करून मधे तोंड घातले. " सैतान अगदी माझ्यासारखा आहे. वाकायचा नाय !"

" त्याच्यासाठी काय क्रॉस देत नैत ! " पांतिलेवने फटकन उत्तर दिले. पण मिरोन त्याला दुसऱ्या खोलीत घेऊन गेले. त्याला एका पेटाऱ्यावर बसवून त्यानी विचारले.

" नातालिया न नातवंडे कशी आहेत ? सगळी ठिकायत ना ? तू म्हणालास की कायतरी कामाय म्हणून. कायाय ? बोलून टाक. नाहीतर आपण परत प्यायला लागू न् तुला इतकी चढंल की बोलता यायचं नाही ! "

" मला पैसे दे ! देवाची आणाय ! मला मदत कर नायतर माझा सत्यानाश झालाच ह्या पायी ... ह्या पैशापायी ! " अघळपघळ धुंद लाचारीने पांतिलेवने काकुळती केली.




मिरोनने एकदम विचारले,

" किती ?"

" शंभर !"

" शंभर काय ?"

" शंभर रुबल !"

" मग असं म्हण ना !"

कोर्शुनोवने पेटारा धुंडाळला. त्यातून एक तेलकट रुमाल काढून त्याची गाठ सोडली आणि दहा दहा रुबलच्या लाल नोटा मोजल्या.

" मेहेरबानी, मिरोन ग्रिगोरिएविच ! तू मला आपत्तीतून वाचवलंस !"

" मेहेरबानी कसली ? आपल्याच रक्तामासाची माणसं असल्यावर . . . !"

मितका पाच दिवस घरी राहिला. रात्री त्याने अनिकुशकाच्या बायकोबरोबर घालवल्या. बाईच्या तीव्र निकडीबद्दल, विशेषतः राजी असणाऱ्या आणि भ्रतार जवळ नसलेल्या अनिकुशकाच्या साध्या बायकोबद्दल त्याला कणव आली. त्याने दिवस आपल्या नातेवाईकांबरोबर आणि मित्रांबरोबर गटाळचा घालण्यात घालवले. थंडी विरुद्ध आपल्या ताकदीची मिजास मिरविण्यासाठी तो पातळ खाकी फर्गोल घालून आणि टोपी डोक्यावर मागे सरकावून खेड्यातील रस्ते तुडवीत भटकायचा. एक दिवस संध्याकाळी तो मेलखोवच्या घरी गेला. त्या अती गरम केलेल्या सायवानात त्याने आपल्याबरोबर गोठवल्या थंडीचा गंध आणि सैनिकाचा उग्र भपकारा आणला होता. युद्ध, खेड्यातील बातम्या ह्याबद्दल तो गप्पा मारीत बसला. मग आपले हिरवे डोळे आकुंचित करून त्याने दाऱ्याकडे पाहिले. आणि तो जायला निघाला. तो गेल्यावर दाराचा धाडकन आवाज झाला तशी मेण-बत्तीच्या ज्योतीसारखी दाऱ्या थरथरली. ओठ घट्ट आवळून ती डोक्यावर रुमाल बांधण्याच्या बेतात होती, पण इलिनिचनाने विचारले,

" दाऱ्या कुठं निघालीस ? "

" मला जरा बाहेर जायचंय ! "

" मी येते तुझ्याबरोबर ! "

पांतिलेय ही प्रश्नोत्तर जणू ऐकूच आली नाहीत असा मुंडी वर न करता बसून राहिला होता. त्याच्या अंगावरून दाऱ्या दाराकडे गेली.

तिच्या अवनत पापण्याआडच्या डोळ्यात कोल्ह्याच्या डोळ्यांची चमक होती. तिची सासू शरीर सावरीत तुरतुरत तिच्या मागे निघाली होती. फाटकाशी मितका खोकत आणि पायाचा आवाज करीत होता. दाराच्या कडीचा आवाज होताच तो पावलाणावर परत यायला निघाला.

"तू रे मितका? आमच्या आवाडात तुझी वाट नाय ना चुकली?" इलिनिचना धूर्तपणाने म्हणाली. "गेलास की फाटक ओढून घे हो! नायतर ह्या वाऱ्यात रात्रभर खडखडत राहील!"

"नाय वाट नाय चुकलो. फाटक लावून घेतो मी!" खट्टू स्वरात मितकाने उत्तर दिले आणि सरळ रस्ता ओलांडून तो अनिकुशकाच्या आवाडाकडे निघाला.

पाखरासारखे बेफिकीर जीवन मितका जगत होता. आज जीवन छान चाललंय, उद्याची काळजी उद्याला. शिपाईगिरी करायला तो फारसा उत्सुक नव्हता. धमन्यात रक्त खेळवणारे बेडर दिल त्याच्याजवळ जरी होते, तरी नाव गाजवण्यासाठी त्याने वाकडी वाट कधी केली नाही. सैन्यातील त्याचे कागदपत्र मुळीच चांगले नव्हते. त्याला दोनदा कोर्ट मार्शल झाली होती. एकदा नागरीकत्व पत्करलेल्या पोलिश स्त्रीवर बलात्कार केल्याबद्दल आणि एकदा चोरी केल्याबद्दल युद्धाच्या तीन वर्षांत त्याला असंख्य वेळा शिक्षा झाल्या होत्या.

एकदा तर लढाईवरील कोर्ट मार्शलमधे त्याला गोळी घालायचेच काय ते बाकी होते. कशा कुणास ठाऊक पण स्वतःची सुटका करून घेण्याच्या हिकमती त्याला अवगत होत्या. रेजिमेन्टमधला तो एक अत्यंत खराब इसम असला तरी त्याचा आनंदी हसतमुख स्वभाव आणि अश्लील गाणी (त्यात पटाईत!) त्याचा मित्रभाव, सरळसोट वागणे ह्यामुळे कझाकांना तो आवडायचा. अंमलदाराना तो आडवायचा त्याच्या गुंड मस्तीमुळे. हसतमुख मितका अलगत लांडग्याच्या पावलाने चालायचा. त्याच्यात, त्याच्या चालीत, त्याच्या बटबटीत हिरव्या डोळ्यांच्या नजर झुकवण्याच्या पद्धतीत एवढेच काय पण गर्दन फिरवण्यातही त्याच्यात लांडग्याचा वाण खूपच होता. कुलपी गोळ्याच्या स्फोटाने दुखापत झालेली आपली मान तो कधीही वळवीत नसे. बाजूला बघायचे असल्यास तो आपला संपूर्ण देहच फिरवीत असे. त्याच्या थोराड हाडावर स्नायूंचे पट गच्च बसलेले होते. आणि हालचालीत तो तेज आणि नेटका होता. त्याच्या अंगाला आरोग्याचा आणि ताकदीचा एक उग्र वास येत होता. एकाद्या खोऱ्यात नांगराने उफणलेल्या उत्तम काळ्या मातीचा तो

वास होता. मितकाच्या दृष्टीने जीवन साधे आणि थेट नांगरलेल्या तासासारखे त्याच्या समोर पसरलेले होते. आणि त्यावरून तो निर्वेध, स्वामी असल्यासारखा चालत होता. त्याचे विचार तेवढेच अनघड साधे आणि सरळ होते. भूक लागली तर माणसाला चोरी करता आली पाहिजे. आणि त्याने ती केली पाहिजे. अगदी तुमच्या साथींची सुद्धा चोरी केली पाहिजे. आणि भूक लागली की मितका चोरी करीत असे. तुमचे बूट जर झिजून गेले असतील तर जगात सोप्यात सोपी गोष्ट म्हणजे एखाद्या जर्मन कैद्याचा जोड काढून घ्यायचा. तुम्हाला जर शिक्षा झाली तर त्याची भरपाई केलीच पाहिजे. आणि मितका आपल्या शिक्षांची भरपाई करायचाच. टेहळणीवर जायचा आणि येताना अर्धवट गळा दाबलेले जर्मन संत्री घेऊन यायचा. अत्यंत धोकेबाज जोखीम आपण होऊन अंगावर घ्यायचा. १९१५ त त्याला बेदम पिटून कैद करण्यात आले होते. पण आपली बोटांची नखे तोडून घेऊन तो मांगराचे छप्पर फोडून बाहेर पडला. आणि जाताना आठवण असावी म्हणून त्याने रेकल्याचा जुंपणीचा सरंजाम पळवला होता. अशा प्रकारे मितका घवघवीत यश मिळवून सगळ्यातून निसटायचा.

सहाव्या दिवशी मिरोवने आपल्या पोराला रेकल्यातून मिलेरोवो स्टेशनावर पोचवला. गाडीचे हिरवे डबे खडखडत पुढून सरकत असताना ते बघत ते उभे होते. नंतर आपले धूसर डोळे वर न उचलता चाबकाच्या दांडक्याने फलाटावरील जमीन उकरीत ते बराच वेळ उभे होते. लुकिनिचका पोरासाठी रडत होती. म्हातारे ग्रिशाका खोकत, ओंजळीत नाक शिंकरत आणि मग तळवे कोटाला पुसत होते. अनिकुशकाची विरहिनी मितकाचा प्रचंड, धुंदपणे आंजार गोंजारणारा देह आठवून त्याच्यापासून लागलेल्या परम्याच्या यातना भोगीत आसू ढाळीत होती.

वाऱ्याने घोड्याची आयाळ पिस्करावी तशी कालदर्शने दिवसांची गुंतवळ करून टाकली. नाताळाच्या थोडेच आधी अनपेक्षितपणे बर्फ पाघळू लागला. दिवसचे दिवस पाऊस पडत राहिला. डोंगरातील खचऱ्या कपाऱ्यांच्या कोरड पात्रातून ओहणाचे लोट वाहू लागले. जुने बांदाड गवत आणि चुनखडीच्या शेवाळलेल्या शिळा ह्यामुळे बोडकी तबके हिरवट दिसू लागली. डॉनच्या थडी फेसाळू लागल्या. बर्फाला निळी प्रेतकळा येऊन तो फुगारला. उघडचा काळचा मातीतून शब्दातीत मधुर गंध उसळला. हमसडकावरील नळांडीतून पाण्याचे बुडबुडे उठू लागले. खंडचापलीकडच्या जंबाळ पायणी नव्या कडेकोसळीने बेलाग होऊन गेल्या. दक्षिणे-कडून येणाऱ्या वाऱ्यावरून कुजलेल्या पर्णाचा उग्र गंध येऊ लागला. आणि

हुंधारच्या वेळी वसंतऋतूत असतात अशा नाजुक करड्या कबूदी सावल्या क्षितिजावर रेंगाळू लागल्या. खेड्यात कुपाटी बाहेर फेकून दिलेल्या राखाडीच्या ढिगाऱ्याभोवती खळबळती डबकी साचली. मळणीच्या खळ्यातील उडव्याभोवतालची जमीन पाझरून दमट पयेणाचा विटवणारा गोडटपणा जाणाऱ्या येणाऱ्यांच्या नाकांना झोंबू लागला. दिवसा काळे मेणचट पाणी झिळमिळ्या लागलेल्या केंबळ्यातून पाघळत खाली गलथ्यातून वहात जायचे. कुपट्यावर बसून दयाळ पक्षी अखंड कर्कश चिवचिवत होते. मिरोन कोर्शुनोवच्या आवाडात हिवाळ्यासाठी ठेवलेला खेड्याचा बैल अकाळ वासंतीक सुस्तीने डरकाळीत कुपाटीला शिंगाने ढोशीत होता. जुनाट बाळवी लागलेल्या नांगरावर आपले तकतकीत उर घसटत होता आणि विदीर्ण होणारा पाझरता बर्फ तुडवीत होता.

नाताळाच्या दुसऱ्या दिवशी डॉनचा प्रवाह फुटला. प्रचंड धडका देत आणि आक्रोशत बर्फ ससेट्याच्या मधल्या धारेवरून खाली वहात गेला. पेंगुळलेल्या महाकाय माशाप्रमाणे बर्फजळ थड्यावर धबधबा आदळले. डॉनच्या पलीकडे क्षुब्ध वाऱ्याने ताबडलेले चिनार फडफडत्या पण निश्चल भरारीसाठी तणावून पुढे वाकले होते·

पण झांजड पडायच्या सुमारास वारा डोंगरावर गर्जू लागला. डोंबकावळे फडफडत चौकात कर्कश चित्कारू लागले. ख्रिस्तोनियाचे डुक्कर सुळक्यात गवताची पेंड घेऊन मेलिखोवच्या आवाडावरून धावत गेले. पांतिलेयने ठरवून टाकले की परत वसंतऋतु खुडला गेला आणि उद्या गोठवणी येणार. रात्री वाऱ्याने पूर्वेकडे मोहरा वळवला. पाघळतीत उध्वस्त झालेल्या डबक्यावर बर्फाचे आरसपानी आच्छादन घालून गोठवणीने टाकेजोड केली. सकाळपर्यंत मॉस्कोच्या बाजूने वारे वाहू लागले. परत घट्ट गोठवणी आली. हिवाळ्याचे अधिराज्य परत सुरू झाले. फक्त डॉनच्या खालच्या अंगाला मधोमध बर्फजळाचे विशाल पांढरे तकटे संथपणे वहात चालले होते आणि उंचवट्यावरून उजाड धरती गोठवल्या थंडीने धुरपत होती.

नाताळानंतर थोड्याच दिवसानी झालेल्या सभेत खेड्याच्या कारकुनाने पांतिलेवला कळविले की, कामेनस्कायात त्याला ग्रिगरी भेटला होता. मुलगा त्याला भेटायला लौकरच येईल असा निरोप त्याने आईबापांना कळविण्यास सांगितले होते.

---

# ७

सेर्गेइ मोखोवच्या लहानथोर काळगेल्या केसाळ हातांना जीवनाच्या सर्व नाड्या जाणवत होत्या. जीवन कधी त्याच्याबरोबर क्रीडा करीत होते तर कधी बुडालेल्या माणसाच्या गळ्याला बांधलेल्या धोंड्याप्रमाणे त्याच्या गळ्याला लटकले होते. त्याने खूप पाहिले होते. आपल्या हयातीत सेर्गेइ प्लेतोनोविचनी अनेक त्रास भोगले. खूपखूप वर्षापूर्वी ते धान्य उचलणारे यंत्र अद्याप चालवीत असताना त्यानी कझाकाकडून कवडी किमतीला धान्य विकत घेतले. आणि नंतर चार हजार पूडस् निरुपयोगी जळलेले धान्य गाडीत घालून नदीत फेकून दिले होते. पतझडीच्या मोसमातील एका काळोख्या रात्री खेड्यातील कुणीतरी हलकी बंदुक (shot gun) त्याच्यावर रिकामी केली होती. ते १९०५चे वर्षही त्याना आठवले. नफ्यातोट्याच्या ओघात मोखोवनी साठ हजार रुबलस साचवले होते. आणि 'वोलगा–कामा बँकेत' ठेव म्हणून ठेवले होते. पण प्रचंड उलथापालथीचा काळ येऊ घातल्याचा वास खूप दूरुनच त्यांना आला होता. त्या कृष्ण दिवसांची ते वाट पहात होते आणि त्याचे हिशेब चुकले नव्हते.

क्षयाने हळूहळू मृत्युपंथाला लागलेल्या बालांदा गुरुजीनी १९१७ च्या जानेवारी महिन्यात त्यांच्याजवळ तक्रारीच्या सुरात म्हटले होते,

" क्रांती अगदी नाकासमोर येऊन ठेपल्येय न् इथं ह्या आचरट रडक्या रोगानं मी मरायला लागलोय. शरमेची गोष्ट आहे, सेर्गेइ प्लतोनोविच ! तुमच्या पैशाच्या थैल्या फाडून उघड्या केलेल्या आणि तुमच्या मऊमऊ घरट्यातून तुम्हाला हुसकावून दिल्याचं पहायला जगू नये ही शरमेची गोष्ट आहे ! "

" शरमेची गोष्ट का ? "

"शरमेची नाहीतर काय? सगळ्यांचा सत्यानाश पहायला आनंद वाटेल!"

"नाही! माझ्या मित्रा! ते घडण्यापूर्वीच तू मरणार!" आपला क्रोध लपवीत सेर्गेइ प्लतोनोविच म्हणाले.

रासपुतिन आणि झारचे कुटुंब ह्याबद्दलच्या शहरी गप्पांचे प्रतिध्वनी डॉनवरील खेड्यातून अद्याप पसरतच होते. पण एकतंत्री राजवट उलथून टाकण्यात आल्याची बातमी मार्च महिन्याच्या सुरवातीला आली तेव्हा सेर्गेइ प्लतोनोविच हादरून गेले. संयत चिंतेने आणि आशेने कझाकांनी ह्या बातमीचे स्वागत केले. त्या दिवशी तरण्या–म्हाताऱ्या कझाकांनी मोखोवच्या दुकानाच्या बंद दाराजवळ घोळका केला होता. तांबड्या केसांचा, तिरळ्या डोळ्यांचा कझाक असणारा खेड्यातील नवीन अतामान ही बातमी ऐकून भुईसपाट झाला होता. दुकानाबाहेर तावातावाने चाललेल्या चर्चेत त्याने जवळ जवळ भाग घेतलाच नाही.

कझाकाकडे घाबरट तिरळ्या नजरेने बघत तो मधूनच भ्रमिष्टासारखा उद्गारायचा, "गोष्टी भलत्याच थराला गेल्या हो! आता आपण काय करावं?"

दुकानाबाहेर गर्दी जमलेली पाहून मोखोवनी बाहेर जाऊन वयोवृद्ध लोकाशी बोलायचे ठरवले. आपला राकून कोट चढवून ते घराच्या पुढच्या पायऱ्या उतरून आले. साधी चंदेरी आद्याक्षरे असलेल्या काठीवर भर देत ते पडवीत आले.

"हं मोखोव तू शिकला सवरलेला माणूस आहेस. आता काय होणाराय ते आम्हा अडाण्याना सांग." संचितपणे स्मित करीत मातवेई काशुलिनने विचारले. त्यामुळे त्याच्या गारठून गेलेल्या नाकाभोवती लहानशा नागमोडी रेषा उमटल्या.

मोखोवने मान लववताच त्या म्हाताऱ्या माणसांनी आदबीने टोप्या काढून हातात घेतल्या आणि त्या घोळक्याच्या मधोमध त्याना जाता यावे म्हणून ते मागे सरकले.

"आपण झारशिवाय रहायचं … …" सेर्गेइ प्लतोनोविच चाचरत बोलू लागले.

सगळी म्हातारी माणसे एकाचवेळी बोलू लागली.

"पण झारशिवाय कसं काय?"

"आमचे बापजादे झारखालीच जगले. अन् आता काय झारची जरूर नाय?"

" डोकं छाटलंत की पाय कसे जगायचे ?"

" कोणत्या प्रकारचं सरकार येणाराय ?"

" बोलून टाक सेर्गेइ प्लतोनोविच ! बोलून टाक ! आम्हाला भ्याचं कारण नाय !"

" एखादे वेळी त्याला स्वतःलाच ठाऊक नसंल !" हसून कुणीतरी अभिप्राय दिला....

सेर्गेइ प्लतोनोविचनी खुळचासारखे आपल्या रबरी तळबुटाकडे रोखून पाहिले, आणि मोठचा यातनापूर्वक त्यांचे शब्द येऊ लागले,

" डचूमाचं सरकार येईल. आपलं प्रजासत्ताक होईल !"

" ही पाळी आली होय आपली ! धुत् त्येच्यायला !"

" स्त्रिवासी खुदब्दौलत दुसरे अलेक्झांदर ह्यांच्या हाताखाली आम्ही कशी चाकरी केली ते आता आठवतं." आवदेइचने सुरवात केली, पण बगातिऱ्योव ह्या कडक म्हाताऱ्या कझाकाने त्याला दटावून थांबवले,

" ऐकलंय ते सगळं ! वायफळ बडबड नकोय !"

" कझाकांचं भरत आलंय म्हणा की !"

" हे सगळे संप असेच चालू राहिले तर सेंट पिटर्सबर्गमधे जर्मन यायला वेळ लागायचा नाय !"

" असलं सारखेपण म्हणजे आपणही नांगरमुठचा सारखेच व्हायचे !"

" आमच्या जमिनी ते आता काढून घेतील. आँ ?"

आजूबाजूच्या त्या म्हाताऱ्या माणसांच्या त्रस्त चेहऱ्याकडे बळेच हसत सेर्गेइ प्लतोनोविचनी नजर टाकली. आणि त्याना भयानक विषण्णतेच्या भावनेने ग्रासून टाकले. सवयीचा चाळा म्हणून त्यांनी आपली पिकत चाललेली दाढी बोटांनी फाकली आणि कोणावर कोण जाणे पण ते रागारागाने बोलू लागले.

" पाहिलंत त्यांनी रशियाची काय दशा करून टाकली ते ! तुम्हाला ते नांगरमुठचांच्या जोडीला बशीवणार. तुमचे हक्क काढून घेणार. जुन्या मानहानीचं उट्टं काढून घेणार. काळ वाईट येतोय... ! कुणाच्या हाती सरकार जातंय त्यावर अवलंबून आहे. नायतर आपल्ला पुरा सत्यानाश ओढवणाराय !"

" जगलो वाचलो तर बघू या…! " बगातिन्योवने मुंडी हलवली. आणि आपल्या झुबकेदार भुंवयाखालून सेर्गेई प्लतोनोविचकडे नजर टाकली. " प्लतोनोविच तू तुझं स्वतःचं बघतोयस ! कदाचित आमची परिस्थिती सुधारेल ! "

" तुमची कशी काय सुधारणाराय ? " मोखोवने फणफणत विचारले.

" नवीन सरकार कदाचित लढाई थांबवील. ते शक्य आहे का नाय ? "

मोखोवने हात हवेत उडवला आणि ते पाय ओढीत आपल्या नक्षीदार निळ्या पडवीत निघून गेले. पैशाचे व्यवहार, गिरणी, बसत चाललेला व्यापार ह्यांचे असंबद्ध विचार त्यांच्या मनात घोळत होते. मग त्याना आठवले की, येलिझावेता मॉस्कोत आहे. आणि व्लादिमीर 'नोवोचेरकास्क' हून लौकरच घरी परत येणार आहे. आपल्या मुलाबद्दलच्या चिंतेच्या बोथट टोचणीने त्यांच्या विचारांच्या बेचैन गोंधळात व्यत्यय आला नाही. आपल्या आजूबाजूचे जीवन एकाएकी अंधारून गेलेले आहे. आणि यातनामय विचार आपले प्राण शोषून घेत आहेत, अशा भावनेने ते पडवीपर्यन्त आले. मागे वळून त्या म्हाताऱ्याकडे बघत ते पायऱ्यांच्या कठड्यापलीकडे थुंकले आणि वरांड्यातून आपल्या खोलीकडे गेले.

ॲना इवानोवनाची नवऱ्याशी भेट भोजनाच्या खोलीत झाली. आपल्या नेहमीच्याच रंगहीन, भावहीन नजरेने त्याच्या चेहऱ्याकडे बघत तिने विचारले, " चहा आधी फराळ करणार का ? "

" छे ! फराळ कसला बोडक्याचा करत्येस ! " त्यांनी चिडून तिला झाडून टाकले. त्यांच्या तोंडात एक कळकट चव आली होती. डोके सुन्न आणि रिकामे वाटत होते.

" लीझाकडून पत्र आलंय ! "

ॲना इवानोवाना पाय ओढीत झोपण्याच्या खोलीत गेली. ( असंख्य संसारी कामाच्या ओझ्याखाली वाकल्याने लग्न झाल्याच्या पहिल्या दिवसापासून ती अशीच चालत होती. )

एक उघडलेले पाकीट घेऊन ती आली.

" मठ्ठ न छचोर कारटी आहे ! " कडक कागदी पाकीटाला येणाऱ्या सुवासाने नाक मुरडलेल्या सेर्गेइ प्लतोनोविच ह्यांच्या मनात आयुष्यात प्रथमच स्वतःच्या मुलीबद्दल असे विचार आले.

पत्रातील 'मनोवृत्ती' ह्या शब्दावर त्यांनी जरा विचार केला. त्यावर चिंतन केले. ह्यात काही सुप्त अर्थ आहे किंवा काय ह्याचा विचार केला. बाकी पत्र त्यांनी वरवर वाचून टाकले. पत्राच्या अखेरीस एलिझाबेताने पैशाची मागणी केली होती. तोच तो ठणकता रितेपणा डोक्यात भरलेल्या सेर्गेइ प्लतोनोविचनी शेवटच्या ओळी वाचल्या. एकाएकी त्याना रडावे असे वाटू लागले. त्यांचे सबंध आयुष्य उजाड होऊन पुढे उभे राहिले होते.

" ती मला परकी आहे न् मी तिला परका आहे ! " त्यांच्या मनात आले. " पैशाची जरूर लागली की तेवढ्यापुरती माझी मुलगी असल्याचं तिला आठवतं. गलिच्छ पोरटी ! तिचे ते प्रेमवीर .. ! लहान असताना कसे छान केस होते. ती माझी होती तेव्हा ! परमेश्वरा ! कसं सगळंच बदलतं ! पार म्हातारपणापर्यन्त मी अडाणीच राहिलो ! कधीतरी बरे दिवस येतील असं वाटत होतं. पण प्रत्यक्षात वाटेवरच्या धोंड्यासारखा मी आपला एकाकीच राहिलोय ! पैसे लांड्यालबाड्या करून मिळवले. पण भल्या मार्गानं मिळतात कुठं ? इतरांना मी पिळलं न् आता क्रांती येत्येय ! उद्या माझ्याच घरातून माझे नोकर मला बाहेर काढतील ! तिच्या आयला त्यांची ! न् माझी पोरं ? व्लादिमीर मूर्खाय ! न् अर्थ तरी कशालाय ? कशालाच काय अर्थ नाय ... "

कोणत्या तरी अस्पष्ट साहचर्यापोटी त्याना त्यांच्या गिरणीत घडलेला एक प्रसंग आठवला. माप कमी दिले म्हणून एक कझाक गिऱ्हाइक आकांडतांडव करीत होते. पैसे देत नाही म्हणत होते. तो गलबला ऐकून काय चालले आहे ते पहायला सेर्गेइ प्लतोनोविच एंजिनाच्या खोलीतून बाहेर आले. ती हकीकत ऐकून घेतल्यावर वजनवाल्याला त्यानी पीठ ठेऊन घ्यायला सांगितले. तो ठेंगणा हडकुळा कझाक पीठाचे पोते एका बाजूने ओढत होता. आणि ठोसर बांध्याचा भरदार छातीचा गिरणीतील झावर हा गडी दुसऱ्या बाजूने खेचत होता. कझाकाने त्याला ढकलून दिल्यावर झावरने हात उगारला आणि आपल्या प्रचंड मुष्टीचा एक तडाखा त्याच्या कानफटात ठेवून दिला. तो ठेंगणा कझाक कोलमडला. मग कळवळत उठून उभा राहिला. त्याच्या डाव्या कानशीलावर खरचटले होते. सेर्गेइ प्लतोनोविचच्या दिशेने एक पाऊल टाकीत तो स्फुंदत, दात ओठ खात म्हणाला,

" घे माझी कणीक ! भर ठासून पोटात !" असे म्हणून तो निघून गेला. त्याचे खांदे थरथरत होते.

हा प्रसंग आणि त्यातून जे निष्पन्न झाले ते सेर्गेइ प्लतोनोविचना आठवायला तसे काही कारण घडलेले नव्हते. त्या ठेंगण्या कझाकाची बायको त्यांच्याकडे कशी आली, तिने ते पीठ कसे मागितले, इतर गिऱ्हाइकांची सहानुभूती मिळवण्यासाठी तिने डोळ्यातून टिपे कशी काढली ते त्याना आठवले.

"हा कसला धंदा बाबार्नू ? असं वागायचा ह्याला काय अधिकार? देऊन टाक आमचं पीठ !"

"ए मावशे ! आता इथनं बऱ्या बोलानं जातेस का झिज्या उपटू तुझ्या ?" झावरने तिची टर उडवली.

त्या कझाकाएवढाच स्वत: अशक्त आणि ठेंगणा असणाऱ्या 'तागडीवाल्या' गुड्डूने झावरच्या अंगावर कशी झेप घेतली आणि मग झावरच्या हातचा निर्दय मार खाऊन ती जागा कायमची त्याने कशी सोडून दिली ते सर्व पहाणे त्रासदायक आणि वेदना देणारे होते.

त्या पत्राची घडी केल्यावर हे सर्व सेर्गेइ प्लतोनोविचच्या मनात तरळून गेले आणि शून्य नजरेने ते समोर बघत बसले.

दिवस कलला तो एक दुष्ट, ठुसठुसणारी वेदना मागे ठेवूनच.

त्या रात्री त्यांना नीट झोप लागली नाही. असंबद्ध विचार आणि सुप्त इच्छा ह्यानी ग्रासून ते सारखे ह्या कुशीचे त्या कुशीला होत होते. येवघेनी लिस्त्निस्त्की आघाडीवरून घरी परतल्याचे दुसऱ्या दिवशी सकाळी त्याना समजले, तेव्हा गाडीतून यागोदनायाला जायचे आणि प्रत्यक्ष परिस्थिती समजावून घेऊन मनातील कटू सांचवणी आणि चिंतातूर दु:स्वप्ने हलकी करायचे त्यानी ठरविले. तेव्हा येमिलियानने छोट्या घसरगाडीला घोडा जुंपला आणि धन्याला योगोदनोयेला नेले.

खेड्याच्या डोक्यावर सूर्य एकाद्या पिवळ्या एप्रिकोट प्रमाणे परिपक्व होत होता. त्याच्या वर आणि खाली ढगाच्या धुरकट्या पेंड्या विस्नत चालल्या होत्या. तीक्ष्ण गोठवती हवा समृद्ध फल गंधाने संपृक्त झाली होती. रस्त्यावरील बर्फ घोड्याच्या टापाखाली चुरडला जात होता. त्या जनावराच्या नाकपुड्यातून निघणारी वाफ वाऱ्यावर वहात आणि त्याच्या आयाळीवर शिखा होऊन बसत होती. चपळ गती आणि थंडीने सुखावून सेर्गेइ प्लतोनोविच बसल्या जागी डुलक्या घेत होते. पण खेड्यातील चौकात काळ्या मेंढकातडी घातलेले कझाक

आणि अंगावर पाणमांजरांचे लोकरीचे कोट पांघरलेल्या त्यांच्या बायका ह्यांचा घोळका दिसत होता.

बालांदा गुरुजी आपल्या हिरवट ओठाशी हातरुमाल धरुन घोळक्याच्या मधोमध उभे होते. त्यांच्या 'बटनहोल' मधे एक लाल फीत लावलेली होती. बोलताना त्यांचे डोळे विलक्षण धगधगत होते.

" . . . पाहिलंत, करंटी एकतंत्री राजवट अखेरीस कोसळली. आता हातात आसूड घेऊन कामगारांना मोडून काढायला तुमच्या पोरांना कुणी पाठवणार नाय त्या खविसाची झारची तुम्ही करीत होता ती लाजीरवाणी चाकरी संपल्येय. नवीन स्वतंत्र रशियावर घटना परिषद राज्य करेल. एका नवीन उज्वल जीवनाची ती उभारणी करेल ! "

त्यांच्या मागे त्यांची पत्नी उभी होती. ती त्यांच्या कोटाचे टोक खेचीत काकुळतीने कुजबुजत होती.

" मित्या पुरे झालं ! तुला हे चांगलं नाय हे कळत का नाय ? परत थुंकीतून रक्त यायला लागेल हो मित्या ! "

अवघडून खोकत आपले हसणे दाबीत कझाक बालांदा गुरुजींचे भाषण ऐकत होते. पण त्यांचे त्यांनी पुरते होऊ दिले नाही. जमावातून कळवळ्याचा एक खर्ज मधेच उमटला,

" हो हो ! मोठे झकास दिवस येणारायत ! पण ते बघायला तू काय जगत नैस. गरीब बिचारा ! जा आता घरी, गारठा पडलाय ! "

आपले म्हणणे बालांदा गुरुजीने घाईने पुरे केले. आणि खिन्न होऊन ते निघून गेले.

मध्यान्हीच्या सुमारास सेर्गेइ प्लतोनोविच योगोदनोएला पोचले. लगाम पकडून येमिलियानने घोड्याला वाळुंजीच्या गव्हाणीकडे नेले. त्याचे धनी घसरगाडीतून खाली उतरुन आपल्या मेन्ढकातडीच्या सदऱ्याखाली हात घालून हातरुमाल शोधीत असताना त्याने घोड्याची कसणी सोडवली आणि त्याच्या पाठीवर रुपडलेली टाकली. पायऱ्यांच्या तळाशी सेर्गेइ प्लतोनोविचना एक धिप्पाड मळचा रंगाचा बोरझाई शिकारी कुत्रा भेटला. आपल्या लांब तंगड्या ताणावून जांभई देत तो त्यांच्या वाटेत उभा होता. पायऱ्या भोवती पासललेली इतर कुत्री सुस्तपणे उठून त्यांच्या मागे आली.

"च्यायला ! किती कुत्री !" असे म्हणत त्यांच्याकडे तोंड करून सेर्गेइ प्लतोनोविच पायऱ्या चढून गेले.

त्या सुबक्या सुप्रकाशीत प्रवेशिकेत कुत्री आणि शिरक्यांचा उग्र दर्प येत होता. पेटाऱ्याच्या वरच्या बाजूला असलेल्या सांबराच्या शृंगशाखेवर अंमलदाराची कॉकेशन लोकरी टोपी, चंदेरी गोंडा लावलेला शिरटोप आणि एक कॉकेशन चुगा लटकलेले होते. तिकडे नजर टाकताना सेर्गेई प्लतोनोविचना क्षणभर असे वाटले की, एक धिप्पाड, केसाळ, खांद्यात झुकलेली आकृतीच उभी आहे. बाजूच्या खोलीतून एक पुष्ट, काळ्या डोळ्यांची स्त्री बाहेर आली. मोखोवकडे तिने लक्ष-पूर्वक रोखून पाहिले आणि आपल्या श्यामल आकर्षक मुखावरील तो गंभीर भाव तसाच ठेवून तिने विचारले,

" निकोलाय अलेक्सिएविच कडे आलायत का ? मी त्यांना सांगते. "

ही किंचित पुष्ट, देखणी स्त्री अक्सिनिया आहे हे सेर्गेइ प्लतोनोविचना ओळखायला वेळ लागला. पण तिने त्याना चटकन ओळखले, आणि आपले डाळिंबी ओठ आवळून, नितळ अनावृत बाहूंची किंचित हालचाल करून ती अस्वाभाविकशी ताठ झाली. दारावर टकटक न करता ती दिवाणखान्यात शिरली. आणि तिने दरवाजा ओढून घेतला. मिनिटा दोन मिनिटांनी ती परत बाहेर आली. तिच्या मागोमाग म्हातारे लिस्त्‌निस्त्‌की आले.

स्वागताचे उग्र स्मित करीत अनुग्रह केल्यासारखे त्यानी विचारले. "ओहो ! मोखोव शेटजी ! इकडं येणं कसं केलंत ? आत या ! " ते बाजूला सरकले आणि हाताचा निर्देश करून त्यानी आपल्या अभ्यागताला दिवाणखान्यात पाचारले.

सामाजिकदृष्टया वरिष्ठ असणाऱ्याबद्दल पूर्वीपासूनच शिकलेली नम्रता दाखवीत सेर्गेइ प्लतोनोविचनी लवून अभिवादन केले आणि ते आत गेले. त्यांचे स्वागत करायला येवघेनी लिस्तनिस्तकी पुढे आला आणि चष्म्या आडून डोळे आकुंचित करीत म्हणाला,

" आनंद आहे सेर्गेइ प्लतोनोविच ! कसं काय ? म्हातारे व्हायला लागलात आँ ? "

" छे छे ! येवघेनी निकोलायविच ! तुमच्याहून जास्त जगायची उमेद आहे. पण तुमचं कसं काय ? सगळं ठीकठाक ? "

सोन्याने मढवलेले आपले दात प्रकट करीत येवगेनीने स्मित केले, आणि सेर्गेइ प्लतोनोविचच्या दंडाला धरून त्याना खुर्चीकडे नेले. एका लहान मेजापाशी ते बसले. एकमेकाशी सुखालाप करीत आधीची भेट झाल्यापासून दुसऱ्यात काय बदल झालेत ते पाहाण्यासाठी एकमेकांची तोंडे ते न्याहाळीत होते. लिस्तनिस्तकीनी आक्सिनियाला चहा घेऊन येण्याला सांगितले. नंतर ते सेर्गेइ प्लतोनोविच जवळ येऊन उभे राहिले आणि एक हात मेजावर टेकवीत त्यांनी विचारले,

" खेड्यातील हालहवाल कायाय ? ऐकलीत का तुम्ही एक मोठी छान बातमी ? "

त्या सेनानीच्या हनुवटीखालील स्वच्छ श्मश्रू केलेली कातडीची वळी बघत मोखोवने सुस्कारा टाकला, " न ऐकून कुणाला सांगतो ? "

" काय प्राक्तनानं गोष्टी ह्या थराला आल्या ! " त्या म्हाताऱ्या सेनानीने पाईपचा खोल झुरका घेतला आणि सेकंदभर त्याची गळ्याची घाटी थरथरली. " युद्धाच्या अगदी सुरवातीलाच मी हे भाकीत केलं होतं. राजघराणं बरबाद झालं होते. त्यानं मेरेझ्यकोवस्कीची आठवण होते .... तुला आठवतं येवगेनी ? त्याची पहिला पिटर आणि अलेक्सेइची गोष्ट. हालहाल झाल्यानंतर शहजादा बापाला म्हणतो, " माझं रक्त तुझ्या अवलादीचा सूड घेईल . . . . . ! "

" काय झालयं त्याची खरी बातमी काय आम्हाला कळलेली नाय ! " सेर्गेई प्लतोनोविच क्षुब्धपणे म्हणाले. आपल्या खुर्चीत त्याने चुळबूळ केली. चुट्टा पेटवला आणि ते पुढे बोलू लागले. " एक आठवडा झाला वर्तमानपत्र डोळ्यांना दिसलेलं नाय. येवगेनी रजेवर घरी आल्याचं कळलं. तेव्हा प्रत्यक्षात काय घडलंय अन् पुढं काय घडणार त्याची शहानिशा करायला गाडीत बसून इकडं यावं असं ठरविलं! "

गुळगुळीत दाढी केलेल्या येवगेनीच्या चेहऱ्यावरचे स्मित मावळले आणि त्याने उत्तर दिले,

"भयावह घटना . . . सैनिकांचं नीतिधैर्य अक्षरशः संपलय. लढत राहण्याची त्यांची इच्छा नाही. त्याला ते विटलेत. खरं सांगायचं तर मान्य अर्थानं आमच्याकडं यंदा सैनिक नव्हतेच. बेलगाम अन् रानटी गुन्हेगारांच्या त्या टोळ्या बनल्यात. पपांना हे समजूच शकत नाही. आमच्या सैन्याचं नीतिधैर्य कोणत्या थरापर्यंन्त ढासळलंय त्याची त्याना कल्पनाच येऊ शकत नाही.

मर्जीला येईल तशा आपल्या जागा ते सोडून देतात. अमलदारांना ठार मारतात. नागरीकांची लूटमार करतात, खून पाडतात . , . . लष्करी हुकूम पाळायला इन्कार करणं आता नित्याचं झालंय."

" मासा डोक्याकडून सडत जातो. " म्हाताऱ्या लिस्त्‌निस्त्‌कीनी तंबाखूच्या धुराचा ढग तोंडातून सोडून दिला.

" मी तसं नाही म्हणणार " कपालाला आठ्या घालून येवगेनी म्हणाला. त्याची एक पापणी चित्तक्षोभाने फडफडत होती. " मी तसं नाही म्हणणार. सैन्य खालून सडत चाललंय. बोलशेव्हिकांनी ते खालून कुजवलंय. कझाकांच्या डिव्हिजन सुद्धा, विशेषत: पायदळाशी दाट संबंध असणाऱ्या डिव्हिजन नैतिकदृष्टचा अगदी बेभरवंशाच्या आहेत. भयंकर थकावट आणि घराची ओढ . . . . अन् हे बोलशेव्हिक . . . ! "

" त्यांना हवंय काय ? " इत:पर स्वत:वर ताबा ठेवणे अशक्य होऊन सेर्गेइ प्लतोनोविचने उसळून विचारले.

" ओह . . . ! " येवगेनी हसला, " त्याना हवंय . . . पटकीच्या जंतूपेक्षा ते भयंकर आहेत. भयंकर अशा अर्थी की माणसाला त्यांची जास्त सहजपणे लागण होते. सैनिकांच्या ऐन गाभ्यापर्यन्त त्यांचा शिरकाव होतो. अर्थात मला म्हणायच्यात त्या त्यांच्या कल्पना ! त्यांच्यापासून बचाव करणारं क्वारंटाइनच नाही. बोलशेव्हिकांत काही अत्यंत हुशार लोक आहेत ह्यात शंकाच नाही. त्यांच्यापैकी काहींशी माझा संबंध आलाय. त्यापैकी काही निव्वळ कडवे आहेत! " एवढे बोलून संताप आवरीत येवगेनी उद्गारला. " पण त्यातले बहुसंख्य बेलगाम दुराचारी जनावरं आहेत. बोलशेव्हिक शिकवणुकीच्या तात्पर्याशी त्यांना सोयरसुतक काही नाही. लुटालूट आणि आघाडीवरून य:पलायन एवढंच त्यांना हवंय. त्यांची पहिली इच्छा म्हणजे सत्ता स्वत:च्या हाती घ्यायची. आणि कोणत्याही अटीवर ते ज्याला साम्राज्यवादी म्हणतात ते युद्ध थांबवायचं. अगदी वेगळा सलुख करूनसुद्धा. न् मग जमीन शेतकऱ्यांना द्यायची, कारखाने कामगारांना द्यायचे. अर्थात हा जेवढा स्वप्नाळूपणा तेवढाच मूर्खपणा आहे. पण अशाच प्राकृत पद्धतीनं सैनिकांना ओढून घेण्यात त्याना यश आलंय. "

आपल्या बोटांत हस्तीदंती सिगारेट होल्डर चाळवीत आवरलेल्या, धुमसत्या क्रोधाने लिस्त्‌निस्त्‌की बोलत होता. खुर्चीतून उडी घेण्याच्या बेतात असल्याप्रमाणे सबंध देह पुढे झुकवून सेर्गेइ प्लतोनोविच ऐकत होते. काळे केसाळ नमदी बूट

घालून हिरवट कबऱ्या मिशा चावीत म्हातारे लिस्त्‌निस्त्‌की दिवाणखान्यात येरझारा घालीत होते.

उलथापालथीचा उद्रेक होण्याच्याही आधी कझाकांच्या सूडाच्या भयाने रेजिमेंटमधून पळून जाणे आपल्याला कसे भाग पडले ते पुढे सांगून स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलेल्या पेत्राग्रादमधील घटनांची कथा त्याने कथन केली. क्षणभर ते सगळे गप्प होऊन गेले नंतर सेर्गेइ प्लतोनोविचच्या नाकाकडे रोखून बघत म्हाताऱ्या लिस्त्‌निस्त्‌कींनी सटकन विचारले, "गेल्या पतझडीत तू पाहिलंस ते 'बोयारिनीचं' सबजा शिगरू विकत घेणार का ?

"असल्या वेळी अशा गोष्टी तुम्ही कशा काय बोलू शकता निकोलाय अलेक्सिएविच ?" मोखोवने रडव्या तोंडाने कपाळाला आठ्या घालीत विचारले आणि हवेत हात झटकून हताशपणाचा अविर्भाव केला

इकडे सेर्गेइ प्लतोनोविच ह्यांचा गाडीवान येमिलियान नोकरांच्या बराकीत बसून चहा घेत अंगात ऊब आणीत होता. बीटमुळासारखे आपले गाल लाल रुमालाने पुशीत खेड्यातील बातम्या सांगत होता.

अंगाभोवती एक पश्मीनी शाल ओढून घेऊन आक्सिनिया पलंगाजवळ उभी होती. पलंगाच्या कोरीव काम केलेल्या मागच्या बाजूला तिचे उर टेकले होते.

"मला वाटतं आमचं घर आतापर्यन्त कोसळलं असेल. होय ना ?" तिने विचारले.

"नाय. कशाला कोसळेल ?" येमिलियाने हेल काढून म्हटले.

"न् आमचे शेजारी ? मेलीखोव ! त्यांच कसं चाललंय ?"

"त्यांच ठीक चाललंय !"

"पेत्रो रजेवर घरी आला नाय ?"

"नाय आला वाटतं ! "

"न् ग्रिगरी ?"

"ग्रिगरी नाताळनंतर घरी येऊन गेला. गेल्या वर्षी त्याच्या बायकोला जुळं झालं. तो जखमी झाला होता !"

"जखमी ?"

"होय. दंडात जखमी झाला होता. लढाईनंतर सगळ्या अंगभर कुऱ्यागत निशाण्या होत्या. त्याच्यावर क्रास जास्त होते का घाव जास्त होते कुणास ठाऊक!"

" न् तो कसा दिसत होता ?... ग्रिशा म्हणते मी ! आक्सिनियाने विचारले· कोरडा हुंदका दाबून टाकण्यासाठी ती खोकली.

आपला थरथरता आवाज स्थिर करण्याचा तिने प्रयत्न केला.

" तसाच नेहमीसारखा ! चोचदार नाक अन् काळगेला. असावा असाच तुर्कातला तुर्क !"

" मला ते नाय म्हणायचं ... पण आता मोठा दिसतो का ?"

" मला काय माहित ? असेल दिसत थोडा मोठा ! त्याच्या बायकोला जुळं झालं तेव्हा फारसा म्हातारा झाला नाय हे उघडच आहे !"

" ह्या घरात थंडी वाजत्येय !" आक्सिनिया थरारून म्हणाली आणि बाहेर गेली.

येमिलियाने आपला चहाचा आठवा कप ओतला. आणि ती जात असलेली बघू लागला.

" जहरी कीड साली कुजट हिच्यासारखी हीच !" तो गुरगुरला. " परवा परवापर्यंत शेतकऱ्याचे पैजार घालून खेड्यातून पळत होती. अन् आता झाल्येय बाईसाहेब ! ह्या घरात थंडी वाजत्येय ! हत् तुझ्या आयला साली ! तुझ्या आयला तू कुत्री झालीस रांडे ! ह्या घरात थंडी वाजत्येय ! सरपटती नागीन साली !"

त्याचा इतका अपमान होऊन गेला की चहाचा आठवा कप काही त्याच्याने संपवेना. तेव्हा तो उठून उभा राहिला. अंगावर त्याने क्रुसाची निशाणी केली. आजूबाजूला उर्मटपणे बघत आणि स्वच्छ तक्तपोशी मुद्दाम बुटाने घाण करीत तो बाहेर गेला. परतीच्या सबंध प्रवासात तो आपल्या धन्याएवढाच खिन्न होता. असभ्यपणे घोड्याचे ढुंगण चाबकाच्या दांड्याने बडवीत त्याला शिवीगाळी करीत आपला संताप त्याने मोकळा केला. नेहमीचा शिरस्ता मोडून त्याने धन्याशी चकार शब्दाने भाषण केले नाही. सेर्गेइ प्लतोनोविचही भयभीत मुग्धता पाळून होते.

— — — —

## ८

आघाडीच्या नैऋत्येला राखीव म्हणून ठेवलेल्या पायदळ डिव्हिजन्सपैकी एकीचे पहिले ब्रिगेड आणि त्याला संलग्न असलेली २७ वी डॉन कझाक रेजिमेंट फेब्रुवारी क्रांती होण्याआधी पेत्रोग्रादमध्ये चाललेल्या दंगली मोडून काढण्यासाठी आघाडीवरून मागे घेण्यात आली. हे ब्रिगेड पिछाडीकडे पाठविण्यात आले. त्यांना नवीन हिवाळी जामानिमा देण्यात आला. एक दिवस चांगले खाऊपिऊ घालण्यात आले. नंतर त्यांना आगगाडीत चढवून त्यांची रवानगी करण्यात आली.

परंतु रजिमेंटपेक्षा घटना जास्त वेगाने घडल्या आणि अगदी प्रयाणाच्याच दिवशी अशा दाट वदंता पसरल्या की सरसेनापतींच्या मुख्य कचेरीत बादशहाने गादी सोडून दिल्याच्या फर्मानावर सही केली आहे.

अर्ध्या वाटेत हे ब्रिगेड परत फिरवण्यात आले. राझगोन स्टेशनावर २७ व्या रेजिमेन्टला गाडीतून उतरण्याचा हुकूम देण्यात आला रेल्वेमार्ग वाहतुकीने तुंबले होते. कोटावर लाल फिती लावलेल्या रशियन नमुन्याच्या पण इंग्लिश बनावटीच्या सुघड नवीन बंदुका घेतलेल्या सैनिकांची फलाटावर धूम उडाली होती. त्यापैकी अनेक क्षुब्ध झाले होते. आणि स्क्वाड्रनवारी रांगा लावणाऱ्या कझाकांकडे ते चिंतेने रोखून बघत होते.

पावसाळी दिवस कलायला आला होता. स्टेशनाच्या इमारतीच्या छपरा-वरून पाणी अखंड ठिबकत होते. रेल्वेमार्गावर साचलेल्या तेलाचे तवंग आलेल्या डबक्यातून आकाशाची करडी, मृदू मेंढकातडी प्रकटली होती.

'शंटींग' करणाऱ्या इंजिनाच्या गर्जना दबलेल्या आणि अडखळत येत होत्या. मालाच्या कोठारापलीकडे रेजिमेन्टला भेटायला ब्रिगेडचा कमांडर समंद-

काळ्या घोड्यावर स्वार होऊन आला. त्याने घोड्याचे लगाम खेचले स्वबाजूसकड टक लावून रोखून पाहिले. आणि शब्दांची निवड करताना अडखळत चाचरत त्याने एक भाषण केले.

"कझाकानु! लोकांच्या इच्छेनुसार बादशहा दुसरे निकोलस ह्यांची राजवट . . . अं . . अं . . उलथून टाकण्यात आल्येय! राज्य ड्यूमाच्या हंगामी समितीच्या हाती सरकार देण्यात आलंय. सैन्यानं–त्यात तुम्ही आलातच . . . ही बातमी . . अं . . अं . . शांतपणे ऐकून घेतली पाहिजे . . . बाहेरच्या हल्ल्यापासून आणि . . अं . . अं . तसं सांगायचं म्हणजे . . बाहेरच्या शत्रूपासून स्वदेशाचा बचाव करणं हे कझाकांच कर्तव्य आहे. आता ज्या कटकटी सुरू झाल्यात त्यापासून आपण आपल्याला दूर ठेवायचं आणि नवीन सरकार कसं बनवायचं ही बाब नागरी जनतेकडे सोपवायची. आपण बाजूलाच उभं राहिलं पाहिजे! सैन्याच्या बाबत युद्ध आणि राजकारण ह्या दोन . . . अं . . . अं . . . विजोड बाबी आहेत. ज्यावेळी पाया म्हणजे . . अं . . अं . . हादरतोय . . अशा वेळी आपण कसं खंबीर असलं पाहिजे . . . की . . . की!"

भाषण करण्याचा सराव नसलेला तो सुमार बुद्धीचा म्हातारा ब्रिगेडिअर जनरल आता काय उपमा द्यावी म्हणून इथे चाचरला. इकडे रेजिमेन्ट धीमेपणाने वाट बघत होते. ". . . की जसं काय पोलाद! तुमच्या अमलदारांचे हुकूम पाळणं हे तुमचं कझाकी आणि लष्करी कर्तव्य आहे. पूर्वीप्रमाणेच आपण मर्दुमकीने गनिमाशी लढा देऊ.

"तिकडं मागं (आपल्या मागच्या बाजूला त्याने अदमासाने हात उडवला) राज्य ड्यूमाला देशाचं भविष्य ठरवू द्या. आपण युद्ध संपवलं की देशाच्या आतील कारभारात भाग घेऊ. पण सध्या . . . सैन्याचा द्रोह आपण करता कामा नये. तसा तो आपल्याला करता येणार नाही . . . . सैन्यात कोणतही राजकारण येता कामा नये."

काही दिवस कझाक स्टेशनात राहिले. हंगामी सरकारावरील निष्ठेची त्यांनी शपथ घेतली. सभांना ते हजर राहत. आपल्या स्वतःच्या गावाकडील लोकात ते मिसळत. पण स्टेशनावर गर्दी करणाऱ्या सैनिकापासून ते दूर राहिले होते. सभांतून ऐकलेल्या भाषणांवर ते आपसात चर्चा करीत, प्रत्येक संशयास्पद शब्दाचे विश्वास न वाटून चर्वितचर्वण करीत. आणि मग ते सगळे कुठूनतरी ह्या निष्कर्षाप्रत येत की, आता जर स्वातंत्र्य मिळाले असेल तर त्याचा अर्थ युद्धाचा शेवट. ह्या ठाम

समजुती विरुद्ध लढा देणे आणि शेवटपर्यंन्त लढणे रशियाला क्रमप्राप्त आहे असे प्रतिपादन करणें अमलदारांना कठीण होऊन बसले.

सैन्याच्या वरिष्ठ अंमलदाराना ज्या अबरगतीने झपाटले होते त्याचा कनिष्ठ श्रेणीवर गंभीर परिणाम झाला होता. पेत्रोग्रादपासून अर्ध्या वाटेत कुचंबत पडलेल्या ब्रिगेडच्या अस्तित्वाचा ' डिव्हिजन स्टाफ ' ला जणू संपूर्ण विसर पडला होता. मिळालेला आठ दिवसांचा शिधा सैनिकांनी खाऊन टाकला. नंतर ते शेजारच्या खेडयातून गर्दी करू लागले.

चमत्कार घडावा अश्याप्रकारे दारूची विक्री होताना दिसू लागली आणि झिंगलेले सैनिक आणि अंमलदार हे दृश्य सर्रास झाले.

आपल्या नित्याच्या कर्तव्य क्रमातून बाजूला पडलेले कझाक डॉनकडे रवाना होण्याची वाट बघत आपल्या डब्यातून दाटी करू लागले. कारण राखीवाच्या दुसऱ्या सफ्याची लष्कर कपात होणार अशा अतिशय जोराच्या अफवा होत्या. आपल्या घोडयांच्या निगराणीत ते बेफिकीर बनले. आणि अलंगातून आणलेली जर्मन ब्लॅन्केटस, बागनटे, पाणकोट, तंबाखू ह्याच्या व्यापारात दिवस बाजारच्या चौकात घालवू लागले.

आघाडीकडे परतण्याचा हुकूम रेजिमेंटला मिळाला तेव्हा त्याबद्दल त्यांनी उघड असंतोष प्रकट केला. दुसऱ्या स्क्वाड्रनने जाण्याला स्पष्ट नकार दिला आणि वाहतुकीच्या डब्यांना कझाक इंजिन लावू देईनात. पण त्यांची हत्यारे काढून घेतली जातील अशी रेजिमेंट कमांडरने धमकावणी दिली आणि ही चळवळ विरून गेली. वाहतुकीचे डबे हळूहळू आघाडीकडे फरफटत जात होते. आणि प्रत्येक डब्यातून परिस्थितीवर कडाक्याची चर्चा चालू होती.

" ह्याला काय म्हणतात भाऊ? स्वातंत्र्य? तुमचं स्वातंत्र्य तुम्हाला मिळालं पण युद्धाचा प्रश्न आला. तुम्हाला परत आपलं रक्त सांडणं भागच आहे?"

" परत ही सगळी जुनीचं राजवट ? "

" मग आम्ही झार कशाला हाकलला ? "

" झारच्या राज्यात होतं तसंच आताही आहे ! "

" पाटलूण तीच फक्त बटणं मागच्या बाजूला ! "

" अगदी बरोबर ! "

" हे किती दिवस चालायचं ? "

" हे तिसरं वर्ष. आम्ही आमच्या बंदुका तेवढ्या जवळ घेऊन झोपतोय. "

कोणत्या तरी एका रेल्वे जंक्शनवर पूर्वी ठरवून पडावा तसा कझाकांचा लोंढा बाहेर पडला. आणि कमांडरच्या आश्वासनाकडे आणि धमकावण्याकडे लक्ष न देता त्यांनी आपली सभा सुरू केली. त्यांनी आपल्या डब्यात परत जावे, रस्ता मोकळा करावा अशा फोल विनवण्या कमांडर आणि तिथल्या पुराणपुरुष स्टेशन–मास्तराने करडे पाणकोट घातलेल्या कझाकांच्या घोळक्यात मिसळून केल्या. एक सार्जन्ट आणि एक ठेंगणा सामान्य कझाक ह्यांची भाषणे कझाकांनी एकाग्र चित्ताने ऐकून घेतली. आपल्या संतप्त भावनांना वाट करून देणे ह्या सामान्य कझाकाला कठीण जात होते.

" कझाकानु ! हे असं चालू शकत नाय ? परत त्यानी सगळा बट्ट्याबोळ करून टाकलाय ! आपल्याला ते बनवायला बघताएत ! क्रांती जर झाली असंल आणि सगळ्या लोकांना जर स्वातंत्र्य मिळालं असंल-तर त्यांनी युद्ध थांबवलंच पाहिजे. कारण लोकांना न् आम्हा कझाकांना युद्ध नकोय ! काय बरोबर का नाय् ?"

" बरोबराय !"

" आपल्याला वीट आलाय !"

" इथं गांडीवर पाटलूण टिकेना झाल्येय न् युद्ध कसलं बोडक्याचं ?"

" आम्हाला युद्ध नाय पायजे !"

" चलारे सगळे घरी !"

" सोडून द्या इंजन ! चला रे पोरानु !"

" कझाकांनु ! जरा थांबा ! कझाकांनु ! भाऊ ! अरे ए चांडाळानु ! थांबा ए भावांनु !"

तो ठेंगणा कझाक आरोळ्या ठोकीत हजारोंच्या आवाजावर आपला आवाज उठवण्याचा प्रयत्न करीत होता.

" थांबा ! इंजिनाला हात लावू नका ! आपल्याला फक्त ती उत्क्रान्ती थांबवायचीय ! रेजिमेन्ट कमांडर साहेबांनी आपल्याला कागदपत्र दाखवू द्या ! आम्हाला हे बघू द्या की खरंच आमची आघाडीवर गरज आहे की, हा परत त्यांचा एक डावाय !"

रेजिमेन्टल कमांडर जवळ जवळ बेभान झाला होता. त्याचे ओठ थरथरत होते. रेजिमेन्टने आघाडीकडे परत जावे असा हुकूम देणारी 'डिव्हीजनल स्टाफ'ची तार त्याने जेव्हा मोठ्याने वाचून दाखवली तेव्हाच परत गाडीत बसायला कझाक राजी झाले.

तातार्स्कीचे सहाजण एका डब्यात होते. पित्रो, मेलिखोव, निकोलाय कोशेवोइ, (मिशाचा काका) अनिकुशका, फिदोत बोदोव्स्कोव, मेर्कुलोव (काळ्या कुरळ्या दाढीचा, धगधगीत बदामरंगी डोळ्यांचा, जिप्सी सारखा दिसणारा कझाक) आणि मास्किमवा ग्याझनोव हा रंगेल दुराचारी कझाक युद्धापूर्वी सगळ्या डॉन प्रदेशात एक बेडर घोडे-स्वार म्हणून ख्यातनाम होता.

" मेर्कुलोवला घोडी चोरणं शोभलं असतं ! तो जिप्सीसारखा तरी दिसतो! तुला नुसती घोड्याची शेपूट दिसली तरी काळीज उडायला लागतं तुझं ! " अशी ग्याझनोवची कझाक टिंगल करायचे. मास्किम्काच्या चेहऱ्यावर लाली चढायची.

वाऱ्याचा तिरपा झोत डब्यात घुसला. घाईघाईने बांधलेल्या गव्हाणीत अंगावर ब्लँकिटे घेतलेले घोडे उभे होते. तक्तपोशीच्या मधोमध रचलेल्या मातीच्या ढिगाऱ्यावर दमट लाकडे धुमसत होती. झोंबणारा धूर दारांच्या फटीकडे वहात होता. ह्या शेकोटीभोवती आपल्या खोगीरात बसून कझाक आपली उडतके बाळवीत होते. बोदोवस्कोव जाळावर आपले अनवाणी पाय शेकत होता. त्याच्या कोनदार काल्मिक चेहऱ्यावर एक संतुष्ट चोरटे स्मित रेंगाळले होते. ग्याझनोव आपल्या बुटाचा सताड फाटलेल्या चौड्याकडील तळ मेणदोऱ्याने शिवत होता. धुम्रपानाने घोगऱ्या झालेल्या आपल्या आवाजात त्याने सर्वसाधारण अभिप्राय व्यक्त केला.

" मी लहान असताना हिवाळ्यात चुल्हाणावर चढायचो न् माझी आजी-तेव्हा तिची शंभरी उलटली होती – ती आपल्या बोटांनी माझ्या डोक्यातील उवा शोधीत म्हणायची, " माझ्या लाडक्या मास्किम बाळा ! पूर्वीच्या काळी माणसं आजच्या सारखी रहायची नैत ! ती चांगली टाकटुकीनं कायदा पाळून रहायची. त्यांना काय दुःखं नसायची. पण माझ्या लेकरा, तुझ्या जिंदगीत अशी वेळ येईल की सगळी धरित्री तारांनी झाकली जाईल. लोखंडी नाकाडाचे पक्षी हवेत उडायला लागतील न कावळा कलींगडावर टोचा मारतो तसे ते लोकांना टोचा मारतील. लोकात उपासमार न रोगराई पसरल. भाऊ भावाच्या – लेक बापाच्या जिवावर

उठल. आग लागल्यावर गवत उरत नाय तशी माणसही उरायची नैत." ग्याझनोव थोडा वेळ थांबून पुढे म्हणाला " ती म्हणाली तसंच सगळ घडलय. तारायंत्राचा शोध लागला त्या ह्या तारा! लोखंडी पक्षी म्हणजे विमानं, उपास-मार तर आहेच! आमच्या घरच्या लोकांनी ह्या सगळ्या वर्षात निम्याच जमिनीवर पेरणी केल्येय. जिकडं तिकडं हे असंच आहे. पिक नाय आलं की दुष्काळ पडायचाच!"

"पण भाऊ भावाच्या जीवावर उठंल... ते आपलं जरा जादाच बोलणं. होय का नाय्?" पित्रो मेलिखोवने विचारले.

"जरा थांब लोकांची तिथवरही मजल जैल!"

"नायकी करायला कुणी नसलं की ते आपसातच लढणार!" बोदोव्हस्कोव मधेच म्हणाला.

"च्यायला सालं! आपल्यालाच त्यांना दडपायला लागंल!"

"आधी जर्मनांचं बघा!" कोशेवोई हसून म्हणाला.

"त्याच कायाय? आणखी जरा लढू...!"

घाबरुन गेल्याच नाटक करीत अनिकुशकाने आपल्या निर्लोम चेहऱ्याला घड्या पाडून म्हटले,

"केसाळ तंगड्यांची झरीना साली! आणखी किती दिवस 'जरा लढू' चालायचं?"

"ए हिजड्या तुला दाढी उगवेपर्यंत बरं!" कोशेवोईने आविर्भाव करीत म्हटले.

शेकोटी भोवती बसलेली मंडळी खो खो हसू लागली. घशात धूर जाऊन खोकणारा, डोळ्यांना पाणी आलेला पित्रो अनिकुशकाकडे बोट दाखवीत होता.

"केस साला यडपटच!" अनिकुशका बावचळून पुटपुटला, "नको तिथं उगवतो.... कोशेवोय, तू कशाला तंगडं हलवतोयस्?"

ग्याझनोव मध्येच म्हणाला, "ए! बस्स झालं! आता सोसण्याच्या पली-कडे गेलं! इथं आपली दशा झाल्येय! उवा लागल्यात अंगाला! तिकडं घरच्या माणसांची अवस्था अशी बिकट झाल्येय की, त्यांना कापलंत तरी रक्त निघायचं नाय अंगातून!"

" तू कशाला डुरकतोयस ? " मिशा चावीत पित्रोने कुत्सितपणे विचारले.

" तुला ठाऊकाय काय ते ! " आपल्या कुरळ्या दाढीत स्मित लपवीत मेर्कुलोवने ग्याझनोवच्या ऐवजी उत्तर दिले.

" कझाकाला कशाची जरूराय – तळमळाय ते तुला ठाऊकाय .......! ते कसं असतं तुला ठाऊकाय. कधी कधी धनगर खिल्लार कुरणात घेऊन जातो. गवतावरचं दंव उन्हानं वाळलं नाय तोवर गुरं ठिक असतात. पण डोक्यावर सूर्य आला की गोमाशा गुं गुं करीत चावायला लागतात. तसंच इथाय ! " त्याने पित्रोकडे तोंड वळवले.

" मग मिस्टर सार्जन्ट मेजर, गुरं डुरकायला न् लाथा झाडायला लागतात हां .....हां – तुला ठाऊकाय ! तुला एवढा शिष्टपणा करायच कारण नाय ! तू स्वता बैल हाकल्येयस ... ते कसं होतं ते तुला ठाऊकाय. एकादं वासरू पाठीवर शेपूट हाणतं न् उधळतं ... की सगळं खिल्लार चाललं त्याच्या मागं ! धनगर त्यांना थोपवायला धावतो. पण ती पुरागत सुसाट निघालेली असतात. जर्मनावर आपला पूर लोटतो तसंच ! न् तेव्हा त्याना थोपवायचा प्रयत्नच कर ! "

" ह्या सगळ्याचा काय संबंध ? "

मेर्कुलोवने ताबडतोब उत्तर दिले नाही. दाढीची एक कुरळी बट बोटाभोवती गुंडाळून त्याने तिरस्काराने तिला झटका दिला आणि मग न हसता गंभीरपणे तो म्हणाला,

" गेली दोन वर्षे आपण लढतोय .... खराय का नाय ? आपली अलंगात हाकालपट्टी झाल्याला जवळ जवळ तीन वर्षं झाली. कशाला? कशासाठी ? कुणाला ठाऊक नाय ! म्हणूनच म्हणतो की आज ना उद्या एकदा ग्याझनोव नायतर एकादा मेर्कुलोव आघाडीवरून पळ काढेल, त्याच्या मागं रेजिमेंट येईल – रेजिमेंट मागं सैन्य येईल ..... खूप सोसलं आम्ही ! "

" तुला म्हणायचं ते हे ! "

" होय ! हेच ! मी आंधळा नाय, सगळं काही सुताला लटकल्याचं मला दिसतंय. फक्त कुणी तरी श्शूऽ ! करायचा अवकाश की खांद्यावरला जुना कोट पडावा तसं सगळं खाली कोसळून चक्काचूर होईल. "

" दमानं घे ! " बोदोव्स्कोवने त्याला सल्ला दिला. " पित्रो सार्जन्ट मेजराय हे लक्षात ठेव ! "

" माझ्या कोणाही साथीला मी कधी गोत्यात आणलेला नाय ! " पित्रो उसळून म्हणाला.

" बरं बरं ! रागावू नकोस. मी आपली थट्टा करीत होतो. "

बोदोवस्कोव अवघडून गेल्यासारखा झाला. आपल्या अनवाणी पायाचे घट्ट सांध्याचे चौडे त्याने चाळवले. नंतर तो उठून उभा राहीला आणि घोड्यांच्याकडे चालता झाला.

कोपऱ्यात दाबून बांधलेल्या पयाणांच्या पेन्ड्या रचलेल्या होत्या. तिथे दुसऱ्या एका खेड्यातील कझाकांचा गट हलक्या आवाजात बोलत होता. एकाएकी त्याने गाणे सुरू केले. चीर हून आलेल्या अलिमोव नावाच्या कझाकाने घुसळनाच सुरू केला.

पण कुणीतरी त्याच्या पाठीत धबका घालून खरखरीत आवाजात म्हणाले,

" थांब ए ! "

कोशेवोयने त्याना हाक मारून शेकोटीपाशी बोलावले. स्टेशनच्या कपाटीतून तोडलेल्या लाकडांचे तुकडे घालून त्यानी जाळ केला. आणि शेकोटीच्या उबेत गाणे जास्त चमकदार झाले.

आत लागले लग्न धन्याचे,गिरजा घरच्या दाराशी
घोडे बघते वाट घेऊन रणसामग्री पाठीशी
डोळ्यामधले पाणी आता खळता नायच खळायचे
'आजी-नातू' तशाच सुंदर नव्या नवतीच्या नवरीचे
साज रणाचा पेलीत अंगी कझाक पाऊल टाकितसे
बाहूल धरुनी रिकिब ठेवले भाचा भाला पकडितसे !

शेजारील डब्यातील घरघरीत अकॉर्डिअनने कझाक नृत्याचे सूर दणाणून छेडले. फौजी बूट तक्तपोश निर्दयपणे तुडवू लागले. आणि फाटक्या आवाजातून शब्द किंचाळून उठले.

घोर काळजीचे असले हे कसले हो जिणे
जोखड वाहून झारशाहीचा पाठ पुरी मोडणे
जोखड टाकी चोळवटूनी कझाक माना अशा
श्वास घ्यावया नायच् फुर्सत असली आली दशा

'पुगाचोव * ' तो साद घालती डॉन नदीच्या मुलुखाला
अरं कझाका ! अरं कझाका ! अतामानच्या मुला !

दुसरा आवाज पहिल्याच्या वरताण करून तार स्वरात किंचाळू लागला.

आम्ही करतो झार चाकरी इमान इतबारे
तळमळताती घरी बायका सोडित सुस्कारे
रांडेसाठी जीव टाकणे जमणे ना यापुढे
झारासाठी शोधून काढू ...

कझाकांनी आपले गाणे थांबवले. शेजारील डब्यात अधिकाधीक उंचावत जाणारा भन्नाट कल्लोळ ऐकत ते पसंतीचे डोळे मिचकावत स्मित करू लागले. पित्रो मेलिखोवला काही राहवले नाही, आणि तो खो खो हसत सुटला.

" सैतान साले ! "

मेर्कुलोवच्या पिंगट पिवळसर दीप्तीच्या डोळ्यात एक चमक तरळली. तो ताडकन उठून उभा राहिला. त्याने तो ठेका पकडला आणि बुटाच्या चोड्याचे झपाट्याने पदाघात सुरु केले. नंतर दाणकन् पाय आपटून त्याने नखरेल लवलवता नाच सुरु केला. उकीडवा बसून तंगड्या झाडीत तो गिरक्या घेऊ लागला. प्रत्येकाने आळीपाळीने तसे नाचून दमछाकीने अंगात उब आणली. शेजारच्या डब्यातील अकॉर्डियनचा आवाज केव्हाच विरुन गेला होता. आता तिथून घोगऱ्या आवाजात घातलेल्या जबर शिव्या ऐकू येत होत्या. पण घोड्यांना अस्वस्थ करीत कझाकांचा नाच चालूच होता.

एक अफलातून बसफुगडी घालता घालता मधेच अनिकुशका जेव्हा चुकून जाळावरच जाऊन बसला. तेव्हा ते थांबले. हसत हसत त्यांनी अनिकुशकाला बाहेर काढला. आणि मेणबत्तीच्या तुकड्याच्या उजेडात त्याच्या नवीन तुमानीची पाहणी केली.

पाटलूण ढुंगणावर पार जळून गेली होती आणि त्याच्या गाशाच्या जाकिटाची शेपटीही जळली होती.

" काढून टाक ! " मेर्कुलोवने सहानभूतीपूर्वक सल्ला दिला.

" तू काय मूर्खायस काय रे जिप्स्या ? अन नेसू काय ? "

---

* येमिल्यान पुगाचोव :–झारविरुद्ध १७७३ ते १७७५ मधे झालेल्या किसान युद्धात कझाकांचा आणि किसानांचा नेता.

मेर्कुलोवने आपली दुलंगी ढुंढाळली आणि एक लांब 'पेटीकोट' बाहेर काढला. त्यानी परत जाळ पेटवला. पेटीकोटच्या अरूंद खांदेपट्ट्या पकडून मेर्कुलोवने तो वर उचलला. हसून हसून मुरकुंडी वळत तो म्हणाला,

" हाः हाः हाः ! हे घे ! स्टेशनच्या कुंपणावर वाळत घातलेला पळवला मी ! हॅं: हॅं: हॅं: ! म्हटलं उडतकाला होईल ! पण आता हा फाडत नाय ! हीः हीः हीः ! घे घे ! "

शिव्या घालणाऱ्या अनिकुशकाला जबरदस्तीने तो पेटीकोट चढवण्यात आला. आणि मग हसण्याचा उडालेला खकाणा इतका दणकेबाज आणि जबरदस्त होता की दुसऱ्या डब्यातून डोकी बाहेर डोकावू लागली. आणि अंधारातून मत्सराचे आवाज ओरडलेले ऐकू येऊ लागले.

" काय विचाराय रे टोणग्यांनो ? "

" डर्काळायला काय झालं रे ? "

पुढच्या थांब्यावर त्यांनी आकॉर्डियनवाल्याला बोलावून घेतले आणि गव्हाणी उस्कटीत घोडी भिंतीपाशी रेटीत दुसऱ्या डब्यातील कझाकांनी तिथे दाटी केली. तो 'पेटीकोट' कोणत्यातरी प्रशस्त मापाच्या बाईचा होता. कारण अनिकुशकाला तो भलताच ढगळ होत होता. तो घालून तो नाचला आणि चिमुकल्या वर्तुळात त्याने एवढ्या गिरक्या घेतल्या की अखेरीस तो दमछाक होऊन कोसळला.

पण वरती रक्तस्नात बेलोरशियात चांदण्या शोकाश्रू ढाळीत होत्या. धुरपता अंधार झपाट्याने रात्रीच्या गर्तेत शिरत होता. अगदी खालून धरणीच्या अंगावरून वाहणारा वारा पतझडीच्या, दमट, चिकचिकीत, चिखमलमातीच्या मार्च महिन्यातील हिमाच्या उग्र गंधाने उतरलेला होता.

———




# ९

चोवीस तासात हे रेजिमेन्ट परत आघाडीच्या निकट आले. वाहतुकीची गाडी एका रेल्वे जंक्शनात थोपविण्यात आली. सार्जंन्ट मेजर गाडी खाली करण्याचा हुकूम घेऊन आले. तक्त्यावरून घोडी खाली उतरवून त्यांना रांगेत उभे करण्यात आले. विसरलेली चीज वस्तू आणण्यासाठी मागेपुढे धावपळ चालू होती पयाणाच्या उस्कटवास्कटलेल्या पेंढ्या सरळ वाळूत फेकण्यात आल्या.

पित्रो मेलिखोव चालला असता रेजिमेन्टल कमांडरच्या अडलीने त्याला हाक घातली.

" कमांडरने तुला स्टेशनाकडे बोलावलंय ! "

आपल्या पाणकोटाचा बंद सारखा करीत पित्रो धीमेपणाने फलाटाकडे गेला. जाता जाता त्याने सांगितले, " अनिकुशका, माझ्या घोड्यावर लक्ष ठेव ! "

अनिकुशका निमूटपणे त्याची पाठमोरी आकृती न्याहाळीत होता. त्याच्या खिन्न चेहऱ्यावर नेहमी दिसणाऱ्या कंटाळवाणेपणात चिंता मिसळली होती. आपल्याला रेजिमेन्टल कमांडरने का बोलाविले असावे ह्याचा विचार करीत आपल्या चिखलाळलेल्या बुटाकडे टक लावून पहात जाणाऱ्या पेत्रोचे लक्ष गरम पाण्याच्या मांगराशी फलाटाच्या टोकाला जमलेल्या लहानशा गटाने वेधून घेतले. तो तिकडे गेला आणि तिथले संभाषण ऐकू लागला. मांगराकडे पाठ करून चमत्कारीक, भेदरलेल्या अवस्थेत उभ्या असलेल्या एका उंच लाल तोंडाच्या कझाकाला गराडा घालून वीस पंचवीस सैनिक उभे होते. दाढी वाढलेला त्याचा चेहरा, त्याच्या सार्जन्टी खांदेपट्ट्यावरील ५२ हा क्रमांक इकडे पित्रोने रोखून

पाहिले. आणि ह्या माणसाला आपण पूर्वी कुठेतरी पाहिलेले आहे असे त्याला खात्रीपूर्वक वाटू लागले.

" तू कसं काय जमवणार ?" शेऱ्याचे डाग उठलेल्या हुशार चेहऱ्याच्या एक स्वयंसेवक पायदळवाल्याने त्याला खवचटपणे प्रश्न विचारला.

" कायाय ? आपल्या समोर उभ्या असलेल्या माणसाच्या खांद्याला स्पर्श करून पित्रोने चौकसपणे विचारले.

आपली मान वळवून त्या सैनिकाने अनिच्छेने उत्तर दिलें,

" फरार पकडलाय . तुमच्याच कझाकातलाय ! "

रुंद कुसुंबी भुवया, कुसुंबी मिशांच्या ह्या कझाकाचा चेहरा आपण पूर्वी कुठे पाहिला होता, ते आठवणीला ताण देऊन आठवायचा पित्रोने प्रयत्न केला.

त्या स्वयंसेवकाने विचारलेल्या वाटचात प्रश्नाना त्या कैद्याने काहीही उत्तर दिले नाही. कुलपी गोळ्याच्या कवच्यापासून बनविलेल्या तांब्याच्या टमरेलातील गरम पाण्याचा त्याने घुटका घेतला आणि पाण्यात भिजलेले एक वाळकें बिस्कीट चघळले. चावताना आणि पिताना त्याचे बटबटीत, एकमेकात भरपूर अंतर असलेले डोळे आकुंचित होत. आणि आजूबाजूला जमलेल्याकडे नजर टाकताना त्याच्या भुवया थरथरत. एक वयस्कर ठोसर बांध्याचा सैनिक त्याच्या बाजूला बागनट लावलेली बंदुक घेऊन पहाऱ्याला उभा होता. त्या कझाकाने आपले पिणे संपवले आणि आपल्याला चहाटळपणे न्हाहाळणाऱ्या सैनिकावरून आपले श्रांत डोळे फिरविले. त्याचे निळे बालिश भाबडे नेत्र एकाएकी दाठरले. घटाघटा आवंढे गिळीत त्याने ओठावरून जीभ फिरवली. आणि खरखरीत खोल कडक आवाजात तो कडाडला,

" मी काय जनावराय ? माणसाला खाऊ द्याल का नाय रे डुकरानो ? तिच्या मायला साली ! कधी माणूस पाहलाय का नाय ? "

ते सैनिक एकदम खो खो हसू लागले. पण पित्रोने ते पाहिले. शब्द ऐकले न ऐकले एवढ्यात नेहमी अशा बाबतीत होते तसे त्या माणसाचे नाव त्याला एकाएकी आठवले. युद्धापूर्वी येलान्स्काया वार्षिक जत्रेत तीन वर्षांचा बैल त्याच्याकडून त्याने आणि त्याच्या बापाने विकत घेतला होता. ते त्याला आठवले.

" फोमिन! याकोव! " गर्दीतून धक्काबुक्की करीत पुढे येत तो ओरडला.

वेंधळेपणाने आणि घाबरून जाऊन त्या माणसाने ते टमरेल खाली ठेवले. संकोचल्या नजरेने पित्रोकडे पाहून स्मित केले. आणि तोंडातील घास चघळीत उत्तर दिले, " तुला मी ओळखतोयसं वाटत नाय भाऊ ! "

" तू रुबिएझिनचा ! होय का नाय ? "

" होय न् तू येलानस्कायाचा ! होय का नाय ? "

" नाय ! मी व्येशेनस्कायाचा ! पण मी तुला चांगला ओळखतो. पाच वर्षापूर्वी बाजाराला तू माझ्या बापाला बैल विकलास ! "

तसेच बालिश हसत फोमिनने आठवण्याचा प्रयत्न केला.

" नाय् ! मी ते विसरलो ! तू मला आठवत नायस." तो म्हणाला. त्याच्या म्हणण्यात उघड खंत होती.

" तू ५२ वीत होतास ? "

" होय. "

" तू पळून गेलास ? कसं रे असं केलंस भाऊ ? "

फोमिनने आपली लोकरी टोपी काढून हातात घेतली आणि आतून एक जुनाट चंची बाहेर काढली. तो खाली वाकला आणि संथपणे आपली टोपी खाकेखाली दाबली. एका कागदाचा कोपरा फाडला आणि एवढे करुन झाल्यावर मगच आपली उग्र, आर्द्रतेने चमकती नजर पित्रोवर रोखली.

" सोसेनासं झालं भाऊ ! " तो रुक्षपणे म्हणाला. त्या माणसाची नजर टोचल्याने पित्रो खोकला आणि आपल्या पिवळ्या मिशा त्याने दातात पकडल्या.

" बरं बरं ! गाववाले बोलणं आटपा ! नायतर तुमच्यापायी मी गोत्यात यायचो " बंदुक उचलीत सुस्कारा सोडीत पाहरेकरी म्हणाला. " चला हो बाबा!"

फोमिनने लगबगीने टमरेल थैलीत कोंबले. पित्रोची नजर टाळून त्याला 'अच्छा' म्हटले. आणि कष्टाच्या अस्वलचालीने आपल्या पाहरेकऱ्याबरोबर तो स्टेशन कमांडरच्या कचेरीकडे चालू लागला.

एके काळी पहिल्या वर्गाचे उपहारगृह होते, तिथे दोन स्क्वाड्रन कमांडर्स बरोबर मेजावर वाकलेला रेजिमेन्टल कमांडर पित्रोला दिसला.

" रे मेलिखोव, तुझी वाट बघायला लावलीस तू ! " श्रांत चिडखोर डोळ्यांचा कर्नल कपाळाला आठ्या घालून म्हणाला.

पित्रोने माहिती ऐकून घेतली की, त्याचे स्क्वाड्रन 'डिव्हिजनल स्टाफ' च्या हाताखाली देण्यात येत असून कझाकांवर कडक नजर ठेवणे आणि त्यांच्या वृत्तीत

काही दखल घेण्याजोगा बदल दिसल्यास स्क्वाड्रन कमांडरला कळविणे जरूर आहे. कर्नलच्या तोंडाकडे पित्रो अपलख नजरेने बघत त्याचे बोलणे लक्षपूर्वक ऐकत उभा होता. पण फोमिनचे आर्द्र चमकते डोळे आणि " सोसेनासं झालं भाऊ ! " हे संथ उद्‌गार त्याच्या आठवणीत अढळपणे राहून गेले.

त्या उबदार वाफाळत्या उपहारगृहातून तो बाहेर पडला आणि स्क्वाड्रनकडे चालता झाला. आपल्या डब्याजवळ येताना कझाकांचा एक घोळका स्क्वाड्रन लोहाराभोवती गोळा झालेला त्याला आढळला. फोमिन आणि त्याचे संभाषण ह्याचा चटकन विसर पडून त्याने आपली चाल वाढवली. आपल्या घोड्याची फेर नालबंदी करण्याबद्दल लोहाराशी बोलण्याचे त्याच्या मनात होते. दैनंदीन जीवनाच्या क्षुद्र काळज्या आणि चिंता ह्यानी सगळ्यावर मात केली. पण ती क्षणभरच.

पांढरी उबदार शाल पांघरलेली आणि बेलोरशियनी बायकापेक्षा वेगळा पेहराव केलेली एक बाई डब्यामागून आली. तिच्या आकृतीच्या विलक्षण परिचीत घाटाने पित्रोचे लक्ष खिळवून टाकले. त्या बाईने एकदम त्याच्याकडे तोंड वळविले आणि ती लगबगीने त्याच्या दिशेने आली. तिचे खांदे आणि शेलाटा ज्वानीचा बांधा ह्यात किंचित हेलकावती हालचाल होती. तिचा तोंडवळा ओळखू येण्या-- इतपत ती अद्याप जवळ नसली तरी तिच्या नखरेल, नितंब लचकवीत चालणाऱ्या चालीवरून ही आपली बायको असल्याचे पित्रोने ओळखले. एक सुखद, शिरशिरता गारवा त्याच्या काळजात घुसला. त्याचा आनंद जास्तच मोठा होता कारण तो अनपेक्षित होता. आपण विशेष खूष झाल्याचे इतराना वाटू नये म्हणून आपली चाल मुद्दाम मंदावीत तो तिच्याकडे गेला.

दाऱ्याला त्याने आलिंगन दिले. रिवाजाप्रमाणे तिचे तीनदा मुके घेतले आणि तो तिला काही विचारण्याच्या बेतात होता. पण त्याची गाढ आंतरिक क्षुब्धता वर उचंबळून आली. त्यांचे ओठ थरथरू लागले आणि त्याची वाणी लुप्त झाली.

" तू भेटशीलस वाटलं नव्हतं ! " अखेरीस तो गुदमरत म्हणाला.

" लाडक्या ! किती रे बदललायस !" दार्या टाळी वाजवून म्हणाली, " अगदी ओळखू येईनासा झालायस ! पाहिलंस, तुला भेटायला आल्येय मी. घरनं मला जाऊ देत नव्हते. पण मनात आलं की, माझ्या सजणाला भेटायला मला गेलंच पाहिजे. " नवऱ्याला लगटत आर्द्र नेत्रांनी त्याला न्याहाळीत ती बडबडत होती.

डब्याभोवतालचा कक्षाकांचा घोळका त्यांच्याकडे रोखून बघत, खाकरत डोळे घालीत होता.

" पित्रो सुखी आहे ! "

" माझी थेरडी लांडगीण काय मला भेटायला यायची नाय ! "

" तू नसलास तरी तिला तुझ्याजागी तिथं खंडीभर आहेत की ! "

" आपल्याबर दया करून त्यानं स्वतःच्या जुमल्याला एक रात्र बायकू द्यावी ! "

" चला रे साल्यानु ! त्यांना बघूनच दुखतय माझं ! "

आपल्या बायकोला निष्ठूरपणे शिक्षा करायचा आपण निश्चय केला होता, हे त्या क्षणी विसरून पित्रो सर्वांच्या देखत तिला कुरवाळत होता. तंबाखूने डाग-ळलेल्या बोटांनी तिच्या भ्रुकुटीच्या धनुष्यावरून हात फिरवीत होता. आणि खूष होत होता. खारखोवहून आपल्या रेजिमेन्टकडे परत निघालेल्या बारगीरांच्या पशु-वैद्यांबरोबर आदल्याच रात्री आपण डब्यात झोपलो होतो ह्याचा दाऱ्यालाही विसर पडला होता. त्या पशुवैद्याला भलत्याच झुबकेदार काळ्या मिश्या होत्या. पण ते दोन रात्री पूर्वी ! आता मनःपूर्वक आनंदाचे अश्रू लोटून ती आपल्या नवऱ्याला मिठी घालून खऱ्याखुऱ्या नितळ नेत्रांनी त्याला न्याहाळीत होती.

— — — —

## १०

रजेवर परत आल्यावर कॅप्टन येवगेनी लिस्तनिस्तकीला १४ व्या डॉन कझाक रेजिमेन्टमधे दाखल होण्याचा हुकूम मिळाला. फेब्रुवारी क्रांतीच्या आधीच जे रेजिमेंट सोडून नामुष्कीने पळून जाणे त्याला भाग पडले होते, त्या आपल्या रजिमेन्टकडे वर्दी देण्यासाठी न जाता तो सरळ "डिव्हिजनल स्टाफ" कडे गेला होता.

सेनाधिपती एक सुप्रसिद्ध डॉन कझाक खानदानी घराण्यातील तरुण जनरल होता. १४ व्या डॉन कझाक रेजिमेन्टकडे येवगेनीची बदली करण्याची व्यवस्था त्याने खुशीने केली.

आपल्या खाजगी खोलीकडे लिस्तनिस्तकीला घेऊन जाताना तो म्हणाला, "कॅप्टन, तुमच्या जुन्या वातावरणात तुम्हाला काम करणं कठीण जाईल हे मला माहिताय ! कझाकांच्या मनात तुमच्याबद्दल वैरभाव आहे. तुमच्या नावाचा त्यांना तिटकारा बसलाय. तेव्हा सहाजिकच तुम्ही १४ व्या रेजिमेन्टमधे दाखल होणं जास्त सूज्ञतेचे ठरेल. तिथले अंमलदार म्हणजे विलक्षण उमदे गडी आहेत. आणि तिथली कझाकं जास्त खात्रीची आणि जास्त ठोंबी आहेत. त्यातली बहुतेक दक्षिणे-कडील उस्त मिदवेदीत्सकोवो प्रदेशातल्या खेड्यातील आहेत. तिथं तुमच जास्त चांगलं चालेल. मला वाटतं तुम्ही जनरल लिस्तनिस्तकीचे चिरंजीव ! होय ना? " असे विचारून अंमलदार अंमळ थांबला आणि त्याच्या समजूतीला पुष्टी देणारे उत्तर मिळाल्यावर त्याने बोलणे पुढे चालू केले, "आपल्याकडून मी तुम्हाला शब्द देतो की तुमच्या, तुमच्यासारख्या अंमलदाराचं आम्हाला मोलाय ! आजकाल अंमलदारात सुद्धा जास्ती करून दुटप्पी लोकायत ! धर्मान्तर करणं एवढचं नाय् तर एकाच वेळी दोन देव पुजणं ह्याच्या इतकं सोपं कायच नाय." सेनाधिपतीने कटू निष्कर्ष काढला.

बदलीचा लिस्तनिस्तकीला आनंद झाला. ह्याच दिवशी त्याने द्विन्सपर्यंन्त प्रवास केला. इथे चवदाव्या रेजिमेन्टचा तळ पडलेला होता. त्याने रेजिमेन्ट कमांडरकडे जाऊन हजेरीची वर्दी दिली. बहुसंख्य अंमलदार राजसत्तावादी होते. आणि बव्हंशी जुन्या धर्ममताचे असलेले कझाक तीळमात्र क्रांतीकारक मनोवृत्तीचे नव्हते. हे पाहून त्याला संतोष वाटला. आजूबाजूला खदखदणाऱ्या घटनांचा अर्थ न उमजता किंवा समजून घेण्याची इच्छा नसता त्यांनी अत्यंत नाखुषीने हंगामी सरकारबद्दल एक निष्ठेची शपथ घेतली होती. खुषामतखोर आणि निरूपद्रवी कझाकांना रेजिमेन्ट आणि स्क्वाड्रनच्या समित्यावर निवडून देण्यात आले होते. ह्या नव्या परिसरात लिस्तनिस्तकी सुखाने श्वासोश्वास करू लागला.

पूर्वीच्या त्याच्या हुजुराती आतामान रेजिमेन्टचे होते ते सैनिक त्याला भेटले. त्यांनी स्वतःला निर्लेप ठेवले होते. बाकीचे असाधारण एकजुटीचे आणि एकदिलाचे असून राजसत्ता पुन्हा स्थापन करण्याचे उघड उघड बोलत होते.

सुमारे दोन माहने ह्या रेजिमेन्टचा तळ द्विन्स इथे ठेवण्यात आला. त्यामुळे उत्तम कवायत आणि फराकत मिळालेले ते एकजुटीचे पथक झाले.

पूर्वी स्क्वाड्रनस – पायदळ डिव्हिजनला जोडलेली होती. तेव्हा रिगापासून द्विन्सपर्यंन्त आघाडीवर ती भटकत होती. पण एप्रिल महिन्यात कुणा एका निगूत हाताने ह्या स्क्वाड्रन्सना एकत्रित आणले होते. आणि ह्या रेजिमेन्टची आता वाट्टेल त्याला तोंड देण्याची तयारी होती. अंमलदारांच्या कडक देखरेखीखाली कझाक कवायती करण्यात कालक्रमणा करीत होते. आपल्या घोड्यांना दाणावैरण देत होते. बाहेरच्या कोणत्याही अंमलापासून निर्लेप असे नेमस्त सुस्त आयुष्य जगत होते. त्यांच्या रेजिमेन्टच्या खऱ्या हेतूबद्दल फक्त थोड्या, संदिग्ध अफवा त्याच्यात प्रसृत होत्या. पण अंमलदार आपले इरादे उघड बोलून दाखवीत. खात्रीच्या मार्गदर्शनाखाली इतिहासाचा ओघ नजीकच्याच काळात फिरविण्याचा त्यांचा इरादा ते बोलून दाखवीत.

हाताच्या अंतरावर आघाडी भेडसावत होती. जरा पुढे पश्चिमेला सैन्ये प्राणांतिक ज्वराने धपापत होती. रसद आणि अन्नधान्याची चणचण होती. 'शांतता' ह्या अफलातून शब्दाकडे सैन्याचे असंख्य हात ओढ घेत होते. प्रजासत्ताकाचा हंगामी प्रमुख केरेन्स्कीच्या बाबत सैन्याने संमिश्र प्रवृत्ती धारण केली होती. त्याच्या आतताई आवाहनाने भरीला पडून ' जून ' च्या चढाईत त्यांनी प्रचंड हानी भोगली होती. वसंतऋतूतील जळाप्रमाणे सैन्यातून पाडाला आलेला क्रोध वाहत त्यावर बुडबुडे उठत होते . . . .

परंतु द्विन्स्क मधे कझाक शांतपणे निवांतपणे जगत होते. घोड्यांची पोटे ओट आणि वैरण पचवत होती. आघाडीवर भोगलेल्या दुर्दशांचे कझाकांच्या आठवणीत गचपण माजले होते.

अंमलदार आपल्या सभांना नियमीत हजर रहात होते. त्यांचे बरे चालले होते. रशियाच्या भवितव्यावर ते कडाक्याची चर्चा करत होते.

जुलैच्या सुरवातीपर्यन्त हे असे चालले होते. तीन तारखेला हुकूम आला की एक क्षणही न दवडता कूच करावे रेजिमेन्ट पेत्रोग्रादच्या दिशेने निघाले. सातव्या तारखेला कझाकांच्या घोड्यांच्या टापा राजधानीच्या फरसबंदी रस्त्यावर खडखडू लागल्या.

नेवस्की पथावरील घरे रेजिमेन्टला मुक्कामाला देण्यात आली लिस्त्-निस्त्कीच्या स्क्वाड्रनला एका रिकाम्या व्यापारी वठारातून जागा मिळाली. कझाकांची प्रतिक्षा किती अधिरतेनें आणि आनंदाने केली जात होती, त्याची बोलकी साक्ष शहराच्या अधिकाऱ्यांनी कझाकांना दिलेल्या घरांची जी उस्तवारी केली होती त्यावरून पटत होती. ताज्या सफेदीने भिंती झळकत होत्या. तक्तपोशी चकाकत होत्या. नुकत्याच उभारलेल्या लाकडी कोठ्यांना ताज्या देवदाराचा गंध येत होता. उजेडाच्या टापटीपीच्या त्या अर्धतळघरात अगदी आरामशीर होते.

आपल्या चापाच्या चष्म्याआडून आठ्या घालून लिस्त्निस्त्कीने घरांची काळजीपूर्वक पाहणी केली आणि असा निर्णय घेऊन टाकला की ही ह्याहून चांगली असणे शक्य नाही. आपल्या तपासणीने संतुष्ट होऊन तो आंगणाकडे जाणाऱ्या दाराकडे वळला. कझाकांचे स्वागत करण्याचे काम ज्यांच्यावर सोपवले होते ते नगरपालिकेचे दोन ठेंगणे, झोकदार कपड्यातील प्रतिनिधी त्यांच्या बरोबर होते.

पण इथे एक अप्रिय प्रसंग घडला. दाराची मूठ त्याने पकडली तेव्हा एका तीक्ष्ण हत्याराने भिंतीवर फराटलेले चित्र त्याच्या दृष्टीस पडले. हे चित्र एका कुत्र्याच्या डोक्याचे आणि झाडूचे होते.[†] घराची दुरुस्ती करणाऱ्या एखाद्या कामगाराने ते कुणासाठी आहे ते जाणल्याचे उघड होते.

---

'ओपरिचनिकी' ह्या इवान द टेरिबलच्या कुविख्यात पाशवी सशस्त्र दलाच्या खोगीरांवर कुत्र्याचे डोके आणि 'झाडू' चे चित्र लावलेले असे, झारच्या शत्रूच्या अंगात आपण आपले सुळे खुपसून त्यांना झाडून टाकू हे त्याच्या निश्चयाचे प्रतीक होते.

" हे काय आहे ?" लिस्त्‌निस्त्‌कीने भुवया उडवीत विचारले. नगरपालिकेच्या प्रतिनिधीने आपल्या तीक्ष्ण मूषक दृष्टीने त्या चित्राकडे पाहिले आणि तो भयंकर धपापू लागला. इतक्या तडाख्याने त्याच्या डोक्यात राग चढला की त्याची कडक गळपट्टीही गुलाबी दिसू लागली.

" माफ करा कॅप्टनसाहेब, कुणा दुष्ट हाताने . . . "

" आशा आहे की ह्या राजचिन्हाचे चित्र तुम्हाला न सांगता काढलेले आहे."

" म्हणजे ? आपल्याला काय वाटले ? नाहीतर हे कसं काढलं गेलं असतं ? कुणातरी बदमाशाने केलेला हा बोलशेव्हिक कावा आहे. ताबडतोब भिंतीला सफेदी देण्याचा हुकूम देतो. साला सैतान ! हा मूर्ख प्रकार झाल्याबद्दल मला भयंकर वाईट वाटतं ! खरंच सांगतो माणसं इतकी नीच असतात ह्याची मला शरम वाटते.

ह्या हताश गोंधळून गेलेल्या नागरीकाबद्दल लिस्तनिस्तकीला खरोखरीच वाईट वाटू लागले. आपली निष्ठूर थंड नजर सौम्य करीत तो शांतपणे म्हणाला,

" चित्रकाराचा नेम नीटसा साधलेला नाही. कझाकांना रशियन इतिहासाची नीटशी माहिती नाही. मात्र ह्याचा अर्थ असा नाही की आमच्या बाबतीत आम्ही असल्या प्रवृत्तीला उत्तेजन देऊ शकू ! "

ते चुन्याचे चित्र आपल्या चकचकीत केलेल्या दणकट नखांनी खरवडून काढण्याचा प्रयत्न त्या प्रतिनिधीने केला. चौडयावर भिंतीपुढे उभे राहून हे करीत असताना आपल्या उंची इंग्लिश लांब कोटावर पांढरी भुकटी त्याने माखून घेतली. आपल्या चापाच्या चष्म्याच्या काचा पुशीत लिस्तनिस्तकी स्मित करीत होता. पण ह्या क्षणी अंतर्यामी एक कटू भावना त्याला कुरतडत होती.

" आमचं हे असं स्वागत करताय तर ! पदकाची ही दुसरी बाजू आहे ! पण सगळ्याच रशियाच्या नजरेत आम्ही 'ओपरिच्‌निकी ' आहोत काय ?" शहर प्रतिनिधीची बडबड अनवधनाने ऐकत अंगण ओलांडून तबेल्याकडे जाताना त्याच्या मनात हा विचार आला.

अंगणातील खोल रुंद विहिरीवर सूर्याचे तिरपे किरण पडले होते. आपल्या खिडक्यातून, उंच इमारतीतून राहणारे लोक खिडक्यातून बाहेर वाकून अंगणभर पसरलेले कझाकांचे घोळके न्याहाळीत होते. कझाकांनी घोडे तबेल्याकडे नेऊन सोडले आणि उसंत लाभलेले ते कझाक घोळक्याने उभे राहिले. आणि भिंतीच्या सावलीला उकीडवे बसले.

" आपल्या कोठ्यांकडे का जात नाही रे पोरांनो ?" लिस्तनिस्तकीने विचारले.

" जायचाय कॅप्टन साब !"

" ह्या जागेचा लौकरच वीट येणार !"

" घोडी ठाणबंद केली की जायचंच."

तबेल्यासाठी दिलेल्या कोठारांची पाहणी करून झाल्यावर लिस्त्निस्त्की त्याच्या बरोबर येणाऱ्या शहर प्रतिनिधीकडे वळला आणि त्याच्याबद्दलचा वैरभाव परत आणीत तो म्हणाला,

" ही बाब ज्या कुणाच्या अखत्यारीत असेल त्याच्याशी करार करून ह्याचा काहीतरी बंदोबस्त करा. ह्या तबेल्याला आम्हाला आणखी एक दार-वाट असायलाच हवी–१२० घोड्यांना तीन दारं पुरेशी नाहीत. धोक्याचा इशारा झाला तर घोडी बाहेर काढायला आम्हाला अर्धा तास लागेल. अजबच आहे! ह्या गोष्टीचा वेळीच विचार केला नाहीत तर मला रेजिमेन्टल कमांडरकडे ह्याचा रिपोर्ट द्यायला हवा."

एक नाहीतर दोन दारे आजच ताबडतोब बसवली जातील, असे आश्वासन मिळाल्यावर लिस्त्निस्तकीने त्या प्रतिनिधीचे तसदीबद्दल कोरडे आभार मानून त्याला निरोप देऊन टाकला. अडली नेमले आणि वरच्या मजल्यावर कंपनीच्या अंमलदारांना तात्पुरत्या देण्यात आलेल्या खोल्यांकडे तो चालता झाला.

आपल्या फर्गोलाची बटणे सोडवीत आणि टोपीच्या ढापणाखालचा घाम पुसत मागच्या जिन्याने तो स्वतःच्या खोलीत आला. खोलीतील गार दमटपणाची त्याला कृतज्ञतापूर्वक जाणीव झाली. ज्युनिअर कॅप्टन आतार्श्चिकोव खेरीज अंमलदारांच्या कोठीत कुणीही नव्हते.

" बाकीचे रे कुठे गेले ?" शिबिरी खाटेवर आडवा होत आणि धूळभरले बूट भारावून दोन्ही बाजूला टाकत लिस्त्निस्त्कीने विचारले.

" रस्त्यावर. पेत्रोग्राद बघायला !"

" अन् तू ?"

" नाय् वाटलं जावसं. आत्ता कुठे टेकलो नाय् तर चालले शहर बघायला! काही दिवसापूर्वी काय घडलं ते आपला वाचून काढतोय ! मजेदाराय !"

सदऱ्यावरील दमट घामाला पाठीवर सुखद गारवा येणारी जाणीव अनुभवीत लिस्तनिस्तकी न बोलता पडून राहिला. प्रवासाने आंबून गेल्याने उठून अंगावर पाण्याचा शिडकावा करायला त्याचे मन घेत नव्हते. पण अखेरीस आपल्या सुस्तीवर मात करून तो उठला. आणि त्याने आपल्या गडयाला हाक मारली त्याने आपल वस्त्रे बदलली आणि खळखळून अंग धुतले. समाधानाने हुकारीत आणि आपली मांसल रापलेली मान लवाळ टुवालने घासली.

"अंग धुवून घे वान्या ! त्यानं पर्वत खांद्यावर घेता येतात....!" आतारशिकोवला त्याने सल्ला दिला.

"बरं पेपरात काय आलंय ?"

"होय खरंच अंग धुवायला हवं ! ते काय वाईट नाय म्हणतोस? पेपरात काय आलय ? बोलशेव्हिक निदर्शनं, सरकारी उपाय योजना ... वाच !"

अंग धुतल्याने लिस्तनिस्तकीला हुशारी वाटत होती तो वर्तमानपत्र उचलणार एवढयात त्याला रेजिमेंटल कमांडरला भेटण्याचे आमंत्रण आले. खाटेवरून नाराजीने उठत त्याने साबणाचा वास येणारा, वाटेत चुरगाळलेला नवीन फर्गोल अंगावर चढवला. तलवार बांधली आणि तो नेव्स्की पथावर आला.

रस्ता ओलांडल्यावर त्याने मागे वळून जिथे ह्या स्क्वाड्रनला मुक्कामाला जागा देण्यात आली होती त्या इमारतीकडे नजर टाकली वरकरणी ती इतर इमारतीहून वेगळी दिसत नव्हती इतर घरांच्या रांगेत उभी असलेली ती पाच मजली इमारत असून तिच्या दर्शनी भागात ओबड धोबड धुराने काळवंडलेला दगड होता चट्टा पेटवून तो फरसबंदीवरून हळूहळू चालू लागला. पुरुषांच्या गवती टोप्या, गोल हॅटस, इतर टोप्या आणि बायकांच्या सुरेख साध्या हॅटस ह्यांची थाप गर्दी फेसाळली होती.

मधूनच एखाद्या सैनिकाची 'डेमोक्रॅटिक' हिरवी टोपी दिसायची. आणि रंगांच्या आडरात अदृश्य होऊन दिसेनाशी व्हायची. समुद्राकडून ताजा उत्तेजक वारा येत होता. पण इमारतीच्या टोकळयावर आदळून त्याचे क्षीण झपाटे उधळले जात होते. पोलादी नीललोहित छटा आलेल्या आकाशातून ढग दक्षिणेला तरंगत चालले होते. त्यांच्या दुग्धधवल राशी तीक्ष्ण आणि सुस्पष्टपणे करवतलेल्या होत्या. पावसाचे आगमन सूचीत करणारा वाफाळ उकाडा शहरावर पसरला होता. गरम डांबर, पेट्रोलचे धूर, जवळचा समुद्र, सुगंधमाचा अस्पष्ट घमघमाट, आणि प्रत्येक मोठ्या शहराचे वैशिष्ट्यच असणारे इतर अमूप भपकारे ह्यांच्या वासाने हवा गंधीत झालेली होती.

रस्त्यावर धूर काढीत हळूहळू चालत असताना लिस्तनिस्तकीला येणारा जाणाऱ्यांचे आदराचे तिरपे कटाक्ष लक्षात येत होते. आपला चुरगाळलेला गणवेश आणि मळलेली टोपी ह्याबद्दल त्याला प्रथम काहीसा संकोच वाटला. पण नंतर त्याने ठरविले की, आघाडीवरून आलेल्या माणसाला आपल्या ' दिसण्याची ' लाज वाटायचे कारण नाही. विशेष म्हणजे तो आजच गाडीतून उतरला होता.

दुकानांना लावलेल्या उन्हाच्या पडद्यांनी फरसबंदीवर सुस्त ओलीव पिवळे तुकडे पडले होते. वाऱ्यावर पडदे फुगारत आणि होलाळत होते. आणि येणारा जाणाऱ्यांच्या पावलाशी शिवाशीवी करीत ते तुकडे आंदुळत होते.

दुपारची वेळ असूनही नेवस्की पथ लोकांनी गजबजलेला होता. युद्धकाळात शहराचा सराव सुटलेला लिस्तनिस्तकी खिदळण्याचे आवाज, मोटारींचे हॉर्नस्, वर्तमानपत्रे विकणाराच्या आरोळ्या ह्या एकमेकात मिसळलेल्या अमूप आवाजांचा कल्लोळ सहर्ष संतुष्टतेने प्राशन करीत होता. ह्या वेशभूशित सुखभुक्त संमर्दन्ति घरच्या सारखे वाटले तरी त्याच्या मनात हा विचार आल्याखेरीज राहिला नाही. " आता तुम्ही किती संतुष्ट, किती आनंदी, किती सुखी आहात ! तुम्ही सगळे– व्यापारी, रोख्याचे दलाल, अधिकारी, जमीनदार, खानदानी कुळातील लोक ! पण तीन चार दिवसापूर्वी तुमचं काय झालं होतं ? ह्याच रस्त्यावरून कंगालाचा आणि सैनिकांचा गाळीव लोट वहात होता. तेव्हा तुमची काय अवस्था झाली होती ? खरंच मला तुमच्याबद्दल आनंद वाटतोही आणि वाटतही नाही. तुमच्या सुखवस्तूपणाचा आनंद कसा घ्यावा हे मला उमगत नाही. . . . . "

आपल्या संमिश्र भावनांचे विश्लेषण करायचा, त्याचा उगम शोधण्याचा त्याने प्रयत्न केला. आणि हे ठरवायला त्याला सायास पडले नाहीत की, त्याचे विचार आणि भावना ह्यांचे कारण हे होते की, युद्ध आणि त्याला जे काही भोगावे लागले त्यामुळे ह्या सुखभुक्त संतुष्ट स्त्री पुरुषाच्या गर्दीपासून तो वेगळा होऊन गेला होता

" उदाहणार्थ ह्याचं काय ? " एक गुबगुबीत गुलाबी गालाच्या बिन–मिशीच्या तरुण माणसाच्या नजरेला नजर भिडताच त्याच्या मनात विचार आला. " हा आघाडीवर का नाही ? " मला वाटतं हा एखाद्या कारखानदाराचा किंवा एखाद्या गबर व्यापाऱ्याचा मुलगा असावा. आणि लष्करी चाकरीतून निसटला असावा. बदमाश ! मातृभूमीचं ह्याला ना सोयर ना सुतक ! म्हणे " आघाडी–साठी काम करतोय ! चरबी साठवतोय, आपल्या बायांना खुशालीत ठेवतोय."

पण अखेरीस तू आहेस कुणाच्या बाजूने !" स्वत:ला प्रश्न विचारून त्याने स्मित करीत ठरविले, अर्थातच मी ह्यांच्या बाजूनं आहे. त्यांच्यात माझा अंश आहे. आणि मी स्वतः त्यांच्याच समष्टीचा अंश आहे. माझ्या वर्गात जे काही भलंबुरं आहे त्याचं लहान मोठ्या अंशी माझ्यातही अस्तित्व आहे. कदाचित त्या माजलेल्या डुकरापेक्षा माझी कातडी जरा पातळ असेल. कदाचित गोष्टी मला जास्त तीव्रतेने जाणवत असतील अन् म्हणूनच मी सचोटीचा आहे अन् 'आघाडी–साठी' काम करीत नाही तर मी 'आघाडीवरच' आहे. पदभ्रष्ट बादशहा गाडीत बसून आपल्या निवासस्थानातून बाहेर पडत असताना त्याचे रडवेले ओठ आणि थरथरते अविर्वचनीय असहाय्य हात गुडघ्यावर ठेवलेले पाहून म्हणूनच तर मी ह्या हिवाळ्यात मोगिलेव इथं बर्फात अंग लोटून देऊन लहान पोरासारखा रडलो. क्रांतीचा स्वीकार न करण्यात मी प्रामाणिक आहे. तिचा स्वीकार मी करू शकत नाही. माझं मन आणि माझी बुद्धी तिच्या विरूद्ध बंड पुकारतात. जे जुनं आहे. त्यासाठी मी प्राणांची कुरवंडी करीन. कोणताही आव न आणता एखाद्या सैनिका–सारखे सहज प्राण देईन .... ह्या मार्गानं फारजण येणारे आहेत का ?

फेब्रुवारी महिन्यातील एक कलती दुपार विलक्षण क्षुब्ध रेखीवतेने आठवून त्याचा चेहरा विवर्ण होऊन गेला. मोगिलेवमधील राज्यपालाचे भवन, ओलसर लोखंडी कटंजन हिमाच्छादित भूमी, उन्हाची गुलाबी दीप्ती, धुकट अवगुंठणा-आडून उतरत जाणारा सूर्य .... झेपरच्या परतीरावरील आकाश–निळे शेंदरी गंजपिवळे ..... क्षितीजावरील प्रत्येक लकेर इतकी तरळ होती की, तिकडे नजर टाकणे ही वेदना होती फाटकाजवळ अंमलदार आणि मुलकी अधिकाऱ्यांचा लहानसा घोळका जमा झाला होता. एक बंदिस्त गाडी अवतीर्ण झाली. मागच्या गाद्यांवर रेललेले बॅरोन फ्रेडरिस्क आणि झार तावदानातून दिसत होते. झारचा चेहरा राखी जांभळट छटेचा होता. आपल्या विवर्ण कपाळावर त्याने कझाक रखवालीची मेंढकातडी टोपी कलती ठेवली होती.

जमावाच्या अंगावरून लिस्तनिस्तकी जवळ जवळ धावत गेला होता. त्याच्याकडे लोक चकित होऊन बघत होते. सलाम स्वीकारताना झारचा हात टोपीच्या काळ्या काठावरून खाली ओघळलेला त्याच्या डोळ्यापुढे आला धावणाऱ्या गाड्यांची निःशब्द गती त्याच्या कानात किणकिणली आणि आपल्या अखेरच्या बादशहाला निरोप देणाऱ्या जमावाची मानखंडना करणारी निः–स्तब्धता ...... !

रेजिमेंटल स्टाफचा जिथं मुक्काम होता त्या वराच्या पायऱ्या लिस्तनिस्तकी सावकाश चढून गेला. त्याचे गाल अद्याप थरथरत होते. आणि डोळे आरक्त डबडबलेले रडून सुजलेले होते. दुसऱ्या मजल्यावरील जिन्याखालच्या तबकात त्याने लागोपाठ दोन चुट्टे ओढले. नंतर आपला चापाचा चष्मा पुशीत एका वेळी पायऱ्या गाळीत तो धावत जिथे अधिकाऱ्यांचा मुक्काम होता त्या तिसऱ्या मजल्यावर आला.

रेजिमेन्टल कमांडरने पेत्रोग्रादचा नकाशा त्याच्यापुढे उघडला आणि जिथं सरकारी कचेऱ्याची रखवाली लिस्तनिस्तकीच्या स्क्वाड्रनने करायची होती ते क्षेत्र त्याला दाखविले. एकेक इमारत त्याने तपशीलाने सांगितली. आणि चौकीदार नेमण्याची वेळ आणि पद्धती ह्याचा काटेकोर बारकावा त्याला कळवला. शेवटी तो म्हणाला,

" शिशीर प्रसादात केरेन्स्की . . . ."

" केरेन्स्कीबद्दल चकार शब्द नको !" मरणकळा चेहऱ्यावर येऊन लिस्त-निस्तकी आवेशाने पुटपुटला.

" एवघेनी निकोलायविच स्वत:वर ताबा ठेवला पाहिजे !"

" कर्नल साहेब कृपा करून . . . ."

" कृपा करा . . . . !"

" तुमच्या ह्या शिरा . . . ."

" पुतिलोव कारखान्याकडे आमचे पहारेकरी मी आत्ताच रवाना करायचेत का ?" जोरजोराने फुसफुसत येवगेनीने विचारले.

ओठ चावीत कर्नलने स्मित केले आणि खांदे उडवून उत्तर दिले,

" आत्ताच ! त्यांची नायकी जुमलेदारानी करायची !"

नैतिकदृष्ट्या खचून गेलेला लिस्तनिस्तकी बाहेर पडला. त्याने जे अनुभवले होते त्यामुळे आणि कर्नलबरोबर झालेल्या संभाषणाने तो चिरडून गेला होता. मुख्य दाराच्या अगदी बाहेरच त्याला चौथ्या डॉन कझाक रेजिमेन्टचा पहारा भेटला. त्या अंमलदाराच्या घोड्याच्या काढण्यावरील फुले कोमेजून म्लानपणे अधोमुख झाली होती. त्या माणसाच्या जंबशी मिशांच्या चेहऱ्यावर एक अर्धस्मित होते.

"आमच्या देशाच्या त्रात्यांची जय हो!" पाय वाटेवरून खाली उतरून आपली टोपी हलवीत एक प्रौढ गृहस्थ गरजले.

अंमलदाराने सौजन्याने सलाम केला आणि पहारा दुडक्या चालीने पुढे गेला. कझाकांचा जयजयकार करणाऱ्या त्या नागरिकाच्या क्षुब्ध चेहऱ्याकडे, लाळ गळत्या ओठांकडे, काळजीपूर्वक बांधलेल्या त्याच्या रंगीत कंठवस्त्राकडे लिस्तनित्सकीने टक लावून पाहिले.

आणि कपाळाला आठ्या घालून खांदे पाडून तो आपल्या स्क्वाड्रनच्या वठाराच्या फाटकातून आत शिरला.

---

## ११

नैऋत्य आघाडीचे सेनापती म्हणून जनरल कोर्निलोव ह्यांच्या नेमणुकीचे १४ व्या कझाक रेजिमेन्टच्या अधिकाऱ्यांनी मोठ्या आत्मियतेने स्वागत केले. पोलादी चारित्र्याचा आणि हंगामी सरकारने जो विचका ओढवला होता त्यातून देश बाहेर काढण्याला निःसंशय समर्थ पुरुष म्हणून ते अधिकारी कोर्निलोवबद्दल प्रेमाने आणि आदराने बोलत.

ह्या नेमणुकीचे लिस्तनिस्तकीने विशेष हार्दिक स्वागत केले. खालच्या माणसांची ह्याबद्दल काय प्रतिक्रिया आहे ते स्क्वाड्रनमधील कनिष्ठ अंमलदारांकडून आणि विश्वासातील कझाकांकडून जाणून घेण्याचा त्याने प्रयत्न केला. पण त्याला मिळालेली माहिती त्याला आनंदीत करणारी नव्हती. कारण कझाक एकतर गुळणी धरून बसत किंवा उदासीनपणे म्हणत –

" आम्हाला सगळं सारखंच . . . . ! "

" कोण जाणे तो कोणाय ते . . . . ! "

" त्यानं शांतता आणण्याचा प्रयत्न केला असंल तर मग अर्थातच . . . ! "

" त्याच्या बढतीतून आपल्या पदरात काय पण पडायचं नाय ! "

थोड्याच दिवसात अंमलदारातून आणि जोडीला अधिक व्यापक नागरी वर्तुळातून, लष्करातून अशा दाट वदंता पसरल्या की, आघाडीवर देहान्त शासन पुनश्च सुरू करण्यासाठी, ज्यावर सैन्याचे भवितव्य टांगणीला लागलेले होते आणि ज्यावर युद्धाचा यशस्वी पाठपुरावा अवलंबून होता त्या इतर आणीबाणीच्या उपाययोजना परत सुरु करण्यासाठी, कोर्निलोव हंगामी सरकारवर दबाव आणीत आहे.

असे बोलले जात होते की, केरेन्स्की कोर्निलोवला भीत असून जास्त नमते घेणारा सेनानी त्याच्या जागी आणण्यासाठी कसून प्रयत्न करीत आहे.

कोर्निलोवची नेमणूक सरसेनापती म्हणून करणाऱ्या १९ जुलैच्या सरकारी फर्मानाने सर्वांना धक्का बसला. अंमलदार संघाच्या प्रधान समितीत खूपच ओळखी पाळखी असणाऱ्या ज्युनिअर कॅप्टन आतारश्चिकोवने विश्वासू गोटाचा हवाला देऊन असे कळवले की, हंगामी सरकारला सादर करण्यासाठी तयार केलेल्या आपल्या अहवालात कोर्निलोवने अत्यावश्यक म्हणून पुढील उपाययोजना आग्रहाने सुचविल्या होत्या:– पिछाडीकडील फौजा आणि नागरी जनता ह्यांच्यावर अधिकार हुकमत असणाऱ्या आणि फाशीची शिक्षा ठोठावण्याचा हक्क असणाऱ्या लष्करी कोर्टाची स्थापना, वरीष्ठ अंमलदारांच्या शिस्तभंगाविरुद्ध शिक्षा ठोठावण्याच्या वरिष्ठ अंमलदारांच्या हक्काची पुन:स्थापना, सैनिक समितीच्या हालचाली मर्यादित करणे.

ह्याच दिवशी संध्याकाळी आपल्या आणखी इतर अंमलदाराशी संभाषण चालू असता लिस्तनिस्तकीने तिखट आणि तडक प्रश्न टाकला, " ते कुणाबरोबर जाणार ? "

"सभ्यगृहस्थांनो ! आपल्या क्षोभाला आवर घालीत तो म्हणाला, "आपण मित्र कुटुंबासारखे रहात आहोत. आपला एकमेकाना उत्तम परिचय आहे. पण आतापर्यन्त आपल्यात अनेक प्रश्न तसेच लोंबकळत पडलेले आहेत आणि आता सेनापती आणि सरकारचा बेबनाव होण्याची लक्षणे स्पष्टपणे दिसत असताना आपण ह्या प्रश्नाचा सोक्षमोक्ष केलाच पाहिजे की आपण कुणाबरोबर अन् कुणासाठी आहोत ? आडपडदा न ठेवता आपण दोस्तासारखे बोलू या."

सर्वात आधी उत्तर दिले. ज्युनिअर कॅप्टन आताराश्शीकोवने !

" जनरल कोर्निलोवसाठी मी स्वत:चं न् इतर लोकांचही रक्त सांडायला तयाराय. तो आरपार सचोटीचा माणुसाय न् रशियाला स्वत:च्या पायावर उभं करायला केवळ तोच काय तो समर्थाय. सैन्यासाठी तो काय करून राहिलाय बघा! त्याच्याचमुळे आज 'कमांडर्स' चे हात काहीसे मोकळे झालेत. आधी ह्याच्या उलट सतत समित्या, भाईन्दारी, रणछोडी हे चाललं होतं. चर्चेचा प्रश्नच कुठे येतो ? कोणताही सभ्य माणूस कोर्निलोवलाच पाठींबा देईल.

सडपातळ पायाचा आडमाप रुंद खांद्या–छातीचा आतारश्चिकोव तडातडा बोलला. पुढे उभ्या राहिलेल्या ह्या जिवंत प्रश्नाने त्याला हलवल्याचे स्पष्ट दिसत

होते. बोलून झाल्यावर त्याने मेजापाशी बसलेल्या अंमलदारांच्या गटाकडे आव्हानपूर्वक बघत आपल्या पापीरोस † ची नळी सिगरेट केसवर ठोकली. त्याच्या उजव्या डोळ्याच्या खालच्या काठावर एक ठसठशीत तपकीरी तीळ होता. त्यामुळे ती पापणी नीट मिटू शकत नसे. तेव्हा प्रथमदर्शनी असे वाटायचे की त्याच्या डोळ्यात दुसऱ्यावर उपकार करून झाल्यावर करावे अशा एका उपहासगर्भ प्रतिक्षेचे स्मित तरळत आहे.

" बोल्शेव्हिक्स, करेन्स्की आणि कोर्निलोव ह्यांच्यामधून निवड करायची असेल तर अर्थात आम्ही कोर्निलोवच्या बाजूचे आहोत."

" आम्हाला हे ठरवण कठीणाय की, कोर्निलोवला हवंय कायाय ? रशियात सुरळीतपणा परत आणायचाय की दुसरंच काही परत आणायचंय . . . !"

" तत्वाच्या प्रश्नाला हे उत्तर नव्हे !"

" नाय. उत्तराय !"

" उत्तर असेल तर शहाणपणाचं मुळीच नव्हे !"

" तुम्हाला कशाचं भय वाटतंय कॅप्टन ? राजसत्ता परत येण्याचं ?"

" ह्याचं मला भय वाटत नाही उलट तशी माझी इच्छा आहे !"

" तर वाद कशासाठी आहे ? "

" सभ्यगृहस्थहो ! " दणकट निबर आवाजात दोलगोव बोलू लागला. नामांकित चाकरी बजावल्याबद्दल त्याला सार्जन्ट मेजरच्या जागेवरून कॉर्नेटच्या जागेवर अलीकडेच बढती देण्यात आली होती· " भांडताय कशासाठी ? तुम्ही खुल्लंखुल्ल सांगून द्या की आईच्या पदराला पोर चिकटतं तशी आम्ही कझाकं कोर्निलोवला चिकटणाराहोत ! काय भिडभाड न ठेवता ठणकावून द्या ! त्याच्याशी आपण फारकत घेतली की बुडालोच ! रशिया शेणगोळ्यागत आपल्याला उचलून टाकील ! बाब अगदी स्वच्छाय. जिथं तो तिथं आम्ही !"

" अगदी बरोबर ! " दोलगोवची पाठ आनंदाने थोपटीत आणि आपले हसरे डोळे लिस्त्निस्त्कीवर रोखीत आतारश्चिकोव म्हणाला. लिस्त्निस्तकी हसत आपल्या तुमानीला पडलेल्या सुरकुत्या काळजीने साफ करीत होता.

---

† पापीरोस ही ओठात धरण्यासाठी अर्धी पोकळ कागदी नळी असलेली एकप्रकारची रशियन सिगरेट आहे.

" तेव्हा आतामान रेजिमेन्टच्या अंमलदारानो ! आवाज आतारश्चिकोव ओरडला. आपण कोर्निलोवच्या बाजूचे का नाय ? "

" हां हां ! अर्थात ! "

" दोलगोवनं झटक्यात गुंता सोडवून टाकलाय ! "

" सगळे अंमलदार त्याच्या बाजूने ? "

" आमचा आम्हाला अपवाद करायचा नाय ! "

" कझाक रणमर्द आमचा प्यारा लावर गिओरगिएविच ! हुर्रे ! "

हासत खिदळत ग्लास किणकिणीत अंमलदारानी चहा घेतला. अलिकडे ताणलेली भावना निवळली. आणि गेल्या काही दिवसातील घटनांकडे संभाषणाचा ओघ वळला.

" आपण सगळे सरसेनापतीच्या बाजूचे आहोत. पण कझाकांनी चेहरे जरा टाकलेतच !" ढोलगोव गुळमुळीतपणे म्हणाला.

" चेहरे टाकलेत म्हणजे ?" लिस्तनिस्तकीने विचारले.

" म्हणजे तेच ! चेहरे टाकलेत ! बस्स ! रांडिच्यांना घरी बायकोकडे जायचय. खडतर आयुष्याचा त्यांना वीट आलाय."

" कझाकांना आपल्याबरोबर घेऊन जाणं हे आपलं कामाय !" मेजावर दाणकन् गुद्दा मारीत कॅप्टन चेर्नोकुतोव म्हणाला. "आपण अंमलदार तेवढ्याच साठी आहोत !"

" त्यांनी कुणाच्या बाजूने जायचं ते कझाकांना नीट धीरानं समजावून दिलं पाहिजे."

लिस्तनिस्तकीने ग्लासावर चमचा वाजवला. आणि सगळ्यांचं लक्ष वेधून घेतल्यावर तो मुद्दाम म्हणाला.

" सभ्यगृहस्थहो ! कृपा करून हे ध्यानात असू द्या की, आतारश्चिकोवने म्हटल्याप्रमाणे आज घडीला आपलं कर्तव्य हे आहे की, सत्यपरिस्थिती कझाकांना समजावून देणं. समित्यांच्या असरातून कझाकांना आपण बाहेर काढून घेतलं पाहिजे.

ह्याचा अर्थ असा की, फेब्रुवारीच्या उलथापालथीपासून जो बदल आपण सर्वांनी अंगी बाणून घेतलाय त्याहून मोठा नव्हे तरी निदान तेवढा तरी चारित्र्यातील बदल घडवून आणला पाहिजे. उदाहरणार्थ–पूर्वी म्हणजे सोळा सालात मी

कझाकांना पिटून काढला तर पुढच्याच लढाईत त्यांनी माझ्या पाठीत गोळी घालायचा धोका होता. पण फेब्रुआरी क्रांतीपासून आपल्याला वेगळ्या प्रकारे वागावं लागत आहे. कारण एखाद्या मूर्खावर मी हात टाकला असता तर सोईस्कर संधीची वाट बघत न बसता बाकीच्यांनी तिथल्यातिथं मला ठार केलं असतं. न् आता परिस्थिती पुन्हा बदलली आहे. आता आपण कझाकांशी भाईबंदी केली पाहिजे. " भाईबंदी शब्दावर जोर देऊन लिस्तनिस्तकीनं जाहीर करुन टाकलं, " सगळं काही त्यावर अवलंबून आहे. पहिल्या आणि चौथ्या रेजिमेन्टमध्ये सध्या काय चालू आहे ते तुम्ही जाणताच ! "

" भयंकराय ! "

" अगदी बरोबर. तिथल्या अमलदारांनी जुने अडसर उभारुन कझाकांपासून फारकत करुन घेणं चालूच ठेवलं. परिणामी झाडून एकजात कझाक बोलशेव्हिकांच्या आसराखाली आलेत न् त्यातले नव्वद टक्के स्वतःच बोलशेव्हिक झालेत. येऊ घातलेल्या भयानक घटना आपण टाळू शकत नाही. हे उघड आहे. जे जे गाफील आहेत त्यांना जुलैची तिसरी * आणि पाचवी * तारीख म्हणजे कडक इशारे होते. क्रांतिकारक लोकशाही सैन्याविरुद्ध कोर्निलोवच्या बरोबरीने आपल्याला लढावं तरी लागेल नाहीतर सैन्याची जमवाजमव केलेले, आपला असर वाढवलेले बोलशेव्हिक आणखी एक क्रांती घडवून आणतील. त्यांना दम खायला उसंत आहे, आपल्या फौजांची ते जमवाजमव करताहेत आणि आपण इकडे ढिलाईत आहोत. असं करुन कसं चालायचं ? उद्याच्या उलथापालथीत आपल्याला गरज आहे ती विश्वासू कझाकांची. "

" कझाकांखेरीज आपली अवस्था पात्याशिवाय कोयत्यागत आहे ! " दोलगावने सुस्कारा टाकला.

" अगदी खराय लिस्तनिस्तकी ! "

" खराय म्हणजे खराचाय ! "

" तुला काय वाटतं आम्हाला हे समजत नाय ? आम्हाला समजतं. पण

---

* ह्या दिवशी हंगामी सरकारविरुद्ध कामगार, सैनिक आणि खलाशांची सामुदाईक सशस्त्र निदर्शने झाली.

कधी कधी आम्ही काही करायला निर्बळ असतो. हुकुम नं ? * अन् अकोपनाया प्रावदा ** आपली बीजं पेरतायत् "

" आणि त्यातून उगवलेली रोपटी टाचेखाली चेचून टाकायची नाहीतर जाळून टाकायची सोडून, आपण त्यांचं कौतुक चालवलंय ! " आतारश्चिकोव गरजला.

" नाय. आम्ही कौतुक करीत नाय. आम्ही निर्बळ आहोत ! "

" चुकताय कोर्नेट ! आम्ही निष्काळजी आहोत ! "

" ते खरं नाही ! "

" सिद्ध करा ! "

" सभ्यगृहस्थहो, शांत व्हा ! "

" 'प्रावदा' नष्ट करण्यात आलाय. पण सगळं झालं गेल्यावर मग केरेन्स्कीला जाग येते . . . . ! "

" काय आहे काय ? मंडई ? हे असं चालायचं नाही ! "

हळूहळू बेशिस्त आरोळ्या थंडावल्या. लिस्तनिस्तकीचे म्हणणे अतिशय आस्थेवाईकपणे श्रवण करणारा एक स्क्वाड्रन कमांडर 'माझं ऐकून घ्या' म्हणून बोलू लागला –

" माझी अशी सूचना आहे की, लिस्तनिस्तकीना आपलं म्हणणं पुरतं मांडून द्यावं ! "

" बोला ! "

आपले कोणदार गुडघे मुठीने चोळीत लिस्तनिस्तकी बोलू लागला.

" मला नुकतंच हे जाणवायला लागलंय की, आगामी लढा – म्हणजे मला म्हणायचं की, यादवी युद्ध–अटळ आहे. न् ते जेव्हा येऊन ठेपेल, तेव्हा आपल्याला

---

* हुकुम नं ? ( १ मार्च १९१७ ) पेट्रोग्राड सोव्हिएतच्या कार्यकारी समितीने काढलेल्या ह्या हुकुमानुसार सैन्यात निर्वाचित संघटना स्थापन करण्यात आल्या. जुन्या झारशाही अंमलदारावर देखरेख ठेवण्याची त्यांची कामगिरी होती.

** अकोपनाया प्रावदा ( अलंगातील सत्य ) १९१७ प्रसिद्ध झालेले बोलशेव्हिक.

विश्वासू कझाकांची गरज लागेल. बोलशेव्हिकांकडे त्यांना झुकावणाऱ्या समित्यांपासून त्यांना आपल्याकडे ओढून घेण्यासाठी आपण लढलं पाहिजे. ती एक मूलभूत गरज आहे. लक्षात ठेवा की, नवीन दंगली झाल्यातर पहिल्या अन् चौथ्या रेजिमेन्टचे कझाक आपल्या स्वतःच्या अंमलदारांना गोळ्या घालून मारतील . . . !"

" स्पष्टच आहे !"

" ते मुळीच अनमान करायचे नाहीत !"

" त्यांच्या अनुभवातून – अत्यंत कटू अनुभवातून आपण शाहणं झालं पाहिजे. पहिल्या न् चौथ्या रेजिमेन्टचे निम्मे कझाक – कझाक कसले बोडक्याचे ? आपल्याला फासावर लटकावलायला लागतील. त्या सगळ्यांना खतम करून टाकायला लागेल. शेतातलं तण उपटून टाकलंच पाहिजे ! न् ज्याचे हिशोब त्यांना पुढे चुकते करावे लागतील त्या चुकांपासून आपण आपले कझाक बचावलेच पाहिजेत !"

लिस्तनित्सकीचे झाल्यावर त्याचे म्हणणे आतापर्यन्त विलक्षण एकाग्रतेने ऐकून घेणारा एक स्क्वाड्रन कमांडर बोलू लागला. नऊ वर्षे रेजिमेन्टमधे काढलेल्या आणि युद्धात चार वेळा जखमी झालेल्या ह्या प्रौढ अंमलदाराने युद्धापूर्वी कझाक रेजिमेन्टमधील चाकरीतील अडचणीबद्दल सांगितले. कझाक अंमलदारांना मागे ठेवण्यात आले होते. अस्पृश्यांची वागणूक त्यांना मिळत होती. त्यांना बढती कधीकाळी मिळायची. आणि बहुसंख्य अंमलदारांना कर्नल हुद्दा म्हणजे अगदी डोक्यावरून पाणी होते ! झारला उलथून टाकण्यात आले तेव्हा, कझाक पुढाऱ्यांनी दाखवलेल्या ढिलाईची ही कारणे होती. असे ह्या स्क्वाड्रन कमांडरचे म्हणणे होते. परंतु असे असले तरी, पडेल ती किंमत देऊन कोर्निलोवला पाठींबा देणे हे आवश्यक होते. कझाक सैन्य संघाची परिषद आणि अंमलदार संघाची न परिषद ह्यांच्या मार्फत त्यांच्याशी अधिक दाट संपर्क ठेवणे जरुर होते. "होऊ द्या कोर्निलोवला हुकूमशहा ! कझाकांना तो तरणोपाय ठरेल. झारपेक्षा त्याच्यहिताखाली कदाचित आपलं जास्त भलं होईल !" त्याने समारोप केला.

मध्यरात्र केव्हाच उलटली होती. साध्या अक्षांच्या पांढऱ्या झिज्या फिस्कारून रात्र शहरावर पसरली होती. दर्यासारंगाच्या मनोऱ्याचे काळे टोक आणि दिप्तीचे पाघळलेले पिवळे अडसर खिडकीतून दिसत होते.

पहाटेपर्यंत अंमलदार बोलत बसले होते. असे ठरले की, आठवड्यातून तीन दवस राजकीय विषयावर कझाकांशी चर्चा कराव्यात. फावला वेळ भरुन काढण्या-

साठी आणि राजकारणाच्या घरभेद्या वातावरणापासून कझाकांची मने वळवून घेण्यासाठी जुमलेदारांनी रोज आपले जुमले मेहनत आणि वाचनांत गंतवून ठेवावे. पांगण्यापूर्वी त्यानी गाणे म्हटले.

" डॉनचा नद जागा आहे,
आणि उसळ्या घेत आहे,
शांत इसाई डॉन आहे....
हाकेला ओ देत आहे.... "

चहाच्या बंबातील दहावे आधण त्यांनी संपवले. ग्लासाला ग्लास भिडविण्याच्या किणकिणाटात आरोग्य पानाच्या प्रस्तावांची थट्टामस्करी झाली. अखेर होण्यापूर्वी दोलगोवशी कुजबुजतो सल्लामसलत केल्यावर आताराश्चिकोव ओरडला.

" अन् आता गोडवाटी म्हणून अस्सल कझाकी परंपरेने आम्ही तुमचा पाहूणचार करणार आहोत. मेहरबानी करून आवाज बंद करा! आपण खिडक्याही उघडू या. इथं सगळा धूर भरून राहिलाय "

दोलगोवचा खरखरीत कमावलेला खर्ज आणि आतारश्चिकोवचा आगळा सुखद पंचम एकमेकाना भिडले. सुरवातीला त्यात किंचित चाचरतेपण होते पण अखेरीस ओतप्रोत देखणेपण असलेल्या गाण्यात ते सूर एकमेकात सरमिसळून गेले.

" अभिमानाचा हा परी आमुचा डॉन
हा शांत लाडका बाप आमुचा डॉन
काफरापुढे हा कधी वाकला नसे
मॉस्कोस पुसे ना, ' सांग जगावे कसे ? "
शतकानूशतके केले स्वागत ह्याने
त्या तुर्कांचे हो खड्गाच्या टोकाने
त्या विशुद्ध माता कुमारिकेच्या साठी
अन् सत्य सनातन पवित्र धर्मासाठी
खळखळणाऱ्या विमुक्त डॉनच्या साठी
म्लेंच्छाना समरी खडे चारण्यासाठी
वर्षानुवर्षे पुकारते ही माय
हा माळ डॉनचा ! आमुची धरती माय ! "

एकमेकावर आडवे टाकलेले हात गुडघ्यावर ठेवून आतारश्चिकोव बसला होता. दोलगोवचा बुलंद खर्ज आपल्या पलटयानी आपण कुठल्याकुठे लोपवून टाकीत आहोत ह्याची पर्वा न करता तो अस्खलीत गात होता. अखेरीस त्याचा चेहरा विलक्षण उग्र झाला होता. अखेरीस त्याच्या डोळ्याखालील ठसठशीत तपकिरी तीळावरून आसवाचा थंड थेंब ओघळत चमकलेला लिस्तनिस्तकीच्या नजरेस पडला.

दुसऱ्या स्क्वाड्रनचे अंमलदार निघून गेल्यावर आतारश्चिकोव लिस्तनिस्त-कीच्या खाटेजवळ आला. आणि त्या खाटेवर बसला. आपल्या रूंद छातीवरचे विटलेले निळे पट्टे चाळवीत तो कुजबुजला, "तुला माहिताय येवगेनी ... डॉनवर ... त्या जुन्या कझाकांच्या शतकाच्या जुन्या आयुष्याच्या धातणीवर माझा भयंकर जीवाय. कझाकांवर ... कझाक बायांवर माझं प्रेमाय. त्या सर्वांवर माझं प्रेमाय! माळरानावरच्या कडू दवण्याचा घमघमाट आला की मला रडू येतं .... सूर्यफूल जेव्हा उमलतं .... पावसात न्हालेल्या द्राक्ष मळ्याचा जेव्हा वास दर्वळतो तेव्हा ते मला खोलखोल वर आवडतं .... कळा लागतात त्याच्या ... तुला माहिताय ... अन् आता मला विचार पडलाय ... हे सगळं करून आपण ह्याच कझाकांच्या डोळ्यात धूळफेक नाही ना करत? आपण त्यांना ह्या वाटेला लावायचय का?"

"तुझ्या मनात काय आहे?" लिस्तनिस्तकीने सावधपणे विचारले.

आतारश्चिकोवच्या पांढऱ्या गळपट्टीतून त्याची उन्हात रापलेली गर्दन तारूण्याच्या नव्हाळीची आणि निष्पाप दिसत होती. त्या तपकिरी तीळावर त्याची निळसर पापणी बेढबपणे झुकली होती आणि तो अर्धमिटला डोळा काळोखात सार्द्र चमकत होता.

"मला प्रश्न पडलाय की हे कझाकांच्या भल्याचं आहे का?"

"हे नाहीतर मग काय भल्याचं आहे?"

"मला माहित नाय ... पण ते एवढे उर्मी आल्यागत आपल्यापासून दूर का जातायत? क्रांतीनं आपल्याला मेंढ्या न् बकरे वेगळे करावेत तसं वेगळं केलंय– आपल्या हिताच्या गोष्टीच जणू वेगळ्या झाल्यात."

"हे बघ" लिस्तनिस्तकी निगुतपणे बोलू लागला, "हा घटना समजून घेण्यातला फरक आहे. आपली संस्कृती जास्त थोर आहे. आपण एकूण वस्तु-स्थितीचा अंदाज चोखंदळपणे घेऊ शकतो. पण त्यांच्या दृष्टीने सगळं काही जास्त

रांगडेपणाचं न् बाळबोध आहे. बोलशेव्हिक हे सतत त्यांच्या डोक्यात भिनवतायत की, युद्धाचा शेवट केला पाहिजे, किंवा त्यापेक्षाही त्याचं यादवी युद्धात रुपांतर केलं पाहिजे. कझाकांना ते 'छू:' म्हणून आपल्यावर सोडतायत अन् कझाक दमलेले आहेत. त्यांच्यात जनावरपणा जास्त आहे. पितृभूमीबद्दल स्वतःच्या कर्तव्य आणि जबाबदारीची खंबीर नैतिक जाणीव आपल्याला आहे तशी ती त्यांना नाही. तेव्हा असल्या सिद्धांताला त्यांच्यात जास्त सुपीक जमीन लाभलेय. अखेर शेवटी पितृभूमीचा कझाकांच्या दृष्टीने खराखुरा काय अर्थ आहे ? आपण आघाडीपासून दूरवर आहे, तेवढ्या लांबवर जर्मन येत नाहीत हा त्यांचा युक्तिवाद आहे. हीच सगळी कटकट आहे. युद्धाचं रुपांतर यादवीयुद्धात केल्यानं काय नतीजा होईल हे आपण त्यांना समजावून दिलं पाहिजे."

तो बोलत होता तरी येवगेनीला हे जाणवत होते की आपले शब्द काही मुक्कामाला पोचत नाहीत. आणि एकादे कालव घेते तसे आपले अंग आतारश्चिकोव शिंपल्यात आक्रसून घेत आहे.

आणि झालेही तसेच. त्याचे बोलून झाल्यावर हा माणूस काहीतरी अस्पष्ट पुटपुटला. मग न बोलता बराच वेळ बसून राहिला. लिस्तनिस्तकीने कितीही शिकस्त केली तरी गुळणी धरुन बसलेल्या आपल्या सहकाऱ्याच्या मानसीच्या अंधारी कोणते विचार सैरभैर झालेत त्याचा उलगडा काही त्याला होऊ शकला नाही.

" त्याच मन शेवटपर्यन्त त्याला मी मोकळं करून द्यायला हवं होतं . . . " असा खेदाचा विचार त्याच्या मनात आला.

त्याला 'गुडनाईट' करून आणि जास्त चकार शब्द न काढता आतारश्चि–कोव आपल्या खाटेकडे गेला. विचारांची मनापासून देवघेव करण्याचा त्याने क्षणभर प्रयत्न केला होता. दुसऱ्यापासून प्रत्येक माणूस ज्यानं स्वत:ला झाकून घेतो त्या अज्ञाताच्या कृष्णपटलाचा एक कोपरा त्याने उचलला होता आणि मग परत तो खाली केला होता.

आपल्या मित्राला बेचैन करणारे काय आहे. त्याचा तळ गाठण्यातील आपल्या असमर्थतेवर त्रस्त होऊन चिडून लिस्तनिस्तकी धूर सोडीत काही वेळ

पडून राहिला होता. उदी मखमली काळोखात ताणून टक लावून बघता बघता एकाएकी त्याला आबिसनियाची आठवण झाली. आपल्या रजेचे तिने काठोकाठ भरून टाकलेले दिवस त्याला आठवले.

विचारात झालेला बदल आणि वेळोवेळी त्याच्या मार्गात आलेल्या स्त्रियांच्या दैवघटीत खंडप्राय आठवणी ह्यांनी सुखावून त्याचा डोळा लागून गेला.

— — — —

## १२

लिस्तनिस्तकीच्या स्क्वाड्रनमधे बुकानोव्स्की खेड्यातील इवान लागुतिन नावाचा एक कझाक होता. रेजिमेन्टच्या लष्करी क्रांतीकारक समितीवर सर्वप्रथम ज्यांना निवडून देण्यात आले होते त्यापैकी तो एक होता. हे रेजिमेन्ट पेत्रोग्रादमधे येऊन दाखल होईपर्यन्त त्याने स्वतःचे विशेष असे काही प्रकट केले नव्हते. परंतु जुलैच्या अखेरीस जुमलेदारांनी येवगेनीला कळवले की, लागुतिनला कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या पेत्रोग्राद सोव्हिएतच्या लष्करी विभागात हजर राहण्याची सवय आहे. जुमल्यातील इतर कझाकांबरोबर बोलत असलेला तो नेहमी आढळला आहे. आणि कझाकांवर त्याचा वाईट असर आहे. रखवालीची आणि गस्तीचा 'ड्युटी' नाकारल्याची दोन प्रकरणे घडलेली होती. आणि ह्याचा संबंध जुमलेदारांनी लागुतिनच्या कझाकांवर असलेल्या असराशी जोडला होता. लिस्तनिस्तकीने ठरविले की लागुतिनचा जास्त जवळून परिचय करून घेतला पाहिजे. आणि त्याचे काय विचार चाललेत ते शोधून काढले पाहिजेत. उघड संभाषणासाठी त्या कझाकाला बोलावून घेणे म्हणजे मूर्खपणा आणि गाफीलपणा होता. तेव्हा लिस्तनिस्तकीने दमाने घेण्याचे ठरविले. एक संधी लौकरच चालून आली. जुलै महिन्याच्या अखेरीस लागुतिनच्या जुमल्याला पुतिलोव कारखान्याच्या भोवतालच्या रस्त्यावर गस्त घालण्याची ड्युटी देण्यात आली.

"मी कझाकांबरोबर जातो!" लिस्तनिस्तकीने जुमलेदाराला बजावले. "अडलोला म्हणावं माझा घोडा तयार कर!"

लिस्तनिस्तकीने म्हटल्याप्रमाणे 'येईल त्या प्रसंगाला असावेत' म्हणून त्याच्या ताब्यात दोन घोडे देण्यात आले. गड्याच्या मदतीने कपडे चढवून तो आंगणात गेला.

जुमला आधीच घोड्यावर मांड घेऊन वाट बघत थांबला होता. त्याना पाठीवर घेऊन तो बाहेर पडला. धूसर अंधारातून ते अनेक रस्त्यातून रपेट करीत गेले. लिस्तनिस्तकी मुद्दाम मागे रेंगाळला आणि त्याने लागुतिनला हाक मारून आपल्याजवळ बोलावले. सुमार दिसणारा आपला घोडा त्या माणसाने फिरवला आणि कॅप्टनकडे चौकसपणे नजर टाकीत तो त्याच्याजवळ आला.

" हं मग ? समितीची काही ताजी खबर ? " लिस्तनिस्तकीने विचारले.

" विशेष काय नाय ! "

" तू कुठला रे लागुतिन ? "

" बुकानोवस्कीचा ! "

" आणि गावढं ? "

" मित्याकिन ! "

" त्यांचे घोडे आता बरोबरीने चालले होते. रस्त्यावरील दिव्यांच्या उजेडात लिस्तनिस्तकीने त्या कझाकाचा दाढीदार चेहरा न्याहळला त्याच्या टोपीखालून केसाचा मऊ झुपका दिसत होता. त्याच्या फुगीर गालावर दाढी वेडीवाकडी पिस्कारली होती. ठसठशीत कमानदार भुवयाखाली दडलेले डोळे तल्लख, काहीसे धूर्त होते.

" वरून दिसायला साळसूद दिसतोय, पण आतून कसा काय आहे ? जुन्या राजवटीशी, हुडेलहप्पी धोरणाशी संबंधीत असणाऱ्या प्रत्येक गोष्टीप्रमाणे माझाही बहुतेक तिटकारा करीत असेल. " लिस्तनिस्तकीच्या मनात विचार आला. आणि कोणत्यातरी कारणानं त्याला अशी इच्छा झाली की लागुतिनचा भूतकाळ जाणून घ्यावा.

" कुटुंबवाला का ? "

" जी ! बायको न् दोन मुलं आहेत. "

" शेतीबीती ? "

" आमची कसली शेती. " तुच्छतेने खेदाच्या स्वरात लागुतिनने उत्तर दिले. "आमचे आपले हातावर पोटाय. आमची जिंदगी म्हणजे पिचत झगडत काढायची." क्षणभर थांबून तो पुढे म्हणाला, " आमची जमीन भरडाय. "

लिस्तनिस्तकी एकदा कधीतरी सेबऱ्याकोव स्टेशनकडे बुकानोवस्की ओलांडून गेला होता. दक्षिणेला पाणसळ कुचकामी झिलाणाची सीमा, आणि खोपर नदीच्या स्वच्छंदी वाकणानी घेरा दिलेले ते दूरवरचे एकाकी कुग्राम त्याला सुस्पष्टपणे आठवले. सुमारे चौदा पंधरा मैल अंतरावरील कांडाळयावरून आपण पाहिलेले फळझाडांचे हिरवे मृगजळ आणि त्यातून उचावलेले गिरीजाघरांचे पांढरे मनोरे त्याला आठवले.

" खरपट जमीनाय आमची ! " लागुतिनने सुस्कारा टाकला.

" घरी जावंस वाटतय ना ? "

" होय साहेब ! जेवढचा लवकर जायला मिळेल तेवढं अर्थातच हवयं. ह्या युद्धात फार भोगलं ! "

" बंधू, आपण लवकर परतू असं वाटत नाही ! "

" परतूच ! "

" पण युद्ध तर अजून संपलं नाही नं ? "

" संपेल लौकरच. आपण लौकरच घरी परतू ! " त्या कझाकाने हट्टाने उत्तर दिले.

" आधी आपण आपसात लढू. तुला नाही असं वाटत ?" आपल्या खोगीर-मुदीवरील नजर वर न करता लागुतिनने क्षणभराने उत्तर दिले.

" मग आपण कुणाशी लढणार आहोत ?"

" लढायला काय कमी पडलेत ? . . . कदाचित बोलशेव्हिकांशी !"

परत लागुतिन चूप बसला. टापांच्या खणखणीत लयबद्ध खडखडाटाने जणू त्याला डुलकी लागली होती. जवळजवळ तीन मिनीटे ते चूपचाप होते. नंतर मंदपणे लागुतिनने उत्तर दिले. " त्यांच्याशी आमचं काय भांडण नाय !"

" पण जमिनीचं काय ?"

" प्रत्येकाला पुरेशी जमिनाय !"

" बोलशेव्हिकांचा डाव काय आहे ठाऊकाय ?"

" थोडसं ऐकलंय मी . . ."

" मग ? आपली जमीन बळकावयाला आणि कझाकांना गुलाम करायला बोलशेव्हिकांनी आपल्यावर हल्ला चढवला तर आपल्याला काय करायला हवं ? रशियाचा बचाव करायला जर्मनांविरूद्ध लढत होतास ना ? "

" जर्मनांच वेगळाय ! "

" न बोलशेव्हिकांचं ? "

" काय म्हणता साहेब ! " आपली नजर वर करून ती लिस्तनिस्तकीच्या नजरेला भिडवीत लागुतिनने काहीतरी निश्चय केल्यासारखे उत्तर दिले. " माझा उरला सुरला जमिनीचा तुकडा काही बोलशेव्हिक माझ्या हातून काढून घेणार नैत ! माझ्याकडं एकच हिस्सा आहे. त्याची काय त्यांना गरज लागणार नाय ... पण .... मात्र बोललो तर रागावू नका हं ! .... तुमचे वडिल आहेत. त्यांच्या जवळ अडीच पावणेतीन लाख एकर जमिनाय .... "

" अडीच पावणेतीन नाही. एक लाख ! "

" बरं ! एक लाख तर एक लाख ! काय थोडी थोडकी नाय झाली ! कसं ? " हा कुठला न्याय म्हणावा ? आँ ? आणि रशियाभर तुमच्या वडिलां–सारखे खुपायत ! तेव्हा कॅप्टनसाहेब, तुम्हीच ठरवा की प्रत्येक तोंडाला किती हाव असावी ? तुम्हाला खाण्याची इच्छा आहे तशी इतर सगळ्याच लोकांना आहे. तुम्हाला त्या जिप्सीची गोष्ट ठाऊकाय ना ? आपल्या घोडीला खायला नाय घातलं तर उपासाची तिला सवय होईल असं त्याला वाटलं. उपासाची सवय घोडीला नऊ दिवस झाली न् दहाव्या दिवशी ती मेली. झारच्या अमदानीत सगळाच उजेड होता. गरीबाचं हाल कुत्रा खात नव्हता ! तुमच्या वडिलाना भाकरीचा वाटा म्हणून लाख एकर मिळाले. आम्हाला साध्या माणसाना दोन तोंडं नाहीत तशी त्यांनाहो खायला दोन तोंडं नाहीत. लोकांचं दुर्दैव ! बोलशे–व्हिकांचा मार्ग बरोबराय. न् तुम्ही लढाईची गोष्ट करताय .... !

त्याचे म्हणणे ऐकताना लिस्तनिस्तकी क्षुब्ध झाला होता. पण तो लपवण्याचा तो प्रयत्न करीत होता. अखेर शेवटी त्याला समजले की, त्या विरूद्ध कोणताही वजनदार युक्तिवाद पुढे करायला आपण असमर्थ आहोत. त्याला हे जाणवले की, त्या कझाकाच्या साध्या – भयानक साध्या – युक्तिवादाने आपण खिंडीत सापडलो आहोत. आणि आपले चूक आहे ही खोलवर लपलेली खातरजमा त्याच्या अंतरी उफाळून आल्याने तो दिङमूढ झाला. रागावला.

" तू आहेस तरी कोण ? बोलशेव्हिक ?"

"नाव ठेवायचं इथं काय कामाय . . .?" लागुतिनने मुद्दाम हेल काढून म्हटले, "प्रश्न नावाचा नाय. खऱ्याचा आहे. लोकांना खरं ते हवाय. पण खऱ्याला नेहमी गाडलं जातय. त्यावर ढिगानी माती लोटली जात्येय. त्याचं कधीच मढं झालंय असं लोक म्हणायला लागलेत!"

"तेव्हा सोव्हिएतातले बोलशेव्हिक तुझ्या टाळक्यात हे भरवून देतायत म्हण की! त्याच्या संगतीतला वेळ तू वाया दवडला नाहीस!"

"अरारा! कॅप्टन साहेब, आम्हा सोसत आलेल्याना खुद्द जिंदगीनंच हे शिकवलय. बोलशेव्हिक फक्त पेटवणाला काडी लावतायत्!"

"सोडून दे या बाता! थट्टेवारी नेण्याची गोष्ट नव्हे ही!" आता पुरत्या रागावलेल्या लिस्तनिस्तकीने फर्मावले. "जबाब दे. आत्ता तू माझ्या वडिलांच्या न् एकूण जमिनदारांच्या जमिनीबद्दल बोलत होतास– पण ती . . . खाजगी मालमत्ता आहे. तुझ्याजवळ दोन सदरे असले न् माझ्याजवळ एकही नसला तर तुझ्या म्हणण्याप्रमाणे मी एक सदरा तुझ्यापासून काढून घ्यायला हवा!"

येवगेनीला त्या कझाकाचा चेहरा दिसू शकला नाही. पण त्याच्या आवाजावरून तो हसत असल्याचे त्याने ताडले.

"माझा जादा सदरा मी आपण होऊन देऊन टाकतो. आघाडीवर मी जादा सदरा नाय दिला तर उरला सुरला सदराही दिला. न् उघडचा अंगात फर्गोल घातला. पण कुणी जमीन दिल्याचं मी कधी ऐकलं नाय!"

"झालंय काय तुला . . . जमिनीची भूक लागलेय? आहे तेवढी पुरेशी नाही झाली?" लिस्तनिस्तकीने आपला आवाज चढवला.

फुत्कार टाकीत गुदमरलेल्या आवाजात लागुतिनने जवळ जवळ किंचाळूनच उत्तर दिले,

"तुला काय वाटतं मला फक्त स्वतःसाठी कळा लागल्यात? पोलंडला गेलो होतो. तिथं लोक कसं जगतायत? पाहिलंस ना? का नाय पाहचलंस? आपल्या आजूबाजूला डॉनवर नांगरमुठे कसं जगताहेत? ते तर पाहिलंस का नाय? मी पाहचलंय ना! रक्त पेट घेतं! त्यांच्याबद्दल मला वाईट वाटलं नाय असं वाटलं का काय? पोलीश लोकांना जमिनीच्या ज्या तुकड्यावर भागवून घ्यावं लागतं हे पाहूनही मला भडभडून आलं असल!"

येवगेनी त्याला झणझणीत उत्तर देण्याच्या बेतात होता पण एवढ्यात पुढे असणाऱ्या पुतिलोव कारखान्याच्या अंधूक दिसणाऱ्या कबऱ्या इमारतीतून एकाएकी

" धर त्याला ! " अशी आरोळी आली. टापांचा खडखडाट झाला आणि गोळी झाडल्याचा आवाज आला. आपला चाबूक परजीत लिस्तनिस्तकीने घोडयाला टाच मारली. तो आणि लागुतिन बरोबरीने दौडत आले. त्यांना असे आढळले की, एका कोपऱ्याशी जुमला थांबून गोळा झाला आहे. काही कझाक पायउतार झाले होते. त्यांच्या तलवारी खणखणत होत्या. आणि रिंगणाच्या मध्यभागी त्यांनी धरलेला एक माणूस धडपडत होता.

" काय आहे ? काय प्रकार आहे ? " आपला घोडा त्या घोळक्यात घालीत लिस्तनिस्तकी गरजला.

" हा रांडीचा दगड मारीत होता ! "

" आमच्यातल्या एकाला मारून हा पळाला ! "

" हाण त्याला आर्झुनोव ! "

" कारं रे भडव्या ! हाणामारी खेळतोयस ? "

जुमल्याचा सार्जन्ट आर्झुनोव खोगीरातून बाहेर लोंबकळला होता आणि रशियन सदरा घातलेल्या एका माणसाला त्याने गळपट्टीने पकडले होते. मांड उतरलेले तीन कझाक त्याचे हात त्याच्या पाठीमागे बांधत होते.

रागाने जवळ जवळ बेभान होऊन लिस्तनिस्तकी त्या माणसावर ओरडला,

" कोण आहेस रे तू ? "

कैद्याने मान वर केली पण त्याच्या पांढऱ्या फटक चेहऱ्याचे ओठ जाम घट्ट आवळलेले राहिले होते.

" कोण आहेस तू ? " लिस्तनिस्तकीने तोच प्रश्न पुन्हा विचारला. " दगड फेकतोस होय रे, हलकटा ? बोलत नाही काय ? आरझुनोव . . . ! "

आरझुनोवने खोगीरातून खाली उडी घेतली. त्या कैद्याची गळपट्टी सोडून दिली आणि त्याच्या तोंडावर एक टिंब ठेवून दिलं.

" हाण त्याला ! " आपला घोडा अचानक वळवून नेत लिस्तनिस्तकीने हुकूम सोडला.

मांड उतरलेल्या तीन चार कझाकांनी त्या मुसक्या बांधलेल्या माणसाला जमिनीवर आडवा केला आणि आपले चाबूक फडकावले.

लागुतिनने खोगीरातून ताडकन उडी मारली आणि तो धावत लिस्तनि–स्तकीकडे गेला.

" कॅप्टनसाहेब . . . . हे काय करताय तुम्ही . . . . ? कॅप्टनसाहेब !" थरथरत्या बोटांनी त्याने लिस्तनिस्तकीचा गुडघा पकडला आणि तो ओरडला, " असं करता कामा नाय ! तो मनुष्यच आहे . . . . काय करताय तुम्ही ? "

लिस्तनिस्तकीने उत्तर न देता घोडा पिटाळला. लागुतिन कझाकांकडे धावत परत गेला आणि त्याने आरझुनोवच्या कमरेला विळखा घातला. पावलागणिक त्याचे पाय डगमगत होते. आरझुनोवला बाजूला खेचण्याचा त्याने प्रयत्न केला. पण त्याला प्रतिकार करताना तो सार्जन्ट पुटपुटत होता, " तू पेटू नको ! त्यानं आमच्यावर दगड हाणायचे न् आम्ही शब्द नाय काढायचा ? सोड मला ! सोड मला ! तुझ्या भल्याचं सांगतोय ! "

एक कझाक ओणवा झाला आणि खांद्यावरून आपली हंटर गरगरा फिरवीत त्याने तिचा दस्ता त्या पडलेल्या माणसाच्या मऊ शरीरावर उतरवला. एका मिनिटानंतर रांगडा रासवट हंबरडा रस्त्यावर उफाळला. सेकंदभर चिडीचूप होते. मग परत तो आवाज उसळला. पण आता तो कोवळा कंठ फुटलेला . . . वेदनेने गुदमरुन थरारणारा होता. प्रत्येक प्रहारागणिक तो कण्हता कण्हता तुटक उद्गार काढीत होता,

" सुव्वर ! प्रती . . . क्रांतीकारक ! हाणून घ्या ! आहे . . . ! "

" धबाक् ! धबाक् ! धबाक् ! " प्रहार बदाबद आदळत होते.

लागुतिन परत धावत लिस्तनिस्तकीकडे गेला. त्याच्या गुडघ्यावर रेलून खोगीरावर नखाने ओरबडीत तो गदगदून म्हणाला,

" सोडून द्या त्याला ! "

" मार्गं हो ! "

" कॅप्टन . . . लिस्तनिस्तकी ! ऐक . . . ! ह्याचा तुला जाब द्यावा लागेल ! "

" थू तुझ्या तोंडावर ! " असे घरघरीत आवाजात म्हणून लिस्तनिस्तकीने लागुतिनच्या अंगावर घोडा घातला.

लागुतिन परत फिरला आणि त्या माणसाभोवती केलेल्या कोंडाळ्यापासून बाजूला उभ्या असलेल्या कझाकांकडे धावला. "भाऊ ! " तो ओरडला. " रेजिमेन्ट क्रांतिकारक समितीचा मी सभासदाय ! त्या माणसाला जीवदान देण्याचा मी तुम्हाला हुकूम देतो . . . ! तुम्हाला ह्याचा जाब द्यावा लागेल ! जुने दिवस आता राहिले नैत ! "

एका विचारशून्य आंधळ्या द्वेषाने लिस्तनिस्तकी बेभान झाला. आपल्या घोड्याच्या दोन कानामध्ये त्याने चाबूक हाणला. आणि लागुतिनकडे तो दौडत आला. आपले काळे तेलपाणी केलेले पिस्तूल त्या कझाकाच्या तोंडावर खुपशीत तो कडाडला, " खामोष ! हरामखोर ! बोलशेव्हिक ! गोळी घालीन ! "

पराकाष्ठेच्या इच्छाशक्तीने प्रयत्नपूर्वक त्याने स्वतःला आवर घातला. पिस्तुलाच्या घोड्यावरचे बोट दूर केले. मागच्या पायावरून त्याने घोड्याचा मोहरा गुर्रकन् वळवला आणि तो दौडत निघून गेला.

काही मिनिटानंतर त्या तीन कझाकांनी त्याच्या पाठोपाठ घोडे फेकले.

आरझुनोव व लापिन ह्यानी आपल्या घोड्यांच्या मधोमध त्या कैद्याला फरफटत चालवला. त्या माणसाच्या रक्तात थबथबलेला सदरा त्याच्या अंगाला चिटकून बसला होता. कझाकानी बगलेखाली टेकू दिलेला त्याचा देह असहाय्यपणे होलपाडत होता. पाय फरसबंदीवरुन फरफटत येत होते. त्याच्या चेहऱ्याचा ठेचून जवळ जवळ लगदा झाला होता. रक्तबंबाळ डोके उंचावलेल्या खांद्यांच्या मागे ढिले लोंबत होते. तिसरा कझाक काही अंतरावरून घोड्यावरून चालला होता. रस्त्याच्या कोपऱ्यावर त्याला एक ' द्रोझकी ' चालवणारा दिसला. रिकिबीत उभा राहून तो घोडा फेकीत त्याच्या जवळ गेला. आपल्या पोटऱ्यावरील बुटावर चाबकाचा घमेंडीने प्रहार करीत त्याने त्या माणसाला मोजका हुकूम सोडला. रस्त्याच्या मधोमध रुखलेल्या आरझुनोव आणि लापिन ह्या दोन कझाकाकडे तो द्रोझकी चालवणारा लाचार लगबगीने आला.

दुसऱ्या दिवशी सकाळी जागा झाल्यावर आपण एक फार मोठी भरून काढता न येणारी घोडचूक केली असे लिस्तनिस्तकीला वाटले. कझाकांवर दगड मारलेल्या माणसाला मारझोड केलेल्या आदल्या रात्रीचा देखावा आठवून आणि तो आणि लागुतिन ह्यांच्या दरम्यान घडलेले आठवून त्याने दाताखाली ओठ रगडले आणि कपाळाला आठ्या घातल्या. चेहरा आकसून घेऊन त्याने त्याला सुरकुत्या आणल्या आणि खोकत खोकत तो त्यावर विचार करीत होता.

अंगावर पोशाख चढवताना त्याने असे ठरविले की सध्या लागुतिनच्या वाटेला न गेलेले बरे. त्यामुळे रेजिमेन्ट समितीशी संबंध चिघळायला नकोत. ह्या प्रसंगाचा जुमल्यातील इतर कझाकांना विसर पडेपर्यंत थांबावे. आणि मग गुपचुप त्याला दूर करावे. हेच सूज्ञपणाचे ठरेल.

"तेव्हा ही कझाकांबरोबर भाईदरी करणं!" जळजळीत उपरोधाने त्याच्या मनांत विचार आला. त्या प्रसंगाची कटू छाया अनेक दिवस त्याच्या मनातून गेली नाही.

ऑगस्टच्या सुरवातीतील एका निरभ्र उन्हाच्या दिवशी लिस्तनिस्तकी व आतारश्चिकोव शहरात गेले. अंमलदारांच्या बैठकीनंतर झालेल्या संभाषणापासून त्या दोघात उद्‌भवलेली संदिग्धता दूर करणारे काही घडले नव्हते. आतारश्चिकोव घुम्या बनला होता. त्याला बोलते करण्याचा प्रयत्न लिस्तनिस्तकीने केला पण इतरांच्या नजरेपासून आपले खरे स्वरूप सुरक्षित ठेवण्यासाठी बहुतेक माणसे संवयीच्या पोटी जो दुर्भेद्य पडदा पांघरुन घेतात तो पडदा त्याने ठेवून दिला होता. लिस्तनिस्तकीला नेहमी असे वाटत आले होते की, आपल्या सहकाऱ्याबरोबरच्या व्यवहारात माणसे आपली इतर वैशिष्टचे वरकरणी देखाव्याआड लपवून ठेवतात. ही वैशिष्ठ्ये सहसा कधीही प्रकट होत नाहीत. त्याचा असा खंबीर विश्वास होता की, हा वरपांगी बुरखा दूर केला तर कोणत्याही माणसाचे खरे, नागडे, अखोट अंतरंग उजेडात येईल. निरनिराळी माणसे आपल्या संरक्षणासाठी जे राकट, उग्र, निर्भय, उर्मट, संतुष्ट, आनंदी पुरोभाग उभे करतात. त्यांच्या मागे काय दडलेले असते ते जाणून घेण्याचा एका रुग्ण तळमळीने तो सतत झपाटलेला होता. आणि आता आतारश्चिकोवबद्दल विचार करताना तो एवढाच निष्कर्ष काढू शकला की, राष्ट्राच्या निरनिराळ्या विभागांना एकमेकापासून फोडणाऱ्या वैमनस्यातून मार्ग काढण्याच्या त्याच्या झगड्यात आतारश्चिकोव कझाकांच्या आकांक्षा बोलशेव्हिकांच्या आकांक्षाशी जोडायला धडपडतो आहे. ह्या उपन्यासामुळे आतारश्चिकोवशी मैत्री वाढविण्याचे आपले प्रयत्न थांबवण्याच्या निर्णयाला तो आला. आपले चिंतन बोलून न दाखवता तो दुरावला गेला.

किरकोळ गप्पा मारीत ते नेवस्कीपथावरुन भटकले.

"चल, जाऊन काहीतरी खाऊ या!" एक रेस्तोरॉकडे नजर टाकीत लिस्तनिस्तकीने सुचविले.

"ठिकाय!" आतारश्चिकोवने संमती दिली.

त्यानी रेस्टोरॉमधे प्रवेश केला आणि काहीशा असाह्यतेने आजूबाजूला बघत उभे राहिले. सगळ्या टेबलापाशी माणसे बसलेली होती. आतारश्चिकोव बाहेर पडण्यासाठी वळला एवढ्यात दोन स्त्रीयांबरोबर बसलेला एक ढेरपोट्या, झकपक कपडे घातलेला गृहस्थ ह्या अंमलदाराना निरखून न्याहाळीत खिडकी-जवळील आपल्या टेबलापासून उठला, आणि त्यांच्याजवळ आला. आपली हॅट अदबीने किंचित उचलीत तो म्हणाला,

" माफ करा. आमच्या टेबलापाशी बसता का ? आम्ही आता निघालोच आहोत. " आपली खंडित दंतपंक्ती प्रकट करीत त्याने त्यांना तिकडे येण्याची खूण केली. " अंमलदारांची थोडी सेवा बजवायला मला आनंद वाटतो. आपण राष्ट्राचा अभिमान आहात. "

टेबलाजवळ बसलेल्या स्त्रिया उठून उभ्या राहिल्या. त्यातील एका उंच सावळ्या स्त्रीने आपले केस थोपटून नीट केले. तिच्याहून थोडीशी तरुण असणारी आपल्या नाजूक छत्रीशी खेळत होती.

त्या टेबलाजवळ बसण्याची संधी दिल्याबद्दल ह्या अंमलदारांनी त्या गृहस्थाचे आभार मानले. खाली सोडलेल्या पडद्यातून सूर्याची खंडित किरणे टेबलावरील कापडावर पिवळ्या सुयांसारखी घुसली होती. स्वयंपाकाच्या वासाने टेबलावर मांडलेल्या फुलांचा सूक्ष्म सुगंध मारून टाकला होता. लिस्तनिस्तकीने बर्फाळ बीटमूळांच्या सुपाची मागणी केली आणि फुलदाणीतून त्याने काढलेल्या तांबारलेल्या पिवळ्या त्रिपालीच्या फुलांशी चाळा करीत तो विचारमग्न बसून राहिला. आतारश्चिकोवने घामाने डबडबलेले कपाळ हातरुमालाने पुसले. खाली झुकलेले त्याचे श्रांत सतत उघडझाप करणारे डोळे शेजारील टेबलाच्या पायावर खेळणाऱ्या उन्हाचे निरीक्षण करत होते.

पहिली थाळी त्यांनी संपवलीही नव्हती एवढ्यात मोठमोठ्याने बोलत दोन अंमलदारांनी रेस्तोराँमध्ये प्रवेश केला. रिकाम्या टेबलाचा शोध घेता घेता, पहिल्या अंमलदाराने आपला उन्हात रापलेला चेहरा लिस्तनिस्तकीच्या दिशेने वळविला. आणि त्याचे काळे डोळे आनंदाने उजळले. "अरे! कोण लिस्तनिस्तकी?" असे ओरडून खात्रीची आणि ठाम पावले टाकीत लिस्तनिस्तकीकडे आला. काळ्या मिशाआडून त्याचे पांढरे दात चमकत होते.

लिस्तनिस्तकीने कॅप्टन कालमिकोवला तात्काळ ओळखले. त्याच्या मागोमाग येणारा चुबोव होता. त्यांनी जोरजोराने हस्तांदोलन केले. आपल्या पूर्वीच्या सहकाऱ्यांची ओळख आतारश्चिकोवशी करून दिल्यावर लिस्तनिस्तकीने विचारले,

" इकडं कुणीकडे ?" मिशांना पीळ भरीत कालमिकोवने गर्दन मागे केली आणि इकडे तिकडे बघत उत्तर दिले,

" आमची रवानगी झालयेय. मग सांगेन तुला. पण आधी तुझ्याबद्दल सांग. चौदाव्या रेजिमेन्टमधलं आयुष्य कसं कायाय ?"

ते बरोबरच रेस्तोरॉमधून बाहेर पडले. कालमिकोव आणि लिस्तनिस्तकी दुसऱ्यांच्या मागे रेंगाळले. पहिल्याच गल्लीत ते वळले. आणि शहराच्या निवांत भागाकडे आजूबाजूला सावधगिरीने बघत ते अगदी कुजबूजत बोलत होते.

" आमची फलटण रुमेनियन आघाडीवर राखीवात ठेवण्यात आल्येय,' 'कालमिकोवने सुस्पष्टपणे सांगितले. " दहा दिवसांपूर्वी रेजिमेन्ट कमांडरकडून मला सूचना मिळाली की, माझं स्क्वाड्रन मी दुसऱ्या एका अंमलदाराच्या हवाली करावे आणि चुबोव बरोबर जाऊन डिव्हिजनल स्टाफच्या सेवेला रुजू व्हावे. विलक्षण बदली ! तेव्हा आम्ही डिव्हिजनल स्टाफकडे जातो. कारवाई खात्यातला ' कर्नल यं ?' तुला ठाऊकाय तो ? तिथं गुप्तपणे आम्हाला कळविण्यात येत की आम्ही जनरल क्रिमोवकडे तात्काळ हजेरी द्यावी. तेव्हा फलटणीच्या ठाण्यावर आम्ही जातो. क्रिमोव मला भेटतो. त्याच्याकडे कोणते अंमलदार पाठविण्यात येताहेत ते त्याला कळवलेलं असतंच. तेव्हा तो मला खुल्लं खुल्लं सांगतो, " देशाला मुद्दाम नाशाकडं नेणाऱ्या माणसांच्या हाती सरकार आहे. सरकारच्या मुख्य पदावर असलेला गट बदलला पाहिजे. बहुदा हंगामी सरकारची हकालपट्टी करून, लष्करी हुकूमशाही आणावी लागेल." कोर्निलोवचा त्यात संभाव्य उमेदवार म्हणून उल्लेख केला. नंतर मला असं सुचवलं की अंमलदार संघाच्या प्रधान समितीच्या चाकरीला रुजू होण्यासाठी मी पेत्रोग्रादला जावं. आता विश्वासू अमलदार शहरात शेकड्यानं जमलेत. आपलं काम काय असेल ते तू ताडू शकशील. अंमलदार संघाची प्रधान समिती कझाक सेना संघाच्या बरोबर दाट संपर्क ठेवून काम करत्येय अन् रेल्वे जंक्शनावर आणि डिव्हिजनस् मधून कडव्या बटालिअन्सची जुळवणी चालू आहे. ह्या सगळ्या बटालिअनस् उद्या कामाला येणार आहेत."

" ह्यातून काय निष्पन्न होणार ? तुला काय वाटतं ?"

" तोच तर मुद्दाय ! पण तुला इथं राहूनसुद्धा परिस्थिती माहित नाय असं म्हणतोस ? सरकारात क्रांती नक्की होणार आणि कोर्निलाव सत्ता काबीज करणार. सगळी सेना त्याच्या बाजूनं आहे ! आम्हाला वाटतं दोन समसमान शक्ती आहेत. बोलशेव्हिक आणि कोर्निलोव. केरेन्स्की दोन चक्कीच्या दगडांच्या मधी सापडलाय. हा नायतर तो त्याला चिरडणार. त्याला झोपू दे झारिनाच्या महालात ! तो औट घटकेचा खलिफा आहे." थोडा वेळ गप्प बसून आपल्या तलवारीशी चाळा करीत कालमिकोव म्हणाला, " अर्थात आम्ही अंमलदार म्हणजे बुद्धिबळाच्या पटावरची प्यादी आहोत. खेळणारा आम्हाला कुठं सरकवणार ते आम्हाला माहीत नाय.

माझंच उदाहरण घे. लष्करी ठाण्यावर काय घडतं ते सगळं मला कळत नाय. पण मला हे पक्कं कळतंय की सेनानीत म्हणजे कोर्निलोव, लुकोम्स्की, रोमानोव्स्की, क्रिमोव, देनिकिन, एरदेली ह्यांच्यात गुप्त दुवाय. समजूनाय !"

"पण सेना . . .? सगळी सेना कोर्निलोव मागं जाईल ?" आपली चाल झपाट्याची करीत लिस्तनिस्तकीने विचारले.

"सैनिक अर्थातच जाणार नैत. पण आपण त्याना आपल्या मागं घेऊन गेलं पाहिजे."

"तुला ठाऊकाय? डाव्यांच्या दबावाखाली केरेन्स्की सरसेनापतीची हकालपट्टी करण्याचा प्रयत्न करतोय ?"

"त्याची हिम्मत नाय होणार ! उद्या नाकदुऱ्या काढीत येईल. अंमलदार संघाच्या प्रधान समितीनं ह्याबाबत आपलं मत अगदी परखडपणे सांगितलय !"

"कझाक सेना संघाच्या परिषदेचे शिष्टमंडळ काल त्याला भेटलं." लिस्त-निस्तकी हसून म्हणाला, "त्यांनी त्याला सांगितलं की कोर्निलोवच्या हकालपट्टीचा कझाक विचारसुद्धा करू शकत नाहीत. त्यानं त्याना काय उत्तर दिलं तुला ठाऊक आहे ? म्हणाला की ही सगळी गप्प आहे . . . असा कोणताही प्रकार अंगावर घेण्याचा हंगामी सरकारचा विचार नाही. लोकांना धीर द्यायचा प्रयत्नही करायचा आणि सोव्हिएत खासदाराकडं बघून रांडेसारखं हसायचही !"

कालमिकोवने चालता चालता खिशातून अंमलदाराची डायरी काढली आणि मोठ्याने वाचले,

"आपले रशियन सैन्याच्या सरसेनापतींचे सार्वजनिक कार्यकर्त्यांची परिषद स्वागत करीत आहे. ही परिषद असे जाहीर करीत आहे की आपल्या सैन्यातील आणि रशियातील आपल्या अधिकाराला सुरुंग लावण्याचा कोणताही प्रयत्न परिषदेच्या मते फौजदारी गुन्हा असून अंमलदार, सेन्ट जॉर्जचे कावलिअर, आणि कझाक ह्यांच्या आवाजात ही परिषद सहभागी आहे. कसोटीच्या ह्या भयंकर घडीला विचार करणारा समग्र रशिया आपल्याकडे आशेने आणि श्रद्धेने बघत आहे. बलिष्ठ सेनेची पुर्ननिर्मिती करण्याच्या आणि रशियाला वाचविण्याच्या

आपल्या महान कामगिरीत देव आपल्याला सहाय्य करो ! रोदझ्यानको, स्पष्ट आहे ना ? कोर्नोलोवची हाकालपट्टी करण्याचा प्रश्नच नाही . . . पण शहरात काल तो आला ते पाहिलंस का ?"

" त्सारस्कोए सेलोहून काल रात्रीच परत आलो."

कालमिकोव हसला तशी त्याच्या दातांची सांद्र ओळ आणि गुलाबी हिरड्या प्रकट झाल्या. त्याचे चिंचोळे डोळे आकुंचित झाले आणि त्याच्या कोपऱ्यातून बारीक सुरकुत्यांचे जाळे उमटले.

" देखणं दृश्य ! तेकिन्सचं स्क्वाड्रन त्याच्या हुजूरातीला होतं. प्रत्येक मोटारगाडीत मशिनगन बसवली होती. हा सगळा लवाजमा हिवाळी प्रसादाकडे गेला. अगदी ठणठणीत इशारा ! उंच केसाळ टोप्या घातलेल्या त्या तेकिन्सचे चेहरे पाहायला हवे होतेस ! पाहून घ्यावेत असे आहेत, खास छाप पाडणारे !"

ते दोन अंमलदार चालत चालत परत शहराच्या केन्द्रभागी आले आणि त्यांनी एकमेकांचा निरोप घेतला.

" झेन्या, आपण एकमेकांच्या दृष्टीआड होता कामा नये." हस्तांदोलन करता करता कालमिकोव म्हणाला, "कठीण काळ येतोय ! पाय रोवून उभा रहा, नायतर संपलास !"

लिस्तनित्सकी चालू लागला. एवढ्यात अर्धवट वळून कालमिकोव थांबला आणि त्याला हाक मारून म्हणाला,

" अरे ! मी तुला सांगायचं विसरलो ! तुला मेर्कुलोव आठवतो ? तो चित्रकार !"

" हां हां !"

" मे महिन्यात तो मारला गेला !"

" शक्य नाही !"

" अगदी अपघातानं झालं. इतकं मूर्खासारखं मरण दिसायचं नाय. एका टेहळणी हशमाच्या हातात हातगोळा फुटला न् त्याचा हात कोपरापासून उडाला.

त्याच्या बाजूला मेर्कुलोव उभा होता. त्याच्या कोथळ्याचा एक तुकडा आणि वेडीवाकडी झालेली दुर्बीण, एवढेच त्याचे अवशेष आमच्या हाती लागले. तीन वर्षं काळानं त्याला दया दाखवली . . ."

आणखीही काहीतरी तो ओरडला. पण वाऱ्याने करडी धूळ उधळली गेली आणि काही तुटक अक्षरे लिस्तनिस्तकीच्या कानावर आली. लिस्तनिस्तकीने हात हलवला आणि तो निघून गेला. जाताना मधून मधून तो मागे दृष्टी टाकीत होता.

———

## १३

तिसरी रिसाला फलटण आणि तिला जोडलेली नेटिव्ह डिव्हिजन. नेवेल व्येलिकिए लुकी क्षेत्रात ताबीनात करावीत असा हुकूम हेडक्वार्टर्स स्टाफचे पहिले सेनानी जनरल रोमोनोवस्की ह्यांच्यामार्फत सुप्रीम कमांडरचे सेनासारंग जनरल लुकोम्स्की ह्यांना दिनांक ६ ऑगस्ट रोजी मिळाला.

"त्याच विशिष्ठ क्षेत्राकडं त्याना का पाठवायचं? रुमेनियन आघाडीचे राखीव म्हणून ती पथकं ठेवलेली आहेत." लुकोम्स्कीने भेदरून विचारले.

"मला माहीत नाही अलेक्झांदर सेर्गिएविच! सरसेनापतीकडून आलेला हुकूम जसाच्या तसा पोचता केला."

"हा हुकूम कधी मिळाला तुम्हाला?"

"काल! काल रात्री ११ वाजता. सरसेनानीनी मला आपल्या खोलीत बोलावून घेतलं. आणि हा हुकूम तुम्हाला सकाळी पोचता करण्याचं फर्मावलं."

रोमानोवस्की खिडकीजवळ फेऱ्या घालीत होते. लुकोमस्कीच्या खोलीची एक भिंत मध्य युरोपच्या प्रचंड सामरिक नकाशाने अर्धी व्यापलेली होती. त्या नकाशापुढे थांबून आणि फाजील एकाग्रतेने तो न्याहाळीत रोमोनोवस्की मान मुरडून म्हणाले,

"तुम्ही खुलासा करा . . . ते आपल्या खोलीतच आहेत."

लुकोमस्कीनी तो कागद उचलला. खुर्ची मागे ढकलली. आणि वृद्धापकाल झालेल्या कोणत्याही तुंदीलतनू शिपाईगड्याप्रमाणे सुस्पष्ट ठाशीव पावले टाकीत ते दाराकडे गेले.

रोमानोवस्कीना बाहेर सोडताना आपल्या विचारांचा खंडीत झालेलाच ओघ पुढे चालू करीत ते म्हणाले,

" होय अगदी बरोबर ! "

लुकोम्स्कीना अपरिचित असणारा एक उंच लंबुटांग्या कर्नल कोर्निलोवच्या खोलीतून नुकताच बाहेर पडला होता. लुकोम्स्कीना वाट करून देण्यासाठी तो अदबीने बाजूला झाला आणि मग कारिडॉरमधून लक्षात यावं असा लंगडत निघून गेला. त्याच्या खांद्याला वेडेविद्रे झटके येत होते. कुलूपी गोळ्याच्या धक्क्याने असं झाल्याचे उघड होते.

आपले तळवे मेजावर दाबून कोर्निलोव मेजावर किंचित पुढे झुकले होते. आणि समोरच्या एका प्रौढ अंमलदाराशी बोलत होते. " . . . असं होणार हे ओळखायलाच हवं होते ! काय म्हणतोय मी. कळलं ? पस्कोवला पोचल्याबरोबर कळवा मला. जाऊ शकता ! "

ते अंमलदार बाहेर जाऊन दार ओढून घेईपर्यन्त कोर्निलोव थांबले. मग तरण्या चपळाईने खाली बसले, आणि लुकोम्स्कीसाठी खुर्ची ओढून घेत त्यांनी विचारले,

" तिसऱ्या रिसाला फलटणीच्या बदलीबद्दलच्या माझ्या सूचना रोमानोवस्कीकडून तुम्हाला मिळाल्या ? "

" होय. ह्याबद्दल आपल्याशी बोलायला मी आलोय. हे क्षेत्र आपण का निवडलंत ? "

लुकोमस्कीने कोर्निलोवचा काळवंडलेला चेहरा लक्षपूर्वक न्याहाळला.

तो अगम्य आणि शांत होता. आशियाई धाटणीचा निर्विकार होता. नाकापासून पालथ्या मिशांनी जेमतेम झाकलेल्या राकट मुखापर्यन्तच्या प्रांतावर परिचित वक्ररेषा अुठलेल्या होत्या. त्यांच्या भालप्रदेशावर पोरगेल्यासारख्या पडलेल्या केसांच्या बटेमुळेच काय तो त्या चेहऱ्याचा उग्र-गंभीर अविर्भाव निवळला होता.

मेजावर कोपर टेकून आपल्या लहानखोर शुष्क तळव्यावर कोर्निलोवनी हनुवटी धरली. आपले चमकते मंगोलियन नेत्र आकुंचित केले आणि एका हाताने लुकोमस्कीच्या गुढघ्याला स्पर्श करीत उत्तर दिले, " खास उत्तर आघाडीच्यामागे मला रिसाला ताबिनात करायचा नाही. मला तो अशा ठिकाणी हवाय की जिथून उत्तर किंवा पश्चिम आघाडीवर तो सहज रवाना करता येईल. माझ्या मते मी

निवडलेलं क्षेत्र ही गरज सर्वात उत्तम पुरी करतं. तुमच्या मनात काही वेगळं आहे का ? काय ?

लुकोमस्कीनें संदिग्धपणे खांदे उडविले. "पश्चिम आघाडीची काळजी करण्याचं आपल्याला काही कारण नाही. पस्कोव क्षेत्रात रिसाला ताबिनात करणं जास्त चांगलं होईल !" "पस्कोव ?" कोर्निलोवनी प्रतिप्रश्न केला. देह पुढ झुकवून आणि आपला विवर्ण अधरोष्ठ त्रासिकपणे आवळीत त्यानी डोके हलविले आणि ते म्हणाले, "छे ! पस्कोव क्षेत्र चालायच नाही !"

वृद्धापकालाला साजेशा शांत अविर्भावाने लुकोमस्कीनी आपले हात खुर्चीच्या हातावर ठेवले आणि तोलून मापून शब्द वापरीत ते म्हणाले, "लाव्र गिओर-गिएव्हिच, मी जरूर ते हुकूम ताबडतोब देतो. पण माझा असा ग्रह झालाय की आपण काहीतरी न बोलता राखून ठेवताय . . . पेत्रोग्राद किंवा मॉस्कोला रवाना करण्याच्या दृष्टीन रिसाला ताबिनात करायला आपण निवडलेलं क्षेत्र फार उत्तम आहे. पण आपल्या फौजांची आपण अशाप्रकारे तजवीज लावली तर उत्तर आघा-डीच्या त्या उपयोगी येणार नाहीत. कारण एवढंच की, त्या तिथं आणणं मोठं मुष्कील होईल. माझं जर चुकत नसेल आणि आपलं जर चुकत असेल—कारण मला वाटत आपण न बोलता काहीतरी राखून ठेवीत आहात. तर मी आपल्याला विनंती करतो की, मला एकतर आघाडीकडे तरी पाठवा किंवा आपल्या मनात काय आहे ते पुरतं मला कळू तरी द्या ! आपल्या वरिष्ठांचा संपूर्ण विश्वास संपादन केल्या-खेरीज कोणताही सेनानी आपला बोज राखू शकणार नाही."

एकाग्रतेने श्रवण करीत कोर्निलोवनी आपले डोळे खाली झुकविले होते. पण तरीही लुकोमस्कीच्या एरवी शांत असणाऱ्या चेहऱ्यावर पुरळासारखी उफाळलेली क्षोभाची सूक्ष्म लाली त्यांच्या तीक्ष्ण नजरेने टिपली. क्षणभर विचार करून त्यांनी उत्तर दिले, "तुमचं बरोबर आहे. असे काही विचार आहेत की ज्यांच्याबद्दल मी अद्याप तुमच्याशी चर्चा केली नाही . . . . . मी सांगितल्याप्रमाणे रिसाल्याच्या बदलीचा हुकूम मेहरबानी करून द्या अन् त्यांचा सेनानी जनरल क्रिमोवला अव्वल ठाण्यावर ताबडतोब बोलावून घ्या. पेत्रोग्रादहून मी परत आलो की, तुम्ही अन् मी ह्या विषयावर तपशीलवार चर्चा करू. विश्वास राखा अलेक्झांदर सेर्गिएविच. काहीही लपविण्याची माझी इच्छा नाही तुमच्यापासून !" 'तुमच्यापासून' ह्या शेवटच्या शब्दावर कोर्निलोवने जोर दिला. आणि दारावरची 'टकटक्' ऐकून ते गरकन वळले.

" आत या !"

जनरल स्टाफचे असिस्टंट कमिसारी फोनविझिन आणि ठोसर बांध्याचा पिकलेल्या केसांचा एक जनरल आत आले. लुकोमस्की उठून उभे राहिले. जाता जाता फोनविझिनच्या प्रश्नाला कोर्निलोवने ताड्कन दिलेले उत्तर त्यांच्या कानी पडले,

" जनरल मिलरच्या प्रकरणावर फेरविचार करायला सध्या मला सवड नाही. काय . . . ? हो हो ! मी निघालोय . . . !

आपल्या खोलीत परत आल्यावर लुकोमस्की बराच वेळ खिडकीजवळ उभे राहिले. झाडांच्या भारावलेल्या शेंड्यावर वारा आदळत होता आणि उन्हात वाकलेल्या गवतातून सळसळत होता. ते बघत आपल्या पिकत चाललेल्या दाढीची वेलांटी बोटाळीत लुकोमस्की विचारात गढून उभे होते.

एका तासानंतर सुप्रीम कमांडरच्या सेनासारंगाकडून आलेला कुचचा हुकूम तिसऱ्या रिसाला फलटणीला मिळाला. १० व्या सेनेचे सेनानी म्हणून झालेली नेमणूक त्याकाळी कोर्निलोवच्या विनंतीवरून नाकारणाऱ्या जनरल क्रिमोवना अव्वल ठाण्यावर हजर होण्याचा हुकूम ह्याच दिवशी तारेने रवाना झाला.

तेकिन्सच्या निगेबानीत दि. ९ ऑगस्ट रोजी कोर्निलोव खास गाडीने पेत्रोग्रादला रवाना झाले. सुप्रीम कमांडरना अटक झाल्याच्या किंवा त्यांची हाकालपट्टी झाल्याच्या अफवा दुसऱ्या दिवशी अव्वल ठाण्यावर पसरल्या. पण ११ तारखेच्या सकाळी कोर्निलोव मोगिलेवला परतले.

आल्याबरोबर त्यानी तावडतोब लुकोमस्कीना बोलावून घेतले. तारा आणि परिपत्रके वाचून झाल्यावर त्यानी आपल्या जैतुनी मनगटाला दिमाखात वेढणारी निष्कलंक धवल मनगटपट्टी सरळ केली. त्यांच्या धांदलीच्या हालचालीतून अनोखा क्षोभ प्रकट होत होता.

" आपलं राहिलेलं संभाषण आता आपण पुढे चालू करू शकतो." ते शांतपणे म्हणाले; " तिसऱ्या फलटणीला पेत्रोग्रादकडे हलवण्याची ज्यामुळे मला प्रेरणा झाली आणि ज्यावर आपण अद्याप चर्चा केलेली नाही त्या विचारांकडे वळायची माझी इच्छा आहे. तुम्हाला ठाऊक आहे ? तीन ऑगस्टला जेव्हा मी पेत्रोग्रादमध्ये मंत्रीमंडळाच्या बैठकीला होतो तेव्हा केरेन्स्की आणि सविन्कोव ह्यानी मला संरक्षणाच्या कोणत्याही मूलभूत बाबींवर न बोलण्याची ताकीद दिली ! कारण

त्यांचं म्हणणं असं की मंत्र्यात काही अविश्वासू लोक आहेत. मी सुप्रिम कमांडंट इन चीफ! मी सरकारला अहवाल सादर करतो तेव्हा मला कारवायांच्या मत–सुब्यांबद्दल बोलणं शक्य होत नाही. कारण काय? तर मी जे बोलेन ते काही दिवसात जर्मन हाय कमांडला माहीत होणार नाही याची काही हमी नाही. हे काय सरकार आहे? हे असं झाल्यावर असलं सरकार देश वाचवायला लायक आहे ह्यावर मी विश्वास ठेवू शकतो काय?" ठाशीव जलद पावलांनी कोर्निलोव दाराकडे चालत गेले. कुलुपातून चावी फिरवली आणि आपल्या मेजासमोर येरझारा घालीत ते म्हणाले, "असले किडे देशावर राज्य करतायत् ही दुःखाची बेचैन करणारी गोष्ट आहे!" इच्छाशक्तीची नवळाई. चारित्र्याचा अभाव कौशल्याचा अभाव, धरसोडपणा अगदी फदफितुरीसुद्धा! ह्या गुणांवर हे सरकार . . . . ह्याला 'सरकार' असं म्हणणं शक्य असेल तर! . . . . चेर्नोव आणि इतरांच्या मूक संमतीनं बोलशेव्हिक केरेन्स्कीला बाजूला फेकून देतील . . अलेक्झांदर सेर्गिएविच, रशियाची ही अवस्था आहे. आपल्या दोघांना मान्य असणाऱ्या तत्वांना अनुसरून नवीन उलथापालथीपासून देशाला वाचविण्याची माझी इच्छा आहे- तिसऱ्या रिसाला फलटणीची बदली करायचं माझं मुख्य कारण हे आहे की ऑगस्ट अखेरपर्यन्त ती पेत्रोग्राडला आणता येणं शक्य व्हावं अन् तिथं बोलशेव्हिकांनी उठावणी केली तर त्यांचा अन् मायभूमीच्या फंदफितुरांचा कायमचा बंदोबस्त करून टाकता यावा. ह्या कारवायीची नायकी मी जनरल क्रिमोवला देतोय. माझी खात्री आहे की वेळ पडली तर सैनिक आणि कामगार सोव्हिएटच्या प्रत्येक खास दाराला फासावर लटकवायला मागं पुढं नाही पहायचा. हंगामी सरकारबद्दल सांगायचं तर . . . त्यांना आपण बघून घेवू. मला स्वतःसाठी काही नको! . . . पडेल ती किंमत देऊन आपण रशिया वाचवलाच पाहिजे!"

लुकोमस्कींच्या पुढ्यात कोर्निलोव थबकले आणि त्यांनी सट्‌कन प्रश्न केला, "फक्त ह्याच उपायांनी देश आणि फौजेचं तक्दीर वाचवता येईल ही माझ्या-सारखी तुम्हालाही खात्री वाटते का नाही? शेवटपर्यन्त मला साथ द्याल?

लुकोमस्की उठून उभे राहिले. गाढ भावनेने त्यानी कोर्निलोवचे शुष्क गरम हात पकडले. "माझं मत अगदी तुमच्यासारखं आहे! मी शेवटपर्यंन्त तुमच्या-बरोबर आहे. आपण ह्यावर विचार केला पाहिजे. प्रत्येक गोष्ट काळजीपूर्वक जोखली पाहिजे आणि तडाखा दिला पाहिजे. माझ्यावर ही कामगिरी सोपवा लाव्र गिओरगिएविच!"

" मी एक ढोबळ योजना आखल्येय. कर्नल लिबेदेव आणि कॅप्टन रोझेनद्दो तपशील आखतील. आधीच तुमच्यावर कामाचा बोजा जास्त आहे, अलेक्झांदर सेर्गिएविच. माझ्या म्हणण्यावर विश्वास ठेवा. सगळ्यावर चर्चा करायला आणि जरूर असतील ते फेरबदल करायला उद्या आपल्याला वेळ मिळेल."

नंतर काही दिवस अव्वल ठाण्यावर कामाची धमाल उडून गेली होती. उन्हात रापलेले, पावसावाऱ्याने निबर झालेल्या तोंडांचे, खाकी गणवेशातील अंमलदार मोगिलेवमधील राज्यपाल भवनावर निरनिराळ्या आघाडीपथावरून सेवा रुजू करण्यासाठी येत होते अंमलदार संघाचे भपकेदार पोशाख केलेले आणि कझाक सेनासंघाचे प्रतिनिधी येत होते. डॉन कझाक सेनेचा 'नेमलेला' आतामान असलेल्या कालेदिनकडील जासूद घोड्यावरून येत होते.

निरनिराळे नागरिक येत होते. कोर्निलोवला मदत करण्याची आणि १९१७ मध्ये कोसळलेल्या जुन्या रशियाला सावरण्याची प्रामाणिक इच्छा असलेले लोक ह्यात होते. पण फार लांबून प्रचंड रक्तपाताचा वास लागून आणि देशाच्या नसा उकलणारा जबर हात कुणाचा हे ताडून भक्ष्याच्या आशेने गिधाडेही मोगिलेवला गोळा झाली होती. दोब्रिनस्की, झवोइको आणि अलादिनसारख्या माणसांची सुप्रीम कमांडरशी दाट संपर्क असल्याची ख्याती होती. अव्वल ठाण्यावर आणि डॉन कझाक सेनेच्या ठाण्यावर अशी कुजबूज चालू होती की, कोर्निलोव दुसऱ्यावर अतिविश्वास टाकणारा आहे. आणि साहसखोर लोकांच्या तो आहारी गेलेला आहे. पण त्याचबरोबर अंमलदारांच्या व्यापक वर्तुळात ह्या मताचे वर्चस्व होते की, कोर्निलोव म्हणजे रशियाच्या पुनर्वसनाची पताका आहे. पुनर्वसनाला कळकळीने पाठिंबा देणारांची रीघ ह्या पताकेकडे लागली होती.

राज्यपरिषदेला हजर रहाण्यासाठी १३ ऑगस्टला कोर्निलोवने मॉस्कोकडे प्रयाण केले.

उबदार, किंचित ढगाळ दिवस. फिकट निळ्या ॲल्युमिनियमने आभाळ झाकून टाकल्यासारखे वाटत होते. बैंगणी किनारीचा विशविशीत वादळी राशी-मेघ डोक्यावर उंच ओळला होता. शेते, रुळावरुन खडखडत जाणारी गाडी, गळतीच्या अद्‌भूत पिसांनी मढलेले रान, दुरंत बर्च राईची विशुद्ध पाणरंगी रेखा येणाऱ्या पानगळतीत विधवेची शोकवस्त्रे परिधान केलेली सगळी धरित्री ह्या सर्वांवर नाजूक तिरपी धार पडत होती. आणि त्यातून इंद्रधनुष्याच्या छटा चमकत होत्या.

मैल आणि धुराचा लगताळ गाडी मागे टाकित होती. छातीवर सेंट जॉर्जचे क्रूस लावलेला एक ठेंगणा सेनानी खाकी फर्गोलात उघड्या खिडकीपाशी बसला होता. आपले चिंचोळे काळे करंद डोळे किलकिले करून त्याने आपले डोके खिडकीबाहेर काढले. आणि त्याचा कायम रापून गेलेला चेहरा आणि पालथ्या काळ्या मिशा ताज्या पाऊसथेंबांनी भरपूर ओल्या होऊन गेल्या. त्यांच्या चेहऱ्या-वर बालीशपणे ओघळलेली केसांची बट वाऱ्याने मागे वळवली.

---



# १४

कोर्निलोवचे मॉस्कोत आगमन होण्याच्या आदल्या दिवशी कॅप्टन लिस्त-निस्तकी शहरात येवून दाखल झाला. पेत्रोग्राडमधील कझाक सेना संघाच्या परिषदेने महत्वाची कागदपत्रे त्याच्या हवाली केली होती. मॉस्कोत तळ दिलेल्या कझाक रेजिमेन्टच्या सेनाधिकाऱ्यांच्या हवाली त्याने ते पाकीट केले, तेव्हा त्याला समजले की, कोर्निलोव दुसऱ्या दिवशी येत आहेत.

सरसेनानींना भेटायला दुसऱ्या दिवशी दुपारी लिस्तनिस्तकी अलेक्झांद्रोवस्की स्टेशनात आला. माणसांचा मुख्यत्वे करून लष्करी माणसांचा समर्द पहिल्या आणि दुसऱ्या वर्गाच्या प्रतिक्षागृहात आणि अल्पोपहारगृहात जमला होता. अलेक्झांद्रो-वस्की लष्करी अकादमीची सलामी फलाटावर एककतार उभी होती. आणि बाहेर मॉस्को महिलांची 'मौकिबे मौत' बटालियन सफेबंदीने खडी होती.

कोर्निलोवची गाडी सुमारे तीन वाजता आली जमावात एकदम सामसूम होते. आटपत्या पावलांच्या आवाजावर कडी करून बँडचा कल्लोळ उसळला. जमावात चलबिचल झाली आणि तो पागलपणे फलाटाकडे धावला. लिस्तनिस्तकी त्यात ओढला गेला. त्या दंगलीतून रेटारेटी करीत बाहेर आल्यावर त्याच्या दृष्टीस पडले की, सरसेनानींच्या डब्यासमोर तेकीन्स आपली दोकतार उभी करीत होते. डब्याच्या चकचकीत रोंगण लावलेल्या बाजूवरून त्यांच्या लांब झग्याचा लाल रंग परावर्तीत झाला होता. लिस्तनिस्तकीने पाहिले की, बरोबर बरेच अंमलदार असलेले कोर्निलोव गाडीतून खाली उतरले, सलामीची त्यांनी पहाणी केली. सेन्ट जॉर्ज कवालिअर संघ, लष्करी आणि आरमारी अंमलदारांचा संघ, कझाक सेना संघ ह्यांची शिष्टमंडळे त्यांना भेटली.

सरसेनानींना भेटवण्यात आलेल्यात डॉन आतामान कालेदिन, आणि जनरल झारओनच्कोवस्की ह्यांना लिस्तनिस्तकीने ओळखले. कोर्निलोवच्या भोवती उभ्या असणाऱ्या अंमलदारांनी इतरांच्या ओळखी करून दिल्या.

" किस्लियाकोव – दळणवळण खात्याचे उपमंत्री."

" रुदनेव – मॉस्कोचे महापौर."

" प्रिन्स उबेत्सकोई – अव्वल ठाण्याच्या राजनैतिक कचेरीचे प्रमुख."

" प्रिव्ही कौंसिलर – मुसिन पुष्किन."

" फ्रेंच मिलीटरी ॲटॅशी – कर्नल काईओ."

" प्रिन्स गोलित्सिन."

" प्रिन्स मानसायरेव . . ." आर्जवी नम्र आवाज कुजबुजत होते.

लिस्तनिस्तकीने पाहिले की, कोर्निलोव जसे जवळ येत तसा फलाटाच्या टोकाला उभ्या असलेल्या सुवेषधारी स्त्रियांनी फेकलेल्या फुलांचा त्यांच्यावर मारा होत होता. एक गुलाबी फूल त्यांच्या माकुलाला अडकून तिथेच लोंबकळले. किंचीत संकोचाने, बावरल्या मुद्रेने त्यांनी ते झटकून टाकले.

दाढी राखलेल्या एका प्रौढ अंमलदाराने बाराव्या कझाक रेजिमेन्टच्यावतीने स्वागतपर भाषण अडखळत अडखळत सुरू केले. पण तो काय म्हणत होता ते लिस्तनिस्तकीला काही ऐकू आले नाही. कारण जमावाने त्याला भिंतीवर ढकलले आणि त्याच्या समशेरीचा दस्ता जवळजवळ मोडला.

राज्य ड्यूमाचे सदस्य रोदिचेव ह्यांचे भाषण झाल्यावर कोर्निलोव परत पुढे चालू लागले. त्यांच्याभोवती गर्दीचे दाट कडे एकसंध सरकत होते. अंमलदार हाताची साखळी धरून वाट मोकळी करीत होते. पण जमाव त्यांना ढकलून देत होता. डझनावारी हात कोर्निलोवकडे झेपावले होते. एक दणकट, झिज्या विस्कटलेली बाई त्यांच्या बाजूला तुरूतुरू चालत होती. त्यांच्या फिकट हिरव्या कोटाच्या बाहीवर आपले ओठ दाबायला ती बघत होती.

स्टेशनच्या प्रवेशद्वाराशी कोर्निलोवना लोकांनी खांद्यापर्यंन्त उचलून जयजयकाराच्या गदारोळात बाहेर नेले. खांद्याने एक सणसणीत धक्का देऊन लिस्तनिस्तकीने एका प्रतिष्ठित वयस्कर गृहस्थाला बाजूला ढकलले. कोर्निलोवचा डोळ्यापुढून झर्‌कन गेलेला चकचकीत बूटाचा एक पाय पकडला. तो पाय त्याने अलगद

आपल्या खांद्यावर ठेवला. अंगावरील बोजाची जाणीव उरलेली नाही—मनःक्षोभाने आणि पाय सावरताना उर धपापतोय अशा अवस्थेत तो सावकाश पुढे सरकत असताना जमावाच्या गर्जना आणि बँडचा कल्लोळ ह्याने त्याच्या कानठळ्या बसत होत्या. स्टेशनाच्या प्रवेशद्वारापाशी आल्यावर चेंगराचेंगरीत पट्ट्याखाली सुरकतून गेलेला आपला फर्गोल त्याने घाईघाईने सरळ केला. पायऱ्या उतरून ते चौकात आले. समोर जमाव होता. सैनिकांच्या हिरव्या कतारी आणि आश्वारूढ कझाक स्क्वाड्रन होते. पाण्याने डबडबलेल्या डोळ्यांची फडफड करीत ओठांची अनावर थरथर आवरण्याचा विफळ प्रयत्न करीत लिस्तनिस्तकीने आपल्या टोपीच्या ढापणाला हात टेकवला.

कॅमेऱ्यांची खटखट, जमावाची बेहोशी, कॅडेट्स्चे उत्सवी संचलन, आणि सलामीचा स्वीकार करणाऱ्या चिंचोळ्या काळ्या करंद डोळ्यांच्या मंगोली चेहऱ्याच्या जनरल कोर्निलोवची ठेंगणी मूर्ती ह्यांची अंधूक आठवण नंतर त्याला होत होती.

एका दिवसानंतर लिस्तनिस्तकी पेत्रोग्राडला परतला. आपल्या डब्यातील वरच्या फळीवर फर्गोल अंथरून त्यावर पडल्या पडल्या झुरके घेताना तो कोर्निलोवबद्दल विचार करीत होता.

" जीव धोक्यात घालून त्याने गनिमाच्या हातावर तुरी दिली. जणू काही त्याला ठाऊक होते की देशाला आपली किती तीव्र निकड आहे. न् चेहरा काय आहे! खडक फोडून काढल्यासारखा. जरासुद्धा इकडं तिकडं नाही . . . तसाच त्याचा स्वभाव. त्याला सगळं कसं सुस्पष्ट हवं. अखेरच्या तपशीलापर्यन्त हिशेब मांडलेले. ती वेळ आली की तो आमचं नेतृत्व करील. काय विलक्षण आहे ! तो कोण तेही मला ठाऊक नाही. राजसत्तावादी ? घटनात्मक राजसत्ता . . . त्याला आहे तसा आम्हा सगळ्यांना आत्मविश्वास असता तर !

सुमारे त्याचवेळी मॉस्को राज्यपरिषदेच्या मध्यंतरात दोन सेनानी बलशोई थिएटरच्या कॉरिडॉरमध्ये येरझारा घालीत शांतपणे संभाषण करीत होते. त्यातील एक ठेंगणा मंगोलियन चेहऱ्याचा होता. दुसरा ठोस बांध्याचा, चौकोनी डोक्यावर बारीक कापलेले दाट केस असलेला होता. डोक्यात मधून मधून चाई होत्या. कान घट्ट मुडपलेले होते. "जाहिरनाम्याच्या ह्या कलमात फौजेतील समित्यांचं विसर्जन करायची तरतूद आहे का ?"

" होय."

"संयुक्त आघाडी आणि संपूर्ण एकजूट पूर्णपणे अनिवार्य आहेत. मी सुचवलेल्या उपाययोजनांची तामिली झाल्याखेरीज तरणोपाय ना ी. लढायला फौज पुरती कुचकामी आहे. असली फौज विजय मिळवू शकत नाही. कोणत्याही जबर हल्ल्यापुढं ती टिकावसुद्धा धरू शकणार नाही. बोलशेव्हिक प्रचारानं डिव्हिजन्सची फाटाफूट झाल्येय अन् इकडं पिछाडीला ? त्यांना काबूत आणायचे कोणतेही उपाय जारी केले की कामगार कसा जबाब देतात ते पाहिलंत ! संप न् मिरवणूका ! परिषदेच्या सभासदांना पायी जावं लागतय . . . शरमेची गोष्ट आहे. पिछाडीचं लष्करीकरण, निष्ठूर दंडसत्तेची स्थापना, सटवाईचा गाडा असलेल्या ह्या बोल्शेव्हिकांचं निर्दय निर्दाळण – ह्या आपल्या तातडीच्या कामगिऱ्या आहेत. तुमच्य पाठींब्यावर मी मदार ठेवू शकतो काय अलेक्सेइ माक्सिमोविच ?

"मी पूर्णपणे तुमच्याबरोबर आहे !"

"मला ती खात्री होतीच. धन्यवाद. जरुर पडली की, निर्धारान् अन खंबीरपणे कसं वागावं लागतं पाहिलत. अर्धवट इलाज न् लांबीचौडी भाषा ह्या पलिकडं सरकारची मजल जात नाही. जुलैच्या बंडखोरांना चिरडलं तसं लोकांच्या सत्तेला धमकावणारांचे प्रयत्न तलवारी बंदुकांनी चिरडून टाकण्याच्या गोष्टी सरकार सांगतं. आम्हा शिपाई गड्यांना आधी करायची न् मग बोलायची सवय आहे. ते नेमकं उलट करतात."

"ठीकाय . . . आपल्या धरसोड उपायांची फळं त्यांनी चाखायची वेळ येतेय. पण ह्या नामुष्कीच्या खेळात भाग घ्यायची मला इच्छा नाही. खुल्या लढ्याचा पुरस्कर्ता म्हणून मी होतो न् आहे. दुटप्पीपणा माझ्या स्वभावात नाही !"

तो ठेंगणा सेनानी त्या संभाषणकर्त्यापुढे उभा राहिला आणि त्याच्या गर्द फ्रेंच फर्गोलाचे बटण पिरगाळीत भावनावेगाने अडखळत तो म्हणाला,

"त्यांनी मुस्कं काढून टाकलय न् स्वत:च्याच क्रांतीकारक लोकशाहीला ते घाबरलेत न् विश्वासातल्या फौजा राजधानीच्या जास्त जवळ हलवा म्हणून मला सांगतायत्. पण त्याचबरोबर आपल्या लोकशाहीला खूष करण्यापायी त्यांना स्वत:ला मात्र काही खरे उपाय योजायचे भय वाटतय. एक पाऊल पुढं, एक पाऊल मागं . . . आपल्या फौजांची पुरती मजबूती करून न् जबर नैतीक दबाव आणूनच आपण सरकारकडून आपला मतलब मिळवू शकू न् नाही मिळाला . . . तर आपण बघून घेवू. मी आघाडी उघडी पाडायला कमी नाही करणार. जर्मनांना आणू देत त्यांना शुद्धीवर !"

" ह्या विषयावर मी माझ्या सहकाऱ्यांशी बोललोय. कझाकांचा तुम्हाला सर्वतोपरीनं पाठींबा आहे. लाव्र गिओर्गिएविच ! पुढच्या व्यवस्थेच्या प्रश्नावर फक्त आमचं एकमत व्हायच उरलय.

" अधिवेशन संपलं की, माझ्या खोलीत मी तुमची वाट बघतोय. डॉनवरची हालहवाल काय आहे ?

त्या ठोस बांध्याच्या सेनानीने हनुवटी छातीवर दाबली. खिन्न आणि उदासपणे तो स्वतः पुढची जमीन टक लावून बघू लागला. उत्तर देताना त्याच्या रुंद मिशाखालचे ओठ थरथरले.

"कझाकांवरचा माझा पूर्वीचा विश्वास उरलेला नाही . . . न् आतातर एकूण परिस्थितीची परीक्षा करणंच कठीण आहे. तडजोड आवश्यक आहे. बाहेर–गावच्यांचा * पाठींबा टिकवून धरण्यासाठी त्यांना कझाकांनी काहीतरी अर्पायलाच हवं, ह्या दिशेने काही पावलं टाकतो आहोत पण ती यशस्वी होतीलच अशी हमी देणं शक्य नाही. मला भिती वाटते की, कझाक न् बाहेरगाववाले ह्यांच्या मतलबांची चकमक झडून त्यातून स्फोट व्हायचा. जमीन . . . ! या घडीला त्यांचे सगळे विचार तिथं गुंतून पडलेत."

" आतून घडणाऱ्या कोणत्याही प्रसंगातून स्वतःला सुरक्षित ठेवायला तुमच्या हाताशी विश्वासातल्या कझाक डिव्हीजन्स असायलाच हव्यात अव्वल ठाण्यावर परतलो की मी लुकोमस्कीशी बोलतो. आघाडीवरून मागं डॉनकडं काही कझाक रेजिमेन्टस् रवाना करण्याचा मार्ग आम्ही बहूदा शोधून काढू."

" आपला मोठा ऋणी होईन ! "

" तर मग आज सध्याकाळी आपण ह्यापुढे मिळून करायच्या कामावर चर्चा करू. आमच्या योजना यशस्वीपणे तडीला जातील ह्यावर माझा ठाम विश्वास आहे. पण सेनानीसाहेब, दैव लहरी असतं . . . ! एवढं सगळं करूनही त्यानं माझ्याकडे पाठ फिरवलीच–तर डॉनवर तुमच्याकडं आश्रय मिळेल असं मी धरून चालावं का ?

" नुसता आश्रयच नाही तर बचाव ! पाहुणचाराबद्दल न मीठभाकर देण्याबद्दल कझाकांची ख्याती आहे." संभाषणाच्या समग्र ओघात कालिदीननी प्रथमच स्मित केले. अन् त्यांच्या चर्चेवरील उदासी आणि खिन्नता निवळली.

* कझाक नसलेले पण कझाक प्रदेशावर रहाणारे.

एका तासानंतर डॉन कझाकांचे आतामान कालेदीन ह्यांनी चुपचाप बसलेल्या श्रोत्यांपुढे बाराव्या कझाक रेजिमेंटचा जाहिरनामा घोषित केला.

आणि आता डॉन, कुबान, तेरेक, उरालस, उस्सुरी, ह्यांच्या डोक्यावर, कझाक भूमीच्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यन्त, खेड्याखेड्यातून एका प्रचंड कटाचे धागे काळ्या कोळीष्टकासारखे लोंबू लागले!

— ——————

## १९

जून महिन्यातील चढाईच्या आगमारीत बेचिराख झालेल्या एका चिमुकल्या गावापासून सुमारे आठ कोसावर अलंगांची राक्षसी वळणांची नागमोड एका जंगलाच्या पुढे गेली होती. जंगलाच्या सीमारेषेवरील क्षेत्र कझाक रिसाल्याच्या एका खास स्क्वाड्रनच्या ताब्यात होते.

त्यांच्या मागे आल्डर्स आणि कोवळचा बर्च वृक्षांच्या दुर्गम ओलटचा पलिकडे कर्बटी खाजणाची तांबरलेली राड पसरली होती. युद्धापूर्वी केव्हातरी चाललेल्या कर्वटकामाचा स्पर्श तिला झालेला होता. रानगुलाबाच्या झुडपांवर किरमिजी गुटिका सुरखाईने झळकत होत्या. रानाच्यापुढे झेपावलेल्या दांडीपलिकड उजव्या हाताला कुलूपी गोळचांनी भोकाळलेला खडीचा रस्ता पसरला होता. युद्धात अद्याप तुडवल्या न गेलेल्या वाटांची तो आठवण करून देत होता. रानाच्या कडेपट्टीवर गोळचांनी व्रणित झालेले करंटे झुडतर उगवले होते. आणि जळून कोळसा झालेले झाडांचे बुंधे निराधारपणे एकमेकांना लगटले होते.

इथे बरांडीची पिवळी तपकिरी माती नजरेला पडत होती. खुल्या शेताच्या कपाळावर दूरवर गेलेल्या अलंगांच्या आठचा उमटल्या होत्या. त्याच्यापलिकडे एकेकाळच्या कर्वटकामाच्या खुणा उमटलेले झिलाणसुद्धा ती तुटलेली सडकसुद्धा, माणसांचा वावर झाल्याची, हातातील काम टाकून दिल्याची बोलकी साक्षच होती. रानाच्या कडपट्टीवरील जमीन मात्र डोळचांना एक निरानंद कटू चित्र दाखवीत होती.

मोकोवच्या गिरणीतील एकेकाळचा नोकर इवान अलेक्सिएविच ऑगस्ट महिन्यात एक दिवस शेजारील खेडचात गेला. त्या खेडचात पहिल्या वर्गाच्या

मालगाडीचा तळ पडलेला होता. दिवस कलेपर्यंत इवान अलेक्सिएविच परत आला नाही. आपल्या अलंगाकडे वाट काढीत येताना तो अचानक झाकार कोरोलयोवच्या अंगावर आदळला. झाकार जवळजवळ धावतच होता. निरुद्देश हातवारे करीत होता. धावताना त्याची समशेर वाळूच्या पोत्यांच्या कडांना अडकत होती. त्याला जाऊ देण्यासाठी इवान अलेक्सिएविच वाटेतून बाजूला झाला. पण त्याच्या फर्गोलाचे बटण झाकारने पकडले आणि आपले काविळी डोळे गरगरा फिरवीत तो कुजबुजला, "ऐकलं नैस ? आपल्या उजवीकडच पायदळ निघून चाललंय. आघाडी सोडून चाललेत म्हणावं का काय ?"

शिशाच्या काळ्या रसाप्रमाणे निश्चल झालेली झाकारची काळीकुळकुळीत दाढी बेशिस्त लोंबत होती. त्याच्या डोळ्यात एक वखवखलेलं आर्त होते.

"आघाडी सोडून चाललेत म्हणजे ?"

"ते निघून चाललेत. कशासाठी माहीत नाय !"

"कदाचित त्यांना बदलत असतील. जुमलेदारांकडं जाऊन पाहू या काय ते !"

झाकार मागे वळला. निसरड्या ओल्या मातीत घसरत धडपडत ते जुमलेदाराच्या अलंगाकडे गेले.

परंतु एका तासात पायदळ स्क्वाड्रनच्या जागी आले आणि स्क्वाड्रन गावच्या दिशेला लागले. दुसऱ्या दिवशी सकाळी त्यानी आपली घोडी घेतली. आणि पिछाडीकडे त्यांची सक्तगीर घोडदौड चालू झाली.

बारीक रिमझिम पडत होती. बर्चची झाडे खिन्नपणे वाकली होती. सडक रानात लुप्त झाली. ओलीचा, गळून पडलेल्या पानांचा कुजट उग्र वास हुंगत घोडी खिकाळत तेजीने दौडत होती. धाराधूत गुलाब गुटिकांच्या गुलाबी माळा लोंबल्या होत्या. धवल मालमंडीची फेनील शिरोभूषणे अलौकिक शुभ्रतेने झळकत स्वारांच्या अंगावर वाऱ्याने झाडावरून टपोऱ्या दाणेदार थेंबांचा शिडकावा होत होता. ओल्या थेंबांनी त्यांचे फर्गोल आणि टोप्या अशा काळपटून गेल्या होत्या की जणूकाही गोळ्यांनी त्यांची चाळणच केलेली आहे.

"आपल्या मानगुटा पकडून उगाचच इकडं तिकडं आपल्याला भिरकावतात ते !"

"अलंगाची हौस फिटली नाय वाटतं ?"

" पण खरच, आपल्याला पाठीवतायत् तरी कुठं ?"

" काय तरी नवा डाव रचायचा असल !"

" तसं काय दिसत नाय."

" चला भाऊ, चुट्टा ओढू या. न् कटकटी विसरू या !"

" माझ्या कटकटी मी माझ्या दुलंगीतच भरल्यात !"

" कॅप्टन साहेब, गाणं म्हटलं तर चालेल का ?"

" म्हण म्हणाला ? तर हाण आरखिप !"

पहिल्या रांगेतल्या कुणीतरी खाकरून घसा साफ केला. आणि तो गाऊ लागला–

" चाकरी लष्करी करून आले कझाक परतुन घरी
माकुले खांदियावरी लागली रांग कुसांची उरी"

दमट आवाजांनी मरगळून गाण्याचे सूर ओढले आणि मग निःशब्द झाले. इवान अलेक्सिएविचच्या रांगेतच जाणारा झाकार कोरोतियोव रिकीबीत उठून उभा राहिला. आणि कुचेष्टेने गरजला " अरे ए रडत रावांनु ! आपल्यात असं गातात होय ? गिरीजाधरापुढं थाळच्या घेऊन उभे रहा न् लाझरचं गाणं म्हणा ! दळे साले !"

" तू म्हण की !"

" त्याची गर्दन भलतीच थिटी आहे. आवाजाला तिथं जागाच नाय !"

" गमजा मारल्या ! आता शेपूट घालतोय !"

उवांनी भरलेल्या आपल्या दाढीची काळी लगड कोरोलियोवने मुठीत पकडली. क्षणभर डोळे मिटून घेतले. आणि मग धिटाईने लगाम नाचवीत सुरवातीचे शब्द भिरकावले.

डॉन तिरीचे कझाक शूर हो मजा करुनी घ्या पुरी

त्याच्या दुमदुमत्या पहिल्या ओळीने जणू काय जागे झाल्यासारखी स्क्वाड्रननं गर्जना ठोकली.

किरत ही मर्दुमकीची खरी !
चिब रानातून रानवाटेवरून ते गाणे उधळले गेले
धडा घालुनी सवंगड्यांना द्यावा शौर्याचा
बंदूकीने कसा पाडतो मुडदा गनिमाचा
सुटती गोळ्या परि न मोडते रांग शिस्तवार
हुकूमाचा तो शब्द तेवढा येई कानावर
हुकूम सोडती जसे आमुचे मायबाप कप्तानं
तसे चालतो गनिम काढतो टिपतो गोळी नं !

गात गात सगळी दौड झाली. 'लांडग्यांची मसणवट' म्हणून ज्याला ते म्हणत त्या अलंगापासून सुटल्याच्या आनंदात ती झाली.

त्याच दिवशी संध्याकाळी ते गाडीत बसले. गाडी पस्कोवकडे फरफटत चालली होती. तिसरी मजल संपल्यावरच त्यांना हे कळले की, तिसऱ्या रिसाल्याच्या इतर विभागांबरोबर त्यांची रवानगी पेत्रोग्रादला भडकलेल्या दंगली दडपून टाकण्यासाठी होत आहे. ह्यानंतर संभाषणे शांत पडली. लाल डब्यात एक तर्ह शांतता पसरली.

" आगीतून उठून फुफाट्यात !" लंबुटांग्या बोरशेवने सर्वांचे मत अखेरीस प्रकट केले.

फेब्रुवारीपासून स्क्वाड्रन समितीचा स्थायी अध्यक्ष असणारा इवान अलेक्सि-एविच पहिल्याच विश्रामावर स्क्वाड्रन कमांडरकडे गेला.

" कॅप्टनसाहेब, कझाक काळजीत पडलेत !"

इवान अलेक्सिएविचच्या हनुवटीवरील खोल खळगीकडे कॅप्टनने बराचवेळ टक लावून पाहिले आणि मग स्मित करीत तो म्हणाला,

" गड्या रे, मी स्वतःच काळजीत पडलोय !"

" आम्हाला कुठं चालवलय ?"

" पेत्रोग्रादला !"

" दंगली मोडायला ?"

" तुला काय वाटतं ? दंगलीला मदत करायला चाललोय आपण ?"

" आम्हाला हेही नकोय न् तेही नकोय !"

" आपलं मत कोणी विचारीत नाही ! "

" पण कझाक . . ."

" कझाकांचं काय ?" आता चिडून गेलेल्या अंमलदाराने विचारले. "कझाकांना काय वाटतं ते मला स्वतःला ठाऊकाय. हे काम काय मला मोठं प्यारं असं वाटतं ? हे घे न् वाचून दाखव स्क्वाड्रनला. मग पुढच्या स्टेशनावर मी कझाकांशी बोलीन !"

घडी घातलेला तारेचा कागद कमांडरने त्याच्या हाती दिला. आणि उघड नावड प्रकट करीत तो डब्यातील खारवलेले चरबटलेले मांस खाऊ लागला.

इवान अलेक्सिएविच आपल्या डब्याकडे परतला. जळते कोलीत धरल्यागत त्याने हातात तो तारेचा कागद धरला होता.

" दुसऱ्या डब्यातील कझाकांना बोलवा."

गाडी हालली होती. पण कझाक उड्या मारून इवानच्या डब्यात आले. सुमारे तीस कझाक तिथे जमा झाले.

" कमांडरने ही तार वाचायला दिल्येय !"

" काय काय लिहलंय त्यात ? वाच !"

" बोलणं कमी कर . . . वाच !"

" शांततेबद्दलाय !"

" ऐका रे"

सरसेनापती कोर्निलोव ह्यांचा जाहिरनामा त्या गाढ शांततेत इवान अलेक्सिएविचने मोठ्याने वाचला.

तार खरडललेला तो कागद घामेजल्या हातांनी धरला आणि तो ह्या हातातून त्या हातात फिरू लागला.

मी सुप्रीम कमांडर इन चीफ कोर्निलोव सर्व देशापुढे हे जाहीर करीत आहे की, माझे सैनिकाचे कर्तव्य, स्वतंत्र रशियाचा नागरिक म्हणून माझी निष्ठा, आणि देशावरील माझे सर्वोच्च प्रेम ह्यामुळे पितृभूच्या जीवनातील ह्या गंभीर क्षणी मला हंगामी सरकारच्या आदेशांची अंमलबजावणी करण्याला नकार देणे भाग

पडत असून त्यामुळे लष्कर आणि आरमारातील सर्वोच्च अधिकार माझ्या हाती तसेच ठेवणे भाग आहे. ह्या निर्णयात सर्व आघाडीवरील सेनानींचा पाठींबा मला असून मी सर्व रशियन जनतेला हे जाहीर करीत आहे की, सुप्रीम कमांडर इन चीफच्या जागेवरून मला बेदखल करण्यापेक्षा मी मरण पत्करीन. रशियन जनतेची सच्ची अवलाद नेहमी आपल्या जागेवर मरेल आणि आपला सर्वोच्च ठेवा म्हणजे आपले प्राण तो पितृभूसाठी समर्पित करेल.

दोन्ही राजधान्यांच्या वाटा आमच्या फत्तेयाब गनिमाच्या विजयी आगेकुचीला मोकळ्या पडलेल्या आहेत. अशा या आमच्या जिंदगीच्या अत्यंत खतरनाक घडीला आपल्या देशाच्या स्वातंत्र्याच्या जंगी प्रश्नाचा विसर पडून हंगामी सरकार प्रतिक्रांतिकारकांच्या काल्पनिक खतऱ्याने लोकांना भेडसावित असून राज्य करण्याची आपली नालायकी, आपली दुबळाई, आपला धरसोडपणा ह्यातून हा खतरा ते वाढवीत आहेत.

आपली सगळी उमर लोकांची नि:स्वार्थ चाकरी करण्याला मी वाहिलेली आहे. आणि लोकांच्याच रक्ताची मी अवलाद आहे. तेव्हा जनतेच्या तरफ आझादीचा, लोकांच्या महान भवितव्याचा बचाव न करणे हे माझ्यात नाही. आजकाल हे भवितव्य कमताकद आणि बेहिम्मत हाती आहे. लाचखाऊपणा आणि निमक–हरामी करून रशियन जनतेची आझादीच नव्हे तर मूळ अस्तित्वच बरबाद करणारा बेशरम शत्रू हे स्वत:चेच घर असल्याप्रमाणे आपल्या घरात वावरतो आहे. रशियन जनते, जागी हो, आणि देश कोणत्या अथांग गर्तेत कोसळत आहे तिकडे नजर टाक !

सर्व प्रकारच्या दंगली टाळून, सर्व रशियन रक्तपात चुकवून एकमेकांच्या शिवीगाळीकडे दुर्लक्ष करून आणि त्यांच्याकडून होणारी माझी नालस्ती आणि लाचारी विसरून मी हंगामी सरकारला उद्देशून म्हणत आहे, "माझ्याबरोबर लष्कराच्या अव्वल ठाण्याकडे या. तिथे मी शपथेवर तुमच्या आझादीची आणि सुरक्षिततेची हमी देतो. तिथे माझ्याबरोबर राष्ट्रीय बचावाची अशा प्रकारची आखणी आणि संघटना करा की जेणेकरून आझादी सुरक्षित राहील. आणि बलिष्ठ आणि आझाद जनतेला साजेशा महान भवितव्याकडे रशियन राष्ट्राचे नेतृत्व करता येईल."

जनरल कोर्निलोव

पुढच्या स्टेशनवर गाडी थोडा वेळ थांबवण्यात आली. कोर्निलोवकडून आलेली तार आणि कोर्निलोव हा देशद्रोही आणि प्रतिक्रांतीकारक आहे असे जाहीर करणारी स्क्वाड्रन कमांडरने वाचून दाखवलेली केरेन्स्कीकडून आलेली तार ह्यावर गप्पा मारीत कझाक आपल्या डब्याबाहेर गोळा झाले होते. कझाक परिस्थितीवर अबरगतीने चर्चा करीत होते. आणि खुद्द अंमलदारही गोंधळून गेले होते. "डोक्यात सगळं गुत्ताड होऊन गेलंय, त्यातला कोण चूक ते सैतानाला दखल !"

" ते एकमेकांच्या नरड्याला झटतायत आणि परवड मात्र आपली !"

" अंमलदारांचा माज उताला आलाय !"

" प्रत्येकजण कुरघोडी करायला बघतोय."

" भांडण बुजुर्गांचं न् कांडण कझाकांचं !"

" चांगलाय बट्याबोळ !"

कझाकांचा एक घोळका इवान अलेक्सिएविचकडे आला आणि त्यांनी गळ घातली, "कमांडरकडं चल, आपण काय करायचं ते कळून घेऊ या !"

सगळे मिळून जुटीने स्क्वाड्रन कमांडरकडे गेले. त्याच्या डब्यात अंमलदारांची बैठक भरली होती. इवान अलेक्सिएविच आत गेला.

" कॅप्टनसाहेब आम्ही काय करायचं असं कझाक विचारतायत् !"

" मी आलोच बाहेर एक मिनिटात !"

टोकाच्या डब्याजवळ सगळेच्यासगळे स्क्वाड्रन वाट बघत होते. कमांडर त्या घोळक्यात शिरला. रेटारेटी करीत तो मध्यावर आला. आणि हात उंचावून म्हणाला " आपण ताबेदार आहोत ते केरेन्स्कीचे नव्हे तर सरसेनापतीचे आणि आपल्या वरच्या वरिष्ठांचे. काय बरोबर आहेनं ? तेव्हा प्रश्नच नाही की आपण वरिष्ठ अधिकाऱ्यांचे हुकूम पाळलेच पाहिजेत न् पेत्रोग्राडला गेलं पाहिजे. शेवटचा इलाज म्हणजे आपण ज्ञो स्टेशनावर पोचलो की तिथं आपण पहिल्या डॉन डिव्हिजनच्या सेनानींना भेटू अन् काय हालहवाल आहे ते शोधून काढू. भडकून जाऊ नका असं माझं तुम्हाला सांगणं आहे. आपल्यावर ही अशी वेळ आलेली आहे."

सैनिकाचं कर्तव्य, देशसेवा आणि क्रांतीवर तो कमांडर मग बडबडत राहिला. कझाकांना शांत करण्याचा त्याचा प्रयत्न होता. त्याच्या प्रश्नांना तो उडवाउडवीची उत्तरे देत होता. त्याने आपले इप्सित गाठले. तो कझाकांबरोबर बोलत असताना

एक इंजिन गाडीला जोडण्यात आले. (स्टेशनमास्तरला पिस्तुलांनी धमकावून प्रयाणाची दोन अंमलदारांनी त्वरा केल्याचे कझाकांना कधीच कळले नाही). माणसे आपापल्या डब्यांकडे पांगली.

सैनिकांची गाडी ञो स्टेशनावर पोचायला एक दिवस लागला. उसुरी आणि दाघेस्तावची रेजिमेंट घेऊन एक गाडी त्यांच्या अंगावरून पुढे गेली तेव्हा रात्री ह्यांची गाडी परत थांबवण्यात कझाकांची गाडी सायडींगला टाकण्यात आली. दाघेस्तानचे डबे त्यांच्या अंगावरून खडखडत गेले तेव्हा गर्द काळोखात एकादा दिवा इकडे तिकडे मिणमिणत होता. घोगरे आवाज, 'झुर्नाज' चे आर्त सूर आणि अनोख्या सुरावटी त्यांच्या कानावर पडल्या.

मध्यरात्री ते स्क्वाड्रन हालले ते लहानसे एंजिन बराचवेळ पाण्याच्या पंपाजवळ उभे होते. त्याच्या चुलीतून ठिणग्या खाली पडत होत्या. ड्रायव्हर आपल्या डब्यातून बाहेर वाकून चुट्टा फुकीत होता. जसा काही कुणाची तरी वाट बघत होता. अगदी जवळच्या डब्यातून एका कझाकाने डोके बाहेर काढले आणि तो ओरडला,

"अरे ए गावरील, चल हाकल नायतर आम्ही घालतो गोळ्या."

ड्रायव्हरने चुट्टा थुंकून टाकला थोडावेळ तो काहीच बोलला नाही.

"सगळ्यांनाच काय गोळ्या घालता येणार नाहीत तुम्हाला." असे म्हणून तो खिडकीतून आत चढला.

त्यानंतर काही मिनिटांनी एक धक्का देऊन इंजिन सुरू झाले. त्यामुळे जोडसाखळ्यांची खळखळ सुरू झाली. आणि डब्यात आपला तोल सावरायला धडपडणाऱ्या घोड्यांच्या टापांचा खडखडाट सुरू झाला. पाण्याचा पंप, काही उजळलेल्या खिडक्या आणि गर्द बर्च वृक्ष ह्यांच्या अंगावरून गाडी मंदगतीने पुढे सरकू लागली. कझाकांनी घोड्यांना वैरण दिली आणि ते झोपले. एखाददुसरा जागा असलेला कझाक अर्धवट उघड्या दारात बसून चुट्टा ओढीत होता. भव्य अस्मानाकडे नजर लावून स्वतःच्या विचारात गुंगला होता.

कोरोलिवोवच्या बाजूला इवान अलेक्सिएविच पडला होता. दाराच्या फटीतून झपाट्याने मागे जाताना दिसणाऱ्या चांदण्याकडे तो टक लावून बघत होता. दिवसभर तो परिस्थितीवर विचार करीत होता. पेत्रोग्राडकडे स्क्वाड्रन जाण्याला आपल्या हाती असलेल्या सर्व साधनानिशी प्रतिबंध करायचा अश्या खंबीर निर्णयाला तो पोचला होता. आपली विचारसरणी कझाकांना कशी पटवून द्यावी ह्याचा तो पडल्या पडल्या विचार करीत होता.

कोर्निलोवच्या जाहिरनाम्याच्याही आधी त्याने हे ओळखले होते की कोर्निलोवचा मार्ग हा कझाकांचा मार्ग नव्हे. तरीही अंतःप्रेरणेने त्याला इषारा दिला

होता की, केरेन्स्कीचा बचाव करणेही त्यांचे काम नव्हे. त्याने त्या प्रश्नावर परत परत विचार केला. आणि असा निश्चय केला की, हे स्क्वाड्रन पेट्रोग्राडला जाऊ द्यावयाचे नाही. कुणाशी चकमक झडायचीच असेल तर ती कोर्निलोवशीच झाली पाहिजे. तरीही ती केरेन्स्कीच्या बाजूने नको. त्याच्या सरकारसाठीही नको तर त्याच्या मागोमाग जो उठावणी करेल त्याच्या बाजूने हवी. केरेन्स्की गेल्यावरच आपण ज्याची इच्छा करतो ते सरकार येईल, ह्याबद्दल त्याला बालंबाल खात्री होती. उन्हाळ्यात तो पेट्रोग्राडमधील पक्ष कार्यकारी समितीच्या लष्करी विभागात होता. स्क्वाड्रन कमांडरबरोबर उपस्थित झालेल्या तंट्याबाबत सल्ला देण्यासाठी त्याला स्क्वाड्रनने पाठविले होते. तिथे त्याने समितीचे काम पाहिले होते. अनेक बोल्शेव्हिक कॉमरेड्स बरोबर तो बोलला होता. त्याला वाटलं, "ह्या मणक्यावर आमच्या कामगारांच्या मासाचे अस्तर चढू द्या. मग ते खरं सरकार होईल!" मर इवान पण त्याला लगट. पोर आईच्या थानाला लगटतं तसा लगट."

ज्याच्या मार्गदर्शनाखाली हा दुष्कर नवीन मार्ग त्याला गवसला होता, त्या माणसाबद्दलचे विचार दुलंगीवर पहुडल्या पहुडल्या त्याच्या मनात परत परत येत होते. आणि आतापर्यन्त अनुभवाला न आलेली धगधगीत आत्मीयता त्याच्याबद्दल इवान अलेक्सिएविचला वाटत होती. उद्या कझाकांना काय सांगायचं ह्याचा विचार करता करता कझाकांबद्दल स्तोकमन काय म्हणाला ते त्याला आठवले. डोक्यात ठाण मांडून बसलेले ते शब्द त्याने परत परत घोळले. "स्वतः कझाक हाडाचे सनातनी आहेत. बोल्शेव्हिक कल्पनांचं सत्य त्यांच्या मनावर ठसवताना हे मर्म विसरू नको. सावधगिरीने विचारपूर्वक वाग अन् परिस्थितीशी जमवून घे. तुला न मिशा कोशेवोईला माझ्याबद्दल जसा पहिल्यांदा तिरस्कार वाटत होता तसाच त्यांना तुझ्याबद्दल वाटेल. पण ते मनावर घेवू नको. जिद्दीनं छिन्नी चालवीत रहा. अंतिम यश आपलंच आहे.

कोर्निलोवकडे जाऊ नका म्हणून कझाकांचे मन वळवितांना ते काही हरकती घेतील हे इवान अलेक्सिएविचने मान्य केले.

पण दुसऱ्या दिवशी सकाळी आपल्या डब्यातील साथीदारांबरोबर तो जेव्हा बोलू लागला आणि आघाडीकडे आम्हाला परत पाठवा अशी त्यांनी मागणी करावी, स्वतःच्या भावाशी लढायला पेट्रोग्राडला जाऊ नये असे जेव्हा स्वतः सुचविले तेव्हा कझाकांनी खुषीने संमती दिली आणि पुढे पेट्रोग्राडकडे प्रवास करण नाकारण्याची त्यांची पूर्ण तयारी होती.

झाखार कोरोल्योव आणि चेर्निशेवस्कोच खेड्यातील तुरिलीन नावाचा कझाक इवान अलेक्सिएविचच्या दृष्टिकोनाला सर्वात जवळचे होते. दिवसभर एका डब्यातून दुसऱ्या डब्यात जात ते इतरांशी बोलत होते. संध्याकाळी

एका आडवाटेच्या स्टेशनातून गाडी हळू हळू सरकत असताना तिसऱ्या जुमल्यातील कार्पोरल पशिनिचनिकोव उडी मारून इवानच्या डब्यात आला.

"पुढच्या पहिल्याच स्टेशनात स्क्वाड्रन गाडीखाली उतरवण्यात येणार आहे." इवान अलेक्सिएविचकडे पाहून तो किंचाळला. कझाकांना काय हवय ते तुला ठाऊक नसेल तर कसला अध्यक्ष? आमची बनवाबनवी पुरे की! आम्ही आता मुळीच यापुढे जाणार नाही. अंमलदार आमच्या नरड्याभोवती फास टाकतायत. तू धड ना जनावर धड ना पाखरू! ह्यासाठी आम्ही तुला निवडून दिला होय? आँ? दात काय विचकतोस!"

"हे तू केव्हाच म्हणायला हवं होतंस!" इवान अलेक्सिएविचने हसून उत्तर दिले.

गाडी थांबल्यावर सगळ्यांच्या आधी तो उडी मारून खाली उतरला. आणि तुरिलिनला बरोबर घेऊन स्टेशनमास्तरकडे गेला.

"आमची गाडी पुढं पाठवू नको. आम्ही इथंच खाली उतरणार आहोत."

"काय?" त्या माणसाने भयभीत होऊन विचारले. "मला तुम्हाला पुढं पाठवायचा..."

"खामोष!" तुरिलिन त्याला अडवीत जबरेने म्हणाला. त्यांनी स्टेशन समिती शोधून काढली. समितीचा अध्यक्ष तांबडट केसांचा एक पुष्ट तारमास्तर होता. त्याला त्यांनी परिस्थिती समजावून दिली. थोड्याच मिनिटात एंजिन-ड्रायव्हरने खुषीने गाडी सायडींगला काढली.

कझाकांनी घाईघाईने डब्यापासून पक्क्या सडकेवर लाकडी तक्ते लावले. आणि ते आपली घोडी उतरवू लागले.

आपल्या काळपट चेहऱ्यावरील घाम पुशीत इवान अलेक्सिएविच इंजिन-जवळ तंगड्या सताड फाकून हसत उभा होता. स्क्वाड्रन कमांडर धावत त्याच्या-जवळ आला.

"तू काय चालवलयस? तुला ठाऊकाय..."

"ठाऊकाय!" त्याला अडवीत इवान अलेक्सिएविच म्हणाला, "बोंबलू नको बरं का रे कॅप्टनसाहेब!" त्याचा चेहरा विवर्ण झाला. नाकपुड्या फुगवून तो परखडपणे म्हणाला, "खूप ओरडलास पोरा! आता आम्ही हुकूम सोडणार आहोत. काय?"

" सरसेनापती कोर्निलोव . . ." तो अंमलदार तत पप करीत बोलू लागला' त्याचा चेहरा पांढरा फटक पडला. पण इवान अलेक्सिएविच सडकेवरील वाळूत जाम रोवलेल्या आपल्या बुटाकडे टक लावून बघत होता. हायसे वाटून त्याने हात झटकला आणि कॅप्टनला सल्ला दिला, "क्रुसाऐवजी त्याला आपल्या गळ्याला टांगून घे. आम्हाला तो कचरा आहे !"

तो अंमलदार टाचेवर फिरला आणि पळत पळत आपल्या डब्याकडे गेला.

तासाभरात, एकही अंमलदार बरोबर नसलेले पण अगदी शिस्तीत असलेले ते स्क्वाड्रन, नैऋत्येच्या दिशेने दुडक्या चालीवर निघून गेले. पहिल्या जमल्याच्या आघाडीला मशीनगनवाल्याबरोबर इवान अलेक्सिएविच अधिकाराने घोड्यावरून चालला होता. ठोसर तुरिलिन त्याचा सहाय्यक होता.

कमांडरकडून घेतलेल्या नकाशावरून वाट काढीत ते स्क्वाड्रन मुष्किलीने 'गोरेलोए' खेड्यात पोचले. आणि तिथे त्यांनी रात्रीचा मुक्काम टाकला.

सगळ्यांची सभा भरून असा ठराव झाला की, आघाडीकडे परत जायचे. कुणी त्यांना अडविण्याचा प्रयत्न केला तर लढत द्यायची.

घोडी ठाणबंद करून आणि पहारे बसवून पहाट होण्याची वाट बघत कझाक आडवे झाले. कोणताही जाळ पेटवण्यात आला नाही. बहुतेकांची मने खिन्न असल्याचे उघड होते. नेहमीच्या गप्पागोष्टी किंवा थट्टामस्करी न करता एकमेकां-पासून आपले विचार लपवून ते पडले होते.

"आपलं चुकलं असं वाटून हे परत गेले न् त्यांनी माना खाली घातल्या तर ?" आपल्या फर्गोलाखाली अंगाची जुडी करीत इवान अलेक्सिएविचच्या मनात सचिंत विचार आला. तो विचार जणू काही ऐकू आला असा तुरिलिन त्याच्या जवळ आला.

"झोपलास रे इवान ?"

"अजून नाय !"

तुरिलीन त्याच्या बाजूला उकिडवा बसला आणि चुट्टा पेटवून कुजबुजला, "कझाकांना काळजी वाटतेय . . . त्यांनी घाण केली न् आता घाबरलेत. चांगला बट्ट्याबोळ करून ठेवलाय आपण ! तुला काय वाटतं ?"

"बघू या आपण !" इवान अलेक्सिएविचने शांतपणे उत्तर दिले, "तू घाबरला नाहीस ना ? काय ?"

तुरिलिनने टोपी मागचे डोके खाजवले आणि तो कडवट हसला.

" तुला खरं सांगायचं तर घाबरलोय. आधी नाय घाबरलो पण आता जरा भय वाटतं."

" मुंगळा गुळाला चिकटलाय म्हण की !"

" त्याची ताकद जबरी आहे इवान !"

दोघेही बराच वेळ गप्प झाले. खेड्यातील दिवे विझले. कुठेतरी दूरवरच्या खाजणातील वळुंजीतून बदकांचा कलकलाट कानावर आला.

" जोडीदारणीला हाकरतोय !" तुरिलीन विचार करून कुजबुजला न् परत गुळणी धरून बसला.

मऊसूत रातवेळचा वत्सल निरवतेने कुरणरानाला आच्छादन घातले होते. दवाच्या भाराने गवत वाकले होते. केंदाळ, कोळपती लव्हाळी, चिखलाळ माती, आणि दवात न्हालेले गवत ह्यांचा संमिश्र गंध वाऱ्याच्या झुळूकेने कझाकांच्या नाकपुड्यात शिरत होता. मधूनच घोड्याचे पायबंद खळखळत होते. एखादे जनावर खाली बसले की, फुरफुरण्याचे, डुरकण्याचे आवाज येत होते. परत निद्रिस्त शांतता . . . . . रानबदकांचा दूरवरून अस्पष्ट ऐकू येणारा घोगरा कलकलाट, पाठोपाठ त्याच्या जोडीदारणीने दिलेली साद, अंधारात अदृश्य असलेल्या पंखांची झपाट्याची फडफड. रात्र. निःशब्दता. धूसर कुरणरानाचा ओलावा. पश्चिमेला अधांतरी एका उगवत्या ढगाचा गर्द नाफरमानी घोळ ओठंगला होता. आणि ५८स-कोवच्या प्राचीन भूमीच्या माथ्यावरील अंतराळात प्रशस्त पेटत्या मार्गासारखा पसरलेला आकाशगंगेचा पट्टा. एक अखंड जागते स्मरण होते.

पहाटेस स्क्वाड्रनने परत कूच केले. गोरेलोय खेड्यातून ते गेले. कुरणाकडे गुरे घेऊन जाणाऱ्या बायका पोरांच्या नजरा बराचवेळ त्यांच्या पाठीवर खिळलेल्या होत्या. पहाटेच्या प्रकाशात लालबुंद रंगात न्हालेल्या टेकाडावर ते चढून गेले. तुरिलिनची नजर सहज मागे वळली. इवान अलेक्सिएविचच्या रिकिबींना त्याने पायाने ठोसले. " वळून बघ ! आपल्या पाठीवर घोडेस्वार दौडत येतायत् !"

इवानने मागे खेड्याकडे नजर टाकली. गुलाबी धुराळ्याच्या उडत्या ढगाबरोबर तीन स्वार घोडी फेकीत येताना त्याला दिसले.

" स्क्वाड्रन ठैर जाव !" इवान अलेक्सिएविचने हुकूम सोडला.

आपल्या अंगवळणी पडलेल्या झपाट्याने कझाकांनी आपला करडा चौकोन तयार केला. सुमारे दोन सव्वादोन फर्लांग अंतरावर आल्यावर स्वारांनी दुडकी चाल घेतली. त्यापैकी एक कझाक अंमलदार होता. त्याने पांढरा हातरुमाल बाहेर काढून तो आपल्या डोक्यावर उंचावून हलवला. कझाकांच्या नजरा जवळ येणाऱ्या स्वारांवर एकटक खिळल्या होत्या. खाकी लांबकोट घातलेला कझाक अंमलदार आघाडीवर आला. बाकीचे दोघेजण सिरकासियन गणवेषात होते. ते जरा त्याच्या मागे राहिले.

आपला घोडा त्यांच्याजवळ नेत इवान अलेक्सिएविचने विचारले.

" आमच्याकडं काय कामाय ?"

" आम्ही बोलणी करायला आलोय." सलाम करीत अंमलदाराने उत्तर दिले. " स्क्वाड्रनचा ताबा कुणाकडे आहे ?"

" माझ्याकडे !"

पहिल्या डॉन कझाक डिव्हिजनचा मी मुखत्यार प्रतिनिधी आहे. न् हे अंमलदार नेटिव डिव्हिजनचे प्रतिनिधी आहेत. "लगाम खेचीत आणि घामाने निथळलेल्या आपल्या घोड्याची गर्दन थोपटीत अंमलदाराने खुलासा केला." परिस्थितीवर बोलणी करायला तुमची राजी असेल तर स्क्वाड्रनला पायउतार होण्याचा हुकूम द्या. डिव्हिजनचे कमांडर मेजर जनरल ग्रेकोव ह्यांची तोंडी सूचना मला तुम्हाला पोचती करायचीय !"

कझाक तसेच ते आलेले अंमलदार मध्यभागावर आले. स्क्वाड्रनने त्यांना जागा करून दिली. आणि आपले एक लहान कोंडाळे केले. कझाक अंमलदार आधी बोलले, " कझाकांनो आपण काय करतोय ह्याचा विचार करायला तुमची मनं वळवण्यासाठी न् तुमच्या कृत्याचे गंभीर परिणाम टाळण्यासाठी आम्ही इथं आलोत. काल डिव्हिजनच्या अधिकाऱ्यांना कळलं की कुणाच्या तरी गुन्हेगारी फूसलावणीला बळी पडलात आणि आपले आपण तुम्ही डबे सोडून बाहेर पडलात. तुम्ही द्नोव स्टेशनाकडं ताबडतोब परत या असं तुम्हाला बजावण्यासाठी आम्हाला धाडण्यात आलंय. नेटिव डिव्हिजनचे सैनिक अन् इतर रिसाला फौजांनी काल पेट्रोग्राडवर ताबा केलाय. तशा अर्थाची तार आज आम्हाला आल्येय. आमच्या बिनीच्या पथकांनी शहरात प्रवेश केलाय. सरकारी इमारती, बँका, तार कचेरी, टेलिफोन स्टेशन न् सगळ्या मोक्याच्या ठिकाणांचा कबजा केलाय. हंगामी सरकार पळून

गेलंय न ते उलथलंय. विचार करा कझाकांनो! तुम्ही आडात उडी घेताय. डिव्हिजनल कमांडरचे हुकूम तुम्ही पाळले नाहीत तर तुमच्या अंगावर सशस्त्र फौजा पाठविल्या जातील. तुमची वर्तणूक म्हणजे राजद्रोह, तुमचं लष्करी कर्तव्य पार पाडायला तुमचा इन्कार आहे असं मानलं जाईल. तुम्ही बिनशर्त शरण आलात तरच तुम्ही भाऊबदकीचा रक्तपात टाळू शकाल.

ते अंमलदार घोड्यावरून आले तेव्हा कझाकांची मनं ओळखून इवान अलेक्सिएविचने हे ताडले की, त्यांच्याबरोबर चर्चा सुरू करायची टाळणे शक्य नाही. कारण तसं केलं असतं तर त्याच्या इच्छेच्या अगदी विरुद्ध नतीजा झाला असता. स्क्वाड्रन जेव्हा पायउतार झाले. तेव्हा त्याने तुरिलिनला डोळा घातला. आणि हळूच तो त्या अंमलदारांना खेटून उभा राहिला. कॅप्टनचे बोलणे लक्षपूर्वक ऐकत उभ्या असलेल्या कझाकांची तोंडे उतरलेली, खिन्न होती. काही जणांनी आपसात कुजबूज सुरु केली. लोखंडाच्या रसाप्रमाणे काळी दाढी छाताडावर ओघळलेला झाकार कोरोल्योव कडवट हसत होता. बोश्चेव आपल्या चाबकाशी चाळा करीत डोळ्यांच्या कोपऱ्यातून बघत होता. पुढच्या पहिल्याच थांब्यावर आपण गाडीतून खाली उतरलं पाहिजे म्हणून ज्याने सूचना केली होती तो कार्पोरल असणारा प्शनिचनिकोव तोंडाचा 'आ' वासून थेट अंमलदाराकडे टक लावून बघत होता. गलिच्छ मुठीने मार्तिन शामील गाल चोळीत होता आणि डोळ्यांची झपाझप उघडझाक करीत होता. बागरोवचा पिवळट चेहरा त्याच्या पाठीमागून दिसत होता. मशिनगनवाला क्रासनिकोव शेसावून कपाळाला आठ्या घालून होता. तुरिलिन धपापत होता. तोंडावर शिबे असलेल्या ओबनिझोवने टोपी डोक्यावर मागे सारली होती. न् जोखड दिलेल्या बैलासारखा तो गर्दन वेळावत होता. जसा काही प्रार्थनेला उभा राहिल्यागत अख्खा दुसरा जुमला मान वर न करता उभा होता. चकारशब्द निघत नव्हता. गरम धपापत्या श्वासोच्छ्वासाचा तेवढा आवाज त्या दाटीवाटीच्या घोळक्यातून ऐकू येत होता. गोंधळाच्या सुप्त प्रवाहात सगळे चेहरे ढवळून निघाले होते.

कझाक शरण जाण्याच्या बेतात आहेत हे इवान अलेक्सिएविचने ओळखले. आणखी काही मिनिटे गेली असती की, ह्या मधुभाषी अंमलदाराने त्यांना आपल्या बाजूला ओढून आणले असते. काही वाटेल ते झाले तरी त्याने पाडलेली छाप पुसायलाच हवी होती. अद्याप ज्याला वाचा फुटली नव्हती पण कझाकांच्या मनात जो आकारला होता तो निर्णय फुंकून टाकण्यासाठी इवान अलेक्सिएविचने आपला

हात उंचावला आणि विस्फारलेल्या विलक्षण पांढऱ्या डोळ्यांनी त्या जमावाला झटका देऊन तो गरजला,

" भाऊ ! थोडं थांबा ! "

अंमलदाराकडे वळून त्याने विचारले, " ती तार तुमच्याजवळ आहे ? "

" कोणती तार ? " कॅप्टनने चकित होऊन विचारले.

" पेट्रोग्राड ताब्यात घेतले म्हणून कळवणारी तार ! "

" ती तार . . . अर्थात नाही आहे. त्या तारेशी काय करायचय ? "

" आहा ! तर ती तार ह्यांच्या जवळ नाही हं ! "

सगळया स्क्वाड्रनने सुटकेचा निःश्वास टाकला. अनेक कझाकांनी माना वर करून आपल्या नजरा आशाळभूतपणे इवान अलेक्सिएविचवर रोखल्या. त्यांचे लक्ष जरबेने खेचून घेत त्याने आपला घरघरीत आवाज चढवला. कुत्सितपणे आणि आत्मविश्वासाने तो गरजला,

" तार नाय म्हणतोस होय ? तर आम्ही तुझ्या शब्दावर विश्वास टाकायचा म्हण की ! थातुरमातूर बोलण्यानं आम्ही फसायचो नाय ! "

" लबाडी आँ ? " स्क्वाड्रनने एकसुरात गर्जना केली. " कझाकांनो, तार माझ्या नावावर नव्हती ! " अंमलदाराने आवर्जून छातीवर हात दाबला.

पण त्याचे कझाक ऐकून घेईनात. स्क्वाड्रनची सहानुभूती आणि विश्वास आपण परत मिळवल्याचे जाणवून इवान अलेक्सिएविचने हिऱ्याने काच कापावी असे म्हटले,

" अन् भले ती तुझ्याजवळ असती तरी आपले रस्ते वेगळे आहेत. आपल्याच माणसांशी आम्हाला लढायचं नाय. आमच्याच लोकांवर आम्ही चालून जायचं ? जमणार नाय. आता आम्ही दुधखुळे राहिलो नाय. सेनानीचं सरकार पायावर उभं करायला आम्ही हात देणार नाय. आहे ते असाय ! "

कझाकांनी ओरडून त्याला संमती दिली. जमाव हलला आणि आरोळ्या उठल्या.

" असं पाहिजे ! "

" भले जिरविली ! "

"बरोबऽऽर!"

"हाकल हे हुजूर!"

"मागणी घालायला आलेते भडवे!"

"पेट्रोग्राडमध्ये तीन रेजिमेन्टस् आहेत पण आपल्याच लोकांशी कसं लढावं असा त्याना प्रश्न पडलाय!"

"ऐकलंस रे इवान, मार गचांडी त्यांना!"

इवान अलेक्सिएविचने त्या जासूदांकडे नजर टाकली. ओठ घट्ट आवळून, तो कझाक अंमलदार चिकाटीने वाट बघत होता. त्याच्यामागे खांद्याला खांदा भिडवून बाकीचे 'पहाडी' उभे होते. त्यातला एक देखणा तरुण 'इंगुश' होता. हाताची घडी घालून तो उभा होता. त्याचे चिंचोळे बदामी डोळे चमकत होते. दुसरा प्रौढ वयाचा तांबडट केसांचा ओस्सेनियन होता. आपला हात समशेरीच्या मुठीवर टेकवून आणि बेफिकिरीने पाय फाकून तो उभा होता. कझाकांचे तो कुत्सित नजरेने निरिक्षण करीत होता. इवान अलेक्सिएविच पुढची चर्चा तोडून टाकण्याच्या बेतात होता. पण त्या कझाक अंमलदाराने त्याला आधीच थोपवले. त्या 'इंगुश' बरोबर काहीतरी कुजबूज करून तो खणखणीत आवाजात ओरडला;

"डॉन कझाकांनो! कडव्या डिव्हिजनच्या प्रतिनिधीला तुम्ही बोलून द्याल का?"

परवानगीची वाट न पहाता तो 'इंगुश' हळूच पुढे रिंगणात आला. त्याच्या बूटांना खिळ्यांच्या टाचा लावलेल्या नव्हत्या. चांदीने मढवलेल्या आपल्या अरुंद पट्ट्याशी तो अस्वस्थ चाळा करीत होता.

"कझाक भाऊ! एवढी शोर कशासाठी? कडवटपणा न ठेवता तुम्ही बात करायला हवी. जनरल कोर्निलोव तुम्हाला नकोयत? तुमाला जंग हवी? जशी तुमची मर्जी! आमी देऊ तुम्हाला जंग! आमी घाबरत नै! मुळीसुद्धा घाबरत नै! आजच आमी तुमीचा फन्ना उडवू. आमची पाटीवर दोन रेजिमेन्टस् असतात. मग? शोर कशासाठी? कशासाठी?"

वरकरणी शांतपणे त्याने बोलायला सुरवात केली होती. पण तो जसा बडबडू लागला तसे त्याचे शब्द अधिकाधिक त्वेषाने कोसळू लागले. त्याच्या स्वतःच्या भाषेतील वाक्ये धेडगुजरी रशियनमध्ये मिसळत होती. "तो तितला कझाक तुमाला हैरान करतोय! तो बाल्शेविक आहे. न् तुमी चालला त्याच्या पिछे!

मंग ? मंग ? मला काय देखता येत नै ? पकडो इसको, उतारलो इसके हथियार!"

त्याने धाडसाने इवान अलेक्सिएविचकडे बोट रोखले. त्या रिंगणावरून गर्रकन नजर फिरवली. त्वेषाने हातवारे करताना त्याचा चेहरा लालबुंद होऊन गेला होता. तांबडट केसांचा त्याचा ओसेनियन साथीदार बर्फासारखा थंड होता. त्याचा कझाक अंमलदार आपल्या पडदाळचाच्या गाठीशी चाळा करीत होता. कझाक परत चूप झाले. गोंधळून गेले. क्षुब्ध झालें. तो 'इंगुश' अंमलदार, त्याचे श्वापदासारखे झळकते पांढरे दात, त्याच्या डाव्या कानशिलावरील घामेजली करडी लकेर, इकडे रोखून टक लावून इआन अलेक्सिएविच बघत होता. एका शब्दात हे बोलणे संपवून आपण कझाकांना घेवून गेलो. असतो तो क्षण आपण दवडला ह्याची त्याला खंत वाटली. तुरिलिनने वेळ सावरली. आपले हात बेगुमानपणे नाचवीत त्याने रिंगणाच्या मधोमध झेप घेतली. आपला सदरा टर्रकन उघडा करीत तो गरजला,

"अरे सरपटत्या सापानो ! सैतानानो ! डुकरानो ! रांडासारखी हे भुरळ घालतायत् न् तुम्ही कान टवकारताय ! आपल्याला हवं तसं हे अंमलदार तुम्हाला करायला लावतील. तुम्ही काय चालवलय ? अरे, ह्यांची खांडोळी करायला हवीत. न् त्यांचं ऐकत उभं रहाताय ? मुंडचा छाटा त्यांच्या. त्यांचं रक्त काढा बाहेर. तुम्ही इकडं चऱ्हाट ऐकताना ते आपल्याला वेढा घालतायत. मशीनगननं ते आपली चटणी करतील ! त्यांनी खणाखणी चालू केल्यावर फार वेळ सभा घेता यायच्या नाहीत. त्यांचे सैनिक येईपर्यन्त ते आपल्या डोळ्यात धूळफेक करतायत्. हा – हा! अरे वारे कझाक ! झगे घाला झगे !"

"मांड घ्या !" इवान अलेक्सिएविच कडाडला. त्याच्या गर्जनेचा तोफ-गोळ्यासारखा जमावात स्फोट झाला. कझाकांनी आपल्या घोड्यांकडे धाव घेतली. एका मिनिटात स्क्वाड्रनचे 'जुमला सेफ' बनवण्यात आले.

"ऐका ! कझाकांनो !" कॅप्टन ओरडला. इवान अलेक्सिएविचने आपली काडबीन खांद्यावरून सोडवून घेतली. तिच्या घोड्यावर जाम बोट ठेवीत तो म्हणाला,

"बोलणी संपली ! आता तुमच्याशी बोलायचं झालं तर ह्या भाषेत !"

त्याने अर्थ व्यक्त करण्यासाठी काडबीन हलवली. जुमल्यामागे जुमला करीत ते खालच्या रस्त्याने गेले. मागे वळून पहाता त्यांना ते जासूद घोड्यावर स्वार

झालेले आणि आपसात बोलत असलेले दिसले. तो 'इंगुश' त्वेषाने बाजू मांडीत होता. पुन्हापुन्हा आपला हात उंचावत होता. त्याच्या दस्तमाळेची रेशमी किनखाप हिमशुभ्र चमकत होती.

इवान अलेक्सिएविचने अखेरचे मागे वळून पाहिले तेव्हा हा झगमगता रेशमी पट्टा त्याच्या नजरेला पडला आणि एकाएकी वाऱ्याने झोडपले जाणारे डॉनचे उर, त्यावरील फेसाळत्या हिरव्या लाटा आणि त्यांच्या माथ्यावरून तिरप्या गतीने झेपावणाऱ्या समुद्रपक्षाचे पांढरे पंख हे दृश्य त्याच्या डोळ्यापुढे उभे राहिले.

———

## १६

सशस्त्र फौजांनी सरकार उलथून टाकण्याचा प्रयत्न फसलेला आहे हे ऑगस्टच्या २९ तारखेला कोर्निलोवना क्रिमोवकडून येणाऱ्या तारांवरून समजले.

दुपारी २ वाजता क्रिमोवचे अहवाल घेवून एक अंमलदार अव्वल ठाण्यावर आला. त्याच्याबरोबर थोडावेळ संभाषण करून कोर्निलोवनी जनरल रोमानोव्हस्कींना बोलावून घेतले. एका कागदाचा हातात अस्वस्थपणे चोळामोळा करीत ते म्हणाले,

" सगळं साफ कोलमडलंय ! आमचं हुकूमी पान मारलं गेलंय. क्रिमोवला आपल्या फौजा पेट्रोग्राडला वेळेवर नेणं शक्य होणार नाही. न् आपली संधी वाया जाणाराय. जो गोष्ट सहज तडीला जाईल असं वाटंत होतं त्यात हजारो अडचणी भरल्यात . . . अपेश अटळ आहे. बघा . . . ह्या सैनिक गाड्यांची हलवाहलव बघा." क्रिमोवचा रिसाला आणि नेटीव डिव्हीजन ह्यांची पेट्रोग्राडच्या दिशेने प्रगती दाखवणारा नकाशा त्यांनी पुढे धरला. त्यांच्या तरतरीत, जागरणाने श्रांत झालेल्या चेहऱ्यावरून एक वेडावाकडा शहारा गेला." हे साले रेल्वे कामगार प्रत्येक पावलागणिक आमच्या पायात खोडा घालतायत्. ते हे विसरलेत की, आम्ही यशस्वी झालो की त्यातल्या प्रत्येक दहामागं एकाला मी जागच्या जागी फासावर लटकावीन. क्रिमोवचा अहवाल वाचा."

आपल्या थोराड हाताने स्वत:चा तेलकट सुजीर चेहरा थोपटीत रोमानोवस्की तो अहवाल वाचीत असता कोर्निलोवनी झपाट्याने लिहून काढले.

नोवोचेरकास्क डॉन कझाकांचे आतामन अलेक्सी माक्सिमोविच कालेदिन यांना,

हंगामी सरकारला तुम्ही पाठवलेल्या तारेची अर्थबोधकता माझ्या नजरेला आणण्यात आलेली आहे. बदमाश आणि राजद्रोही ह्याच्याबरोबर निष्फळ लढण्यात पराक्रमी कझाकांची सहनशक्ती संपत गेली आहे. देशाचा अटळ विनाश त्यानी टाळला आहे. त्यांच्या श्रमातून आणि रक्तातून वाढल्या–विस्तारलेल्या आपल्या मातृभूमीचे प्राण आणि स्वातंत्र्य ह्यांचा बचाव करण्यासाठी ते तयार आहेत. आपले संबंध काही काळ मर्यादित रहातील. आपण माझ्याशी रुजवातीने काम करावे अशी माझी आपल्याला विनवणी आहे. तुमची देशभक्ती आणि कझाकी प्रतिष्ठेची ही बाब आहे.

२९–८–१७
जनरल कोर्निलोव

त्यानी लिहिणे पूर्ण करून रोमानोवस्कीना ती तार ताबडतोब पाठवायला सांगितले.

" कूचाच्या शिस्तीने मजल चालू ठेवण्याचा हुकूम देणारी दुसरी तार मी राजे बाग्रातिओनला पाठवावी का ?"

"होय ! पाठवा."

रोमोवस्की मिनिटभर चूप होते. मग विचारपूर्वक बोलावे अशा सुरात म्हणाले,

"लाव्र गिओरगिएविच, माझ्या मते अजून आपल्याला निराश होण्याचं कारण नाही. घटना ह्या अशाच घडतील अशी अपेक्षा करण्यात तुमची चूक आहे . . . "

कोर्निलोव हात उंच करून आपल्या डोक्यावर फडफडणारे फुलपाखरू पकडायला बघत होते. त्यांची बोटे आवळत आणि उघडत होती. चेहरा अपेक्षेने अगदी ताणला गेला होता. आपल्या आजुबाजूने येणाऱ्या हवेच्या झोताला त्रासून ते फुलपाखरू उघड्या खिडकीकडे वळले. पण कोर्निलोवनी ते अखेर पकडलेच. मग सुटकेचा श्वास सोडीत खुर्चीत अंग टाकले.

आपल्या अभिप्रायाला मिळणाऱ्या उत्तराची रोमानोव्हस्की वाट बघत होते. पण त्यांना प्रतिसाद म्हणून कोर्निलोवनी खिन्न आणि उदास स्मित केले.

"काल रात्री मला स्वप्न पडले. स्वप्नात मी एका रायफल डिव्हिजनचा ब्रिगेड कमांडर होतो. कारपाथिअनमध्ये एका चढाईचे नेतृत्व करीत होतो. आमचे

अधिकारी रस्त्यावरच्या एका शेतवाडीशी थांबले. अगदी उत्तम पोषाख केलेला एक युक्रेनी आमचं स्वागत करायला बाहेर आला. त्यानं मला प्यायला दूध पुढं केलं. आपल्या पांढऱ्या फेल्टहॅट काढून हातात घेत अगदी सफाईदार जर्मनमध्ये तो मला म्हणाला, " प्या जनरल ! हे दूध असंतसं नाही. ह्यात विलक्षण औषधी गुणधर्म आहेत." स्वप्नात मला वाटलं की मी ते दूध प्यालो. तो युक्रेनी ओळखीच्या माणसासारखा माझ्या खांद्याना थोपटीत होता. त्याचं मला मुळीच आश्चर्य वाटलं नाही. मग आम्ही पर्वतावर भटकलो. तो आता कारपाथिअनसारखा दिसत नव्हता. कुठंतरी अफगाणिस्थानमध्ये आहोत असं वाटत होतं. एका गवंडीतून आम्ही चाललो होतो . . . हो, गवंडच होती ती . . . आमच्या पायाखाली पिंगट गारगोटचा न् गोटे सरकत होते. आणि खालच्या अंगाला घळीच्या तळाला चंदेरी उन्हात न्हालेला दक्षिणेचा तेजस्वी नजारा दिसत होता . . ."

खिडकीतून वाऱ्याची झुळूक आली. आणि मेजावरचे कागद विस्कटले गेले. कोर्निलोवची धूसर शून्य नजर कुठेतरी झेपरच्या पत्नीकडे, बेलाग उतारावर आणि किर्मजी हिरव्या कुरणावर भिरभिरत होती.

रोमानोवस्कीनी त्यांची नजर कुठे खिळल्येय ते पाहिले. नंतर त्यानी सूक्ष्म सुस्कारा सोडला आणि झेपरच्या आरस्पानी प्रशांत, अभ्रकासारख्या पृष्ठभागावर, जवळ येवून ठेपलेल्या पतझडीने विलक्षण कोमल झालेल्या धूसर शेताकडे आपली नजर वळवली.

———

# १७

पेट्रोग्राडवर स्वारी करण्यासाठी कॉर्निलोवने धाडलेल्या रिसाला फौज आणि नेटीव डिव्हिजनची निरनिराळी पथके आठ रेल्वे मार्गावरील आणि अधल्यामधल्या स्टेशनांवरच्या अफाट मुलूखावर विखुरली होती - रेवेल, वेश्येनबर्ग, नार्वा, यांबूर्ग, गार्नाचिना, सोमरिनो, विरित्सा, चुदोवा, ग्लोव, नोवगोरद, दनो, प्स्कोव, लुगा इथं ते विखुरले होते. सगळी मुख्य स्टेशने एवढेच नव्हे तर सायडिंग्जही मंदगतीने सरकणाऱ्या सैनिकी गाड्यांनी फुलून गेली होती. रेजिमेन्टस् वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्यांच्या नैतिक नियंत्रणापलीकडे गेली होती आणि विखुरलेल्या स्क्वाड्रनचा एकमेकींशी संपर्क उरला नव्हता. कोअर आणि नेटीव डिव्हिजन मिळून एक आर्मी तयार होत होती. तेव्हा काही बदल्या करणं किंवा विखुरलेल्या सैनिकांना एकत्र जमवून गाड्यांचे फेरगट तयार करणं आवश्यक होते. अशा परिस्थितीत वाटेवरील सूचनांतील बदल, फेरबदल, एकमेकांशी मेळ नसलेले हुकूम यामुळे गोंधळ जास्तच वाढला होता. आणि त्या कारणाने सैनिकांची आधीच ताणलेली आणि चंचल झालेली मनोवृत्ती जास्तच खालावत होती.

रेल्वे कामगारांच्या हट्टी विरोधाला तोंड देत, एकामागून एका अडचणींचे निवारण करीत कॉर्निलोवच्या फौजा पेट्रोग्राडच्या दिशेने मंदगतीने मजल दरमजल करीत होत्या. जंक्शनवर त्या साचत व परत पांगत.

सगळ्या कझाक मुलुखातून आलेले अर्धपोटी उस्सुरीयन, ओरेनबुर्गी, नेरचीन्स्की आणि आमूरस्की कझाक आणि नेटिव्ह डिव्हिजनचे इन्गुशी, सिरकास्सिअन, काबारदिनियन, ओस्सेतिन, दाघेस्तानी ह्यांनी लाल डब्यांच्या पिंजऱ्यातून त्यांच्या अर्धपोटी घोड्यांशेजारी दाटी झाली होती. सरकारी खलित्यांची वाट बघत गाड्या तासन् तास स्टेशनात खोळंबून रहात आणि माणसे डब्यातून बाहेर पाहून टोळधाडी सारखे स्टेशन व्यापून टाकीत. प्रतीक्षागृहात त्यांचे लोंढे वाहत किंवा सडकेवर जमा होत. आधी गेलेल्या गाड्यातून उरलेसुरलेले ते खाऊन टाकीत रहिवाशांच्या चोऱ्या करीत. अन्नाची कोठारे लुटीत.

कझाकांच्या पाटलोणींचे पिवळे आणि तांबडे पट्टे राउतांचे भपकेदार शिवणींचे चपकन, पहाडी लोकांचे निमे . . . उत्तरेच्या विनित निसर्गदृश्याने रंगाची एवढी समृद्ध जडण कधी पाहिलेली नव्हती.

२९ ऑगस्टलाच राजे गागारिन ह्यांच्या हाताखालील नेटिव डिव्हिजनच्या तिसऱ्या ब्रिगेडच्या शत्रूशी गाठ पडली. गाडीचे रुळ उखडून टाकल्याचे कळल्यावर इन्गुश आणि चिरकॅसियन रेजिमेन्टस् गाडीतून खाली उतरल्या आणि त्सारस्कोए त्सेलोच्या दिशेने त्यांनी पायी कूच केले. इन्गुश रेजिमेन्टचे नजरबाज सोमरिनो स्टेशनापर्यन्त गेले. ह्या दोन रेजिमेन्टस् रखवालीच्या फौजांना हळूहळू मागे रेटीत उरलेल्या रेजिमेन्टची वाट बघत वेळ काढीत होत्या. पण हुकूमाची वाट बघत त्या रेजिमेंटस् द्नोमध्येच बसल्या होत्या. काही रेजिमेन्टस् तर त्याही स्टेशनापर्यंत पोचल्या नव्हत्या.

नेटिव डिव्हिजनचा कमांडर राजे बग्रतिओन हा स्टेशनाजवळील एका वाडीत उरलेल्या पथकांची जमवाजमव होण्याची वाट बघत होता. विरित्सापर्यन्त जाण्याचा धोका पत्करण्याला तो तयार नव्हता.

२८ तारखेला उत्तर आघाडीच्या ठाण्यावरून त्याला पुढील तारेची नक्कल आली.

तिसऱ्या डिव्हिजनच्या कमांडला आणि पहिली डॉन उस्सुरी, कॉकेशस नेटीव डिव्हिजनच्या अधिकाऱ्यांना सरसेनापतींचा पुढील हुकूम बजावा. जर काही कारणपरत्वे गाड्या रुळावरून पुढे जाऊ न शकल्यास सरसेनापतींचा असा हुकूम आहे की पुढील कूच पायी करण्यात यावे.

२७ ऑगस्ट १९१७, क्रमांक ६४११

रोमानोव्हस्की

सकाळी ९ वाजता बग्रतिओन ह्याने कोर्निलोवला तारेने कळविले की सकाळी ६–४० ला पेट्रोग्राड क्षेत्राचा सेनानी मेजर बग्रातुनी ह्याच्यामार्फत केरेन्स्किचा हुकूम आला आहे. हुकूमात म्हटले आहे की, सगळ्या गाड्या मागे घ्याव्या, गाचकी जंक्शन ते ओरेदेज स्टेशनादरम्यान डिव्हिजनच्या सगळ्या गाड्या हंगामी सरकारच्या आदेशानुसार रोखण्यात आल्यात. कारण रेल्वे सिग्नल देत नाही.

कोर्निलोवचा पुढील निर्णय त्याच्याकडे आला होता :—

राजे बग्रातिओन यांस,

रेल्वे मार्गाने कूच चालू ठेवा.

रेल्वे मार्गाने येणे शक्य नसल्यास लुगापर्यंत पायी जाणे आणि तिथे जनरल क्रिमोवच्या मुखत्यारीने वागणे.

तरीही बग्रातिओन पायी जायला धजला नाही. त्याने डबे भरण्याचा हुकूम दिला.

डॉन कझाक डिव्हिजन बनविणाऱ्या रेजिमेन्टस् बरोबरच येवगेनी लिस्त-निस्तकीने ज्यात पूर्वी कधीतरी चाकरी केली होती ते रेजिमेन्ट रेवेल-नार्वा रेल्वेमार्गाने पेट्रोग्राडकडे हलविण्यात आले. २८ ऑगस्टच्या संध्याकाळी ५ वाजता ह्या रेजिमेन्टस्ची दोन स्क्वाड्रन्स नार्वाला येवून पोचली. नार्वा पलीकडचा रस्ता उध्वस्त झाल्याने त्या रात्री पुढे मजल मारणे अशक्य आहे असे कमांडरला कळले. प्लेटी बसवणाऱ्या गटाला त्या जागेवर पाठवण्यात आले होते. आणि त्यांनी रस्ता वेळेवर दुरुस्त केल्यास दुसऱ्या दिवशी पहाटे गाडी पुढे जाणार होती. हे मान्य करणं कमांडरला भाग पडलं. शिव्या घालीत तो आपल्या डब्यात चढला. इतर अंमलदाराना त्याने ही वार्ता कळवली आणि तो चहा पिण्याला बसला.

रात्र ढगाळ होती, फिनलंडच्या आखाताकडून जोरदार झोंबणारे वारे वहात होते. रस्त्यावर आणि डब्यातून कझाक गप्पागोष्टी करण्यासाठी जमा झाले. गाडीच्या भोंग्याने अस्वस्थ झालेली घोडी लाकडी तक्तपोशीवर खूर आपटीत होती. गाडीच्या टोकाला एका तरूण कझाकाच्या आवाजात गाणे ऐकू येवू लागले. त्या अंधारात ते गाणे कसली तक्रार करीत होते कोण जाणे.

रे नगरा . . . रस्त्या . . . गावा . . .  
मज निरोप आता द्यावा.  
गे ठुमकठाकडे सजणी  
मज निरोप आता द्यावा.  
केसात माळली होती  
अस्मानिळी फुलवंती

सजणीच्या बाहुपाशी
दिनरात गुजरली खाशी
दिनरात उभा मी आता
घेऊन ही बंदूक हाता !

वखारीच्या कबऱ्या धुडापलीकडून एक माणूस बाहेर उगवला. तो थांबला आणि ते गाणे ऐकू लागला. पिवळ्या कडूशांत चकाकणाऱ्या रुळांकडे त्याने डाव्या-उजव्या बाजूला टेहळले. आणि खंबीरपणे ढांगा टाकीत तो डब्यांच्या दिशेने जाऊ लागला. रुळाखालील फळ्यांवर त्याच्या पावलांचा नाद ठसक्याने घुमत होता. पण दोन रुळमार्गांच्या मधून वाळूतून चालताना तो आवाज आवळल्यासारखा होत होता. शेवटचा डबा तो ओलांडून गेला तेव्हा डब्याच्या दारात उभा असलेला कझाक गायचा थांबला आणि त्याच्या दिशेने ओरडला,

"कोणाय ?"

"तुला कोण हवय ?" न थांबता त्या माणसाने नाराजीने उत्तर दिले.

"रात्रीचा कुठं भटकतोस ?"

"तुम्हा उडग्यांना चांगलं हाणतो आम्ही. कुठं काय राहून गेलंय ते बघतोयस होय ?" गाडीच्या मधल्या भागाशी येईपर्यंत तो माणूस चालत होता. मग गाडीच्या दारातून मुंडकं आत घालून त्यानं विचारलं,

"तुमचं कुठलं स्क्वाड्रन ?"

"कैद्याचं" कुणीतरी अंधारात हसले.

"नाय, मी खरंच विचारतोय !"

"आमचं दुसराय !"

"न चौथा जुमला कुठाय ?"

"पुढून सहावा डबा !"

सहाव्या डब्याच्या दाराशी तीन कझाक चुट्टे ओढीत होते. एक उकीडवा बसला होता. दुसरे उभे होते. आपल्या दिशेने येणाऱ्या माणसाला ते चुपचाप नजरत होते.

"कझाकांनु नमस्ते !"

" नमस्ते." नवाडचाचे तोंड न्याहाळीत त्यातील एकानें उत्तर दिलें.

" निकिता दुगिन जिवंताय ? तो इथाय ?"

" मी इथाय !" उकिडव्या बसलेल्या माणसाने उत्तर दिले आणि तो उठून उभा राहिला. टाचेखाली त्याने आपला चुट्टा चुरगळला. " पण मी तुला ओळखत नाय. तू कोणायस् ?" लांब कोट आणि मळकट सैनिकी टोपी घातलेल्या नवख्याचा चेहरा न्याहाळून बघण्याच्या प्रयत्नात त्याने आपले दाढीवाले तोंड पुढे घातले. एकाएकी चकीत होवून तो ओरडला, "इल्या ! बुनचुक ! कुठून उपटला यार तू ?"

बुनचुकचा केसाळ हात हातात घट्ट पकडून त्याच्यावर ओठंगत तो जरा शांतपणे म्हणाला,

" ही आपलीच माणसं आहेत. तुला भ्याचं कारण नाय. तू इथं कसा आलास ! बोल साल्या बोल !" इतर कझाकांशी बुनचुकने हस्तांदोलन केले आणि बद्द लोखंडाचा व्हावा तशा आवळलेल्या खर्जाच्या आवाजात त्याने उत्तर दिले,

" मी पेट्रोग्राडहून आलोय. तुम्हाला सगळीकडं शोधीत होतो. कामाय ! आपल्याला बोलायला हवं. तू सहीसलामत धडधाकट आहेस हे बघून आनंद वाटला भाऊ !"

तो हसला. त्याच्या रुंद, जाड भुवयांच्या चेहऱ्याच्या चौकोनात त्याचे शुभ्र दात झळकले. आवरून धरलेल्या आनंदाने त्याचे डोळे चमकत होते. "बोलायचं म्हणतोयस होय ?" त्या दाढीवाल्या कझाकाचा आवाज आश्चर्याने चढा झाला. " तू अंमलदार ! आमच्या स्क्वाड्रनला हेटाळत नंस ? मेहेरबानी ! इल्या पोरा, देव तुझं भलं करो. दयाळूपणाची वागणूक आम्हाला माहितच नाय." त्याच्या आवाजात भाबड्या करमणूकीचा सूर होता.

त्याच आपुलकीच्या सुरात बुनचुकने उत्तर दिले. " आता तुझी थट्टा पुरे झाली. दाढीनं गाठली ढेरी तरी सुचतेय मस्करी."

" दाढी काय आत्ता भादरतो. पण पेट्रोग्राडमध्ये काय चाललंय ते आम्हाला सांग. बंडाळी सुरू झाली ?"

" आपण आत जाऊ या." बुनचुकने आश्वासित सुचविले.

ते डब्यात चढले. दुगिनने कुणाला तरी पावलाने ठोसले आणि तो कुजबुजला " उठा रे पोरांनु ! हवा असलेला पाहुणा आलाय, उठा ! आटपा लवकर.....

जल्दी !" कझाकांची चाळवाचाळव झाली. आणि ते उठले. तंबाखू आणि घोड्याच्या घामाचा वास येणाऱ्या दोन थोराड हातानी अंधारात बुनचुकचा चेहरा चाचपडला. आणि विचारले, " बुनचुक ?"

" मीच तो ! तू चिकामासोव काय रे ?"

" मीच तो. गड्या भेटलास ! खुषी झाली. पळत जाऊन तिसऱ्या जुमल्या-तली पोरं घेऊन येवू का ?"

" वा ! झकास !"

तिसऱ्या जुमल्यातील जवळ जवळ माणूस न माणूस आला. फक्त दोघेजण घोड्यांजवळ थांबले. कझाक बुनचुकजवळ गेले. आपल्या राकट हातात त्यांनी त्याचे हात पकडले. त्याच्या अंगावर ते रेलले. कधी बुनचुक कधी इल्यामित्रिच, तर कधी इल्याशा म्हणून त्याला साद घालीत. कंदीलाच्या उजेडात त्याचा थोर ड कोमेज-लेला चेहरा त्यांनी न्याहाळला. त्या सगळ्या आवाजात आपुलकीचे, मैत्रीचे स्वागत होते.

डबा कोंदटून गेला. लकडभिंतीवर उजेडाचे गोळे नाचत होते. वेड्यावाकड्या सावल्या हेलावत पसरत होत्या. धुरातून कंदिलाचा मेणचट उजाळा पडला होता.

त्यांनी बुनचुकला कंदिलाकडे तोंड करून बसविले. आणि त्याच्याभोवताली त्यांनी दाटी केली. जे अगदी जवळ होते ते टाचांवर उकिडवे बसले. बाकीचे दाट कोंडाळे करून उभे होते. दुगिन खोकला.

" इल्या मात्रिच, आम्हाला तुझं पत्र अलीकडेच मिळालं. पण तरी आम्हाला तुला भेटायचं होतं. न् काय करायचं त्यावर तुझा सल्ला घ्यायचा होता. आम्हाला पेट्रोग्राडला पाठवतायत्. काय करणार !"

" त्याचं असं आहे मित्रिच," दाराजवळ उभा असलेला एक कझाक म्हणाला. त्याच्या कानाच्या सुरकुतलेल्या पाळयातून कडे लोंबत होते. वरंडीच्या पत्र्यावर पाणी उकळवायला मना करून ज्याचा लिस्तनित्सकीने पाणउतारा केला होता, तोच हा माणूस होता. " कुठले कुठले चळवळे आमच्याकडे येतात. पेट्रोग्राडकडे जाऊ नका म्हणून आमची मनं वळवायला बघतात. म्हणतात आम्ही आपसात लढायला नकोय. हे असं सगळं सांगत्यात. आम्ही त्यांचं ऐकून घेतो. पण त्यांच्या-बरही आमचा तसा विश्वास नाय. ती माणसं परकी. आम्हाला आपली भलत्याच वाटेने घेवून जायची, कुणाला दखल ? पेट्रोग्राडला जात नाय म्हटलं तर कोर्निलोव

आमच्या अंगावर त्याच्या नेटिव डिव्हिजन घालणार, त्यातून रक्तही सांडायचं. पण तू आमच्याचसारखा कझाक आहेस. आमचा तुझ्यावर जास्त विश्वास आहे. पितरहून तू आम्हाला लिहलंस ही मोठीच मेहेरबानी. आम्हाला वर्तमानपत्रं पाठवलीस . . . खरं तर आम्हाला चुट्टयाच्या कागदाची चणचण होती . . ."

"ए ठोंब्या, काय बडबड लावल्येस ?" दुसरा एकजण त्याला अडवीत रागाने म्हणाला, "तुला वाचता येत नाय तेव्हा तुझ्या डोक्यात तोच विचार. पण आम्ही सगळे काय तुझ्यासारखे नाय. आम्ही जसे काय वर्तमानपत्र फक्त चुट्टे करायलाच वापरतो ! आम्ही ती पहिल्या पानापासून शेवटच्या पानापर्यन्त वाचतो. इल्या मित्रच !"

"साला थापा मारतोय."

"म्हणे चुट्टयाला कागदाची चणचणाय ! काय पण बोलणं !"

"पोरांनु, माझ्या म्हणण्याचा तसा अर्थ नाय. कानात कडी घातलेला कझाक दिलगिरीने म्हणाला. आम्ही अर्थात आधी ती वाचतो . . ."

"तुम्ही स्वतः वाचलीत ?"

"मला लिहाय्‌वाचायला कुठं शिकायला मिळालंय ? माझ्या म्हणण्याचा मतलब असा की, आम्ही मिळून ती वाचली. मग चुट्टयासाठी वापरली . . .

कझाकांना त्याहाळीत बुनचुक किंचित हसला. बसून बोलणे त्याला कठीण वाटू लागले म्हणून तो उठून उभा राहिला. कंदिलाकडे त्याने पाठ केली आणि तो हळूहळू प्रयत्नपूर्वक बोलू लागला,

"पेट्रोग्राडमध्ये तुम्हाला करण्यासारखं काय नाय. तिथं कोणतीही बंडाळी झालेली नाय. तिथं तुम्हाला कशाला पाठवतायत ठाऊकाय ? हंगामी सरकार उलथून टाकावं म्हणून. न्‌ तुमचं पुढारीपण कोण करतोय ? झारचा जनरल कोर्निलोव. केरेन्स्कीला तो लाथ मारून का हाकलतोय ? त्याच्या जागी त्याला स्वतःला बसायला हवं म्हणून. ऐका कझाकानु, तुमच्या मानेवरचं लाकडी जोखड त्यांना काढून टाकायचंय. पण त्या जागी ते लोखंडाचं जोखड लादतील ! दोन अरिष्टातून इष्ट ते तुम्हाला पत्करायचय. होय का नाय ? तुम्ही स्वतःच काय ते ठरवा. झारच्या राज्यात तोंडात मारून वेत तुम्ही लढायला जात होता. आता कुणी तुमच्या तोंडात नाथ मारणार. पण केरेन्स्कीनंतर सत्ता बोलशेव्हिकांकडे आली की सगळं बदलणार आहे. बोल्शेव्हिकांना लढाई नकोय. ते सत्तेवर आले तर

ताबडतोब शांतता येईल. मी केरेन्स्कीच्या बाजूनं नाय. तो गेला फाफलत ! ते सगळे एकाच वाणाचे आहेत !" त्याने स्मित केले. कपाळावरचा घाम हाताने निपटला आणि तो पुढे बोलू लागला, "पण तुम्हाला आळवतो की कामगारांचं रक्त सांडू नका. कोर्निलोव सत्तेवर आला तर रशियात कामगारांच्या रक्ताच्या नद्या वहातील. त्याच्याकडून सत्ता छिनावून घेणं न् श्रमणाऱ्या लोकांच्या हाती ते देणं जास्त कठीण होऊन बसेल."

"इल्या मित्रिच, जरा थांब !" असे म्हणत बुनचुकसारखाच ठोसर बांध्याचा एक कझाक मागच्या रांगातून उभा राहिला. तो माणूस खोकला. त्याने आपले हात चोळले. तो लांबलचक आणि जुन्यापुराण्या सिलसुपारीच्या धाराधूत मूळासारखा होता. नव्हाळीच्या, हिरव्याकंच चिकणचोपड्या पानांसारख्या हसऱ्या डोळ्यांनी बुनचुकला नजरत त्याने विचारले, "आत्ता तू जोखडाबद्दल कायतरी बोलितलस. पण बोल्शेव्हिक राज्यावर आल्यावर ते कसले जोखड आमच्या मानेवर घालणारैत ?"

"काय बोलतोस ? स्वताचा स्वताच जोखड घालून घेणारैस काय ?"

"स्वताचा स्वता म्हणजे ?"

"अरे, बोल्शेव्हिक राज्यावर आले तर सरकार कुणाच होणार ? तू निवडून आलास तुझं. नायतर दुगिनच. नायतर ह्या इथं बसलेल्या मामाच्च होणार ? ते निवडून दिलेलं सरकार सोव्हिएटांचं सरकार. समजलं !"

"पण सगळ्यांच्या डोक्यावर कोण बसणार ?"

"परत जो निवडून येईल तो. तुला निवडून दिलं तर तू सगळ्यांच्या डोक्यावर !"

"आरं तिच्या ! तू मस्करी नाय ना करत मात्रिच !"

कझाक हसले आणि एकदम सगळेच बोलू लागले. दारावर ठेवलेल्या पहाऱ्यावरचा रखवालदारसुद्धा क्षणभर त्यांना सामील होण्यासाठी आला.

' पण जमिनीचं काय करायचा त्यांचा विचाराय ?"

"आपल्या जमिनी कुणी काढून घेणार नाय !"

"ते लढाई थांबवतील ? एखादवेळी ती आपली बोलाची गोष्ट असंल. आम्ही त्यांच्यासाठी लढावं असं त्यांना वाटत असंल !"

" आम्हाला खऱ्याला समरून काय ते सांग."

" इथं आम्ही सगळे अंधारात आहोत !"

" परक्या माणसावर विश्वास ठेवणे धोक्याचं. वावड्यातर खूप उडतायत!"

" काल कुणीतरी खलाशी केरेन्स्कीसाठी रडत आलाता. त्याच्या झिज्या धरून त्याला डब्याबाहेर हाकलला."

" अरे प्रतिक्रांतीकारकांनो !" येडपट ओरडत होता.

" त्याच्या ह्या लंब्याचीडच्या शब्दाचा आम्हाला काय बोधच होत नाय!"

बुनचुक एकदा इकडे एकदा तिकडे वळत होता. डोळ्यांनी कझाकांचा अंदाज घेत होता. ते गप्प होईपर्यन्त थांबला होता. हाती घेतलेले कार्य तडीला जाते का नाही त्याबद्दल त्याला सुरवातीला वाटणारी धाकधुकीची भावना गेली होती. कझाकांची मने ओळखून त्याने हे पक्के जाणले की, काहीही झाले तरी सैनिकांची गाडी नार्वाला थांबविण्यात येणार. पहिल्या डॉन डिव्हिजनच्या कझाक पथकातून चळवळीचे काम करावे असे त्याने स्वतः पेट्रोग्राड प्रदेश समितीला जेव्हा आदल्या दिवशी सुचविले तेव्हा त्याला यशाची पक्की खात्री होती. पण नार्वाला आल्यावर त्याची आशंकेने चलबिचल झाली होती. कझाकांशी त्यांच्याच भाषेत बोललं पाहिजे हे त्याला ठाऊक होते. आणि आपल्याला हे जमणार नाही अशी त्याला भीती वाटत होती. कारण नऊ महिन्यांपूर्वी आघाडी सोडल्यापासून तो फक्त कामगारातच मिसळत होता. आणि परत एकदा त्यांच्या सवयी आणि त्यांच्या बोलण्याची धाटणी त्याने आत्मसात केल्या होत्या. त्यांच्याशी बोलताना हा भाव त्याच्या अंगवळणी पडून गेला होता की, आपले म्हणणे समजावून देण्याला एक शब्द पुरेसा आहे. पण इथे त्याच्या मुलुखातले कझाक होते. त्यांच्याशी बोलताना वेगळयाच अर्धवट विसरून गेलेल्या भाषेची–काळीच्या भाषेची–गरज होती. पालीचे चापल्य, एका विलक्षण श्रद्धेचे सामर्थ्य ह्यांची गरज होती. निव्वळ जाळ भडकवता येवून इथे भागणार नव्हते. अवज्ञा दाखवण्याची युगांची भीती नष्ट करण्यासाठी, अज्ञानाच्या भिंती उखडून टाकण्यासाठी, त्यांचे बरोबर आहे ही भावना कझाकात रुजवण्यासाठी आणि त्यांना पुढे घेवून जाण्यासाठी इथे अग्नी चेतवायला हवा होता.

कझाकांशी बोलायला सुरवात केली तेव्हा प्रथम आपल्या आवाजात अडखळता बुजरेपणा आहे हे त्याच्या ध्यानात आले. आपले रुपक शब्द जणू आपणच

ऐकतोय असा कृत्रिम भाव त्याला जाणवला होता. आपल्याच युक्तिवादातील बुळेपणा पाहून तो टरकला होता. शब्द शोधण्यासाठी त्याने मेंदूला वेदना होईतो ताण दिला होता. पण त्याच्या तोंडातून साबणाच्या फुग्यांसारखी पोकळ वाक्ये बाहेर पडली. खच्ची झालेल्या फसव्या विचारांचा त्याच्या मनात गुंता होऊन गेला होता. घामाने डबडबून धापा टाकताना त्याच्या मनात येत होते,

" ही प्रचंड कामगिरी माझ्यावर सोपवलेली आहे न् मीच माझा सत्यानाश करून घेतोय. शब्दच नीट जुळत नाहीत . . . मला काय झालंय ? दुसरा कुणी असतो तर हजारपटीने चांगला बोलला असता. हात्तिच्या मारी ! काय मूर्ख आहे मी . . . !"

जोखडाबद्दल त्याला ज्या कझाकाने प्रश्न केला त्या प्रश्नाने त्याला खुळचट बुळेपणातून बाहेर खेचले. दिलेल्या उत्तरानंतर जे भाषण त्याने केले त्यामुळे त्याला स्वत:ला सावरून घेण्याची संधी मिळाली. शक्तीचा एक विलक्षण ओघ त्याला जाणवला. स्वच्छ, तीक्ष्ण, धारदार शब्दांचे समृद्ध भांडार त्याला गवसले. त्याला उत्साह चढला. थंडपणाच्या अविर्भावाखाली त्याने आपला क्षोभ लपविला. प्रश्नांना धडाकून, भेदक उत्तरे दिलीं. आणि संभाषणाचा ओघ असा फिरवून घेतला की जसा काही बिनवजवलेला घोडा स्वाराने काबूत आणावा.

" बरं हे सांग घटनासमिती वाईट आहे का ?"

" तुमच्या लेनिनला तर जर्मनांनी पाठवलाय ना ? नाय ? मग त्याला कुठनं आणलात तुम्ही ?"

" मित्रिच, तू स्वत: होऊन आलास का त्यांच्या सांगण्यावरून आलास ?"

" कझाकांच्या जमिनी ते कुणाला देणारैत ?"

" झारच्या राज्यात काय वाईट होतं ?"

" मेंशेविकही लोकांच्याच बाजूनं आहेत ना ? "

" आमची स्वत:ची सैन्य परिषदाय न् लोकांच सरकाराय. आम्हाला सोव्हिएटा कशाला हव्यात ? " कझाकांनी विचारले.

एकामागून एका प्रश्नाचा त्याने समाचार घेतला.

मध्यरात्र उलटून गेल्यावर ती लहानशी सभा समाप्त झाली. दोन्ही स्क्वाड्रन्सना बोलावून सकाळी सर्वसाधारण सभा घेण्याचे ठरले.

बुनचुकने रात्र डब्यातच काढली. त्याने आपले ब्लँकेट पांघरावे असे चिकामासोवने त्याला सुचविले.

त्या कझाकाने अंगावर क्रुसाची निशाणी केली. आणि आडवा होत त्याने बुनचुकला बजावले, " इल्या मित्रिच, आपण कुठ झोपतोय याची तुला फिकीर नाहिसं दिसतय . . . . पण आम्हाला माफ कर. उवांनी खाऊन टाकलय आम्हाला तुला त्यांचा त्रास झाला तर चिडू नकोस. आम्हाला इतका वीट आलाय की बदकाच्या अंडचाएवढचा मोठ्या होईस्तो आम्ही त्यांना वाढवल्यात ... ..." तो क्षणभर गप्प होता. मग शांतपणे त्याने विचारले, बुनचुक, लेनिन कुठल्या माणसातलाय ? म्हणजे त्याचा जन्म कुठं झाला ? लहानाचा मोठा तो कुठं झाला?

" लेनिन ? तो रशियनाय ! "

" आँ ? "

" खराय, तो रशियनाय ! "

" नाय भाऊ ! तू इथं चुकतोयस ! त्याच्याबद्दल तुला फारशी माहिती नाहीशी दिसतय ?" जरा आगाबुपणाच्या सुरात चिकोमासोव म्हणाला, " तो कुठलाय ते तुला ठाउकाय ? तो आपल्याच रक्ताचा आहे. तो डॉन कझाकातलाय सालस्की जिल्हयात तो जनमला. वेलिकोक्नियाझ्येस्काया गावचा आहे तो . . ... समजलं ? असं म्हणितात की तो सैन्यांत बंधानी म्हणून होता. त्यांचा चेहराच सांगतोय. खालच्या खोऱ्यातल्या कझाकांसारखाच तो–गालाचं थोराडहाडपेर-तसेच ते डोळे . . . . ! "

" तू कुठं ऐकलंस ? "

" कझाक बोलत होते ते ऐकलं. "

" नाय चिकामासोव, तो रशियनाय. त्याचा जन्म सिबिर्स्क प्रांतात झाला."

" माझा तुझ्यावर विश्वास नाय. अगदी मुळीच नाय. बुगाचोव कझाका–तलाच का नाय ? न स्तेनका राझीन ? न एर्माक तिमोफिएविच ? तसाच तो ! सगळे कझाकायत ! झारविरूद्ध गरिबांची उठावणी केली ते सगळे कझाकच होते. न तू म्हणतोस की तो म्हणे सिबिर्स्कचा आहे ! असली भाषा ऐकणंही नामुष्कीच आहे मित्रिच . . . . "

स्मित करून बुनचुकने विचारले,

" तो कझाकाय असं म्हणतात होय ? "

" तो कझाकच ! फक्त सध्या तो तसं सांगत नाय. त्याचा चेहरा पाहिल्याबरोबर मी ओळखीन. "

चिकामासोवने चुट्टा पेटविला आणि कडकडीत तंबाखूचा उग्र गंध त्याने बुनचुकच्या तोंडावर सोडला. विचारात गढून तो खोकला. " अर्थात हो आश्चर्याची गोष्ट त्यावरून आमची भांडणं झाली. अगदी गुद्दागुद्दीवर आलो. जर हा ब्लादिमिर इलिच जर कझाकांपैकी असंल – जर बधानी असंल – तर त्यानं हे एवढं ज्ञान कुठं मिळवलं ? असं म्हणीतात की लढाईच्या सुरुवातीला त्याला जर्मनांनी कैद केलं होत. तिथ तो हे सगळं शिकला. पण त्यांच्या कामगारांना जेव्हा तो बंड करायला लावायला लागला न त्यांच्या विद्वानांना जेव्हा त्यानं मागं टाकलं तेव्हा ते जाम टरकले. " चल फताडडोक्या ! " जर्मन त्याला म्हणीतले. " येशूशपथ जा तुझ्या लोकांकडं !" आम्हाला असं भंडावलयस की आमच्यान काय आवरत नाय आता ! न म्हणून त्याला रशियाकडं पाठवला. कारण त्यांना भीती वाटली की हा आपल्या कामगारांना उठवायचा !" आहा ! तो सुळका आहे ! भाऊ आहे !" शेवटचे शब्द फुशारकीने उच्चारून चिकामासोव अंधारात सुखावून हसला. " रे मित्रिच, तू त्याला कधी पाहिला नैस ना ?"

" नाय ? अरारा ! त्याची डोई म्हणीत्यात अगडबंबाय !" तो खोकला आणि त्याने नाकपुड्यांतून धुराची कबरी सुरनळी सोडली. चुट्टा संपवून तो म्हणाला, " बायांना आणखी अशी पोरं व्हायला पायजेत. अरे एक काय असे कित्येक झार तो उलथून टाकंल." थोडा वेळ थांबून तो म्हणाला,

" छे ! मित्रिच ! माझ्याशी वाद घालू नको. ब्लादिमीर इलिच कझाकाय! तुला कशाला शक येतोय ? असली माणसं सिबिर्स्कमधून येत नसतात !"

" बुनचुक गप्प होता. त्याच्या तोंडावर हसू होते. बराच वेळ त्याचा डोळा लागेना. उवांचा तांडा त्याच्या डोक्यावर चढला होता. त्याच्या सदऱ्याच्या आत जळजळीत खाजेने वेदना होत होत्या. चिकामासोवने सुस्कारा सोडला आणि कुशी खाजवल्या. अस्वस्थ घोड्याच्या खिकाळण्याने झोप पळून गेली. त्याचा परत डोळा लागला होता. एवढ्यात घोडी भांडू लागली. खूर आपटू लागली. दुष्टाव्याने खिकाळू लागली.

" च्यायला ! हर्रर्र . . . हर्रर्र . . . ! हाततिच्या आयला !"

ताड्कन उठत डुगिन पेंगल्या आवाजात ओरडला. न् जवळच्या घोड्याला त्याने हाताला लागलेल्या दणकट हत्याराने हाणले.

बुनचुक ह्या कुशीच्या त्या कुशीला होत होता. आपण टक्क जागे आहोत हे जाणवून त्याला संताप येत होता. उद्याच्या सभेचा तो विचार करू लागला. अंमलदारांच्या प्रतिकाराला कोणते स्वरुप येईल त्याची कल्पना करण्याचा तो प्रयत्न करू लागला. आणि रुक्षपणे त्याने स्मित केले. " कझाकांनी एकजुटीने निषेध केला तर ते कदाचित पळून जातील. पण कुणास ठाऊक ! तसंच झालं तर नगर-लष्कर समितीशी बोललेलं बरं." अजाणता त्याला १९१५ च्या ऑक्टोबर महिन्यातील हमल्याचा एक प्रसंग आठवला. आपण ओळखीच्या, रुळलेल्या वाटेला लागलो ह्या जाणीवेने जणू आनंदून त्याचा मेन्दू आवर्जून आठवणींचे तुकडे जुळवू लागला. मेलेल्या रशियन आणि जर्मन सैनिकांचे चेहरे आणि त्यांची हिडीस अवस्था सरमिसळ आवाजातील बोलणी, कधीतरी पाहिलेल्या निसर्ग दृश्याचे रंगहीन काळाने विटलेले कपडे, कोणत्यातरी कारणाने बोलायचे राहून गेलेले विचार, उडत हत्यारांचा अस्पष्ट प्रतिध्वनी, मशिनगन्सचा परिचित दुरटा, तोफांचा खळखळाट, अगदी कळ यावी इतकी सुंदर टिपेच्या आवाजातील सुरावट, एकेकाळी जिच्यावर त्याने प्रेम केले होते त्या स्त्रीच्या मुखाची अंधूक रुपरेषा, परत युद्धाचे कपटे, मुडदे, सामाईक थडग्यांचे दबलेले उंचवटे . . .

तो उठून बसला आणि म्हणाला किंवा कदाचित त्याच्या मनात केवळ विचार आला.

" मरेपर्यन्त ह्या आठवणी मी वाहून नेणाराय. केवळ मीच नव्हे तर ह्यातून जगतील वाचतील त्या सर्वांना त्या वाहून न्याव्या लागणारायत्. आमचं सगळं जीवनच विछिन्न . . . शापित ! थू: त्यांच्यावर ! थू: ! मेलेतरी त्यांची पापं धुतली जायची नाहीत ! . . ."

मग त्याला १२ वर्षांची लुशा आठवली. लुशा त्याच्या मित्राची मुलगी· पेत्रोग्राडमध्ये धातू कामगार असणारा हा त्याचा मित्र युद्धात ठार झाला होता. त्याच्याबरोबर तुला इथं त्यानं काही दिवस काम केले होते. एक दिवस दुतर्फा वृक्ष असलेल्या रस्त्याने तो चालला होता. ती हाडे निघालेली रोगट मुलगी बाकावर बसली होती. आपल्या हडकुळ्या तंगड्या खुशाल पुढे पसरून ती चुट्टा ओढीत होती. तिचा चेहरा सुकलेला होता. डोळे श्रांत होते. कोपऱ्यांना कटू मुरड पडलेले तिचे रंगवलेले ओठ अकाली पक्व झाल्यासारखे वाटत होते. " काका, मला ओळखलं नाहीत ?" धंदेवाईक स्मित करीत तिने विचारले आणि ती उठून उभी राहिली. मान खाली झुकवून आणि बुनचुकच्या बाहूटचात डोके खुपसून ती दुःखाने आणि असहाय्यपणे रडू लागली.

दाटून आलेल्या विखारी द्वेषाने त्याने दात ओठ रगडीत हुंकार भरला. आणि तो छाती चोळीत बसला. ती द्वेषभावना त्याच्या उरात जणू खंगरासारखी खदखदत होती. त्यामुळे त्याला धड श्वासही घेता येईना. त्याच्या काळजातून तीव्र कळ उठली.

पहाटेपर्यंत त्याचा डोळा लागला नाही. पहाटेच तो रेल्वे कामगार समितीकडे गेला. तो पिवळट आणि नेहमीपेक्षा जास्तच खिन्न दिसत होता. कझाक सैन्याची गाडी नावाबाहेर नेऊ नका म्हणून त्याने त्या समितीचे मन वळवले. मग तासाभराने त्याने नगरलष्कर समितीचे सहाय्य मिळावे म्हणून ती शोधून काढली.

आपल्या कामगिरीच्या संभाव्य यशाने किंचित आनंदून तो गाडीकडे परतला तेव्हा आठ वाजले होते. त्या अवघ्या शरीराला सकाळचा कोमट गारठा जाणवत होता. वखारीच्या गंजलेल्या छपरावरून ऊन उतरले होते. आणि एका बाईचा सुरेल, दाणेदार, लयबद्ध आवाज येत होता. पहाटेपूर्वी थोडा वेळच पण सडसडून न् मुसळधार पाऊस कोसळून गेला होता. रस्त्यावरची रेताड माती भिजून आणि लहान लहान ओहळानी रेघाटून गेली होती. तिला चिबपणाचा गंध येत होता. पावसाच्या थेंबटयांनी तिच्यावर पडलेले खळगे मातान्या वणांसारखे अजून तसेच होते.

डब्यांना वळसा घालून जाताना लांबकोट आणि चिखलाने बरबटलेले उंच बूट घातलेला एक अंमलदार त्याच्या दिशेने आला. कॅप्टन कालिमकोवला बुनचुकने ओळखले आणि त्याची वाट बघत आपली गती त्याने किंचित मंदावली.

कालिमकोव जवळ आला आणि थबकला. त्याचे चिंचोळे काळे डोळे थंडपणे चमकले.

"कोण कार्नेट बुनचुक ? अजून तू मोकळाच आहेस ? माफ कर. तुझ्या हातात हात देता येत नाही."

त्याने ओठ घट्ट आवळून घेतले आणि हात खिशात खुपसले.

"मीही तुझ्या हातात हात देण्याची तयारी केली नव्हती, तू उगाच घाई केलीस बोलायची ?" बुनचुक कुचेष्टेने म्हणाला.

"इथं काय करतोयस ? कातडी बचावतोयस ? का . . . का तू पेट्रोग्राडहून आलास ? केरेन्सी महाराजांकडून आलास का काय ?"

"ही उलटतपासणी का काय ?"

"कधी एकेकाळी सहकारी असलेल्या पळपुटयाच्या खुशालीबद्दलच हे निव्वळ सार्थ कुतूहल आहे !"

बुनचुकने हसू तसेच ठेवून खांदे उडवले.

" काळजी करू नको. मी काही केरेन्स्कीकडून आलो नाही."

" पण आता संकटाशी सामना असताना तुमची भाऊक एकी झाल्येय हं !"

ते काही असो. तू आहेस कोण ? माकुल नाहीत सैनिकाचा लांबकोट घातलायस !" बुनचुकची किंचित पोक आलेली आकृती कालिमकोवने तिरस्काराने आणि अनुकंपेने नजरली. " राजकारणी फिरस्ता आँ ? बरोबर ओळखलं का नाय ?" उत्तराची वाट न पहाता टाचेवर वळून ढांगा टाकीत तो चालता झाला.

डब्यात आपली वाट बघत दुगिन बुनचुकला आढळला.

" कुठं गेलातास ? सभा सुरुही झाल्येय."

" सुरू झाल्येय म्हणजे ?"

" म्हणजे तेच ! पेट्रोग्राडला गेलेला आमचा स्क्वाड्रन कमांडर कालिमकोव आज सकाळी परत आला. त्यानं कझाकांची सभा बोलावल्येय. त्यांच्याची बोलायला आताच तो गेलाय.

कालिमकोवला पेट्रोग्राडला केव्हा पाठवण्यात आले ते शोधून काढण्यासाठी बुनचुक काही मिनिटे थांबला. तो एका महिन्यापूर्वी गेल्याचे दुगिनने त्याला सांगितले. ''बाँब हल्ल्याचा अभ्यास करण्याच्या निमित्ताने कोर्निलोवने पेट्रोग्राडला पाठवलेला क्रांतीचा एक वैरी म्हणजे त्याचा स्वत:चा निष्ठावान अनुयायी असला पाहिजे." दुगिनबरोबर सभास्थानाकडे जाताना त्याच्या मनात अंधूक विचार आला.

वखारीच्या पलीकडे कझाकांचे फर्गोल आणि लांबकोटांचे हिरवे कबरे थाप कडे होते. मध्यभागी अंमलदारांच्या रिंगणात एका पिंपावर उभा राहून कालिमकोव कडाडून आणि ठासून ओरडत होता.

" . . . विजयी अखरीकडं चला. त्यांचा आपल्यावर विश्वास आहे. आपण तो विश्वास खरा करू या. आता जनरल कोर्निलोवकडून कझाकांना आलेली तार मी वाचून दाखवणार आहे."

विनाकारण धांदल करीत त्याने आपल्या फर्गोलातून एक चुरगळलेला कागदाचा ताव बाहेर काढला. आणि गाडीच्या कमांडंटशी तो काहीतरी कुजबुजला.

बुनचुक आणि दुगिन तिथे येवून कझाकात मिसळले; "प्यान्या कझाक दोस्तांनो!" कालिमकोवने विवशतेने आणि काहीशा जोशाने वाचले. "रशियन राज्याच्या सीमा रुंदावल्या आणि विस्तारल्या त्या तुमच्या बापजाद्यांच्या हड्डीवरच ना?

रशिया महान झाला तो तुमच्या महान मर्दुमकीनं. तुमच्या पराक्रमाच्या शर्थीनं, तुमच्या त्यागानं आणि शौर्यानंच ना? शांत डॉनच्या आझाद बच्चांनो, कुबानच्या फेसाळत्या तेरेकच्या देखण्या योध्यांनो, उराल्स, ओरेनबुर्ग, आस्माखान, सेमिरेचेन्स्की, आणि सैबेरियन मैदान, गिरिकंदर दूरवरचा ट्रान्सबैकाल, आमूर आणि उस्सुरीच्या झेपावत्या गरूडांनो, तुमच्या ध्वजेची इज्जत आणि किरत ह्यांचा तुम्ही नेहमी बचाव केलेला आहे. तुमचे बाप न बापजादे ह्यांचे पवाड रशियन भूमीवर दुमदुमत आहेत. तुमच्या मायदेशाच्या मदतीला तुम्ही एकजुटीनं उभं रहाण्याची वेळ आलेली आहे. माझा असा आरोप आहे की हंगामी सरकार धरसोड, नालायक व राज्य करायला निकम्मं आहे. देशाच्या आतल्या कारभाराचा त्यांनी जर्मनांना ताबा घेऊ दिलाय. कझानमधील स्फोटानं हे दाखवून दिलंय. तिथं जवळजवळ दसलाख गोळे न बारा हजार मशिनगन्स नष्ट करण्यात आल्या. ह्याशिवाय मी असाही आरोप करतो की सरकारचे काही मंत्री राजद्रोही आहेत. हे मी सिद्ध करू शकेन. ३ ऑगस्ट रोजी हिवाळी राजवाड्यात मी मंत्रीमंडळाच्या बैठकीला हजर होतो. तेव्हा प्रधानमंत्री केरेन्स्की आणि सवितकोव ह्यांनी मला कळवलं की मी माझ्या मनातले विचार बोलू नयेत. कारण मंत्रीमंडळात काही निमकहराम लोक आहेत. हे अगदी उघड आहे की, असलं सरकार देशाचा सत्यानाश करीत आहे. अशा सरकारवर विश्वास टाकणं शक्य नाही. अशा सरकारकडून आपला कोणताही उद्धार होईल अशी अपेक्षा दुःखी रशिया करू शकत नाही. म्हणूनच आपल्या गनिमाला खूष करण्यासाठी हंगामी सरकारने जेव्हा हुकूम सोडला की सरसेनापती पदाचा मी राजीनामा द्यावा तेव्हा एक कझाक म्हणून मानाचा न् मनाचा सच्चा म्हणून हा हुकूम धुडकावून लावणं मला भाग पडलं आहे. मातृभूमीची बेइज्जत आणि तिच्याशी हरामखोरी ह्यापेक्षा रणांगणावर मरण पत्करणं मी पसंत केलं. कझाकांनो, रशियन भूमीच्या सरदारांनो, जरूर पडली तर मातृभूमीच्या बचावासाठी माझ्याबरोबर उठाव करण्याचं वचन तुम्ही दिलं आहे. ती वेळ आता आली आहे. मातृभूमी मरणाच्या उंबरठ्यावर आहे! हंगामी सरकारच्या हुकूमाला मी मान तुकवणार नाही. देश विकायला निघालेल्या हंगामी सरकारला आणि त्यांच्या बेजबाबदार सल्लागारांना मी विरोध करतो.

कझाकांनो, तुमच्या जनतेची इज्जत आणि किरत – त्यांचा अजोड पराक्रम त्यांना उचलून धरा. असं केल्याने तुम्ही देशाचा आणि क्रांतीने मिळवलेल्या आझादीचा बचाव कराल. माझी आज्ञा पाळा. माझ्या हुकूमाची तामिली करा !"

२८ ऑगस्ट १९१७
जनरल कोर्निलोव
सरसेनापती.

त्या कागदाची गुंडाळी करताना कालिमकोव्ह थोडा वेळ थांबला. आणि मग कडाडला,

"बोल्शेव्हिकांचे आणि केरेन्स्कीचे दलाल रेल्वेमार्गाने आपल्या सैन्याची हालचाल थोपवीत आहेत. सरसेनापतींचा आम्हाला आदेश मिळाला आहे की, रेल्वेने प्रवास करणं अशक्य झाल्यास आपण घोड्यावर बसून पेत्रोग्राडकडं कूच करावं आज आपण निघत आहोत. गाड्यातून उतरण्याची तयारी करा. गर्दीतून आडदांडपणे धक्काबुक्की करीत बुनचुक धाडकन त्या कड्याच्या मधोमध आला आणि अंमलदाराच्या घोळक्याच्या जवळ न जाता खणखणीत आवाजात तो गरजला,

"साथी कझाकांनो ! पेत्रोग्राडच्या कामगार आणि सैनिकांनी मला पाठवलंय. तुमच्या बांधवांशी युद्ध मांडायला, क्रांतीचा पराभव करायला, तुमचे अंमलदार तुम्हाला घेऊन निघालेत. लोकांच्या विरुद्ध जायचं असेल, राजेशाही जर तुम्हाला आणायची असेल तर खुशाल जावा ! पण पेत्रोग्राडच्या कामगारांना न सैनिकांना आशाय की तुम्ही त्यांचे मारेकरी होणार नाय ! त्यांनी तुम्हाला कळकळीनं बंधूंचे नमस्कार कळवलेत. गनिम म्हणून नव्हे दोस्त म्हणून तुमची त्यांना भेट घ्यायचेय . . . !"

त्याला पुढं बोलू देण्यात आले नाही. एक अवर्णनीय कल्लोळ झाला. आरोळ्यांच्या गदारोळाने कालिमकोव जणू काही त्या पिंपावरून खाली खेचला गेला. तो ताडताड बुनचुककडे आला. पण काही पावलावर येवून थबकला. आणि कझाकांकडे वळून म्हणाला,

"कझाकांनो ! गेल्या वर्षी कॉर्नेट बुनचुक आघाडी सोडून पळून गेला. हे तुम्हाला ठाऊक आहे. ह्या भ्याडाचं न् फितुराचं आपण ऐकणार आहोत ?"

कर्नल सुकीनच्या घनगर्जनेत त्याचा आवाज लुप्त झाला. कर्नल सुकीन सहाव्या स्क्वाड्रनचा कमांडर होता.

"अटक करा ह्या बदमाशाला ! आम्ही आमचं रक्त सांडलं तेव्हा हा लपला होता पिछाडीला ! पकडा त्याला !"

"थांब भा ऽ ऊ!"

"बोलू दे त्याला !"

"त्याची मुस्काटदाबी करू नको ! त्याला काय म्हणायचं ते म्हणू दे !"

"पकडा ह्याला !"

"पळपुटे आम्हाला नाय पायजेत !"

"बोल रे बुनचूक !"

"लगाव मित्रिच !"

"खेचा त्याना !"

परस्पर विरोधी आरोळ्यांचा कोलाहल कझाकांनी सुरू केला.

एक उंच बोडका कझाक उडी मारून पिंपावर चढला. तो रेजिमेन्टच्या क्रांतीकारक समितीचा सभासद होता. जळजळीत शब्दात त्याने कझाकांना आवाहन केले की, क्रांतीच्या नरडीला नख लावणाऱ्या जनरल कोर्निलोव्हचा हुकूम पाळू नका. लोकांवर होणारे युद्धाचे घोर परिणाम त्याने सांगितले. आपल्या भाषणाच्या अखेरीस बुनचुककडे वळून तो म्हणाला,

"साथी हो ! अंमलदार तुमची हेटाळणी करतात तशी आम्ही करत नाय. तुम्हाला पाहून आम्हाला आनंद झालाय. लोकांचा प्रतिनिधी म्हणून आम्हाला तुमच्याबद्दल आदर वाटतो. तुम्ही अंमलदार होतात तेव्हा कझाकांच्या तोंडावर थुंकला नैत. त्यांच्याबरोबर भावागत राहिलात. तुमच्या तोंडून कधी शिवी ऐकली नाय. आम्ही भले अनपढ असू. पण असं समजू नका की आमची कदर केलेली आम्हाला समजत नाय. अहो, ढोरांनासुद्धा प्रेमाचा शब्द समजतो. आम्ही तर माणसं आहोत. आम्ही तुमच्या पायावर डोकं ठेवलंय. पेत्रोग्राडच्या कामगारांना सांगा त्यांच्याविरुद्ध आम्ही हात उचलणार नाय !"

नगारे पिटल्यागत मंजूरीच्या आरोळ्यांचा कल्लोळ उडाला. पार टिपेपर्यन्त तो उंचावला. मग हळू हळू कमी होत शांतवला. कालिमकोव परत उडी मारून पिपावर चढला. कझाकांच्या दिशेने आपली देखणी अंगकाठी झुकवताना तो झुलत होता. डॉनची किरत आणि प्रतिष्ठा, कझाकांचं ऐतिहासिक कार्य, अंमलदारानी आणि सैनिकांनी सांडलेले रक्त ह्याबद्दल तो धापा टाकीत बोलला. त्याचा चेहरा फटफटीत पडला होता.

कालिमकोवचे झाल्यावर एक पांढऱ्या केसांचा कझाक बोलला. बुनचुकवर त्याने दुष्ट हल्ला चढवला. पण कझाकांनी आरोळ्या ठोकून त्याचा आवाज बंद पाडला. आणि त्याला पिपावरून खाली खेचला. तात्काळ चिकामासोव उडी मारून आला. ओंडका छिलावा असा दोन्ही हातानी घाव घातल्यासारखे करीत तो कडाडला,

" आम्ही जाणार नाय ! गाडीखाली उतरणार नाय ! तारेत लिहीलंय की कोर्निलोवला मदत करायचं कझाकांनी वचन दिलंय म्हणे ! पण आम्हाला विचारायला कोण आलं होत ? कझाक दोस्ती संघाच्या अंमलदारानी वचनं दिली. जनरल ग्रेकोवनं शेपूट हालवली होती. जा म्हणाव. कर मदत ! "

एका मागोमाग दुसरा पिपावर चढून भाषण करीत होता. आपले थोराड मस्तक झुकवून बुनचुक उभा होता. त्याचे गाल लालबुंद झाले होते. त्याच्या कानशीलावरच्या आणि मानेवरच्या शिरा थाडथाड उडत होत्या. वातावरण विजेने भारले होते. असे वाटत होते की, थोडे जास्त झाले. कुणीतरी काहीतरी करण्याची घाई केली तर त्यातून रक्तपात होणार. पण नगरलष्कराचे सैनिक त्या गर्दीत आले आणि कझाक अंमलदार सभा सोडून चालते झाले.

अर्ध्या तासाने दुगिन धावत बुनचुककडे आला. " मित्रिच काय करायचं ? कालिमकोवचा काहीतरी डाव दिसतोय. त्यांचं मशिनगन उतरवणं चालू आहे. जासूद घोड्यावर स्वार होऊन कुठंतरी गेलाय."

" चल ! विसेक कझाक गोळा कर ! जल्दी ! "

अंमलदाराच्या डब्यापाशी कालिमकोव आणि इतर तीन अंमलदार घोड्यांवर मशिनगन्स चढवीत होते.

बुनचुक ढांगा टाकीत त्यांच्या जवळ गेला. आपल्यामागे असणाऱ्या कझाकांवरून त्याने नजर फिरविली. आपल्या लांबकोटाच्या खिशात हात खुपसून त्याने एक नवेकोरे निगुतपूर्वक साफ केलेले अंमलदाराचे पिस्तूल बाहेर काढले.

"कालिमकोव, तुला अटक करण्यात येतेय. हात वर..." कालिमकोवने घोड्यापासून एक उडी मारली आणि पिशवीतून पिस्तूल काढायला तो वाकला. पण एक काडतूस त्याच्या माथ्यावरून सणाणत गेले. आणि घरघरीत भयानक आवाजात बुनचुक परत म्हणाला,

"हात वर!"

कालिमकोवने डोळे आकुंचित करून ते न्याहाळले आणि हळूहळू आपले हात वर केले. त्याच्या हाताची बोटे स्फुरण पावत होती. अंमलदारांनी नाखुषीने आपली हत्यारे देवून टाकली.

"आम्ही आमच्या तलवारीपण उतरवायच्या का?" एक तरुण कॉर्नेट मशिनगनरने आदबीने विचारले.

"हां!"

"ह्यांच्यावर पहारे बसवा." बुनचुकने दुगिनला सांगितले. "चिकामासोव, दुसऱ्या अंमलदाराना अटक करून इकडे घेऊन येईल. ऐकलंस ना चिकामासोव? दुगिन, तू आणि मी कालिमकोवला नगरलष्कराच्या क्रांतिकारक समितीकडं घेऊन जाऊ या. "कॅप्टन कालिमकोव, एक पाऊल पुढं!"

"खूब चलाखी! चलाखाय!" कौतुकाच्या सुरात एक अंमलदार म्हणाला. त्याने डब्यात उडी मारली आणि 'पावले' टाकीत निघून जाणाऱ्या बुनचुक,दुगिन आणि कालिमकोवला तो न्याहाळू लागला.

"मंडळी! शरमेची गोष्ट आहे मंडळी! पोराढोरांसारखं वागणं झालं आपलं. त्या बदमाशाला गोळी घालायचं सुचलंही नाही. कालिमकोववर त्यानं पिस्तुल उचललं तेव्हाच आपण त्याला टिपायचा. म्हणजे सगळंच संपलं असतं!" कर्नल सुकीनने इतर अंमलदारांकडे चिडून निरखून पाहिले. आणि बराचवेळ तो डबीतील पापीरोझ चाचपडू लागला.

"अख्खा जुमला त्यांचा होता. त्यांनी आपली चटणी केली असती." एक कॉर्नेट ओशाळगतीच्या सुरात म्हणाला.

अंमलदार न बोलता धुम्रपान करीत होते. मधूनच एकमेकांकडे कटाक्ष टाकीत होते. बुनचुकने वागण्यात जी त्वरा केली तिने ते हबकले होते.

थोडावेळ कालिमकोव न बोलता चालत होता. आपल्या काळ्या मिशीचे टोक कुरतडत होता. गालफडे दिसणारा त्याचा डावा गाल मुस्कटात भडकवल्या-

सारखा जळत होता. येणारे जाणारे थबकून चकीत होवून बघत होते. एकमेकांशी कुजबुजत होते.

नार्वाच्या माथ्यावरचे आभाळ ढगाळले होते. आपल्या वाटचालीत ऑगस्ट महिन्याच्या हातून हरवलेली बर्चची पानगळत रस्त्यावर सोन्याच्या हुंडीसारखी पडली होती.

गिरिजाघराच्या हिरव्या घुमटाभोवती डोमकावळे मंडले येत होते. स्टेशनाच्या पलीकडे, काळेजणाऱ्या शेतांपलीकडे रात्र केव्हाच थंडे सुस्कार टाकीत पडली होती. पण दक्षिणेला विदीर्ण पांढरीशुभ्र अभ्रे झपाट्याने वहात चालल्याचे अजून दिसत होते. अदृश्य सीमारेषा ओलांडीत झांजरातून रात्र येत होती.

स्टेशनापाशी कालिमकोव गर्रकन वळला. आणि बुनचुकच्या तोंडावर थुंकला.

" बदमाश . . . !"

ती थुंकी चुकवून बुनचुकने भुवया उंचावल्या. आपल्या डाव्या हाताच्या पकडीत स्वतःचे उजवे मनगट त्याने बराच वेळ आवळून धरले. त्याचा तो हात पुनः पुन्हा: पिस्तुलाच्या खिशाकडे जाऊ बघत होता.

" चल पुढं !" त्यानं तुटकपणे फर्मावले.

कालिमकोव पुढे निघाला. तो शिव्या घालीत होता. गलिच्छ शब्दांचा त्याने पट्टाच सुरू केला होता.

" फितूर ! हरामखोर ! फेडायला लागल हे !" परत परत थांबून बुनचुककडे पाहून तो किंचाळत होता.

" चल पुढं हो . . . पुढं हो . . . ! बुनचुक परत परत बजावीत होता. परत कालिमकोव तरातरा पुढे जायचा. मुठी वळवायचा. चवताळलेल्या घोड्याप्रमाणे हिसकाहिसक करायचा.

ते पाण्याच्या नळाजवळ आले. करकरा दात खात कालिमकोव किंचाळला; " तुमचा पक्ष नाय. गाव गदळ झालेली तुमची टोळी आहे. तुमचा पुढारी कोणाय? जर्मन लष्कराचे अंमलदार ! बोल्शेव्हिक . . . हाः हाः ! अक्करमाशे ! रांड घ्यावी तसा तुमचा पक्ष खरीदावा ! हरामखोर ! हरामजादे ! मायभू विकलीत ! एकाच झाडावर तुम्हा सगळ्यांना मी लटकावलं असतं ! ओहोहोहो ! येईल !

वेळ येईल ! अरे तुमच्या ह्या लेनिननं तीस मार्क घेऊन रशिया टाकला ! लाखाची लाच खाऊन लपून बसलाय बदमाश !"

" भिंतीजवळ उभा रहा !" शब्दांचे हेल काढीत बुनचुक कंपित आवाजात ओरडला. दुगिन भयाने बावरून गेला.

" इल्या मात्रिच ! काय करतोयस काय ? थां ऽ ब !"

बुनचुकचा चेहरा संतापाने वेडावाकडा न् लालबुंद झाला. कालिमकोवच्या अंगावर झेप घेऊन त्याने काडकन् त्याच्या कानफटात ठेऊन दिली. त्या अंमलदाराच्या डोक्यावरून उडालेली टोपी त्याने पायाखाली तुडवली. आणि त्या कैद्याला त्याने नळापासच्या काळवटलेल्या विटांच्या भिंतीजवळ खेचला.

" उभा ऱ्हा ऽ !"

" काय करतोयस ? तू . . . ! हिंमत करू नको. मला मारायची हिंमत करू नको." त्याच्याशी खेचाखेच करीत कालिमकोव गरजला.

पाठ भिंतीवर आदळताच तो ताठ झाला. लख्खन त्याला उमगले. " माझा जीव घ्यायचाय ?"

आपल्या लांबकोटाची बटणे झटपट लावीत कालिमकोव एक पाऊल पुढे आला. " घाल गोळी, रांडीच्या घाल गोळी . . . ! न् बघ रशियन अंमलदार कसे मरतात ! अरे मरणाच्या दारात मी . . ."

काडतूस त्याच्या तोंडात घुसले. नळाच्या आसपास गोळीचा आवाज घुमला. कालिमकोवने डाव्या हाताने डोके गच्च पकडले. तो अडखळला आणि कोलमडला. त्याने पाठीची कमान केली. रक्ताळलेले दात आपल्या छातीवर थुत्कारले. जिभेने ओठ चाटले. त्याची पाठ जमिनीला लागते न लागते तोच बुनचुकने पुन्हा पिस्तूल झाडले. आकडी आल्यासारखा कालिमकोव थरकापला. कुशीला वळला आणि मग पेंगुळलेल्या पक्षागत त्याने डोके छातीत घुसमटले आणि त्याने हुंदका दिला. रस्त्याच्या पहिल्याच फाट्यावर दुगिनने बुनचुकला गाठले.

" मित्रिच . . . काय रे केलंस हे मित्रिच ? का तू त्याला . . . ?"

बुनचुकने दुगिनचे खांदे पकडले. त्या कझाकाच्या डोळ्यांना आपली निश्चल नजर खंबीरपणे भिडवित विलक्षण शांत आणि सौम्य आवाजात तो म्हणाला,

" त्यांनी आपल्याला . . . नाय तर आपण त्यांना ! मधलीअधली वाट नाय. रक्ताचा जाब रक्तानं ! कळीतलं ? कालिमकोवसारखी माणसं निकालात

काढली पैजेत. सापासारखी ठेचली पैजेत. न् त्यांच्याबद्दल ज्यांना दयेचा कळवळा येतो त्यानाही गोळ्या घातल्या पैजेत. कळीतलं? तुला कशापायी कळवळा आलाय? सावर स्वतःला.

"घट्ट हो! कालिमकोवच्या हाती सत्ता असती तर ओठातला चूट्टयासुद्धा न काढता त्यानं आपल्याला गोळ्या घातल्या असत्या न तू . . . हट् रड्या!"

पण दुगिनची मुंडी हालत राहिली. दात थडथडत राहिले. गंजाने डागाळ–लेल्या बुटातील त्याच्या दांडग्या पायांना आपण कुठे चाललोय ह्याचे भान उरले नाही.

शुकशुकाट असलेल्या रस्त्यावरून ते न बोलता चालत होते. बुनचुक मधूनच वळून मागे नजर टाकीत होता.

पूर्वेकडे चाललेले धूसर ढग आकाशातून खाली फेसाळले होते. ढगांच्या लहानशा फटीतून क्षीण धाराधूत चंद्र छद्मी हिरवट डोळ्यांसारखा खाली टवकारून बघत होता. कोपऱ्याशी एक सैनिक आणि खांद्यावर पांढरी शाल घेत-लेली एक बाई एकमेकांना दाट भिडून उभी होती. काहीतरी कुजबुजत सैनिकानें त्या बाईला मिठी मारून जवळ घेतले. पण तिने त्याच्या छातीवर हात रेटून त्याला ढकलले. मान मागे वळवून गुदमरत्या आवाजात ती म्हणत होती, "तुझा मला विश्वास नाय-विश्वास नाय . . .!"

आणि तिच्या ओठातून एक मृदू नव्हाळीचे हास्य उमटले.

— — — —

## १८

केरेन्स्कीने ज्यांना पेट्रोग्राडला येण्याचे फर्मावले होते. त्या जनरल क्रिमोवनी ३१ ऑगस्ट रोजी स्वतःवर गोळी झाडून घेतली.

क्रिमोव ह्यांच्या सेनेच्या पथकांची शिष्टमंडळे आणि कमांडर्स ह्यांच्या भलावणीसाठी हिवाळी प्रासादाकडे ओघ लागला. खुल्लंखुल्ला युद्धासाठी जे सैनिक आता आतापर्यन्त हंगामी सरकारवर चाल करून निघाले होते तेच आता केरेन्स्कीपुढे लाचार होऊन लवत होते. त्याच्या नाकदुऱ्या काढीत होते. आपल्या नितांत स्वामीनिष्ठेची त्याला वचने देत होते. घबराट उडून गेलेली क्रिमोवची सेना प्राणांतिक वेदनेने तडफडत होती. निव्वळ सुस्तपणापोटी काही विभाग अजून पेट्रोग्राडकडे सरपटत होते. पण त्या हलवाहलवीतील सगळा उद्देशच निघून गेला होता. कारण कोर्निलोवच्या बंडाळीची इतिश्री झाली होती. ह्या प्रतिगामी उद्रेकाच्या फुलबाज्या विझत चालल्या होत्या. देशाच्या हंगामी राज्यकर्त्याच्या अंगावरचे मांस तसे झडले होते हे खरे पण हा राज्यकर्ता नेपोलियनच्या ऐटीने तरातरा चालत होता. आणि मंत्रिमंडळाच्या बैठकीतून रशियाची "संपूर्ण राजकीय स्थिरस्थावर" ह्याबद्दल सांगत होता.

क्रिमोवच्या आत्महत्येच्या आदल्या दिवशी जनरल अलेक्सिएव ह्यांची सरसेनापती म्हणून नेमणूक झाली. पापभिरू सरळमार्गी असणाऱ्या अलेक्सिएवनी आपल्या जागेचे संदिग्ध स्वरूप ओळखून देऊ केलेले पद आधी स्पष्टपणे नाकारले. पण नंतर त्यांनी ते स्विकारले. कोर्निलोवच्या आणि त्यांच्या सरकारविरोधी बंडाळीच्या बनावात गोवल्या गेलेल्यांच्या नशिबाला हात द्यावा एवढ्याच एकमात्र इच्छेपोटी त्यांनी हे पद स्विकारले. अलेक्सिएवनी कोर्निलोवबरोबर अव्वल ठाण्यावर थेट टेलिफोन संपर्क साधला. आपल्या नेमणूकीबद्दल त्यांची भूमिका समजावून

घेण्याचा आणि त्यांच्या होवू घातलेल्या आगमनाबद्दल जाणून घेण्याचा त्यांचा प्रयत्न होता. कंटाळवाण्या वाटाघाटी खंडित होत उशीरा रात्रीपर्यन्त चालू होत्या.

त्याचदिवशी कोर्निलोवनी आपल्या सेनानी आणि सहकाऱ्यांची बैठक घेतली. हंगामी सरकारविरूद्ध लढा चालू ठेवण्याच्या औचित्याबद्दल कोर्निलोवनी सरळ प्रश्न टाकला. लढा चालू ठेवण्याला बहुसंख्येने अनकुलता दर्शवली.

सबंध कामकाजात गप्प बसून असलेल्या लुकोमस्कीकडे वळून कोर्निलोवनी विचारले, "अलेक्झांद्र सेर्गिएविच, तुमचं मत तुम्ही सांगावं !"

सत्तेसाठी लढा चालू ठेवण्याविरुद्ध संयत पण ठाम शब्दात लूकोमस्कीनी निवेदन केले.

"मग काय शरणागती ?" त्यांना अडवित कोर्निलोवने परखडपणे विचारले.

लुकोमस्कीनी खांदे उडविले.

"परिस्थिती उघडच आहे !"

आणखी अर्थातास चर्चा रखडली.

इच्छाशक्तीच्या बळावर स्वतःला चक्क आवर घालीत कोर्निलोव गप्प बसून होते त्यांनी बैठक बरखास्त केली आणि तासाभराने लुकोमस्कीना बोलावून घेतले.

"तुमचं बरोबर आहे अलेक्झांदर सेर्गिएविच." त्यानी हाताची बोटे मोडली आणि विझलेल्या फिक्या नजरेने कुठेतरी बघत ते श्रांतपणे म्हणाले, "ह्यापुढे प्रतिकार करणं मूर्खपणाचं आहे. तो गुन्हा आहे."

मेजावर बोटांचा ताल धरून ते बसून राहिले. असे वाटत होते की, ते काहीतरी ऐकत आहेत. कदाचित आपल्या विचारांची उंदरासारखी खुडबूड ऐकत आहेत. मग त्यांनी विचारले,

"अलेक्सिएव कधी येणार आहेत ?"

"उद्या."

१ सप्टेंबरला अलेक्सिएव अव्वल ठाण्यावर आले. त्याच दिवशी संध्याकाळी हंगामी सरकारच्या हुकूमावरून त्यांनी कोर्निलोव, लुकोमस्की आणि रोमानोवस्की ह्यांना अटक केली.

अटक केलेल्या सेनानींना 'मेट्रोपोल' हॉटेलमध्ये पहाऱ्यात ठेवायचे होते. त्यांना हलविण्यापूर्वी अलेक्सिएवनी कोर्निलोवची खाजगी भेट घेतली. ती भेट वीस मिनिटे चालली. ते खोलीतून बाहेर पडले. तेव्हा अगदी हादरून गेलेले होते. त्याना स्वतःवर ताबा ठेवणे जमेना.

रोमानोवस्कीनी कोर्निलोवची भेट घेण्याचा प्रयत्न केला. तेव्हा आपली वाट कोर्निलोवच्या पत्नीने रोखल्याचे त्यांना आढळून आले.

"माफ करा! लाव्र गिओर्गिएविचनी कुणाला आत सोडू नको म्हणून बजावलंय!"

तिच्या त्रस्त मुद्रेवरून रोमानोवस्कीनी धावती नजर फिरवली. आणि ते माघारी वळले. ते झपाझपा डोळ्यांची उघडमीट करीत होते. त्याबरोबर त्याच्या डोळ्याखालील काळी वर्तुळेही हालत होती.

दुसऱ्या दिवशी अग्नेय आघाडीचे सरसेनापती जनरल देनिकिन आणि खास सेनेचे सेनानी मार्कोव वाल्नोवस्की आणि एरदेली ह्या सेनानींना बेर्दिचेव इथे अटक करण्यात आली.

अशाप्रकारे इतिहासाच्या विध्विघटनेने कोर्निलोवच्या बंडाळीची नामुष्कीची अखेर झाली. पण तिच्या इतिश्रीतून एक नवीन बंडाळी जन्माला आली. कारण आगामी यादवी युद्ध आणि क्रांतीवरील विस्तृत हल्ला ह्यांच्या मनसुब्यांच्या सूतोवाचाचा जन्म झाला तो "कोर्निलोव काळातच" ह्यात शंकाच नाही.

———

## १९

ऑक्टोबर महिन्यात एक दिवस सकाळीच कॅप्टन लिस्तनिस्तकीला 'रेजिमेंटल कमांडर' कडून असा आदेश आला की, त्याने आपले स्क्वाड्रन चालत हिवाळी प्रासादाच्या चौकाकडे आणावे. सार्जन्ट मेजरला जरूर ते हुकूम देऊन त्याने गडबडीने पोशाख चढवला. दुसरे अंमलदारही जांभया आणि शिव्या देत उठले.

"काय भानगड आहे ?"

"बोल्शेव्हिक !"

"मंडळी, माझी काडतुसं कुणी घेतली ?"

"कुठं जायचं आपण ?"

"ऐकताय ना ? गोळीबार चाललाय !"

"कोण सैतान गोळीबार करतोय ? तुम्हाला कायतरी भास होतायत !"

अंमलदार आवारात आले. जुमल्यांच्या हारीवर स्क्वाड्रन उभे करण्यात आले होते क्विक मार्चचा हुकूम देऊन लिस्तनिस्तकीने त्यांना रस्त्यावर नेले. कझा नेवस्की पथावर शुकशुकाट होता. कुठेतरी दूरवर मधूनच गोळीबाराचा आवाज येत होता. चिलखती गाडी हिवाळी प्रासादाच्या चौकात फिरत होती. कॅडेटस् पहाऱ्यावर होते. रस्त्यावर ओसाड रानाची निःशब्दता पसरली होती. प्रासादाच्या दरवाजाजवळ कझाकांना कॅडेटसचे पथक आणि चौथ्या स्क्वाड्रनचे कझाक अंमलदार भेटले त्यातील एक स्क्वाड्रन कमांडर लिस्तनिस्तकीला बाजूला घेऊन गेला आणि म्हणाला,

"सगळं स्क्वाड्रन तुमच्याबरोबर आहे ?"

"हो. का ?"

"दुसऱ्या, पाचव्या आणि सहाव्या स्क्वाड्रनने 'मार्च' करायला नकार दिला. पण मशिनगन पथक आमच्याबरोबर आहे. तुमचे कझाक कसे आहेत ?"

लिस्तनित्सकीने हाताला झटका देऊन म्हटले, "खराब ! पण पहिल्या आणि चौथ्या रेजिमेन्टस्चं काय ? ते इथं नाहीत. ते येणार नाहीत. आज बोल्शेव्हिकांचा हल्ला होण्याचा संभव आहे. हे ठाऊकाय तुम्हाला ? काय होणाराय सैतानाला ठाऊक ?" दुःखाने सुस्कारा टाकून तो पुढे म्हणाला, "ह्या सगळ्यापासून डॉनकडं परत जावं असं वाटतं..."

लिस्तनित्सकी आपले स्क्वाड्रन घेऊन राजवाड्याच्या आवारात गेला. कझाकांनी आपल्या बंदुकांच्या मोळ्या रचून ठेवल्या आणि ते त्या प्रशस्त आवारात भटकू लागले. अंमलदार एका कोपऱ्यात जमा झाले आणि धुम्रपान करीत गप्पा मारू लागले.

काही वेळानंतर कॅडेट्स्चे रेजिमेंट आणि महिला बटालियन येवून दाखल झाली. राजवाड्याच्या आपल्या मशिनगन्स घेवून कॅडेटस्नी राजवाड्यांच्या देवड्यांवर जागा धरल्या. बायकांची आवारात गर्दी झाली. त्यांच्याभोवती गोळा होऊन कझाक रांगडी मस्करी करू लागले. सार्जन्ट आर्ख्यानोवने त्यातील एका कुडते घातलेल्या बेढब बाईच्या पाठीत धबका घालून म्हटले, "मावशी, तू आपली पोरं काढावीस पुरुषांच्या भानगडीत कशाला पडावं ?"

"तूच काढ पोरं !" त्या फटकळ 'मावशी'ने उलट त्याच्या पाठीत धपाटा घालून म्हटले.

"काय ग चांदण्यांनु, तुम्हीपण आमच्यात का ?"

म्हाताऱ्या देवभोळ्या पण बाईलवेड्या चुकोवनोवने विचारले.

"रांडिच्यांना फोकलून काढल्या पैजेत !"

"भले रे सैनिक !"

"घरी बसायला काय झालं ? हातानं कायतरी कामधाम तरी झालस्तं !"

पुढनं दिसायला सैनिक, पिछाडीला धड ना भिक्षू धड ना... सैतानाला दखल काय ते ! थूत करावीसं वाटतं.

"अगं ए लढणार ! जरा गांड हलव तुझी–नायतर मी हलवतो !"

कझाकात हसण्याचा खकाणा उसळला.

पण दुपार होईस्तो त्यांची आनंदी वृत्ती मावळली. बायकांनी प्लटुन्स बनवली. आणि प्रचंड पाईनच्या तुळयाच्या दरवाजात मेढेकोट रचला. पुरुषी बांध्याची एक धिप्पाड बाई त्यांना हुकूम सोडीत होती. तिच्या अंगलट बसलेल्या लांब कोटावर सेंट जॉर्जचे पदक तिने लावले होते. चिलखती गाडीच्या चौकातील फेऱ्या वाढल्या. कॅडेटसनी डब्बादवाळचा आणि मशिनगनचे पट्टे आणून ठेवले.

"गडचांनु आता बघा गंमत !"

"लढाई घेणारसं म्हण की !"

"मग तुला इथं कशाला आणलाय ? ह्या बाया धरायला ?"

लागुतिनच्या भोवती त्याच्या गावाकडील माणसांचा घोळका जमून कशावर तरी चर्चा करीत होता. अंमलदार कुठेतरी निघून गेले होते. आवारात कझाक आणि बायकांखेरीज कुणी नव्हतं. तशाच टाकून दिलेल्या काही मशिनगन्स दरवाजात उभ्या होत्या. त्यांच्या ढाली ओलरसपणे चमकत होत्या.

संध्याकाळच्या सुमारास रिमझिम पाऊस पडू लागला. खायला प्यायला न देता सोडल्याबद्दल कझाक कुरकुरू लागले.

"लिस्तनिस्तकी कुठाय ?"

"तो राजवाड्यात आहे. आपल्यासारख्यन्त कॅडेटस् तिकडं सोडणार नाहीत."

"कुणालातरी फौजो रसोईकडं पाठवू या." दोघाना पाठविण्यात आले.

"बंदुका नेऊ नका. नायपर त्या काढून घेतील – तुमच्याकडून." लागुतिनने सल्ला दिला.

कझाकांनी आणखी दोन तास वाट पाहिली. पण ना फौजी रसोई आली ना कुणी जासूद आला. पुढे असे कळून आले की सिमेनोव डिव्हिजनच्या सैनिकांनी रसोई परत न्यायला लावली होती. झांझर पडायला लागल्यावर महिला बटालियन दरवाजापाशी गोळा झाले. तुळयांच्या पलीकडे आडव्या पडून त्यानी चौकातून गोळीबार सुरू केला. कझाकांनी गोळीबारात भाग घेतला नाही. ते चुट्टे ओढीत आणि जास्तच कंटाळून उभे होते. अखेर शेवटी लागुतिनने भिंतीजवळ स्क्वाड्रन गोळा केले आणि राजवाड्याच्या खिडक्या अबरगतीने न्याहाळीत तो त्या जमा-वाला उद्देशून म्हणाला,

" कझाकांनु हे असाय बवा ! आपण इथं थांबण्यात काय मतलब नाय. आपण बाहेर जायला पायजे. नायतर विनाकारण आपल्यावर आफत यायची. राजवाड्यावर भडिमार सुरू होईल. न् मग आपण काय करायचं ? अंमलदार नाहीसे झालेत . . . आपण काय मरायला थांबायचं ! जाऊ या घराकडं. उगाच भिंतीला पाठी घासण्यात काय मतलब ? हंगामी सरकारबद्दल काय सांगावं ? त्याचा आपल्याला काय फायदा ? तुमचं काय म्हणणं कझाकांनु ?

"आपण जर आवारातून बाहेर पडलो तर बोल्शेव्हिक आपल्यावर मशिनगन चालवतील !"

" आपला जीव घेतील ! "

" शक्य नाय ! "

" समजेल मग ! "

" नाय. शेवटपर्यंन्त इथंच थांबू या ! "

" खाटीकखान्यात जाणाऱ्या मेन्ढरांसारखं आपण इथं थांबतोय ! "

" आम्ही जाणार ! "

" बोल्शेविकांकडं माणसं धाडा. म्हणावं त्यानी आमच्या वाटंला जाऊ नें, आम्ही त्यांच्या वाटंला जाऊ ने ! "

पहिल्या आणि चौथ्या स्क्वाड्रनचे कझाक तिथे येऊन त्या सभेत सामील झाले. आणखी थोडा वेळ चर्चा होऊन प्रत्येक स्क्वाड्रनचा एक असे तीन कझाक दरवाजातून बाहेर पडले. थोड्यावेळाने ते परत आले. त्यांच्याबरोबर तीन खलाशी होते. तुळयांच्या लकडकोटावरून खलाशांनी उड्या मारल्या. ढांगा टाकीत ते आवारातून चालत आले. त्यांचे चेहरेमोहरे तरतरीत होते. ते कझाकांकडे आले. त्यातील एक खलाशी देखणा काळ्या गलमिशांचा होता. त्याच्या लोकरी काचोळ्याची बटणे सुटली होती. टोपी डोक्यावर मागे सरकवलेली होती. तो त्या जमावात घुसला.

" कझाक साथींनु ! आम्ही क्रांतीकारक बाल्टिक आरमाराचे आहोत. तुम्ही 'हिवाळी प्रासाद' सोडून निघून जावं अशी सूचना करायला आम्ही आलोत.

तुमच्या वैरी बूर्ज्वा सरकारचा बचाव करायचं तुम्हाला काही एक कारण नाही. त्यांची बूर्ज्वा कारटी ! कॅडेटस् त्यांचा बचाव करू देत ! हंगामी सरकारचा बचाव एकाही सैनिकानं केलेला नाही. पहिल्या आणि चौथ्या रेजिमेन्टमधले तुमचे भाऊ आम्हाला येऊन मिळालेत आमच्या बाजूनं ज्यांना यायचय त्यांनी डावीकडं व्हा!"

थांब भाऊ पहिल्या स्क्वाड्रनचा एक सार्जंट पुढे आला. "आम्ही आनंदानं जाऊ. पण समजा बोल्शेव्हिकांनी आमच्यावर गोळीबार सुरू केला तर?"

"साथीनो! पेट्रोग्राड लष्करी क्रांतीकारक समितीच्या वतीनं आम्ही वचन देतो की, तुम्ही अगदी सुखरूप जाल. कुणीही तुम्हाला हात लावीत नाही!"

ठोसर बांध्याचा माताचे वण असलेला दुसरा एक खलाशी काळ्या गलमिशांच्या आपल्या साथीजवळ उभा होता. आपली बैलासारखी गर्दन सावकाश वळवीत त्याने कझाकांना न्याहाळले. तटतटून बटणे लावलेल्या आपल्या रुंद छाताडावर बुक्की मारून तो म्हणाला,

"आम्ही स्वत: तुमच्याबरोबर येतो!! तुमच्या मनात शक आणू नका पोट्ट्यांनु! आम्ही तुमचे गनिम नव्हत. पेट्रोग्राडचे कामगारही तुमचे गनिम नव्हत. तुमचे गनिम 'हे' आहेत...! आपला अंगठा त्याने राजवाड्याच्या दिशेने उडवला. आणि आपले हिंस्त्र, हारीचे, एकसारखे असलेले दात प्रकट करीत तो हसला.

कझाक चाचरले. महिला बटालियनच्या काहीजणी जवळ आल्या आणि थोडावेळ ते ऐकत उभ्या राहिल्या. नंतर त्या परत दरवाज्याकडे गेल्या.

"अग ए बायांनु, येताय का आमच्या बरोबर!" त्यांना जाताना पाहून एक दाढीवाला कझाक ओरडला.

"तुमच्या बंदुका उचला न चालू लागा" लागुतिन ठामपणे म्हणाला.

कझाकांनी खुशीने आपली हत्यारे उचलली आणि रांगा धरल्या.

"मशिनगन घेऊ या का?" एका बंधानींने काळ्या गलमिशावाल्यांना विचारले.

"होय. त्या कॅडेटस्साठी ठेवून देऊ नका!"

आवारातून कझाक बाहेर पडणार एवढ्यात अंमलदार तिथे आले. दात कोंडाळे करून खलाशांकडे टक लावून बघत ते उभे राहिले. स्क्वाड्रनने निघून जायला सुरवात केली. आपल्या बंदूका घेऊन सर्वांच्या आघाडीला मशिनगन पथक गेले. ओल्या दगडांवर चाके खरडत आणि खडखडत होती. पहिल्या स्क्वाड्रनचय

आघाडीच्या जुमल्याबरोबर लोकरी काचोळे घातलेला खलाशी गेला. एक उंच, पिकलेल्या भुवयांचा कझाक त्याची बाही खेचून ओशाळलेल्या आवाजात म्हणाला; "भाऊ, आम्हाला लोकांच्या विरुद्ध जायचं होतं, असं नायना वाटत तुम्हाला ? आम्हाला लबाडीनं इथं आणलं. आम्हाला ठाऊक असतं तर आलो नसतो. देवा शपथ !"

चौथे स्क्वाड्रन सर्वांच्या मागून आले. कझाक दरवाजाशी थबकले. सगळे महिला बटालियन तिथे दाट जुटीने उभे होते एक धष्टपुष्ट कझाक लकडकोटावर चढला. आपली नखे काढलेली काळी बोटे आर्जवाने आणि सूचकतेने हालवीत तो म्हणाला, "अग ए नेमबाजानु, ऐकून घ्या ! आम्ही बाहेर चाललोय. पण तुमच्या बायकी मूर्खपणानं तुम्ही इथं रहाताय. ठीकाय. पण दगाबाजी चालणार नाय ! आमच्या पाठीमागं आमच्यावर गोळ्या चालवायला लागाल तर मागं फिरू न् तुमचा खिमा करून टाकू. नीट बोलीतलं ना मी ? अच्छा !"

लकडकोटावरून उडी टाकून आपला जुमला गाठायला तो पळाला. मधून मधून तो मागे वळून बघत होता.

कझाक चौकाच्या जवळजवळ मध्यावर पोचले. एवढ्यात त्यातल्या एकाने मागे वळून पाहिले आणि तो चवताळून ओरडला,

"पोरांनु ते बघा ! आपल्या मागून अंमलदार धावत येतोय."

अनेक जणांनी माना वळवल्या. एक उंच अंमलदार कमरेशी समशेर दाबून धरीत आणि हाताचा इशारा करीत चौकातून धावत येत होता.

"हा आताराशिचकोव–तिसऱ्या स्क्वाड्रनचा !"

"कोण ?"

"उंचाडचा. डोळ्यावर ल्हासं असलेला !"

"आपल्या बरोबर यायचा विचाराय काय ?"

"चांगला गडी आहे !"

आताराशिचकोव त्या 'कंपनी' च्या मागे चपळाईने धावत होता. त्याच्या तोंडावर हसू तरळत होते. कझाकांनी आपले हात हलवले आणि ते हसले.

"पळ कॅप्टन पळ !"

राजवाड्याच्या दरवाजातून गोळीचा एकच रुक्ष सणत्कार आला. आताराशिचकोवने हात वर फेकले आणि तो अडमडला. मग पाठीवर कोसळला. तंगड्या झाडीत तो उठायला धडपडत होता.

जणू काय हुकूम मिळावा तशी ती स्क्वाड्रन्स फिरली आणि त्यांनी राजवाड्याच्या दिशेने मोहरा केला. मशिनगनवाल्यांनी दरवाजावर तोफा डागल्या. काडतूसपट्ट्याचा खडखडाट झाला. पण पाईन तुळयाच्या मागे चिटपाखरू दिसत नव्हते. एका मिनिटापूर्वीच तिथे दाटी केलेले अंमलदार आणि बदकांना त्या माराने जणू भिरकावून दिले होते. स्क्वाड्रन्सनी परत घाईने रांगा धरल्या आणि गडबडीने पावले टाकीत ते निघून गेले.

शेवटच्या जुमल्यातील दोन कझाक मागे आतारशिचकोवकडे गेले होते. त्यांनी आपला जुमला गाठला. आणि सगळ्या स्क्वाड्रनला ऐकू जाईल अशा खणखणीत आवाजात त्यातील एकजण ओरडला,

" डाव्या खांद्याखाली त्याला टिपलाय. आटपलायच तो ! "

कझाकांची पावले खंबीर आणि जोरदार घुमत होती. काळ्या गलमिशावाल्या खलाशाने हुकूम दिला,

" डावीकडे – – – क्विक मार्च ! "

कझाकांच्या रांगांनी वळण घेतले आणि ताडताड पावले टाकीत त्या निघून गेल्या.

निःशब्दतेत गुरफटलेली राजवाड्याची मुटकुळी मागे उभी होती.

———

# २०

पतझडीची हवा उबदार झाली होती. मधून मधून बायखोवच्या लहानशा गावावर निस्तेज सूर्य क्वचितच तळपत होता. ऑक्टोबर महिन्यात पाखरांचे दक्षिण दिशेला उड्डाण सुरू झाले. अगदी रात्रीच्या वेळीही बगळ्यांचा दुःखाने हेलावून टाकणारा टाहो थंडगार काळीवरून घुमत येत होता. उद्याची गोठवणी, उत्तरेकडील निर्दय वारे ह्यांच्यापासून बचावण्यासाठी स्थलांतर करणारे कळप त्वरेने दूर चालले होते.

कोर्निलोव प्रकरणी अटक केलेले सेनानी सहा आठवडे सुनावणीची वाट बघत बसले होते. ह्या काळात तुरुंगातील त्यांचे जीवन स्थिरावले होते. ते जरी अगदी स्वाभाविक नसले तरी त्याला आपला एक रुळलेला क्रम आला होता. न्याहारीनंतर सेनानी फिरायला जात. परत आले की आपले टपाल बघत. भेटायला येणाऱ्या नातेवाईक आणि मित्रमंडळींना भेटत. जेवण करीत आणि 'नितांत शांततेचा तास' संपल्यावर आपल्याला खोल्यातून एक एकटे काम करायला जात. संध्याकाळी ते बहुदा कोर्निलोवच्या खोलीत जमत. मध्यरात्र टळून जाईपर्यन्त तिथे ते गप्पा मसलती करीत बसत.

महिलांच्या व्यायामशाळेत त्यांचा तुरुंगवास चालू होता. तिथे त्यांचे एकूण आरामात चालले होते.

ह्या इमारतीच्या बाहेर सेंट जॉर्ज बटालियनच्या सैनिकांचा आणि आत तेकिन्सचा पहारा होता. पहाऱ्याने कैद्यांच्या स्वातंत्र्याला काही प्रमाणात आडकाठी होत होती तरी त्यांच्या बाजूने त्यात एक अर्थवाही फायदा होता. त्याची व्यवस्था अशी करण्यात आली होती की, कैद्यांना तसे वाटले तर कोणत्याही क्षणी सहज

आणि सहीसलामत पळून जाणे त्यांना शक्य होते. आपल्या स्थानबद्धतेच्या समग्र कालखंडात त्यांचा बाहेरील जगाशी मुक्त संपर्क होता. बुर्ज्वा वर्तुळांवर ते दबाव पाडीत होते. आपल्या कारस्थानाच्या निशाण्याची झाकपाक करीत होते. अंमलदाराची लहर आजमावण्यासाठी बोटचेपा अंदाज घेत होते. आणि तसाच प्रसंग आला तर पळून जाण्याची तयारी करीत होते.

आपले शरीररक्षक म्हणून स्वामीनिष्ठ तेकिन्स असावेत ह्याबद्दल उत्सुक असणाऱ्या कोर्निलोवनी कालेदिनशी संधान बांधले. कोर्निलोवच्या मागणीनुसार कालेदिनने तुर्कस्थानमध्ये उपासमार होणाऱ्या तेकिन्सच्या कुटुंबांना धान्य भरून अनेक ट्रक्स त्वरेने रवाना केले. सत्ता काबीज करण्याच्या आपल्या प्रयत्नात ज्या अंमलदारानी भाग घेतला होता, त्यांच्या कुटुंबाना सहाय्य मिळावे म्हणून कोर्निलोवनी मॉस्को आणि पेट्रोग्राडमधील सावकाराना (बँकर्सना) कमालीची खरमरीत पत्रे पाठविली. आपली कुलंगडी बाहेर पडण्याच्या भयाने ह्या सावकारांनी दशसहस्त्रावधी रुबल्सची मदत वाटली. नोव्हेंबर महिन्यापर्यन्त कोर्निलोवचा कालेदिनबरोबर नेमाने पत्रव्यवहार चालू होता. ऑक्टोबरच्या मध्याला कालेदिनला पाठवलेल्या प्रदीर्घ पत्रात त्यानी डॉनवरील परिस्थितीची चौकशी करून तिथले कझाक आपले कसे स्वागत करतील अशी विचारणा केली होती. कालेदिनचे उत्तर प्रोत्साहक होते.

परंतु ऑक्टोबर क्रांतीने कैदी सेनानींचा आधारच कोसळला.

दुसऱ्याच दिवशी चारी दिशेने जासूद रवाना करण्यात आले. एका आठवड्यानंतर कालेदिनने स्वतःला सरसेनापती म्हणवणाऱ्या जनरल दुखोनिनना पत्र पाठवले. ह्या कैद्यांबद्दल कुणालातरी वाटणाऱ्या चिंतेचा प्रतिध्वनी ह्या पत्रातून उठला होता. कोर्निलोव आणि त्यांच्या लवाजम्याची जामीनावर सुटका करावी अशी जोरदार विनंती ह्या पत्रात होती. कझाक सेना संघ आणि लष्करी आणि आरमारी अंमलदार संघाची प्रमुख समिती ह्यांनी अव्वल ठाण्याकडे अशीच विनंती केली. सुखोनिन चाचरले.

१ नोव्हेंबर रोजी कोर्निलोवने त्यांना पत्र पाठवले. ह्या पत्रावर दुखोनिन ह्यांनी समासात जी टिपणे केली आहेत त्यावरून सेनाधिकारी किती विलक्षण असहाय बनले होते ते दिसून येते. सैन्यावरचे प्रत्यक्ष नियंत्रण गमावलेले हे सेनाधिकारी आपले अखेरचे दिवस लोटांगणे घालीत घालवीत होते.

हुजूर सरकार निकोलाई निकोलाईविच,

नशीबेकरून आपण अशा परिस्थितीत सापडला आहात की ह्या घटनांना कलाटणी देण्याचे कर्तव्य आपल्यावर येऊन पडलेले आहे. ह्या घटना बव्हंशीकरून वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांचा धरसोडपणा आणि छुपी संमती ह्यातून उद्भवलेल्या असून त्यातून देशाचा विनाश ओढवण्याचा धोका निर्माण झालेला आहे. आपल्या-बाबत अशी घटिका जवळ येत आहे की जेव्हा माणसाने मोठा धोका पत्करलाच पाहिजे किंवा राजीनामा दिला पाहिजे. न पेक्षा देशाची धूळधाण आणि सैन्याची अंतीम विघटना होण्याचे लांच्छन ह्यांची जबाबदारी त्याच्या खांद्यावर येवून पडेल.

माझ्या हाती असलेल्या अपूर्ण आणि त्रोटक माहितीप्रमाणे परिस्थिती गंभीर आहे. पण अद्याप ती पुरती हाताबाहेर गेलेली नाही. परंतु अव्वल ठाणी आपण बोल्शेव्हिकांना घेऊ दिलीत किंवा स्वखुषीने त्यांचा अधिकार मान्य केलात तर मात्र ती हाताबाहेर जाईल.

प्रचाराने निम्मे गळाठलेले सेन्ट जॉर्ज बटालियन आणि तुमच्या ताब्यातील दुर्बळ झालेले तेकिन रेजिमेंट ही मुळीच पुरेशी खंबीर नाहीत.

आगामी घटना कशा घडणार आहेत त्याचे वळण ताडता मला असे वाटते की, आपण अशी उपाय योजना करणे आवश्यक आहे की जेणे करून अव्वल ठाण्याची सुरक्षितता मजबूत होईलच पण आपल्याला घेरू पाहणाऱ्या बेबंदशाहीविरुद्ध पुढचा लढा संघटीत करण्याच्या दृष्टीने अनुकूल परिस्थिती निर्माण होईल. माझ्या मने ह्या उपाय-योजना खालीलप्रमाणे आहेत.

(१) एक चेकोस्लाव्हाक रेजिमेन्ट आणि पोलिश घोडदळाचे एक रेजिमेन्ट ताबडतोब मोगिलेवला रवाना करण्यात यावीत.

(दुखोनिनचे समासातील टिपण :– ही रेजिमेन्टस पूर्णपणे विश्वसनीय आहेत असे अव्वल ठाण्याला वाटत नाही. बोल्शेव्हिकांबरोबर पहिला युद्ध-विराम ज्यांनी केला–त्यापैकी ही रेजिमेन्टस् होती.)

(२) ओर्शा, स्मोलेन्स्क, झ्लोबिन आणि गोमेल ह्यांचा पोलिश कोअरने कबजा करावा. कझाक आघाडीच्या बतारीतून त्यांना तोफखान्याची कुमक देण्यात यावी.

(समासातील टिपण :- ओर्शा आणि स्मोलेन्स्क सर करण्यासाठी दुसरी कुबान डिव्हिजन आणि आस्माखान कझाकांचे ब्रिगेड ह्यांना ह्यापूर्वीच आणण्यात आले आहे. बिखोवमधून पहिल्या पोलिश डिव्हिजनची रेजिमेन्ट काढून घेणे अनुचित आहे. कारण ह्यामुळे कैद्यांची सुरक्षा कलुषित होईल. पहिल्या डिव्हिजनची पथके खूपच खचलेली असून त्यांना खरे सैन्य मानता येणार नाही. रशियाच्या अंतर्गत कारभारात ढवळाढवळ न करण्याचे पक्के धोरण पोलिश कोअरने स्वीकारले आहे.)

(३) चेकोस्लोवाक कोअर आणि कोर्निलोव रेजिमेन्ट त्याचप्रमाणे कझाक डिव्हिजनची एक किंवा दोन अंमळ विश्वसनीय पथके ह्यांना पेट्रोग्राड आणि मॉस्कोला रवाना करण्याच्या सबबीवर ओर्शा मोगिलेव झ्लोबिन मार्गावर जमविण्यात यावे.

(समासातील टिपण – बोल्शेव्हिकांशी लढण्याला कझाकांचा निखालस विरोध आहे.)

(४) सर्व ब्रिटिश बेलजिअन चिलखती गाड्या ह्याच प्रदेशात जमवण्यात येवून त्यात निव्वळ अंमलदारच असावेत.

(५) बंदूका, दारुगोळा, मशिनगन्स, स्वयंचलित शस्त्रे, हातगोळे ह्यांचे खबरदार पहाऱ्यातील साठे मोगिलेव आणि शेजारील आणखी एखाद्या जागी रचण्यात यावेत आणि अंमलदाराना आणि ह्या प्रदेशातून हमखास गोळा होणाऱ्या स्वयंसेवकाना ते वाटावे.

(समासातील टिपण–ह्यातून अतिरेक संभवतो.)

(६) डॉनचे आतामान तेरेक आणि कुबान सेना हे आणि पोलिश आणि चेक समित्या ह्यांच्या दरम्यान विश्वसनीय संधान आणि अचूक करार स्थापले जावेत. देशात सुव्यवस्था निर्माण करावी. ह्याला कझाकांनी जोरदार पाठींबा दिला असून पोल्स आणि चेकस्च्या दृष्टीने रशियात सुव्यवस्थेची स्थापना त्यांच्या स्वत:च्या अस्तित्वावर जिव्हाळ्याचा परिणाम करणारा प्रश्न आहे.

अधिकाधिक भयावह बातम्या रोजच्या रोज येत होत्या. खुद्द बिकोव इथं असंतोष वाढत होता. अटक केलेल्या सेनानींच्या सुटकेची मागणी करणारे कोर्नि–

लोवचे हितचिंतक आपल्या मोटारगाड्यांतून ये जा करीत होते. कझाक संघाने तर छुप्या धमकावण्याही दिल्या.

एकूण घटनांच्या भाराने दडपून गेलेल्या दुखोनिनने धरसोड चालू केली. कैद्यांना डॉनकडे सोडून देण्यात यावे असा हुकूम त्याने १८ नोव्हेंबर रोजी दिला. पण मग लगोलग तो रद्द करून टाकला.

दुसऱ्या दिवशी सकाळी चिखलाने लडबडलेली एक गाडी बिकोव व्यायामशाळेच्या तुरुंगाच्या मुख्य प्रवेशद्वाराशी येऊन उभी राहिली. ड्रायव्हरने तत्परतेने गाडीचे दार उघडले. एक झकपक कपडे केलेला बयस्कर अंमलदार बाहेर पडला. पहाऱ्याच्या अंमलदाराच्या हाती त्याने जे कागदपत्र दिले त्यावर स्टाफ-कर्नल कुसोनस्कीचे नाव होते.

" मी अव्वल ठाण्यावरून आलोय. जनरल कॉर्निलोवसाठी खास निरोप आहे. कमांडंट कुठं भेटतील ?"

तेकीन रेजिमेन्टचे लेफ्टनंट कर्नल एरगार्डट कमांडंट होते. त्यांनी आलेल्या गृहस्थांना तत्काळ कॉर्निलोवकडे नेले. कुसोनस्कींनी स्वतःची ओळख करून दिली आणि तातडीच्या किंचित कृत्रिम सुरात कळवले,

" प्रतिकार न करता चार तासात मोगिलेव बोल्शेव्हिकांना शरण जाईल. जनरल दुखोनिन ह्यांनी तुम्हाला असं कळवायचा हुकूम दिलाय की, सगळ्या कैद्यांनी ताबडतोब बिकोव सोडावं."

मोगिलेवमधील परिस्थितीबद्दल कुसोनस्कींना प्रश्न विचारीत असता कॉर्निलोवनी लेफ्टनंट कर्नल एरगार्डटना बोलावून घेतले. मेजाच्या कडेवरील आपल्या डाव्या हाताच्या बोटावर सगळा भार देऊ ते म्हणाले,

" सेनानींची ताबडतोब सुटका करा. तेकिन्सची मध्यरात्रीपर्यंत निघण्याची तयारी झाली पाहिजे. मी रेजिमेन्टबरोबर राहीन."

रेजिमेन्टच्या लोहारशाळेतील भाते दिवसभर करकरत आणि धपापत होते. निखारे लालबुंद फुलले होते. घण आदळत होते. ऐरणींजवळ कर्कश खेंकाळत होते. तैनकिन्स घोड्यांच्या चारी टापांना नाल ठोकीत होते. जीन जेरबंदी ठाकठीक करीत होते. बंदुका साफ करून तयारी करीत होते.

सेनानी दिवसा आपल्या बंदिवासातून एकेकटे बाहेर पडत होते. पण ते लहानसे गाव दिवे मालवून गाढ झोपी गेले त्या भयाण मध्यानरातीला घोडेस्वार

तिघातिघांच्या रांगेने शाळेच्या आवाडातून बाहेर पडू लागले. पोलादी आकाशाच्या पार्श्वभूमीवर त्यांच्या कृष्णाकृतीचे शेंडे कोरल्यागत दिसत होते. डोळ्यापर्यंत ओढून घेतलेले मेंढेकातडीच्या टोप्या, टोप्यांच्या फण्यांनी झाकलेले त्यांचे गर्द ओशर चेहरे असे ते स्वार जिनातून पुढे झुकून विस्कटल्या पंखाच्या प्रचंड काळ्या पक्षाप्रमाणे घोडी फेकित होते. त्या पहाळीच्या मधोमध रेजिमेंटल कमांडर कुगंलगेनच्या बाजूने कोनिलोव खांदे पाडून एका उंच सडसडीत घोड्यावरून हिंदकळत चालले होते. बिखोव गावाच्या रस्त्यातून थंडगार वारा घो घो वहात होता. त्या वाऱ्याने चेहरा मुरडून डोळ्याच्या चिचोळ्या गर्ता किलकिल्या करून ते मधूनमधून गोठलेल्या तारकामंडित नभाकडे बघत होते.

कोऱ्या टापांची मंजूळ टपटप रस्त्यातून अलगत सळसळत गेली, आणि वेशीच्या बाहेर ती विरून गेली.

— — —— —

## २१

बारावे कझाक रेजिमेन्ट दोन दिवस माघार घेत होते. हळूहळू सगळ्या वाटेत लढत पण ते माघार घेत होते. रशियन आणि रुमेनियम सैन्याच्या चंबू-गबाळ्याच्या गाड्यांची उंचावलेल्या खडबडीत रस्त्यावरून रीघ लागलेली होती. ऑस्ट्रीयन आणि जर्मन संयुक्त डिव्हिजनने माघार घेणाऱ्या सैन्याला गाढ वेढल्या कमरऱ्याच्या चालीने कव घालून वेढा आवळण्याचा प्रयत्न केला.

एका संध्याकाळी बातमी आली की बारावे रेजिमेन्ट आणि त्याच्या जवळच असलेले रुमेनियन ब्रिगेड वेढ्यात सापडण्याचा खतरा आहे.

होविनेस्की खेड्यातून गनिमाने रुमेनियन ब्रिगेडला मावळतीच्या सुमारास हुसकले आणि गोल्श खिंडीला लागून असणाऱ्या "४८०" ह्या टेकाडावर तो सरकला. पहाडी डिव्हिजनच्या बतारीची कुमक आलेल्या बाराव्या रेजिमेन्टला रात्री हुकूम मिळाला की, त्यांनी गोल्श खोऱ्याच्या उताराला पिछाड राखणीचा पवित्रा घ्यावा. चौक्या बसवून रेजिमेंटने अंगावर येणाऱ्या गनिमाला तोंड देण्याची तयारी केली.

त्याच रात्री मिशा कोशेवोई आणि त्याचाच गाववाला असणाऱ्या मद्दड अलेक्सेई बेशनियाक ह्यांना छुप्या मोर्चे ठाण्याकडे पाठवण्यात आले. एका पडीक विहीरीजवळच्या घळीत विरळ गोठवणीचो हवा खात ते लपून बसले. ढगाळ आकाशातून रानटी कलहंस पुन्हापुन्हा झेपावत होते. झेपावताना सभय आक्रंदत होते. चुट्टा ओढायचा नाही असा हुकूम असल्याने सगेजलेला मिशा आपल्या सोबत्याच्या कानात कुजबुजला,

"ही जिंदगी चमत्कारिकाय अलेक्सी ! आंधळचागत माणसं चाचपडतात, एकत्र येतात, परत पांगतात, कधीकधी एकमेकांना तुडवितात . . . . आपण इथं मरणाच्या दारात जगतोय. मग आपल्याला वाटतं की हे सगळं काय चाललंय· दुसऱ्या माणसाच्या मनागत जगात आणखी काय भयंकर असलंस वाटत नाय. काय वाटूल ते करा. त्याचा तळ काय लागतच नाय . . . इथं तुझ्या शेजारी मी पडलोय. तुझ्या मनात काय चाललंय ते मला ठाऊक नाय. कधीच ठाऊक नव्हतं· तुझी गेली जिंदगी कशी होती हे मला ठाऊक नाय. तुलाही माझ्याबद्दल काय ठाऊक नाय . . . कदाचित मला वाटत असंल की, आता तुझा जीव घ्यावा न् तू मला बिस्किट देतायस्. माझ्या मनात काय चाललंय त्याचा तुला काय पत्ता नाय . . . माणसांना स्वतःबद्दलही फारसं ठाऊक नसतं. उन्हाळचात मी इस्पितळात होतो. माझ्या शेजारच्या बिछान्यात मॉस्कोहून आलेला एक सैनिक होता. तो सारखा विचारायचा कझाक कसे रहातात. काय काय विचारायचा भगवान जाणे ! त्यांची समजूताय की चाबकाखेरीज कझाकांना काय माहीतच नाय. त्यांची समजू-ताय की कझाक रानटी आहेत. कझाकांना मन नाय. त्यांच्या मनाच्या ठिकाणी बाटलीकाचाय. अन् आम्ही त्यांच्यासारखीच माणसं आहोत. त्यांच्यासारखीच आम्हाला बायकापोरींची आवडाय. आम्हाला दुःख झालं की आम्ही रडतो पण दुसऱ्याच्या खुशीचा आनंद आम्हाला होत नाय. तुला काय वाटतं अलेक्सेई ? मला जिंदगीची भूकाय ! जगात किती किती खुबसूरत बाया आहेत हे आठवलं की काळीज कुरतडायला लागतं. त्या सगळचावर प्रेम करणं शक्य नाय. हे मनात आलं की दुःखानं किंचाळावं वाटतं. उंच असो, बुटकी असो, सडसडीत असो, लठ्ठ असो त्या सगळचांशी मी झोपू शकेन. बायांबद्दल आपल्या मनात इतकी कोवळीकाय की अगदी कळ येईल इतक्या मी त्या गोंजारीन. पण जिंदगीनं आपली काय दशा केलीय बघ ! एका बाईला ते आपल्या गळचात बांधतात मग मरेपर्यन्त तिला चिकटून रहावं लागतं. तिचा आपल्याला वीट येईल असं कसं लोकांना वाटत नाय ? आता सगळचावर कळस म्हणून लढाई सुरु केलेय . . ." "तुला पुरता झोडपला नाय बैला !" बेशनियाकने निष्पापणे त्याची टर उडवली.

कोशेवाई उताणा पडला. न बोलता तो आकाशाचे रितेपण न्याहाळत होता. स्वप्नाळूपणे स्मित करीत होता. थंडगार अप्राप्य प्रशांत धरतीला त्याचे हात कुरवाळीत होते.

त्यांचे 'बदली' येण्याच्या आधी एक तास जर्मनांनी त्यांच्यावर अचानक झडप घातली. बेशनियाकने कशीबशी एक गोळी झाडली आणि दात करकरा खात

तो प्राणांतिक वेदनेने कोसळला. एका जर्मनाचे बागनट त्याच्या कोथळ्यातून आरपार गेले. त्याचे मूत्राशय फाडीत गेले. आणि त्याच्या मणक्यावर आदळून थरथरले. बंदुकीच्या दस्त्याने कोशेवाई आडवा झाला. एक दणकट रिक्रुटाने त्याला खांद्यावरून सुमारे अडीच फर्लांग वाहून नेले. मिशा शुद्धीवर आला तेव्हा आपल्याच रक्ताने आपण गुदमरत आहोत अशी त्याला भावना झाली. पण त्याचा श्वासोच्छ-वास जेव्हा ताळ्यावर आला आणि त्याची ताकद जेव्हा परत आली, तेव्हा त्या जर्मनाच्या पाठीवरून खाली पडण्यात त्याला फारसे कष्ट पडले नाहीत. त्याच्या दिशेने त्यांनी फैर झाडली पण काळोख आणि दाट झुडपे ह्यांच्या मदतीने तो पळून गेला.

माघार थांबवण्यात आली आणि रशियन, रुमेनियन सेनेने वेढ्याच्या चाली तून जेव्हा स्वतःची सुटका करून घेतली तेव्हा बारावे रेजिमेन्ट पिछाडीला काढून घेण्यात आले. पळपुटे पळून जाऊ नयेत म्हणून रस्त्याची नाकेबंदी करून मोर्चाची ठाणी उभारण्याचा त्यांना हुकूम मिळाला. पळपुट्यांना जरूर पडल्यास गोळ्या घालून थांबवण्याचा आणि जे सापडतील त्यांना बंदोबस्तात डिव्हिजन ठाण्याकडे नेण्याचा हुकूम होता.

मोर्चाच्या ठाण्यावर 'ड्यूटी' मिळालेल्या पहिल्यात मिशा कोशेवोई होता. तो आणि इतर तीन कझाक सकाळी खेड्यातून निघाले. आणि रस्त्याला लागूनच असलेल्या मक्याच्या शेताच्या कडपट्टीवर त्यांनी 'जागा' धरल्या. तो रस्ता रानाच्या कडेने जाऊन उतरत्या उत्तम मशागत केलेल्या खोऱ्यात लुप्त झाला होता. ते आळीपाळीने टेहळत होते. दुपारी सुमारे दहा सैनिकांचा एक गट रस्त्यातून त्यांच्या दिशेने येताना त्यांना दिसला. आतील खेडे सोडून पुढे जाण्याचा सैनिकांचा विचार होता. ते रानाजवळ आल्यावर थबकले. त्यांनी चुट्टे पेटवले. आपल्या वाटेबद्दल त्यांची बोलणी चालल्याचे स्पष्ट दिसत होते. नंतर ते पुढे गेले आणि एकदम डावीकडे वळले.

"त्यांना हाळ्या घालू या का?" कणसाच्या दांड्यावरून उठत कोशेवाईने इतरांना विचारले.

"त्यांच्या डोक्यावरून गोळ्या झाडू या!"

"अरं ए! थांबा!"

त्या कझाकांपासून शंभर एक पावले पुढे गेलेले ते सैनिक त्या आरोळ्या ऐकून क्षणभर थबकले. आणि परत हळुहळू चालू लागले.

"थांबा!" हवेत बार काढीत एक कझाक ओरडला.

बंदूका मागून फरफटत आणीत ते हळूहळू जाणाऱ्या सैनिकांना गाठायला थांबले.

"थांबायला काय धाड भरली हुती? कुठनं आलात? कुठं निघालात? कागदपत्रं दाखवा." मोर्चे ठाण्याचा नाईक असलेला कझाक सार्जन्ट कोलिचेव खेकसला.

ते सैनिक थबकले. त्यातल्या तिघांनी शांतपणे खांद्यावरच्या बंदूका काढल्या. त्यातील एक जण खाली वाकला. बुटाचा सुटलेला तळ उचलून धरणारी तार त्यानं परत नीट बांधली. ते सगळेजण पार लक्तरे लोंबलेले गलिच्छ होते. जंगलातील झुडतरात त्यांनी रात्र काढल्याचे उघड दिसत होते. कारण त्यांच्या लांबकोटावर पिंगट पालापाचोळ्याचे दाट झुपके लगटले होते. त्यातल्या दोघांनी डोक्यावर तोबऱ्याच्या पिशव्या घातल्या होत्या. इतरांच्या डोक्यावर लोकरी टोप्या होत्या. त्यातले कानपट्टे बटणे तुटलेले होते. टोपीच्या वाद्या फडफडत होत्या. त्यातला एक पोक आलेला उंच सैनिक पुढे आला. त्याचे खप्पड गाल थरथरत होते. त्यांचा तो नाईक पुढे असल्याचे दिसत होते. तो रागाने ओरडला. "काय हवंय तुम्हाला? आम्ही काय तुमच्या वाटंला गेलो?" आमच्या मागं काय म्हणून लागलात?

"कागदपत्रं!" उग्र आवाज करीत त्याला अडवीत सार्जन्ट म्हणाला.

निळ्या डोळ्यांचा आणि नुकत्याच भाजलेल्या विटेगत लालबुंद असलेल्या एका सैनिकाने खिशातून हातगोळा काढला. त्या सार्जन्टच्या तोंडापुढे तो नाचवीत त्याने आपल्या सोबत्यांवर नजर फिरवली. आणि यारोस्लाव्ह बोलीत तो तडतडा म्हणाला,

"हे बघ पोरा – हे बघ कागदपत्र! हे बघ! वर्षातल्या कोणत्याही दिशी तुला चालंल अशी ताकीदाय बघ! तवा संबाळ! हा फेकला तर तुकडं वेचायला जित्ता न्हाणार नैस. समीजलास? अरं समीजलास का इच्यारत्योय! सपष्ट झालं का नाय?"

"बकवास नाय पायजे!" कपाळाला आठ्या घालून त्याच्या छातीत ढोशीत सार्जन्ट म्हणाला. "बकवास नाय पायजे. न् मला भिववायला बघू नको. आधीच खूप भिववलंय आम्हाला. तुम्ही पळपुटे आहात न् आमच्या बरोबर तुम्हाला ठाण्याकडं यायला लागलं. तुमच्या सारख्याची तिथं वाट बघतायत!"

एकमेकांकडे दृष्टीक्षेप करून त्या सैनिकांनी बंदूका खांद्यावरून उतरवल्या. त्यातला काळ्या मिशांचा माणूस खाणीत काम करणारासारखा दिसत होता. कोशेवोई आणि इतर कझाकांकडे आपली बेगुमान नजर वळवून तो गुरगुरला.

"देवाच्यान् तुम्हाला बागनटं चाखायला देऊ! हाकला इथून! देवाच्यान् जो पहिला जवळ ईल त्याला गोळी घालीन!"

तो निळ्या डोळ्यांचा सैनिक आपला हातगोळा मस्तकावर धरून फिरवित होता. सर्वांच्या पुढे असलेल्या त्या उंच पोक आलेल्या सैनिकाने आपल्या गंजलेल्या बागनटाने सार्जंटच्या लांबकोटाचे धबले खरवडले. तो खाणत्रात शिविगाळ करू लागला आणि आपल्या बंदूकीचा दस्ता त्याने मिशा कोशेवोईच्या दिशेने हाणला बंदूकीच्या घोड्यावरील कोशेवोईची बोटे थरारली. त्यातल्या एका कझाकाने एका ठेंगण्या सैनिकाला त्याच्या लांबकोटाचा गळा पकडून हातभर अंतरापर्यन्त खेचले. मागून प्रहार होईल ह्या भयाने तो वळून इतरांकडे बघत होता.

मक्याच्या ताटावर सुकलेली पाने सळसळत होती. उतरत्या खोऱ्यापलीकडे टेकड्यांची निळी उंचसखल ओळ उमटली होती. लालकपील रंगी गायांचा कळप खेड्यालगतच्या कुरणरानात भटकत होता. वाऱ्याबरोबर थंडगार धुळीचे लोट रानापलीकडे चक्रावत चालले होते. ऑक्टोबर महिन्याच्या त्या धूसर दिवसात एक पेंगुळलेली शांती भरून राहिली होती. उन्हाची शिपण झालेल्या रानमाळावर प्रसन्न शांती आणि निवांतपणे पसरला होता. पण रस्त्याच्या बाजूलाच माणसे निरर्थक रागाने लाथाळी करीत. पावसाने न्हालेल्या सुफल धरतीवर आपले रक्त सांडण्याच्या तयारीत होती.

त्यांचा आवेश किंचित ओसरला. आणि ते सैनिक आणि कझाक जरा सलुख्याने बोलू लागले. "मोहरा सोडून आम्हाला तीनच दिवस झाले." कोशेवोई चिडून म्हणाला, "आम्ही पिछाडीला पळितलो नाय. न् तुम्ही पळपुटे लाजा वाटायला पाहिजेत तुम्हाला! आपल्या सोबत्यांना सोडून जाताय. आघाडी कोण संभाळणार? माझ्या स्वतःच्या सोबत्याला माझ्या शेजारी बागनटानं फाडला. न् तुम्ही म्हणीता आम्ही लढाई चाखली नाय! आम्ही चाखली तशी चाखा तुम्ही!"

"कशापाई उगाच बोलाचाली?" त्याला अडवीत दुसरा कझाक म्हणाला, "ठाण्यावर चला. वादावादी बस्स!"

"कझाकांनू, रस्ता सोडा! नाय तर गोळ्या घालू. देवाच्यान् गोळ्या घालू!" खाणकामगारासारखा दिसणाऱ्या सैनिकाने धमकावले.

सार्जन्टाने उपाय हरल्यागत हात पसरले. "आमच्यानं ते व्हायचं नाय. भाऊ! वाटलं तर घ्या जीव आमचा. पण काय झालं तरी तुम्ही सुटणार नाय. आमच्या स्क्वाड्रनचा तिथं त्या खेड्यात तळ पडलाय ..."

तो उंच पोक आलेला सैनिक मधूनच धमकवायचा, मधूनच लाडीगोडी लावायचा. मधूनच आर्जवं भाकायचा. अखेरीस खाली वाकून त्याने आपल्या गलिच्छ बोचक्यातून एक बाटली बाहेर काढली. कोशेवोईला डोळा घालून तो हलक्या आवाजात म्हणाला, "कझाकांनु तुम्हाला पैका देतो न् ही पहा जर्मन व्होडका ... आम्ही आणखी कायतरी गोळा करू. देवाची शपथ आहे ... जाऊ द्या आम्हाला. घरी पोरंबाळं आहेत. तुमचं तुम्हालाच ठाऊकाय ... आम्ही थकून गेलोय. आमच्या सोसण्यापलीकडं गेलंय ... किती दिवस सोसायचं? भगवंता खरंच नाही ना रोखणार आम्हाला?" त्याने घाईघाईने बुटाच्या पायातून थैली काढली. त्यातून दोन कळकट केरेन्स्की रुबलच्या नोटा काढल्या आणि आग्रहाने त्या कोशेवोईच्या हातात कोंबल्या "घे रे! घे घे! अरे देवा ...! फिकीर करु नको! आम्ही निसटू कसेतरी. पैशाचं काय मोठं? ... चालवू त्याच्याशिवाय. घेरे घे! आणखी गोळा करू आम्ही!"

शरमेने चटका बसल्यागत कोशेवोई मागे हटला. त्याने हात पाठीमागे धरले होते. तो मान हलवीत होता. त्याच्या गालावर रक्त उसळून ते लालबुंद झाले. डोळे पाण्याने भरू लागले. "बेशनियाक तसा मारला गेल्यानं माझं डोकं फिरलंय" त्याच्या मनात विचार आला. "मी स्वतः लढाईच्या विरुद्धाय न् ह्या माणसांना मी पकडायला बघतोय. मला काय अधिकाराय? मी इथं काय करतोय? किती नीच डुक्कराय मी!"

तो सार्जन्टकडे गेला. त्याला बाजूला घेऊन त्याची नजर चुकवीत तो म्हणाला, "सोडून देऊ या त्यांना! तुला काय वाटतं कोलीचेव? देवाच्यान् जाऊ दे त्यांना!" आपण काहीतरी लाजीरवाणी गोष्ट करीत आहो अशी नजर टाकीत सार्जन्टने उत्तर दिले, "सोडून देऊ या त्यांना ... दुसरं त्यांच आपण काय करणार? आपणही लौकरच तेच करणाराहोत ... कशाला ते लपवायचं."

त्या सैनिकांच्याकडे वळून तो रागाने कडाडला, "हरामखोर! आम्ही तुमच्याशी माणुसकीनं आदरानं बोलतोय. न् तुम्ही आमच्यापुढं पैसे धरता? आम्हाला भीक लागली वाटलं काय?" तो लालबुंद होऊन गरजला, "ठेऊन घ्या तुमच्या

थैल्या. नायतर गुदरतो तुम्हाला ठाण्यावर !" कझाक बाजूला झाले. सैनिक चालते झाले. खेड्यातील दूरवरच्या निर्मनुष्य रस्त्याकडे वळून बघत कोशेवोई त्या पाठमोऱ्या पळपुट्यांकडे बघून ओरडला, "अरं ए ! ए घोडींनू, दिवसाढवळ्या कुठं निघाला ? त्या तिकडं रानाय. दिवस काढा तिथं न् रातचं निघा. नायतर दुसरं ठाणं भेटंल न् सापडाल !"

सैनिकांनी गुळमुळीतपणे आजुबाजूला न्याहाळले. आणि रस्ता सोडून ते हिवररानाच्या दिशेने गेलेल्या एका गलिच्छ मातकट वाटेने पांगले.

---




# २२

पेट्रोग्राडमध्ये उलथापालथ झाल्याच्या अफवा नोव्हेंबरच्या सुरवातीला कझाकांकडे पोचू लागल्या. ठाण्यावरील अडलींना इतरांपेक्षा बहुदा जास्त माहिती होती. त्यांनी ह्याला दुजोरा दिला की, हंगामी सरकार अमेरिकेला पळून गेले आहे. ते म्हणत होते की, केरेन्स्कीला खलाशांनी पकडला. त्याची त्यांनी साफ हजामत केली. एखाद्या नायकिणीसारखा त्याला रंगवला. आणि दोन दिवस पेट्रोग्राडच्या रस्त्याने त्याची धिंड काढली.

हंगामी सरकार उलथून टाकण्यात आले असून कामगार किसानांच्या हाती सत्ता आलेली आहे अशी अधिकृत बातमी आली. तेव्हा कझाक खबरदारीने गप्प झाले. आता लढाई संपेल अशा अपेक्षेने अनेकांना आनंद झाला, पण केरेन्स्की आणि जनरल क्रासनोव ह्यांच्याबरोबर तिसरी रिसाला फौज पेट्रोग्राडवर चाल करून जात असून दक्षिणेकडून कालेदिनने कझाक रेजिमेंट घेऊन कूच केले आहे ह्या अफवेने घबराट पसरली.

आघाडीच्या कोसळून ठिकऱ्या उडाल्या होत्या. ऑक्टोबर महिन्यात सैनिक सैरावैरा बेशिस्त घोळक्यांनी पळाले होते. पण नोव्हेंबर अखेर कंपनीच्या कंपनी आणि रेजिमेन्टस्च्या रेजिमेन्टस् आपल्या जागा सोडून चालल्या होत्या. कधीकधी फुटकळ सामान जिन्नस घेऊन ते चालत होते पण जास्त करून रेजिमेन्टची मालमत्ता बरोबर घेऊन ते जात. वखारी फोडीत, अंमलदारांना गोळ्या घालीत वाटेवर लुटालूट करीत त्यांचा बेबंद प्रमत्त लोंढा घराकडे धोधावत होता.

पळपुट्यांना धरून ठेवण्याच्या बाराव्या रेजिमेन्टच्या कामगिरीला ह्या नवीन परिस्थितीत काही अर्थच उरला नाही. आपली रंगणे सोडून चालत्या

होणाऱ्या पायदळाने पाडलेली भगदाडे आणि फटी बुजवण्याचा फोल प्रयत्न त्यांना आघाडीवर पिटाळून संपला. नंतर डिसेंबर महिन्यात ते रेजिमेन्ट परत काढून घेण्यात आले. नजिकच्या स्टेशनात ते नेण्यात आले. रेजिमेन्टची सगळी मालमत्ता, मशिनगन्स, राखीव दारूगोळा घोडे डब्यात चढवून त्यांनी संघर्षग्रस्त रशियाच्या केन्द्रभागाकडे प्रस्थान ठेवले.

युक्रेनमधून बाराव्या रेजिमेंटच्या फौजी गाड्या डॉनच्या दिशेने रखडत चालल्या होत्या. झ्नामेनकापासून जवळच बोल्शेव्हिक 'रेडगार्डस'नी त्यांची हत्यारे काढून घेण्याचा प्रयत्न केला. अर्धा तास बोलणी चालली होती. कोशेवाई आणि स्क्वाड्रन क्रांतीकारक समित्यांचे प्रमूख असणारे इतर पाच कझाक ह्यांनी हत्यारानिशी पुढे जाण्याची परवानगी मागीतली.

"तुम्हाला हत्यारं काय करायचीत ?" स्टेशन सोव्हिएटच्या सभासदांनी विचारले. "आमच्या धनिक न् सेनानींचा फडशा पाडायला ! कालेदिनची शेपूट पिरगळायला !" सगळ्यांच्या वतीने कोशेवाईने उत्तर दिले. "आम्ही आमची हत्यारं सोडणार नाय. ती सैन्याची आहेत" कझाकांनी निषेधाने सांगितले.

गाड्यांना पुढे जाऊ देण्यात आले. क्रेमेनचुग येथे त्यांना निःशस्त्र करण्याचा आणखी प्रयत्न झाला. उघड्या दारातून कझाकांनी मशिनगन्स बसवल्या. आणि स्टेशनावर त्या डागल्या. त्यांच्यापैकी एका स्क्वाड्रनने रुळावरून सफेबंदी केली. आणि त्यांनी लढण्याचा पवित्रा घेतला. तेव्हा मगच त्यांना पुढे जाऊ देण्यात आले. येकातेरिनोस्लाव जवळ रेडगार्डस पथकाशी गोळीबाराची देवाणघेवाणही कामी आली नाही. रेजिमेन्ट काही अंशी निःशस्त्र करण्यात आले. मशिनगन्स, काडतुसाच्या शंभराहून जास्त डब्बादवाल्या, फौजी टेलिफोन्सची उपकरणी, तारांची बरीचशी रीळे हे सामान जप्त करण्यात आले. कझाकांनी आपल्या अंमलदाराना अटक करावी असे सुचविण्यात आले. त्याला कझाकांनी नकार दिला. अवघ्या प्रवासात त्यांनी फक्त एक अंमलदार गमावला. तो रेजिमेन्टचा अॅडजुटंट चिरकोस्कोव होता. खुद्द कझाकांनीच त्याला देहदंडाची शिक्षा ठोठावली. चूबाती आणि 'रेडगार्ड'चा एक खलाशी ह्यांनी ती शिक्षा अंमलात आणली.

१७ डिसेंबरच्या संध्याकाळी सिनेलनिकोवो स्टेशनापाशी कझाकांनी अॅडजुटंटला गाडीतून बाहेर खेचला.

"कझाकांचा विश्वासघातकी. तोच ना हा ?" माउझेर पिस्तुल आणि जपानी बंदूकीने हत्यारबंद असलेल्या एका बोथरखिडचा खलाशाने मौजेने विचारले.

"तुला कांय वाटलं आम्हाला हा चेहरा आठवत नाय ! छट् ! आम्ही त्याला बरोबर खेचलाय !" चुबतिईने धपापत उत्तर दिले.

अॅडजुटंट एक तरुण ज्युनिअर कॅप्टन होता. पिंजऱ्यात सापडलेल्या श्वापदा-सारखा तो भिरीभिरी चौफेर बघत होता. त्याचे गाल जाळणारी थंडी आणि बंदूकीच्या दस्त्याचा प्रहार होऊन झालेल्या वेदना ह्याचे त्याला भान नव्हते. चुबतिई आणि तो खलाशी त्याला घेऊन गाडीपासून जरा लांब गेले.

"ह्याच्यासारखे सैतानायत म्हणून लोकांना बंड करावं लागतं. क्रांती झाली ती असल्या लोकांच्या पायीच . . . ओहोहो ! अरं लाडल्या इतका थरथरू नको. तुकडं खाली पडतील तुझं." चुबतिई फुत्कारीत म्हणाला. त्याने टोपी काढून हातात घेतली आणि अंगावर क्रुसाची निशाणी केली.

"हं ! संभाळा कॅप्टनसाहेब !"

"तयार ?" आपल्या पिस्तुलाशी खेळत त्या खलाशाने विचारले. त्याच्या विलग झालेल्या ओठातून दंतहीन हास्य प्रकट झाले होते.

"तयार !"

चुबतिईने परत क्रुसाची निशाणी केली. आणि खलाशाकडे तिरप्या नजरेने पाहिले. खलाशाने एक पाय मागे टाकून नेम धरला होता. विकट स्मित करीत त्याने पहिली गोळी झाडली.

चापलिन जवळच रेजिमेन्ट योगायोगाने एका हातघाईत सापडले. अराजक आणि युक्रेनी ह्यांची जुंपली होती. रेजिमेन्टचे तीन जण त्यात कामी आले. नेट लावून मोठ्या मुष्कीलीने ते त्यातून बाहेर पडले. रायफल डिव्हिजनच्या फौजी गाड्यांनी अडवलेला रेल्वे मार्ग त्यांनी मोकळा केला.

तीन दिवसात रेजिमेन्टचा पहिला जथा मिलेरोवा स्टेशनावर गाडीतून खाली उतरत होता. उरलेले लुगान्‌स्कमध्ये कुचंबत बसले. निम्मे लोक कारगिन खेड्यात आले. (उरलेले निम्मे बाहेर पडून आणि घोड्यावर मांड टाकून स्टेशनातून सरळ घराकडे निघाले.)

दुसऱ्या दिवशी त्यांनी आपले पाडावजिन्नस आणि ऑस्ट्रीयनांकडून काबीज केलेले घोडे ह्यांची विक्री केली. रेजिमेंटची गंगाजळी आणि सामानसामुग्री त्यांनी वाटून घेतली.

कोशेवोई आणि तातारस्की खेड्यातील इतर कझाक तिसऱ्या प्रहरी घराकडे निघाले. एका टेकडीवर त्यांनी घोडी चढवली. तळवटी चिर नदीच्या वळणे घेत गेलेल्या हिमशुभ्र काठावर डॉनच्या वरच्या खोऱ्यातील सर्वांत सुंदर असलेले कारगिन खेडे उभे होते. वाफेवर चालणाऱ्या गिरणीच्या धुरांड्यातून मुलायम धुराचे भपकारे वर उठत होते. चौकात माणसांचा काळसर घोळका जमला होता. दिवेलागणीच्या प्रार्थनेची घंटा निनादत होती. कारगिनच्या उतारापलीकडे क्लिमोवस्की खेड्याभोवतालच्या वळुंजीचे पानमुकूट अगदी जेमतेम दिसत होते. त्याच्याही पलीकडे हिमाच्छादीत क्षितिजाच्या दवण्या निळावंतीवर धूसर मावळतीची झगमगती लाल प्रभा अर्ध्या अस्मानांवर पसरली होती.

रासवट सफरचंदाची तीन झाडे ज्यावर पोसली होती तो ठिया ओलांडून अठरा स्वार करकरत्या जीनांवरून चौखूर दौडत ईशान्येच्या दिशेने निघून गेले.

टेकड्यांच्या कोंडाळ्यामागे गोठल्या थंडीची रात्र चोरासारखी दबा धरून बसली होती. आपल्या फडाटोप्यांनी चेहरे झाकून घेतलेले कझाक सुसाट दौडीसाठी घोड्यांना पुन्हापुन्हा टाचा लावीत होते. मागे दक्षिणेकडे पडत जाणाऱ्या टणक रस्त्यावर घोड्यांचे नाल अगदी काळजात कळ उठण्याइतके स्वच्छ खणाणत होते. नुकत्याच लागलेल्या पाघळणीने तासलेले बर्फाळ कवच रस्त्याच्या दुतर्फा गवताना आपंगले होते. आणि त्या चांदण्यात अग्नीरत्नाप्रमाणे धवलदीप्तीने तेजाळत होते.

न बोलता कझाक घोडी दामटीत होते. रस्ता दक्षिणेकडे ओघळत गेला होता. रान पूर्वेला लपेटले होते. रस्त्याच्या बाजूच्या हिमावर ससांच्या इवल्याशा निशाण्या उमटल्या होत्या. माळरानाच्यावर उंचच उंच आकाशगंगेने व्योमाच्या कमरेला असा विळखा घातला होता की, जसा काही चांदीने मढवलेला कझाकाचा पट्टाच !

---

# पर्व पाचवे

## १

१९१७ च्या सरत्या पतझडीच्या दिवसात कझाक आघाडीवरून घरी परतू लागले. वयस्कर दिसू लागलेला ख्रिस्तोनिया आणि त्याच्या बरोबर ५२ व्या रेजिमेंटमधे असलेले इतर तिघेजण परत आले. गुळगुळीत गालांचा आनिकुशका बंधानी, इवान तोमिलीन आणि 'नालवाला' याकोव परतले. त्यांच्यामागोमाग मार्तिन शामिल, इवान अलेक्सिएविच, झखार कोरेलेव, काहीच्याबाहीच उंचाड्या असणारा बोरशेव हे आले. डिसेंबर महिन्यात मितका कोर्शुनोव अचानक उगवला आणि एक आठवड्यानंतर मिशा कोशेवोई, म्हाताऱ्या काशुलिनचा लेक प्रखोर झीकोव आन्द्रेई काशुलिन, एपिफान माक्साएव सिनिलिन इगोर ही बाराव्या रेजिमेन्टमधे असलेली सगळी कझाक मंडळी परतली.

आपल्या रेजिमेन्टमधून फुटलेला फेदोत बोदोव्स्कोव वोरोनेझहून थेट घराकडे आला. एका ऑस्ट्रियन अंमलदाराकडून घेतलेल्या देखण्या जरद्या घोड्यावर बसून तो आला. आपल्या जनावराच्या वेगावर भिस्त ठेवून, क्रांतीने खदखदणाऱ्या वोरोनेझ मुलुखातील खेड्यातून आपण कसे वाट काढीत आलो, 'रेडगार्ड' पथकाच्या डोळ्यादेखत आपण कसे निसटलो ह्याची कथा त्याने नंतर अनेकदा सांगितली.

नंतर कामेन्स्कायातील बोल्शेव्हिक झालेल्या २७ व्या रेजिमेंटमधून पळालेले मेकुलोव, प्योत्र मेलेखोव आणि निकोलाई कोशेवोई हे आले. त्यांनीच ही

बातमी आणली की, दुसऱ्या राखीव रेजिमेंटमध्ये असणारा ग्रिगरी मेलेखोव बोल्शेव्हिकांना जाऊन मिळाला असून कामेनस्कायात राहिलेला आहे. एकेकाळी धाडसी 'घोडीचोर' असणारा अफाट माक्सीम ग्रॅझनोव्ह २७ व्या रेजिमेंटमधेच राहिला होता. धामधुमीच्या काळातील नाविन्याने आणि सुखासीन जीवनाच्या शक्यतेने तो बोल्शेव्हिकांकडे ओढला गेला होता. माक्सीमबद्दल बोलताना हे लोक सांगत की त्याने कमालीचे कुरूप तेवढेच कमालीचे तेज घोडे मिळवले आहे. त्याच्या पाठीवर म्हणे सलग चंदेरी केसांची लकेर आहे ते तेवढेसे उंच नाही पण पठाडी देहाचे आहे. गाईसारखे पाटलरंगी आहे. ग्रिगरीबद्दल ते फारसे बोलत नसत. खेड्याचा आणि त्याचा रस्ता परस्परविरुद्ध दिशेने गेलेला आहे ह्या जाणीवेने . . . हे रस्ते परत कधी एकमेकांना मिळतील ह्याबद्दल आशंकेने . . . ते त्याच्याबद्दल बोलायला नाराज असत.

मालक म्हणून म्हणा किंवा ज्यांची खूप वाट पाहिली असे पाव्हणे म्हणून म्हणा कझाक ज्या घरी परत आले ती घरं आनंदाने भरून गेली. ज्यांचे नातलग किंवा प्रियजन गमावले होते त्या घरातील गाढया दुःखात हा आनंद तीक्ष्ण आणि निर्दयतेने जास्तच तीव्रता आणीत होता. असे अनेक कझाक होते की जे बेपत्ता झाले होते. गालिशिया, बुकोविना, पूर्व प्रशिया, कारपाथियन आणि रुमेनिया इथे विखुरले होते. त्यांचे देह खाली कुजत पडलेले होते वर आग्येलाचे शोकगीत घुमत होते. सामाईक थडग्यांच्या ढिगांवर आता उंच तण माजले होते. पाऊस त्यावर झोडपीत होता. वाहत्या हिमाने त्यांना वेढून टाकले होते. बोडक्या कझाक बाया खेड्यातील रस्त्याच्या टोकापर्यंत किती वेळाही धावत गेल्या आणि डोळ्यावर हाताचा आडोसा धरून त्यांनी दूरवर कितीही न्याहाळले तरी आपला जिवलग घोडा फेकीत आलेला त्यांच्या डोळ्यांना कधीही दिसायचा नव्हता. त्यांच्या सुजलेल्या आणि सुकलेल्या डोळ्यातून पाण्याचे कितीही पाट वाहिले तरी त्याने त्यांची वेदना धुवून जाणार नव्हती. श्राद्ध–स्मरणाच्या दिवशी त्या कितीही रडल्या तरी पूर्वेचा वारा त्यांचा आक्रोश गलिशियाकडे, पूर्व प्रशियाकडे सामाईक थडग्याच्या खरलेल्या ढिगांकडे नेणार नव्हता.

थडग्यावर जसे गवत वाढते तसा वेदनेवर काळ माजत जातो. जे निघून गेले होते त्यांच्या खुणा वाऱ्यावर वाहून गेल्या. आपल्या जिवलगाच्या घरपरतणीची व्यर्थ वाट ज्यांनी पाहिली आणि ज्यांची वाट पाहणे सदाचेच व्यर्थ ठरणार होते त्यांच्या विदारक वेदना आणि स्मृती काळ तशाच वाहून नेणार होता. कारण मानवी जीवन नश्वर आहे. आणि हे गवत तुडवायला आपल्यापैकी कुणालाच फारशी सवड दिलेली नाही . . .

आपँला दीर मार्तिन शामिल आपल्या गर्भारशी बायकोला कुरवाळताना पाहिला, पोरांना खाऊ देताना, त्यांचे लाड करताना पाहिला की प्रखोर शामिलची बायको कठीण भुईवर कपाळ आपटून घ्यायची. आपल्या झोपडीतील मातीच्या जमिनीचे लचके तोडायची. ती तडकडून घरभर हातागुडघ्यावर रांगत फिरायची तिची लहानशी पोरे मेन्ढराच्या कळपाप्रमाणे एकमेकांना बिलगून उभी राहत. आपल्या आईला बघून ती भोकाड पसरीत त्यांचे डोळे भयाने विस्फारलेले असत.

लाडक्या जिवा, तुझ्या उरल्यासुरल्या पोलक्याची लक्तरं कर! तुझ्या खडतर दळभद्र्या जिंदगीने पातळ झालेले डोईचे केस उपट, रक्त फुटेपर्यंत ओठ चाव, कामाने घट्टे पडलेले तुझे हात एकमेकावर चोळ, तुझ्या भकास घराच्या उंबरठ्यावर देह आपटून घे! तुझ्या घराचा धनी हरपलाय. तुझा नवरा गेलाय. तुझी पोरं अनाथ झालीत; आणि लक्षात ठेव तुला किंवा तुझ्या अनाथ पोरांना कुणीही पोटाशी घेणार नाही. अपरंपार श्रम आणि दारिद्र्य ह्यातून कुणीही तुझी सुटका करणार नाही. श्रमाने गलितगात्र होऊन तू रात्री अंथरुणाला पाठ टेकशील तेव्हा तुझे मस्तक आपल्या उराशी कुणीही कवटाळून धरणार नाही. "काळजी करू नको आनिस्का, नेऊ रेटून!" असं तो तुला एकदा म्हणाला होता, तसं कुणीही म्हणणार नाही. तुला दुसरा नवरा मिळणार नाही. कारण श्रमाने चिंतेने पोरवड्याने तुझं चिपाड करून सुरकतून टाकलंय. तुझ्या अर्धनग्न पोरांना बाप कधी लाभणार नाही. सगळी नांगरणी आणि कुळवणी करावी लागेल आणि अतोनात श्रमाने धापा टाकाव्या लागतील. कापणी यंत्रावरून बुचेडे खुरपून तुलाच ते गाडीत चढवावे लागतील. गव्हाचे अवजड भारे खुरपण्यावर चढवशील तेव्हा पोटात काहीतरी तुटत आहे असे तुला वाटेल आणि मग लक्तरे पांघरून रक्तस्त्रावाच्या वेदनेने तू तडफडत राहशील.

आपल्या पोराचे जुने आतून घालायचे कपडे घेऊन ते हुंगत अलेक्सेई बेशनिव्याकची आई दुःखाने अश्रू ढाळीत होती. पण मिशा कोशेवोईने बरोबर आणलेल्या त्याच्या शेवटच्या सदऱ्याच्या घड्यातूनच तिला त्याच्या घामाच्या खुणांचा वास येऊ शकत होता. त्या सदऱ्यात डोके खुपसून म्हातारी गदगदून व्याकुळ आक्रोश करीत होती. त्या मलिच्छ कपड्यांवर तिच्या आसवांनी आकृत्या उमटत होत्या.

मानित्सकोव, अफोनिकी, ओझेरोव, एवलान्तिया, कालिनिन, लिखोविदोव, एर्माकोव आणि इतर अनेक कझाकांची कुटुंबे पोरकी झाली.

फक्त एका स्तिपान आस्ताखोवसाठी कुणी रडले नाही. कारण रडायला कुणी नव्हतेच. उन्हाळ्यातसुद्धा उदासवाणे दिसणारे त्याचे कुडाचे घर मोडकळीला येऊन भकास पडले होते. आक्सिनिया यागोदनोएत रहात होती तिची हालहवाल फारशी ऐकू येत नव्हती. तिने खेड्यात कधी पाऊल टाकले नाही. कदाचित कधी पाऊल टाकावेसे तिला वाटलेही नसेल.

डॉनच्या वरच्या खोऱ्यातील मुलुखातील कझाक गटागटाने घरी परतले. डिसेंबरपर्यन्त व्येशेनस्काया जिल्ह्याच्या खेड्यातून जवळजवळ सर्वजण परतले. दहापासून चाळीसापर्यंत गट केलेली स्वारांची टोळकी तातारस्कीतून जात आणि डॉनच्या डाव्या काठाने वाटेला लागत.

"सैनिक हो, कुठून आलात ?" म्हातारी माणसे जाऊन विचारीत.

"चेर्नाया नदीवरून !"

"झिमोवनायावरून !"

"दुब्रोवकाहून !"

"रेशेतोव्स्कोवोहून."

"दुदारेवस्किएहून !"

' गोरोखोव्स्किएहून !"

"आलिमोवस्किएहून !"

अशी उत्तरे येत.

"लढाई संपली म्हणावी का काय ?" म्हातारी माणसे हळूच विचारीत.

हळव्या मनाचे शांत असलेले स्वार स्मित करून म्हणत,

"खूप झालं दादा ! पिट्टा पडला आमचा !"

"गरज संपली ! आता चालले घराला !"

पण विशेष आडदांड आणि दुखावलेले जे होते ते आईमाई उद्धरून त्या म्हाताऱ्यांना ऐकवीत,

"हाकल ए थेरड्या ! साला गांडू !"

"कशाला उचापती हव्यात ? काय करायचंय तुला ?"

"बोकाळलेत साले आगावू ?"

हिवाळ्याच्या अखेरीस नोवोचेरकास्क जवळच यादवी युद्ध भडकले होते. पण डॉनच्या वरच्या खोऱ्यातील जिल्ह्यातून स्मशानशांतता नांदत होती. फक्त कुटुंबातून अंतर्गत छुपे मतभेद धुमसत होते आणि मधूनमधून डोकी वर काढीत होते. आघाडीवरून परतलेल्या कझाकांशी म्हाताऱ्या माणसांचे बनत नव्हते.

डॉन प्रांताच्या राजधानीजवळ भडकलेल्या युद्धाची खेडूतांना फक्त सांगोवांगी माहिती होती. ज्या निरनिराळ्या राजकीय प्रवृत्ती उसळल्या होत्या त्यांची केवळ अंधुक समज आलेली ही माणसे भुईला कान लावून वाट बघत होती.

जानेवारीपर्यंन्त तातारस्की खेड्यातील जीवनाचा ओघ शांतपणे वाहत होता. आघाडीवरून परतलेले कझाक आपल्या बायकांबरोबर घरात आराम करीत होते. पोटभर जेवत होते. युद्धात त्याना जे सोसावे लागले त्यापेक्षाही जास्त कटू व्यथा आणि ओझी त्यांच्यापुढे वाढून ठेवलेली होती ह्याची त्यांना दखलच नव्हती.

———

## २

रणांगणावर बजावलेल्या उत्कृष्ट कामगिरीबद्दल १९१७ च्या जानेवारीत ग्रिगरी मोलिखोवला कॉर्नेटच्या हुद्याची बढती देण्यात आली. 'ट्रूप कमांडर' म्हणून त्याची दुसऱ्या राखीव रेजिमेन्टमधे नेमणूक झाली. सप्टेंबर महिन्यात न्यूमोनिया झाल्याने तो रजा घेऊन घरी आला. दीड महिना घरी काढल्यावर 'मेडिकल कमिशन' ने त्याला पास केले आणि तो रेजिमेंटमधे परतला. ऑक्टोबर* क्रांतीनंतर त्याला 'स्क्वाड्रन कमांडर' ची बढती देण्यात आली. आजूबाजूला घडणाऱ्या घटना आणि त्याच्या रेजिमेन्टमधील एक अंमलदार लेफ्टनंट येफिम इझवारिन ह्याचा प्रभाव ह्यामुळे ह्यावेळेपर्यंत त्याच्या मतात खूपच बदल झाला होता.

रजेवरून परत आल्याच्या दिवशीच ग्रिगरीची इझवारिनशी ओळख झाली. मग ड्यूटीवर असताना आणि नसताना तो अनेकदा त्याला भेटू लागला. नकळत इझवारिनचा प्रभाव त्याच्यावर पडत होता. येफिम इझवारिन गुंदोरोवस्की प्रांतातील एका सुखवस्तू कझाकाचा मुलगा होता. नोवोचेरकास्क कॅडेट ट्रेनिंग कॉलेजात त्याने शिक्षण घेतले होते. कॉलेजातून तो थेट आघाडीवरील दहाव्या डॉन कझाक रेजिमेन्टमधे दाखल झाला. ह्या रेजिमेन्टमध्ये त्याने सुमारे वर्षभर चाकरी केली. आपल्याला तिथे काय मिळाले ते सांगताना तो म्हणायचा, "सेंट जॉर्जचा क्रॉस आणि शरीराच्या निरनिराळ्या सोई-गैरसोईच्या भागात हात-गोळ्याची चौदा छकलं!" नंतर त्याची दुसऱ्या राखीव रेजिमेन्टकडे बदली

* १९१७ च्या ७ नोव्हेंबरची कामगार क्रांती. (जुन्या कॅलेंडरप्रमाणे २५ ऑक्टोबर)

झाली. त्याची कारकिर्द पूर्ण करण्यासाठी ही बदली झाली होती पण कारकिर्द मात्र अल्पजीवी ठरली.

असाधारण कर्तृत्व, अत्यंत हुशार, सरासरी कझाक अंमलदारांच्या पातळीच्या बरेच शिक्षण झालेला इझवारिन जाज्वल्य कझाक स्वायत्ततावादी होता. फेब्रुअरी क्रांतीने त्याला हलवून सोडले. परत वळण्याची त्याला संधी ह्या क्रांतीने मिळाली. कझाकांच्या फुटीरवादी वर्तुळाशी त्याने संधान बांधले. डॉन प्रदेशाची स्वायत्तता आणि कझाकावर झारशाहीने हात टाकण्यापूर्वी डॉनवर ज्या प्रकारचे सरकार अस्तित्वात होते तशा सरकारची स्थापना ह्यासाठी त्याने डोकेबाज चळवळ चालू केली. इतिहासाशी त्याचा उत्तम परिचय होता. त्याला तळमळ होती. पण त्याची नजर स्वच्छ होती. बुद्धी समतोल होती. 'त्यांचे स्वतःचे सरकार स्थापन होईल. त्या प्रदेशावर एकही रशियन उरणार नाही. कझाकी जमात स्वतःच्या सरहद्दीवर स्वतःचे पहारे बसवतील. युक्रेनी आणि थोर रशियन पुढे आल्यावर डोईची टोपी उचलून वर करीत, नव्हे तर त्यांच्या बरोबरीचे म्हणून ते बोलतील आणि त्यांच्याशी व्यापार आणि देवाण घेवाण करतील' असे डॉन कझाकांच्या स्वतंत्र भावी जीवनाचे चित्र तो आपल्या अमोघ वक्तृत्वाने रंगवीत असे. भाबडे कझाक आणि सुमार शिक्षण घेतलेले अंमलदार ह्यांची डोकी इझवारिनने फिरवून टाकली. ग्रिगरीही त्याला भाळला. सुरवातीला त्यांच्यात कडाक्याचे वाद होत पण अर्धशिक्षित ग्रिगरी त्याच्या प्रतिस्पर्ध्यापुढे कःपदार्थ होता ह्या वाक्द्वंद्वात इझवारिनची सहज फत्ते व्हायची. ही चर्चा बहुदा बराकीच्या एखाद्या कोपऱ्यात चालायची आणि ऐकणारे नेहमी इझवारिनच्या बाजूने असत. आपला युक्तिवाद आणि भावी स्वतंत्र जीवनाचे चित्रण ह्यामुळे तो कझाकांना जिंकून घेई. डॉनच्या खालच्या खोऱ्यातील भरभराटीला आलेल्या कझाकांच्या अगदी आतल्या, खोलवर जोपासलेल्या भावनांना हे चित्र विशेष भिडत असे.

"पण गव्हाखेरीज आपल्या जवळ काय नाय तर रशियाखेरीज आपण कसं जगीतणार ?" ग्रिगरी विचारायचा.

इझवारिन सहिष्णुतेने समजावून द्यायचा, "फक्त डॉन प्रदेशाच्याच स्वतंत्र अन् अगदी एकांडचा आयुष्याचा मी विचार करीत नाय. कुबान, तेरेक आणि कॉकेशसचे पहाडी ह्यांच्याबरोबर संघराज्याच्या म्हणजे एकजुटीच्या आधारे आपण एकत्र जगू. कॉकेशसमधे खजिनांची रेलचेल आहे. तिथं काय वाट्टेल ते सापडतं."

" न् कोळसासुद्धा ?"

" दोनेत्स्क वाटी हाकेच्या अंतरावराय."

" पण ते रशियाच्या मालकीचय !"

" ते कुणाच्या मालकीचय् न् कुणाच्या मुलुखाताय हा वादाचा प्रश्नाय. पण जरी दोनेत्स्क वाटी रशियाकडं गेली तरी आपलं फारसं नुकसान होत नाय. आपली संघराज्याची एकजूट उद्योगधंद्याच्या पायावर नसंल, आपला शेतीचा देशाय न् तसं असल्यान् आपण आपल्या लहानशा उद्योगाला रशियाकडून विकत घेऊन कोळसा पुरवू. न् फक्त कोळसाच नाय. रशियाकडून आणखी बऱ्याच गोष्टी विकत घ्यायला लागतील. इमारत लाकूड, धातू, तयार माल, दगड न् माती ! परतफेड म्हणून आपण त्यांना उत्तम वाणाचा गहू न तेल पुरवू.

" न् वेगळं राहिल्यानं आपला फायदा काय होणार ?"

" अगदी उघडाय ! पहिली गोष्ट म्हणजे त्यांच्या राजकीय संरक्षणापासून आपली मोकळीक होईल. रशियन झारांनी नष्ट करून टाकलेली आपली जुनी व्यवस्था आपण परत मांडू. न सगळे उपरे लोक बाहेर काढू. यंत्रसामुग्रीची आयात करून दहा वर्षात आपण आपली शेती अशा पातळीपर्यंत वाढवू की आपण दसपट श्रीमंत होऊ जमीन आपलीय, आपल्या बापजाद्यांच्या रक्ताचं पाणी न् हाडांच खत तिला घातलय् पण चारशे वर्षं आपण रशियाच्या अंकित आहोत. स्वतःचा विचार न करता रशियाच्या हिताचा बचाव करतोय. आपल्याला समुद्रापर्यन्त जायला वाटाय. आपली भक्कम लढाऊ फौज होईल न् ना युक्रेनी ना रशियन आपल्या स्वातंत्र्याचा भंग करायला धजावतील !"

बेताची चण, देखणी अंगलट आणि रुंद खांदे असलेला इझवारिन म्हणजे एक खास कझाक होता. त्याचे कुरळे केस कच्च्या 'ओट' च्या रंगाचे होते. चेहरा श्यामल आणि शुभ्र कपाळपट्टी उतरती होती. गाल आणि पांढरट भुव-यांच्या कडाच तेव्हढ्या उन्हाने रापलेल्या होत्या. तो उंच सुरेल मध्यम स्वरात बोलायचा. बोलता बोलता डावी भृकुटी उंचावण्याची आणि काहीतरी हुंगल्या-सारखे करावे अशाप्रकारे आपले लहान चोचदार नाक मुरडण्याची त्याला खोड होती. त्याची उत्साही चाल, चालीतील आत्मविश्वासाचा झोक आणि तपकिरी डोळ्यांची निर्भय नजर ह्यामुळे रेजिमेन्टच्या इतर अंमलदारात तो उठून दिसायचा. कझाकांना त्याच्याबद्दल मनःपूर्वक आदर वाटायचा, खुद्द रेजिमेन्ट कमांडरपेक्षाही कदाचित त्याच्याबद्दलच जास्त वाटायचा.

इझवारिन आणि ग्रिगरी ह्यांच्या एकत्र खूप गप्पा झाल्या. आपल्या पायाखालची धरणी परत एकदा कंपायमान होत आहे असे ग्रिगरीला वाटायचे. मॉस्कोतील डोळ्यांच्या इस्पितळात गारांझाची भेट झाली तेव्हा आला तसाच एक अनुभव त्याला येत होता.

ऑक्टोबर क्रांतीनंतर थोड्याच दिवसांनी त्याचे इझवारिनबरोबर बराच वेळ संभाषण झाले. परस्परविरोधी प्रेरणांनी विकल होऊन त्याने बोल्शेव्हिकांबद्दल काय वाटते असा प्रश्न सावधपणे लेफ्टनंटला विचारला.

"येफिम इवानिच, मला असं सांग की, तुला काय वाटतं-बोल्शेव्हिकाचं बरोबराय का नाय?"

आपली भृकुटी उंचावून आणि नाकाला गंमतीची मुरड घालून इझवारिनने उत्तर दिले,

"बोल्शेव्हिकांचं बरोबराय का? हाः हाः! पोरा, तू अजून तान्हुलायस. बोल्शेव्हिकांचा स्वतःचा कार्यक्रम, स्वतःच्या योजना, स्वतःच्या आशा आहेत त्यांच्या दृष्टीनं त्यांचं बरोबराय न आपल्या दृष्टीनं आपलं बरोबराय. बोल्शेव्हिक पक्षाचं खरं नाव तुला ठाऊकाय? नाय? अरे ते आहे 'रशियन सोशल डेमॉक्रॅटिक मजूर पक्ष' समजलं? मजूर! ह्या घडीला ते शेतकऱ्यांच्या न् कझाकांच्या पुढं पुढं करतायत पण त्याचा आधाराय कामगार वर्ग. ते कामगारांना स्वातंत्र्य मिळवून देतायत. पण कदाचित त्याहून वाईट गुलामगिरी शेतकऱ्यांना देतायत. प्रत्यक्ष व्यवहारात प्रत्येकाला सारखा वाटा मिळेल असं घडत नसतं.

बोल्शेव्हिक जर वरचढ ठरले तर कामगारांना चांगलं पण इतरांना ते वाईट. राजेशाही परत आली तर जमीनदारांना न् त्यांच्यासारख्यांना चांगलं पण इतरांना वाईट. आम्हाला हेही नको न् तेही नको. आम्हाला आमच स्वतःचं हवं. न् सगळ्यात पहिली गोष्ट म्हणजे आमच्या सगळ्या रक्षणकर्त्यांना हुसकलं पायजे. मग तो कोर्निलोव असो, केरेन्स्की असो का लेनिन असो. आमच्या स्वतःच्या देशात त्यांच्याखेरीज आमचं काय अडलेलं नाय. देवानं आमच्या मित्रांपासून आम्हाला वाचवावं!

"आमच्या शत्रूंचा आम्ही स्वतः समाचार घेऊ!"

"पण तुला ठाऊकाय की बहुतेक कझाक बोल्शेव्हिकांकडं ओढले जातायत!"

"ग्रिशा, माझ्या मित्रा, हे समजावून घे! कारण हाच पाया आहे. आज घडीला शेतकरी आणि कझाकांचे रस्ते बोल्शेव्हिकांशी जुळतायत. हे खराय! पण का ते तुला ठाऊकाय? ह्याचं कारण बोल्शेव्हिकांचा शांततेला पाठिंबाय; ताबडतोब शांतता त्यांना हव्येय. अन आज घडीला लढाई कझाकांच्या 'हित्तं बसतयेस!" असे म्हणून त्याने धाड्कन आपल्या सावळ्या गर्दनीवर थाप मारली आणि उपरोधाने उंचावलेली भृकुटी खाली आणीत तो ओरडला,

'न् म्हणूनच कझाकांना बोल्शेव्हिजमची घाण मारत्येय न् बोल्शेव्हिकांच्या पावलावर पाऊल टाकीत ते चाललेत. पण . . . लढाई संपली रे संपली न कझाकांची जायदाद बळकावायला बोल्शेव्हिकांनी हात पसरले रे पसरले की कझाक न् बोल्शेव्हिकांचे रस्ते एकमेकापासून फुटलेच! हे मूलभूत न इतिहासाच्या दृष्टीन अटळाय. कझाकांच्या आयुष्याची आजची व्यवस्था न् बोल्शेव्हिक क्रांतीचा जो अखेरचा कळस तो समाजवाद ह्यांच्या दरम्यान दुर्गम दरी आहे. काय? तुझं काय म्हणणाय यावर?"

"माझं म्हणणं एवढंच की मला काय समजत नाय?" ग्रिगरी तोंडातल्या तोंडात पुटपुटला. "मला ह्याचा शेंडाबुडखाच कळत नाय. माळरानावरच्या बरफवादळात हरवल्यागत माझी अवस्था झाल्येय!"

"त्यातून तुझी सुटका होणार नाय. त्यातून बोध घ्यायला तुला जिंदगी भाग पाडंल न् तुला ह्या नायतर त्या बाजूला ती पिटाळील!"

ऑक्टोबरच्या अखेरीस हे संभाषण झाले. नोव्हेंबर महिन्यात दुसऱ्या एका कझाकाशी ग्रिगरीची गाठ पडली. डॉनवरील क्रांतीच्या इतिहासात ह्याने एक मोठी भूमिका बजावली होती. फ्योदर पोद्‌तियोलकोवशी ग्रिगरीची भेट झाली आणि परत एकदा थोडेसे उजूतजू होऊन पूर्वीचे सत्य त्याच्या मनात परत रुजले.

दुपारपासून गोठवणारा पाऊस पडत होता. संध्याकाळच्या सुमाराम हवा निवळली आणि २८ व्या रेजिमेन्टमधे कारपोरल असणाऱ्या त्याच्याच मुलुखातील द्रोझदोवकडे जाण्याचे ग्रिगरीने ठरवले.

पंधरा मिनिटानंतर तो द्रोझदोवच्या दाराशी असलेल्या पायपुसण्यावर आपले बूट स्वच्छ करीत होता. द्रोझदोवच्या जोडीला कुणीतरी होते.

काहीशा जीर्ण फर्निचरने आणि भांड्याकुंड्यात लावलेल्या कॅक्टस वनस्पतीने ती खोली भरलेली होती. रखवाली बतारीतील सार्जन्टमेजरच्या फिती खांद्यावर लावलेला एक दणकट बांध्याचा कझाक खिडकीकडे पाठ करून छावणीच्या खाटेवर बसला होता. पाठीला बाक आणून आणि काळी पटलूण घातलेले पाय सताड फाकून तो बसला होता. त्याचे लाल केसांचे हात त्याच्या गुडघ्यावर स्थिरावले होते. त्याचा लांब कोट त्याला इतका जाम आवळ बसला होता की दंडाखाली त्याला सुरकुत्या पडून छातीवर तो उसवेल असे वाटत होते. दार करकरल्याबरोबर त्याने आपली आखूड गर्दन वळवून थंड नजरेने ग्रिगरीला न्याहाळले आणि मग आपल्या चिचोळ्या खोबणीच्या दाट झापडांच्या अज्ञातात डोळ्यांचा थंड प्रकाश बुडवून टाकला.

" ओळख करून देतो तुमची ! ग्रिगरी, हा आमचा अगदी शेजारी. उस्त खोपेरस्कायाचा पोदतियोलकोव !"

न बोलता त्या दोघांनी हस्तांदोलन केले आणि ग्रिगरी खाली बसला.

आपल्या यजमानाकडे बघून ग्रिगरीने स्मित केले.

" मी तुझी जमीन घाण केली. राग नाय ना आला ?"

" काळजी करू नको. माझी मालकीण सगळं ठीक करेल . . . चहा घेणार?"

लहानखुरा आणि पालीसारखा चपळ असलेल्या ख्रोझदोवने तंबाखूने डागळल्या बोटांनी समोवारला थापटी मारली आणि खेदाच्या सुरात तो म्हणाला,

" थंड प्यावा लागणार !"

" मला नकोय. राहू दे."

ग्रिगरीने पोदत्योलकोवपुढे चुट्टा केला.

त्या ठासून भरलेल्या पाकिटाशी आपल्या थोराड लाल बोटांनी पोदत्योलकोवने बराच वेळ खटाटोप केला आणि तो पुटपुटला, " च्या मारी ! हातातच येत नाय काय केल्या !" अखेरीस त्याने चुट्ट्याची गुंडाळी वळली आणि आपले हसरे डोळे (ते आता जास्तच चिचोळे दिसत होते) वर करून ग्रिगरीच्या चेहऱ्याकडे पाहिले. त्याच्या सहज अविर्भावाने खुष होऊन ग्रिगरीने विचारले, " कुठलं गाव ?"

" माझा जन्म कुतोवस्कीचा," पोदतियालकोव खुषीत येऊन बोलू लागला. "पण अलीकडे मी उस्त–क्लिनोवस्की इथं राहतो. कुतोवस्की तर तुम्हाला ठाऊकाय ? ऐकीतलं असणारच ! एलान्स्कायच्या अगदी वेशीवरचाय बघा ! प्लिशाकोवस्की गावडं तुला ठाऊकाय ? तर त्याच्याच पुढं मातबिएव लागतं त्याला लागूनच आमचं त्युकोवनोवस्की ! त्याच्याच पुढं मी जनमलो. ते वरचं न् खालचं कुतोवस्की."

ग्रिगरीला उद्देशून कधी 'तुम्ही' तर कधी 'तू' म्हणत पोदतियालकोव दिलखुलास बोलत होता. एकदा तर त्याने आपला दणकट हात ग्रिगरीच्या खांद्या-वर ठेवला.

पोदतियालकोवच्या स्वच्छ घोटलेल्या चेहऱ्यावर किंचित माताचे वण होते. त्याच्या मिशांचे आकडे कडक वळवलेले होते. चोपून बसवलेले त्याचे स्निग्ध केस त्याच्या लहानशा कानांवरून उतरले होते आणि त्याच्या डाव्या भुवईवर त्यांचा किंचित आकडा वळलेला होता. त्याचे थोराड अपरे नाक आणि डोळे सोडले तर त्याच्या दिसण्यात एक प्रसन्न ठसठशीतपण होते. प्रथमदर्शनी त्याच्या डोळयात अलौकिक असे काही नव्हते पण नीट निरखून पाहता त्यातील शिशासारखे जडत्व ग्रिगरीला जाणवले. छऱ्यांसारखे लहान असणारे ते नेत्र जंग्यातून झळकल्यागत त्या चिचोळया गर्तेतून चकाकत आणि जिद्दीच्या चिवटपणाने नजर जागच्याजागी खिळून ठेवीत होते.

ग्रिगरी कुतुहलाने त्या माणसाला न्याहाळीत होता. खास असे एकही वैशिष्टय नाही. पोदतियालकोव क्वचितच डोळयांची उघडझाप करायचा. बोलत असताना आपली उदास नजर तो आपल्या सोबत्यावर रोखून धरायचा किंवा एकीकडून तो दुसरीकडे खिळवायचा. पण त्याचे कुरळे, उन्हात पांढुरलेले पापणीचे केस झुकलेले आणि निश्चल होते. फक्त मधूनच आपल्या फुगीर पापण्या तो पाडायचा. परत त्या उचलून आपल्या छऱ्यांसारख्या डोळयांनी नेम धरायचा.

"एक मजेदार मुद्दाय भाऊ !" ग्रिगरीने संभाषणाला तोंड फोडले.

"लढाई संपल अन् आपण नव्या प्रकारानं जगायला लागू. युक्रेनचं सरकार वेगळं होईल न् कझाकसेना परिषदेचा अंमल डॉनवर चालंल !"

"अतामान कालेदिनचा . . . !" पोदतियालकोवने शांतपणे त्याची चूक दुरुस्त केली.

"एकूण एकच ! त्यात फरक कायाय ?"

" फरक काय नाय !" पोदतियालकोवने रुकार दिला.

" रशियामाईचा आपण निरोप घेतलाय." इझवारिनच्या कल्पनेचा विस्तार ग्रिगरीने चालू केला. द्रोसदोव आणि रखवाली बतारीतील हा अनोळख्या ह्यांची ह्या कल्पनेला कशी काय दाद मिळते ह्याबद्दल त्याला कुतूहल होते. "आपल्याला आपलं स्वतःच सरकार असल, आपला स्वतःचा जिंदगीचा ढंग असल. कझाक भूमीतून युक्रेनींना हाकून देऊ. सीमेवर आमचे पहारे बसतील न् खोखोलना आत येऊ देणार नैत ! जुन्या काळी आमचे बापजादे रहात तसे आपण राहू. मला वाटतं क्रांती आपल्या भल्यासाठीचाय ? कसं म्हणतोस द्रोझदोव ?"

द्रोझदोवने धूर्त स्मित करून बसल्या जागीच चुळबूळ केली.

"अर्थात आपलं चांगलच होणार ! नांगरमुठ्यानी आपली ताकद हिरावून नेल्येय. त्यांच्या हाताखाली नांदणं आपल्याला शक्यच नाय. न सगळे आतामान जर्मन होते. फॉन ताडबे फॉन ग्राब्बे न कोण कोण ते भगवान जाणे ! त्यांनी आमची धरती ज्या सगळ्या ठाणेदार अंमलदारांना दिली. आता काय झालं तरी श्वास घ्यायची तर फुरसत झाली !"

" पण ह्या सगळ्याला रशियाची मान्यता आहे का ?" अमुक कुणा एकाला असे उद्देशून न बोलता पोदतियालकोवने शांतपणे विचारले.

" मला वाटतं त्याला मान्यता द्यावी लागंल !" ग्रिगरीने त्याला आश्वासीत म्हटले.

" काय झालं तरी एकूण एकच. कढी तीच पण जरा पातळ !"

" ते कसं काय ?"

" तसंचाय ते !" आपले छन्यासारखे डोळे विशेष झटकन् वळवीत ग्रिगरीकडे सुस्त नजर टाकून पोदतियालकोव म्हणाला. "आतामान पूर्वी सारखेच वागणार. ज्यांना काम करावं लागतं त्यांना ते भरडणार. कुणातरी 'हुजुरां' पुढं तुला वाकावं लागणार न तो तुझं नाकाड फोडणार. वा रे वा काय पण जिंदगी ! त्यापेक्षा गळ्याला धोंडा बांधून नदीत उडी घे !"

ग्रिगरी उठून उभा राहिला आणि खोलीत येरझारे घालू लागला. अखेरीस पोदतियालकोवच्या पुढे येऊन तो उभा राहिला आणि त्याने विचारले,

" मग आम्ही काय करावं ?"

" तड गाठावी !"

" कसली तड ?"

" एकदा नांगरणी सुरू केली की कुळव शेवटपर्यन्त नेला पायजे. झारला न प्रतिक्रांतिकारकांना एकदा उलथून टाकल्यानंतर सरकार लोकांच्या हाती येत का नाय ते बघायला हवं. त्या जुन्या काळच्या गोष्टी म्हणजे सगळ्या भाकडकथा. जुन्या काळी झार आम्हाला भरडत होता. आज झार नाय तर दुसरा कुणीतरी आम्हाला भरडून ' चीं चीं ' करायला लावंल !"

" मग तुझ्या मते ह्याला इलाज काय पोदतियालकोव ?"

त्या कोंदलेल्या लहानशा खोलीत मोकळ्या जागेच्या शोधात पोदतियाल-कोवचे सुस्त छर्र्यासारखे डोळे इकडून तिकडे भिरभिरले.

"लोकांचं सरकार... निवडून आलेलं ! जनरलांच्या हाती गेलात की परत लढाई होणार. ती आता नकोशी झाल्येय आम्हाला. सबंध जगभर लोकांचं सरकार आलं तर काय सांगावं ? लोक भरडले जाणार नैत. लढाईवर पाठवले जाणार नैत ! पण आज आमच्याजवळ कायाय ? जुनी पाटलूण ! उलटी केली तरी भोकं राहणारच !" असे म्हणून पोदतियालकोवने गुडघ्यावर दाणकन् थापटी मारली आणि एक हिंस्त्र स्मित केले. त्याबरोबर अणीदार शुभ्र दातांची सघन ओळ प्रकटली. " जुन्या दिवसापासून आपण दूर राहणंच बरं. नायतर ते आपल्याला असं ताबडतील की, झारचा अंमल बरा असं वाटंल !"

" न आपल्यावर अंमल कुणाचा ?"

" आपला आपल्यावर अंमल !" पोदतियालकोवने विशेष उत्साहाने उत्तर दिले. " आपल्याला आपलं स्वतःचं सरकार असंल. त्या कालेदिनला तंग जरा ढिले करू द्यात की त्यांना आपण आपल्या पाठाडावरून फेकूनच देऊ !"

वाफाळलेल्या खिडकीसमोर ग्रिगरी थबकला. आणि त्याने बाहेर रस्त्यावर नजर टाकली. खेळणारी मुले, समोरच्या घरांची ओली छपरे, कुपाटीच्या मागून उगवलेल्या निष्पर्ण चिनाराच्या विटक्या, कबऱ्या फांद्या इकडे तो बघू लागला. पोदतियालकोव आणि ग्रोझदोव ह्यांच्यात चालू असलेला वाद आता त्याला ऐकू येत नव्हता. आपल्याला दडपून टाकणाऱ्या विचारांच्या गुंत्यातून सूर्यप्रकाशाचे

दर्शन घेण्यासाठी–कोणतातरी निर्णय घेण्यासाठी त्याची यातनामय धडपड चालू होती.

खिडकीच्या तावदानावर बोटांनी आद्याक्षरे काढीत तो दहा मिनिटे उभा होता. खिडकीच्या पलीकडे म्लान आणि अवेळीचा हिवाळी सूर्यास्त समोरच्या ठेंगण्या घराच्या छपराआडून धुमसत होता. सूर्य असा काही लोंबत होता की जणूकाही छपराच्या गंजलेल्या पाखाडीवर तो कंगोऱ्यावर ठेवलेला आहे आणि आता ह्या किंवा त्या बाजूने तो घरंगळत जाणार. गावातील उद्यानातून सळसळती पाने एकमेकांचा पाठलाग करीत रस्त्यावरून जात होती. आणि झपाटयाने बळावत चाललेला युक्रेनचा वारा गावातून गर्जना करीत चालला होता.

---



३

बोल्शेव्हिक क्रांतीपासून जे पळून आले होते त्या सर्वांच्या दृष्टीने नोवो-चेरकास्क हे गाव आकर्षणाचे केन्द्र झाले होते. रशियन फौजांच्या प्राक्तनाचा जे एकेकाळी निवाडा देत होते त्या महत्त्वाच्या सेनानींचे ओघ डॉनच्या खालच्या खोऱ्यातील प्रदेशातून वाहू लागले प्रतिगामी डॉन कझाकांचा पाठिंबा मिळण्याची आणि सोव्हिएट रशियाविरुद्ध चढाईचा तळ म्हणून डॉनचा वापर करण्याची त्यांना आशा वाटत होती. २ नोव्हेंबर रोजी जनरल अलेक्सिएव कॅप्टन शाप्रोनला घेऊन नोवोचेरकास्कला येऊन दाखल झाले. कालेदिनबरोबर बोलणी केल्यानंतर त्यांनी स्वयंसेवकांची पथके संघटीत करणे सुरू केले. उत्तरेकडून पळून आलेले अंमलदार, कॅडेटस्, विद्यार्थी, बेदखल सैनिक, सर्वांत क्रियाशील असणारे प्रतिक्रांतीकारक कझाक, साहसाच्या शोधात असणारे आणि केरेन्स्की रुबलमधे का होईना पण जादा पगार घेणारे लोक म्हणजे ह्या भावी स्वयंसेवक सेनेचा कणा होता.

नोव्हेंबरच्या अखेरीला देनिकिन, लुकोमस्किई, मार्कोव, एरदेली हे सेनानी येऊन दाखल झाले. ह्या वेळेपर्यन्त अलेक्सिएवच्या पथकातून हजारांच्या वर भरती झाली. ६ डिसेंबर रोजी कोर्निलोव स्वत: गावात येऊन थडकले. डॉनच्या सीमावर त्यांनी येताना रक्षक मागे ठेवले होते आणि स्वत:चे वेषपरिवर्तन केले होते. ह्या वेळेपर्यन्त रुमेनियन आणि ऑस्ट्रो जर्मन आघाड्यांवरून आपली जवळ जवळ सर्व कझाक रेजिमेन्टस् काढून घेण्यात कालेदिन यशस्वी झाले होते. नोवोचेरकास्क–चेर्तकोवो–रोस्तोव–तिखोरेत्स्काया ह्या डॉन मुलुखाच्या प्रमुख रेल्वेमार्गावर त्यांनी ही रेजिमेन्टस् पसरली होती. पण तीन वर्षांच्या युद्धाने जेरीस

आलेल्या आणि क्रांतीकारक मनोवृत्ती घेऊन आघाडीवरून परतणाऱ्या कझाकांनी बोल्शेव्हिकांशी लढण्याची फारशी मोठी इच्छा दाखवली नाही. रेजिमेन्टमधे तिसऱ्या हिश्शानेसुद्धा नेहमीचे घोडदळ उरले नव्हते.

सत्तावीसावे, चव्वेचाळीसावे आणि दुसरे ही राखीव रेजिमेंटस कामेनूस्कोए गावात होती.

घराची ऊब त्यांना जबरदस्तपणे सादावीत होती आणि आपल्या घर-खेडयाच्या दिशेने त्यांची जी उत्स्फूर्त वाटचाल कझाक करीत होते तिला पायबंद घालू शकेल अशी कोणतीही शक्ती पृथ्वीतलावर नव्हती. पेट्रोग्राडमधे फक्त तीन डॉन रेजिमेन्टस होती ती सुद्धा तिथे फार दिवस राहिली नाहीत.

जी विशेष बेभरवंशाची पथके होती ती सुधारण्याचा किंवा आपल्या सर्वात कडव्या फौजांनी वेढून त्यांना इतरांपासून तोडण्याचा प्रयत्न कालेदिनने केला.

नोव्हेंबर अखेरीस कालेदिनने बिनीची पथके क्रांतीकारक रोस्तोववर घालण्याचा जेव्हा प्रयत्न केला तेव्हा हमला चढविण्याला कझाकांनी नकार दिला आणि थोडे अंतर जाऊन ते माघारी वळले. पण खंडित डिव्हिजन्सची एकजूट करण्याची जी व्यापक विकसीत संघटना तयार झाली होती तिचे परिणाम दिसू लागले. २७ नोव्हेंबरपर्यन्त कालेदिनच्या हाताखाली अनेक विश्वासू स्वयंसेवक पथके तयार झाली. ह्या वेळेपर्यन्त अलेक्सिएवने ज्या थोडया बटालियन्स गोळा केल्या होत्या त्यातूनही कालेदिन फौजा उसनवार घेऊ शकत होता.

२ डिसेंबर रोजी स्वयंसेवकांच्या फौजेने रोस्तोववर धाड घालून ते सर केले. कोर्निलोवच्या आगमनानंतर ते शहर म्हणजे स्वयंसेवक दलाचे संघटनात्मक केन्द्र झाले. कालेदिन एकटा राहिला. पार त्सारित्सिनपर्यन्त आणि सारातोव प्रांताच्या सीमेपर्यन्त त्याने आपली कझाक पथके त्या मुलूखाच्या सीमेवर विखुरली.

अत्यंत तातडीच्या कामगिऱ्यासाठी मात्र त्याने अंमलदारांची गनिमी काव्याची पथके वापरली. कारण कमजोर झालेले फौजी सरकार रोजच्या आधाराला केवळ त्याच्याचवर विसंबून राहू शकत होते.

दोनेत्स्क खाण कामगारांना नामोहरम करण्यासाठी ताज्या भरतीची पथके पाठविण्यात आली. कॅप्टन चेर्नेत्सोव माकेएवका जिल्हयात कामाला लागले. इथे

खडचा ५८ व्या कझाक रेजिमेन्टचीही पथके होती. नोवोचेरकास्क इथे सेमिलेतोव, ग्रिको ह्यांच्या व इतर अनेक लढाऊ तुकडया तयार करण्यात आल्या. उत्तरेला तथाकथित 'स्तेनका रेझिन' पथकात अंमलदार आणि गनिमी सैनिक ह्यांची मोट वळण्यात आली. परंतु लालरक्षकांचे स्तंभ त्या प्रांताकडे तीन दिशांनी येत होते. खारखोव आणि वोरोनेझ इथे डॉनवरील प्रतिक्रांतीकारकाविरुद्ध प्रहार चढविण्यासाठी फौजांची जमवाजमव चालू होती.

डॉनवर ढग आले होते. ते गहिरे आणि काळे होत होते. पहिल्या चक-मकीला साथ देणाऱ्या तोफांच्या गर्जना युक्रेनहून येणाऱ्या वाऱ्यावरून येत होत्या.

---

# ४

नावेप्रमाणे विशाल वक्षाचे सोन-ढवळे राशीमेघ नोवोचेरकास्कवरून संथपणे तरंगत होते. कॅथिड्रलच्या चकाकत्या घुमटाच्या अगदी माथ्यावरील अस्मानात एका राशीमेघाचा करडा लकेरदार झुबका निळ्या अवकाशात झुकला होता. त्याचे प्रदीर्घ पुच्छ क्रिव्यानस्कोई खेड्यावर कुठेतरी खाली लोंबून गुलाबी चंदेरी रंगात झळकत होते.

उगवता सूर्य तळपत नव्हता पण आतामानच्या राजवाड्याच्या खिडक्य त्याच्या किरणात प्रखरपणे झळकत होत्या. घरांची उतरती लोखंडी छपरे चकाकत होती आणि सैबेरियाचा मुकूट उत्तरेच्या दिशेने लांबवून धरलेल्या येरमाकचा ब्राँझचा पुतळा आदल्या दिवशी पडून गेलेल्या पावसाने ओलसर झालेला होता.

कझाक पायदळाची एक प्लतून क्रेशचेन्स्की टेकडीवर आगेकूच करीत होती. त्यांच्या बागनटांवर सूर्यकिरणे उसळ्या घेत नाचत होती. मधूनच जाणाऱ्या एखाद्या वाटसरूचा आणि द्रोझकीचा खडखडाट एवढेच नाद ऐकू येत होते आणि प्रभातकाळच्या बिलोरी निवांततेचा भंग कझाकांच्या लयबद्ध ऐकू येईल न येईल अशा चालीने जेमतेम होत होता.

त्या दिवशी सकाळी मॉस्को गाडीने इल्या बुनचुक नोवोचेरकास्कला येऊन दाखल झाला. तो आपल्या जुन्या लांब कोटाचे काठ खाली ओढीत होता आणि आपल्या नागरी कपड्यात किंचित अडल्या न् बावरल्यासारखे त्याला वाटत होते. डब्यातून सर्वात शेवटी तो बाहेर पडला.

एक लष्करी पोलीस आणि दोन मुली फलाटावर चकरा मारीत होते. त्या दोघीजणी कशावरून तरी खिदळत होत्या. आपली सस्ती गबाळ सुटकेस काखोटीला

मारून बुनचुक बाहेर, गावात गेला. गावाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यन्त तो गेला तरी त्याला फारसे कुणी भेटले नाही. अर्धा तास चालल्यावर एका लहानशा चंद्रमौळी घराजवळ तो थबकला. कित्येक वर्षे डागडुजी न केलेले ते घर बापुडवाणे दिसत होते. काळाने आपला हात त्या घरावर टाकला होता. छप्पर ढासळायला आले होते. भिंती खचल्या होत्या. झडपे गबाळ लोंबत होती. खिडक्या तिरपांगड्या झाल्या होत्या. फाटक उघडून बुनचुकने घरावरून आणि चिमुकल्या अंगणावरून धावती नजर टाकली. आणि लगबगीने तो पावलाण चढून गेला.

लाकडे रचलेल्या एका संदुकीने घराची चिचोळी पडवी निम्मी व्यापून टाकल्याचे त्याला आढळून आले. काळोखात त्याचे ढोपर एका कोपऱ्यावर आढळून आले. काळोखात त्याचे ढोपर एका कोपऱ्यावर आदळले पण वेदनेची दखल न घेता त्याने दार उघडले. पहिल्या ठेंगण्या चाफेखणीत कुणीही नव्हते. कुणी न आढळल्याने तो दुसऱ्या खोलीकडे गेला. आणि उंबरठ्याशी थबकला. ह्याच एका घराचे खास वैशिष्ट्य असणाऱ्या भयंकर परिचित गंधाने त्याचे डोके गरगरले. कोपऱ्यातील देवचित्रे, बिछाना, मेज, त्यावर लावलेला लहानसा डागाळलेला आरसा, काही छायाचित्रे, बऱ्याच मोडकळीला आलेल्या खुर्च्या, शिवणकामाचे यंत्र आणि चुल्हाणावर उभा असलेला कळकटलेला चहाबंब हे सारे त्याने न्याहाळून घतले. त्याचे काळीज एकाएकी विलक्षण धाडधाड उडू लागले. त्याने सुटकेस खाली टाकून दिली आणि सायवानात चहूकडे न्याहाळून बघितले. उंच हिरव्या रंगाचे चुल्हाण अगत्यशील दिसत होते. एका निळ्या सुती पडद्याआडून एक म्हातारे बांड्या रंगाचे पट्टेरी मांजर डोकावून बघत होते अगदी मानवी कुतूहलाने. त्याचे डोळे चमकत होते. त्याला पाहुण्यांची सवय नसल्याचे उघड दिसत होते. घाणेरड्या बशांचा पसारा टेबलावर पडला होता. अर्धवट विणलेल्या मांडमोजा-पाशी लोकरीचा गुंडा आणि विणकामाच्या चार चकचकत्या सुया एका स्टुलावर पडल्या होत्य.

आठ वर्षांत काहीही बदलले नव्हते. जणू काही कालच तो इथून, हे असे टाकून गेला होता.

तो धावत पावलाणावर गेला. आवारात दूरवर असलेल्या कोपऱ्यातील मांगरातून एक म्हातारी वाकलेली बाई बाहेर पडली.

'आई! पण तीच का? तीच आहे ती?'

त्याचे ओठ थरारले. तिला भेटायला तो धावत गेला. धावता धावता डोक्यावरची टोपी त्याने खस्सकन काढून घेतली.

"कोण हवंय तुम्हाला? कुणाकडं आलात?" डोळ्यावर तळव्याचा आडोसा धरून उभी रहात त्या म्हातारीने घाबरून विचारले.

"आई!" बुनचुकच्या घशातून घोगरे शब्द उचंबळले. "असं काय करीतेस? मला ओळीखलं नैस?"

तो धडपडत तिच्या दिशेने गेला. प्रहार बसून झोकांडे जावे तशी ती हेल-कावते आहे असे त्याने पाहिले.

तिला पळून जावे असे वाटत होते पण तिच्यात ताकद उरली नव्हती एकाद्या वादळी झंझावाताविरुद्ध लढत दिल्यासारखी ती होलपाडू लागली. त्याने तिला आपल्या बाहूत घेतले. तिचा सुरकुतलेला चेहरा, भयाने आणि आनंदाने गढूळलेले डोळे ह्यांचे त्याने मुके घेतले. त्याचे स्वतःचे डोळे असहाय्यतेने उघडझाप करीत होते.

"इल्या! इल्युशका! लेकरा! ओळखलं नाय रे! अरे देवा! कुठनं आलास?" स्वतःला सावरून घेण्याचा आणि आपल्या दुबळ्या पायावर उभी राहण्याचा प्रयत्न करीत ती म्हातारी पुटपुटली.

काही क्षण गाढ आवेग अनुभवल्यानंतर ती दोघे घरात गेली. सुटकेचा निश्वास टाकून त्याने अंगावरचा उसना घातलेला ओव्हरकोट फेकून दिला. आणि तो मेजापाशी बसला.

"तू पुन्हा भेटशील असं कधी वाटलं नाय... किती बरसं झाली... बाळा... कशी ओळखणार तुला? केवढा मोठा झालास... म्हातारा दिसायला लागलास!"

"बरं, तू कशी आहेस आई?"

त्याने हसून विचारले.

इकडे तिकडे लसपस करीत, मेजावर खाण्याचे मांडीत, चहाच्या बंबाखाली कोळसे घालीत ती असंबद्ध उत्तरे देत होती. वाहत्या डोळ्यांनी ती परत परत आपल्या लेकाकडे धावत होती, त्याचे मस्तक थोपटीत होती, त्याला मिठी घालीत होती. तिने पाणी तापवले आणि स्वतःच्या हातांनी त्याचे डोके धुतले. आतून घालण्याचे काही स्वच्छ कपडे संदुकीच्या तळातून बाहेर काढले अनेक दिवस पडून राहिल्याने ते पिवळे पडले होते. त्याला जेवू घातले आणि त्याच्यावरची नजर दूर न करता मध्यरात्रीपर्यन्त ती त्याच्याशी बोलत बसली. त्याला तिने प्रश्न विचारले. दुःखाने ती मान हलवीत होती.

बुनचुक झोपण्यासाठी आडवा झाला. तेव्हा शेजारील घंटा–मनोऱ्याने दोनाचे टोल दिले होते. त्याचा चटकन डोळा लागला त्याला स्वप्न पडत होते की आपण परत कारागिर विद्यालयाचे विद्यार्थी आहोत. खेळून दमलो आहोत. हातात पुस्तक धरल्या धरल्या आपल्याला डुलकी लागत आहे आई सायबाताचे दार उघडून आली आहे आणि कठोर आवाजात विचारीत आहे.

"इल्या, उद्याचा अभ्यास केलास का नाय ?" तोंडावर अचल ताणलेले सुखी स्मित घेऊन तो झोपला होता.

रात्री अनेकदा त्याची आई त्याच्या जवळ गेली. त्याचे पांघरूण आणि उशा तिने नीट केल्या. त्याच्या भव्य भालप्रदेशाचे मुके घेतले आणि आवाज न करता परत बाहेर गेली.

घरी त्याने फक्त एकच दिवस काढला. सैनिकाचा लांब कोट आणि नवीन खाकी टोपी घातलेला एक साथी सकाळी आला. त्याच्याशी तो हलक्या आवाजात बोलत होता. तो माणूस निघून गेल्यावर हा इकडे तिकडे लसपसू लागला. भराभर त्याने सुटकेस भरली. अंगाला न होणारा ओवरकोट चढवला. एका महिन्यात परत भेटण्याचे आईला आश्वासन देऊन त्याने तिचा घाईने निरोप घेतला.

" तू कुठं निघालास इल्या ?"

" रोस्तोवला निघालोय आई, रोस्तोवला ! मी लवकर परत येईन . . . तू वाईट वाटून घेऊ नको आई . . . . वाईट वाटून घेऊ नको." त्याने तिला धीर दिला.

तिने घाईघाईने आपल्या गळ्यातून एक लहानसा क्रूस काढला. आपल्या लेकाचा मुका घेत तिने ती दोरी त्याच्या डोक्यावरून खाली सरकावली. थरथरत्या बोटांनी ती त्याच्या गळ्यात नीट बसवीत ती पुटपुटली,

" हा घाल गळ्यात इल्या ! देवा त्याचं रक्षण कर. त्याला वाचव. तुझ्या पंखाचा त्याला आसरा दे. जगात माझं एवढंच सर्वस्वाय . . ." त्याला तिने आवेगाने मिठी मारली आणि मग तिला स्वतःला आवर घालता येईना. तिच्या ओठाचे कोपरे थरथरू लागले. दुःखाने तिने ओठ काढले. वसंतातील पावसाप्रमाणे एका मागोमाग एक कढत अश्रू बुनचुकच्या केसाळ हातावर ठिपकत होता. त्याने तिचे हात आपल्या गळ्यातून काढले आणि गोऱ्यामोऱ्या चेहऱ्याने त्याने घराबाहेर धाव घेतली.

रोस्तोव स्टेशनावर मेन्ढरांसारखी लोकांची झुंबड उडाली होती. घोटाभर पाऊल बुडेल असा जमिनीवर सिगरेटच्या थोटकांचा आणि सूर्यफूल बियांच्या फोलफटांचा खच पडला होता. त्यांनी चोरलेल्या सामुग्रीचा, तंबाखू आणि जिनसांचा सौदा स्टेशनाच्या चौकात नगर लष्करातील सैनिक करीत होते. दक्षिणेकडील बंदरात आढळणारी अनेक राष्ट्रिकांची तोबा गर्दी मोठ्याने गोंगाट करीत मंदगतीने इकडे तिकडे हालत होती.

" अस्–स्समालोवस्कीय . . . अस्–स्समालोवस्कीय ढोबळी !" चुट्टे विकणारा एक पोरगा किंचाळत होता.

" सस्तात देतो साब !" संशयास्पद दिसणाऱ्या एका पौर्वात्य माणसाने बुनचुकच्या कानाशी कट-कारस्थान करावे असे कुजबुजून म्हटले आणि आपल्या डगल्याच्या फुगीर भागाकडे बघत डोळा मारला.

" भाजलेल्या बिया–भाजक्या बिया . . .! बिया घ्या बिया !" स्टेशनाच्या प्रवेशद्वाराशी भाजलेल्या बिया विकणाऱ्या तरुण मुली आणि बायांच्या आरोळ्या ऐकू येत होत्या.

ह्या गर्दीतून वाट काढीत आपसात बोलत, खिदळत काळ्या समुद्रावरील पाच सहा खलाशी चालले होते. त्यांनी सणासुदीचे कपडे घातले होते. त्यांच्या अंगावर पट्ट्या, सोनेरी बटणे आणि चिखलाने बरबटलेल्या घोळदार पाटलूणी होत्या. माणसे नम्रपणे त्यांना वाट करून देत होती.

गर्दीला न्याहाळीत बुनचुक संथपणे चालला होता.

" सोन्याचं ? तुझ्या आयला भडव्या ! हे हातभट्टीचं सोनाय. माझे काय डोळें फुटल्येत ?" हसत हसत रेडिओसिग्नलर असणारा एक सैनिक म्हणत होता.

त्याला उत्तर देण्यासाठी वचावचा बोलत तो फेरीवाला संशयास्पद वाटावा एवढा जडशील पट्टा हलवीत होता.

" मग बगतुय्स काय ? सोनाय ! बावनकशी ! कुठून आणलय त्याची खात्री हव्येय ? गावच्या पाटलाकडून आणलय. समजलं ? गेलास भडव्या गाढवाच्या गांडीत ! तुला काय बठवून ध्यायचंय काय ? हे हवं का . . . हे ?"

" आरमारात हे चालायचं नाय ! हा . . . मूर्खपणा . . ." जवळूनच एक आवाज ऐकू आला.

" काय नाय चालणार ?"

" हे . . . हृया वर्तमानपत्रातलं . . . !"

" ए पोरा . . . इकडं आण . . . !"

" आम्ही पाचव्या नंबराला* मत दिलं. त्याला काय इलाज नाय. आपल्या हाती आणखी कायाय ?"

" खीर घ्या ! खीर ! मिठ्ठास खीर !"

" जुमलेदार म्हणत होता उद्या निघू या म्हणून !"

बुनचुकने धक्काबुक्की करीत पक्ष समितीची खोली शोधून काढली. आणि तो वाट काढीत जिना चढून दुसऱ्या मजल्यावर गेला. जपानी धाटणीच्या बंदूका घेतलेल्या ' रेडगार्डस् ' नी त्याची पुढची प्रगती रोखली. बागनटे रुंद आणि आखूड होती.

" साथी, तुम्हाला कोण हवंय ?"

" मला साथी आब्रामसोन हवेत. ते इथं आहेत का ?"

" डाव्या हाताची तिसरी खोली."

दाखवलेल्या खोलीचा दरवाजा बुनचुकने उघडला. एका वयस्कर रेल्वे-कामगाराशी बोलत असलेला एक ठेंगणा, फताड्या नाकाचा, काळ्या केसांचा माणूस त्याच्या दृष्टीस पडला. त्याचा डावा हात जाकीटाच्या पाख्याखाली होता आणि उजवा हात तो हवेत पद्धतशीरपणे हलवीत होता.

" ते चालायचं नाही ! ही संघटना नव्हे ! तुम्ही चळवळ जर ही अशी चालवलीत तर आपल्याला हवेत त्याच्या नेमके उलट परिणाम होतील !"

त्या रेल्वे कामगाराच्या तोंडावरील चिंतातूर अपराधी भाव पाहता त्याला आपल्या समर्थनासाठी काहीतरी बोलावे असे वाटत असल्याचे दिसत होते. पण तो दुसरा माणूस त्याला तोंडच उघडू देत नव्हता. ज्याच्याशी तो बोलत होता त्याचे ऐकून घेण्याची त्याला इच्छा नव्हती. तेव्हा त्याची नजर टाळून आणि चीड विकोपाला जाऊन तो कडाडला,

" मितचेन्कोला कामावरून आताच्या आता दूर करा ! हे सहन करणं शक्य नाही. तुमच्यात जे काही चाललंय ते आम्ही चालू देणार नाही. वेरखोत्-

---

* त्यावेळी झालेल्या ' ड्यूमाच्या ' निवडणूकीत बोल्शेव्हिक उमेदवारांच्या यादीला पाचवा क्रमांक होता.

स्कीला क्रांतीकारक निवाडामंडळापुढे ह्याचा जाब द्यावा लागेल. त्याला अटक केली का? केली? त्याला गोळी घालण्यात यावी असा मी आग्रह धरीन!" खरमरीतपणे त्याने बोलून घेतले. अद्याप तो त्यातून नीटसा सावरला नव्हता तेवढ्यात त्याने आपली क्रुद्ध मुद्रा बुनचुकच्या दिशेने वळवली. आणि धारदारपणे विचारले, "तुम्हाला काय हवंय?"

"आपणच आब्रामसोन का?"

"होय!"

पेट्रोग्राड पक्ष समितीकडून आलेली कागदपत्रे बुनचुकने त्याच्या हाती दिली. खिडकीच्या कट्टयावर तो बसला. आब्रामसोनने ती पत्रे काळजीपूर्वक वाचली. आपल्या उद्धटपणाबद्दल खेद दर्शवीत त्याने बुनचुककडे पाहून खिन्नपणे स्मित केले.

"जरासे थांबा. एक दोन मिनिटात आपण बोलू या!"

त्याने त्या रेल्वेकामगाराला वाटेला लावले आणि तो बाहेर गेला. काही मिनिटानंतर एका धष्टपुष्ट आणि स्वच्छ दाढी घोटलेल्या खडचा सेनेतील अंमलदाराला घेऊन तो परत आला. त्या अंमलदाराच्या जबड्यावर तलवारीच्या वाराचा व्रण होता.

"हे आपल्या लष्करी क्रांतीकारी समितीचे सभासद आहेत. न् कॉमरेड तुम्ही . . . तुमचं आडनाव विसरलो!"

"बुनचुक!"

"कॉमरेड बुनचुक तुम्ही मशीनगनवाले ना?"

"होय!"

"आम्हाला नेमका असाच माणूस हवाय!" स्मित करून तो अंमलदार म्हणाला. कानापासून जबड्याच्या टोकापर्यन्त आलेला त्याचा व्रण सगळ्याच्या सगळा फुलून आला.

"आमच्यासाठी रेडगार्ड्स्च्या कामगारात तुम्ही मशीनगनची तुकडी उभी करू शकाल? शक्य तितक्या लवकर?" आब्रामसोनने विचारले.

"मी प्रयत्न करीन. वेळाचा प्रश्न आहे!"

" ठीक. तुम्हाला किती लागेल ? एक आठवडा . . . ? दोन . . . ? तीन?" बुनचुकच्या अंगावर ओठंगत त्या अंमलदाराने विचारले. त्याच्या चेहऱ्यावर अधीर स्मित होते.

" काही दिवस ?"

" झकास !"

आब्रामसोनने कपाळ चोळले आणि उघड उघड त्रासून तो म्हणाला, "नगर लष्कराच्या तुकड्या पार बिथरल्यात. त्यांच्यावर भरवसा ठेवण्यासारखा नाही. मला वाटतं सगळीकडं आहे तसंच हे आहे. कॉमरेड बुनचुक ! इथं आमच्या आशेची मदार कामगारांवर आहे. खलाशांवरही आहे पण सैनिकांचं सांगायचं तर . . . न् म्हणूनच आम्हाला स्वतःचे मशिनगनवाले हवेत." आपली काळी दाढी ओढीत त्याने विचारले,

" पुरवठ्याच्या बाबतीत तुमची काय हालत आहे ? ठीक ठीक आम्ही ती व्यवस्था करू. आज काही खायला मिळालं का नाही ? नाही–अर्थातच नाही !"

" माणसाचे पोट भरलेले आहे की तो उपाशी आहे हे केवळ नजरेने ताडता येण्यासाठी तुला किती फाके पडलेले असले पाहिजेत रे भाऊ, न् हे केस पिकावेत असा किती ताप न् भयानक अनुभव तू घेतला असशील !" अब्रामसोनच्या भुंगोऱ्यागत डोईवरील पिकल्या केसांचा तळपता पुंजका बघताच एकाएकी कणव वाटून बुनचुकच्या मनात विचार आले. वाटाड्याबरोबर अब्रामसोनच्या घरी जाताना त्याचे मन फिरून फिरून त्याच्याकडे वळत होते. " काय पण गडी आहे ! सच्चा बोल्शेव्हिक ! वरून खडबडीत पण आत भलेपण न् माणुसपणाय ! वेर-खोतस्कीसारख्या घातपात्याला मारून टाकण्याची शिक्षा देताना तो मागंपुढं बघत नाय पण आपल्या कॉमरेडांच्या गरजांची त्याला जाणाय !"

त्या भेटीतील जिव्हाळ्याने हेलावलेल्या मनःस्थितीतच तो आब्रामसोनच्या घरी पोचला. त्याची चिठ्ठी त्याने मालकिणीला दिली. थोडासा जेवला आणि पुस्तकांनी भरलेल्या लहानशा खोलीतील खाटेवर विश्रांतीसाठी आडवा झाला. तात्काळ तो झोपी गेला.

---

६

पक्ष समितीने बुनचुकच्या हवाली जे कामगार केले होते त्यांच्याबरोबर सकाळपासून रात्र पडेपर्यन्त पुढील चार दिवस तो गुंतून गेला होता. ते एकूण सोळा जण होते. शांततेच्या काळात अगदी भिन्न भिन्न व्यवसाय करणारी ती माणसे होती. त्यांची वये वेगळी होती. राष्ट्रीयत्व वेगवेगळे होते. दोघेजण हमाल होते. ख्वलिचको नावाचा युक्रेनी आणि रशियन झालेला ग्रीक मिखालिदि. स्तिपानोव नावाचा कंपोझिटर. आठ धातू कामगार. पारामोनोव खाणीतून आलेला झ्येले-नकोव हा खाणकामगार. एक दुबळपतला आरमेनियन रोटिवाला ग्येवोरक्यान्त्स रेबिंदेर नावाचा रशियन झालेला जर्मन कसबी मेकॅनिक. आणि रेल्वेच्या वर्कशॉप-मधले दोन कामगार. गाशा घातलेला सैनिकी लांबकोट पेहनलेल्या आणि फारच मोठ्या मापाचे बूट घातलेल्या एका बाईने बुनचुकला सतरावे पत्र आणून दिले.

तिच्या येण्याचा उद्देश लक्षात न येऊन तिच्या हातातून मोहोरबंद पाकीट घेताना बुनचुकने तिला सांगितले, "परत जाताना माझ्यासाठी जरा ठाण्यावर जाल का?"

तिने अवघडल्यासारखे स्मित केले. डोईला बांधलेल्या रुमालातून खाली निसटलेली केसांची जाड बट नीट बसवली आणि तिने चाचरत उत्तर दिले,

"मला तुमच्याकडं पाठवलंय . . ." क्षणार्ध उडालेला आपला गोंधळ सावरीत ती म्हणाली, "मशिनगनवाली म्हणून पाठवलंय."

बुनचुकचा चेहरा लालबुंद होऊन गेला. "डोकी फिरली का काय त्यांची? माझं काम काय बायकांची बटालियन बनवायचंय? माफ करा, पण हे तुमच्या-जोगं काम नव्हे ते मेहनतीचं आणि पुरुषी ताकदीचं काम आहे. छे छे मी तुम्हाला घेऊ शकत नाय!"

कपाळाला आठ्या घालूनच त्याने ते पत्र उघडले आणि गडबडीने मजकुरावरून दृष्टी टाकली. वर्दी हुकूमात एवढेच म्हटले होते की, पक्ष सदस्या आन्ना पोगुदकची बदली मशिनगन विभागाकडे करण्यात आली आहे. पण त्याला आब्रामसोनचे एक पत्र जोडलेले होते. त्यात म्हटले होते :–

प्रिय कॉमरेड बुनचुक,

आन्ना पोगुदको ही एक उत्तम कॉमरेड तुमच्याकडे आम्ही पाठवीत आहोत. तिची अत्यंत आग्रहाची मागणी आम्ही मान्य केली आहे. आशा आहे की, तिला तुम्ही लढाऊ मशिनगनवाली म्हणून तयार कराल. ही मुलगी माझ्या माहितीची आहे मी तिची मन:पूर्वक शिफारस करतो. ती एक मोलाची कामगार आहे. तुम्ही फक्त एका गोष्टीवर नजर ठेवावी असे माझं सांगणे आहे ती तिखट आणि शिष्ट स्वभावाची आहे. ( अजून तिचं तरुणपण मागे पडलेलं नाही ) अविचारी कृत्य करण्यापासून तिला आळा घाला आणि तिच्यावर लक्ष ठेवा.

आठ धातू कामगार म्हणजे तुमच्या तुकडीचा गाभा आहे ह्यात शंकाच नाही. त्यापैकी बोगोवोईकडे विशेष लक्ष असू द्या. तो मोठा ताकदीचा, क्रांतीला वाहून घेतलेला कॉमरेड आहे. तुमच्या मशिनगनच्या तुकडीची घडण आंतरराष्ट्रीय आहे ही गोष्ट चांगली आहे. त्यामुळे तिची लढाऊ ताकद वाढेल.

शिकवण्याची त्वरा करा. आम्ही असे ऐकतो की कालेदिन आमच्यावर हल्ला चढवण्याची तयारी करीत आहे.

बांधव नमस्कार
आब्रामसोन.

आपल्यासमोर उभ्या असलेल्या मुलीकडे बुनचुकने रोखून पाहिले. त्याला ठाणे म्हणून जे देण्यात आले होते त्या तळघरातील मंद उजेडात तिच्या चेहऱ्यावर सावली पडून त्या चेहऱ्याची ठेवण झाकली गेली होती.

"हं! मग काय?" अलिप्तपणे तो म्हणाला. "तुमची स्वत:चीच इच्छा असली . . . न् आब्रामसोननं म्हटलंय तेव्हा तुम्ही राहू शकता!"

बुनचुकच्या कसलेल्या हातानं मशिनगनचे सुटे सुटे भाग केले होते. चौकस नजरेने ते निरखून पाहण्यासाठी त्यांनी मशिनगनभोवती गर्दी केली होती. त्यावर त्यांचे कोंडाळे एकमेकांच्या पाठीवर रेलून झुकले होते. संथ गतीने ते भाग पुन्हा

जुळवीत त्याने प्रत्येक भागाची रचना आणि कार्य समजावून दिले. ते कसे हाताळावे ते शिकविले. बार कसा ठासावा, नेम कसा धरावा ते शिकविले. फेक आणि पल्ला कसा ठरवावा ते खुलासेवार सांगितले. नंतर गनिमाच्या आग्येलापासून स्वत:चा बचाव कसा करावा ते दाखवून दिले मोक्यावर मोर्चे लावण्याची आणि किरांच्या बयाजवार मांडण्याची आवश्यकता त्यांच्या नजरेला आणून दिली.

सतराच्या सतराजण झपाट्याने शिकले. रोटीवाला ग्येवोरक्यानत्स तेवढा अपवाद होता. त्याला ते काही जमेना. बुनचुकने कितीही वेळा दाखवून दिले तरी त्याच्या ध्यानात काहीही रहायचे नाही. त्याचे डोके कामातून जायचे.

सगळा गोंधळ उडून तो पुटपुटायचा, "का जमेना ? अरं तिच्च्या . . . मी . . . माझंच चुकलं. हे ह्या हितं पायजे. तरी नाय जमत !" तो निराश होऊन ओरडायचा "का पण ?"

"सांगतो 'का पण'!" कपाळावर, गालावर दारूचा निळा रंग लागलेला, श्यामल वर्णाचा बोगोवोई त्याची टिंगल करायचा. "हे जमत नाय कारण तू मूर्ख आहेस. हे असं करायला हवं" तो आत्मविश्वासाने तो भाग नेमक्या जागी लावायचा. "अगदी लहान पोर असल्यापासून मला लष्करी गोष्टींचा नाद होता." सगळ्यांच्या हसण्याच्या कल्लोळात तो चेहऱ्यावरच्या निळ्या खुणा दाखवीत म्हणायचा, "मी तोफ बनवायचा प्रयत्न केला पण ती उडाली न जाम तडाखा बसला. म्हणून आज मी इतका तरबेजाय !"

आणि खरोखरच मशिनगनचे तंत्र आत्मसात करण्यात तो पहिला होता. फक्त ग्येवोरक्यानत्स मागे पडला होता. त्याचा रडका चिडका आवाज नेहमी ऐकू यायचा,

"परत चुकलं. पण का ? ध्यानात येत नाय !"

"काय गाढव आहे ! काऽय गाढव आहे ! असा गाढव नाखिचेवानमधे फक्त एकच !" संतापी, ओल्या ओठांचा मिखालिदी रागाने म्हणाला.

"अफाट मूर्ख !" घुम्या जर्मन रेबिंदेरने त्याची 'री' ओढली.

"ती काय कणिक मळायची नाय !" क्विलिचकोने मस्करी केली. सगळेजण प्रांजळपणे हसले. पण स्तिपानोव रागेजून ओरडला. त्याचा चेहरा लालबुंद झाला होता.

"कॉमरेडला हसण्यापेक्षा तुम्ही त्याला दाखवून दिलं पायजे!"

रेल्वेवर्कशॉपमधे काम करणाऱ्या धिप्पाड, आडमापाच्या, बटबटीत डोळ्याच्या कुतगोरोवने त्याचे म्हणणे उचलून धरले. "मूर्खो, तुम्ही हसत उभे रहा न् काम राहू द्या! कॉमरेड बुनचुक, ह्या मेणाच्या बावल्यांना ताकीद द्या. नायतर हाकलून लावा! क्रांती धोक्यात आहे न हे इथं खिदळत उभे राहिलेत!" आपली घणाची मूठ त्याने हलवली.

आन्ना पोगुदको प्रत्येक गोष्टीची कुतुहलाने चौकशी करायची. ती बुनचुकचा पिच्छा पुरवायची. त्याची बाही ओढायची. मशिनगनपासून त्याला दूर होता व्हायची नाही.

"न् पानपेटीतलं पाणी गोठलं तर काय होईल? सुसाट वारा असेल तर नेम किती खालवर करायला हवा? न् हे कसं कॉमरेड बुनचुक?" आपले साशंक उत्कट चमकते काळे डोळे रोखून ती त्याच्यावर प्रश्नांचा भडीमार करायची.

तिच्या सान्निध्यात त्याला बावरल्यागत व्हायचे आणि जणू सूड उगवावा तसा तो तिची कसून परिक्षा घ्यायचा. त्याचा अविर्भाव अतीच थंड असे. पण थंडीने कुडकुडत दोन्ही हातांचे तळवे हिरव्या कुडत्याच्या डाव्या उजव्या बाहयात खुपसून सैनिकाचे थोराड बूट घातलेले पाय घसटीत नेमकी वेळेवर रोज सकाळी सात वाजता ती तळघरात जेव्हा प्रवेश करायची तेव्हा एक विलक्षण खळबळत्या भावनेने तो बेचैन व्हायचा. त्याच्यापेक्षा ती किंचित ठेंगणी होती. सगळ्या निरोगी कामकरी मुलींचे खास वैशिष्टय असते तशी तिची अंगलट पुष्ट आणि दणकट होती. कदाचित ती किंचित झुकत्या खांद्याची होती. कदाचित सुंदरही नव्हती पण तिच्या विशाल बलवत्तर डोळयांनी तिच्या मुखाला आगळ देखणपण आणले होते.

पहिले चार दिवस तिच्याकडे बघण्याची त्याला धड संधीच मिळाली नाही. तळघरात जेमतेम उजेड होता आणि तिचा चेहरा न्याहाळायला त्याला जरी वेळ झाला असता तरी तसे करणे त्याला गैर वाटले असते.

पाचव्या दिवशी संध्याकाळी ती दोघे मिळूनच तळघराबाहेर पडली. ती त्याच्या पुढे गेली पण अगदी वरच्या पायरीवर उभी असताना ती काहीतरी विचारायला त्याच्या दिशेने मागे वळली आणि त्या सायंप्रकाशात तिला पाहून बुनचुकने आतल्या आत आवंढा गिळला. उत्तराची वाट बघत ती उभी होती.

तिची मान किंचित कलली होती. डोळे त्याच्यावर रोखलेले होते आणि हाताने ती केस मागे सारीत होती. पण तिचा प्रश्न त्याला ऐकूच आला नाही. एका सुखद वेदनेच्या भावनेने मुग्ध होऊन तो हळूहळू जिना चढून आला. डोईवरचा रुमाल सोडल्याखेरीज केस सारखे करणे कठीण आहे हे तिच्या ध्यानात आले. त्यात ती गढून गेली होती. मावळत्या प्रकाशात तिच्या गुलाबी नाकपुड्या किंचित स्फुरण पावत होत्या तिच्या मुखाची ठेवण दणकट पण त्याबरोबरच बालिश कोवळिकीची होती. तिच्या उंचावलेल्या वरच्या ओठावर सूक्ष्म लव होती. तिच्या गोऱ्या कातडी-वर ती काळी छटा दिसून येत होती. दणका बसण्याआधी झुकवावे तसे त्याने मस्तक झुकवले आणि नाटकीपण मस्करी करीत तो म्हणाला,

" आन्ना पोगुदको, मशिनगनवाली नंबर २, माणसाचं सुख असतं तशी तू सुंदरायस !"

" आचरटपणा " ती ठसक्यात म्हणाली आणि तिने स्मित केले. "आचरट-पणा, कॉमरेड बुनचुक ! मी विचारीत होते की, उद्या चांदमारीच्या तालमीला किती वाजता आपण जायचं ?"

तिच्या त्या स्मिताने ती जास्तच भाबडी, सोपी आणि पार्थिव वाटू लागली तो तिच्या बाजूला येऊन थांबला आणि कुंठित झालेल्या सूर्याने जिथे वस्तुजाताल-लालबुंद छटांनी न्हाऊ घातले होते त्या रस्त्याच्या टोकावर तो शून्य नजरेने बघू लागला. शांतपणे त्याने उत्तर दिले,

" चांदमारीची तालीम ? उद्या. तू कुठून जाणार ? कुठ राहतेस तू ?"

गावाच्या वेशीवरील कोणत्यातरी लहानशा आडगल्लीचे नाव तिने घेतले.

एका फाटचावर त्यांना बोगोवोईने गाठले.

" बुनचुक, हे पहा, उद्या आपण केव्हा जमायचं ?"

ते चालत असता बुनचुकने सांगितले की, आठ वाजता तिखाया रानात त्यांनी जमायचंय. ऋुतोगोरोव आणि ख्वीलीचको तिथे मशिनगन गाडीत घालून आणतील.

थोडं अंतर त्यांच्याबरोबर चालून गेल्यावर बोगोवोईने त्यांचा निरोप घेतला.

न बोलता बुनचुक आणि आन्ना पोगुदको काही वेळ चालत होते.

अखेरीस त्याच्याकडे तिरप्या नजरेने बघत तिने विचारले,

" तुम्ही . . . कझाक का ?"

" होय !"

" अंमलदार होतात ?"

" हं मी कसला अंमलदार !"

" तुम्ही कुठल्या गावचे ?"

" नोवोचेरकास्क !"

" रोस्तोवमधे येऊन बरेच दिवस झाले ?"

" झाले काही दिवस !"

" त्या आधी कुठं होता ?"

" पेट्रोग्राडमधे होतो !"

" पक्षात कधीपासून आहात ?"

" १९१३ पासून."

" तुमचं कुटुंब कुठाय ?"

" नोवोचेरकास्कमधे." तो गडबडीने म्हणाला आणि आपले हात विनवणी केल्यासारखे पसरून तो म्हणाला, " थोडी थांब. आता मला काही प्रश्न विचारू दे ! तुझा जन्म रोस्तोवचा ?"

" नाही. मी एकातेरिनोस्लाव प्रांतातली. पण इथं मी काही दिवस राहिल्येय."

" आता मी विचारतो . . . युक्रेनची ?"

ती क्षणभर अडखळली. मग ठामपणे तिने उत्तर दिले, " नाही."

" यहुदी ?"

" होय. पण तुम्ही कसं ओळखलं ? माझ्या बोलण्यावरून ताडलंत ?"

" नाही."

" मग मी यहुदी आहे हे कसं ओळखलंत ?"

तिच्या बरोबर चालावे म्हणून त्याने आपल्या ढांगांची लांबी आवरली आणि उत्तर दिले, "कान. कानाची ठेवण न् डोळे नाहीतर तुझ्या धर्माच्या खुणा फारशा दिसत नाहीत." क्षणभर विचार करून तो पुढे म्हणाला, "चांगलं आहे की तू आमच्या बरोबर आहेस!"

"का?" तिने चौकसपणे विचारले.

"त्याचं असं आहे की यहुद्यांचं एक नाव झालंय, न् मला ठाऊक ठाऊक आहे की अनेक कामगारांचा-मी सुद्धा कामगार आहे-ते खर असल्याचा विश्वास आहे. ते म्हणजे हे की यहुदी फक्त हुकूम सोडतात. स्वतः गोळ्या झेलायला कधीही जात नाहीत. पण हे खरं नाही. हे खरं नाही असं तू उत्कृष्टपणे सिद्ध करशील. तू कुठं शिक्षण घेतलंस का?"

"होय. गेल्या वर्षी मी शाळा सोडली. तुमचं शिक्षण कुठं झालं? मी हे विचारत्येय कारण तुमच्या संभाषणावरून तुम्ही कामगार वर्गातले वाटत नाहीत."

"मी खूप वाचलंय!"

ते हळूहळू चालत होते तिने मुद्दामच घराकडे जाणारी लांबची वाट काढली. स्वतःबद्दल त्याला थोडे सांगून झाल्यावर ती परत कॉर्निलोवच्या हल्ल्याबद्दल, पेट्रोग्राड कामगारांच्या प्रवृत्तीबद्दल आणि ऑक्टोबर क्रांतीबद्दल त्याला प्रश्न विचारू लागली.

कुठूनतरी धक्क्यावरून बंदुकीच्या गोळीचा आवाज आला. नंतर एका मशिनगनने नीरवतेच्या ठिकऱ्या उडवल्या तिने तात्काळ विचारले,

"कुठल्या बनावटीची आहे ही?"

"ल्युइस मशिनगन आहे."

"पट्टा किती वापरलाय?"

त्याने उत्तर दिले नाही.

नांगर टाकलेल्या पडावातून उंचावलेल्या हाताप्रमाणे नारिंगी, पाचूच्या रंगाने शिपलेल्या प्रकाशझोताचा गोठलेला संस्पर्श संध्याकाळच्या पेटलेल्या अस्मानाला भिडला होता. तिकडे तो कौतुकाने बघत होता.

त्या ओसाड गावातून ती दोघे जवळजवळ तीन तास भटकत होती. अखेरीस राहत होती त्या घराच्या फाटकापाशी त्यांनी एकमेकांचा निरोप घेतला.

एका अज्ञात उजळत्या आंतरिक तृप्तीने बुनचुक घरी परत आला.

“फार चांगली कॉमरेड आहे. हुशार मुलगी आहे! तिच्याशी बोलायला किती बरं वाटलं. अलीकडच्या काळात मी अगदी जंगली बनलोय. लोकांशी मैत्रीचे संबंध ठेवायला हवेत. नाहीतर माणूस सैनिकाच्या वाट्याला येणाऱ्या बिस्किटासारखा कडकडीत होतो.” त्याने विचार केला. स्वतःची तो फसवणूक करीत होता. आणि आपण स्वतःला फसवीत आहोत हे त्याला कळत होते.

लष्करी क्रांतीकारक समितीची बैठक संपवून आब्रामसोन नुकतेच परतले होते. मशिनगनवाल्या तुकडीबद्दल ते चौकशी करू लागले. आन्नाबद्दल त्यांनी विचारले,

“कसं काय चाललंय तिचं? तिला जमत नसेल तर आपण तिला सहज दुसरं काम देऊ शकतो.”

“छे छे!” बुनचुक घाबरून म्हणाला. “ती मोठी कर्तबगार मुलगी आहे.”

तिच्याबद्दल आणखी खूप बोलावे अशी अनिवार इच्छा त्याला झाली होती. पण महत्प्रयासाने त्याने ती आवरली!

---

## ६

२५ नोव्हेंबरच्या माध्यान्हीला नोवोचेरकास्कहून रोस्तोववर हल्ला करण्यासाठी कालेदिनने फौजा पिटाळल्या. अलेक्सिएलच्या अंमलदार पथकाच्या लांबच लांब पहाळी रेल्वेमार्गाच्या बाजूने कूच करू लागल्या उजव्या बगलेवर कॅडेट्सच्या घनदाट तापयांचो त्यांना कुमक होती. डाव्या जरंधरावर पोपोवची स्वयंसेवक पथके चालली होती. करड्या जुडग्यासारख्या दिसणाऱ्या त्या चिमुकल्या आकृती खंदकात उड्या घेत. मग सरपटत बाहेर येत. परत सफाबंदी करीत आणि पुढे सरकू लागत.

नाखिचेवानी गावाच्या चौसीमावर विखुरलेले रेडगार्डसचे सफे चिंतेने अस्वस्थ होते. कामगारांपैकी काहीजण भयाच्या भावनेने अंगावरील काळ्या ओहरकोटासुद्धा पतझडीच्या चिखलाची पर्वा न करता इकडे तिकडे सरपटत होते. त्यातील अनेकांनी आयुष्यात प्रथमच बंदूक धरली होती. आपल्यावर चालून येणाऱ्या 'व्हाइटगार्ड्स्'च्या चिमुकल्या आकृत्या काहीजण माना उंचावून न्याहाळीत होते.

बुनचुक सफ्यात होता. डोळ्यावर दुर्बीण धरून आपल्या मशिनगनजवळ तो गुडघे टेकून बसला होता. आदल्याच दिवशी त्याने आपला गैरसोईचा नागरी कोट बदलला होता. आता आपल्या फौजी फर्गोलात त्याला शांत निश्चित वाटत होते.

हुकूमाच्या शब्दाची वाट न बघता त्या माणसांनी गोळीबार सुरू केला. पहिला बार घुमताच शिव्या घालीत बुनचुक उठून उभा राहिला आणि ओरडला, "गोळीबार बंद!"

बारांच्या धडधडाटात त्याची आरोळी लुप्त होऊन गेली. तो प्रयत्न त्याने सोडून दिला आणि गोळीबाराच्या धडाक्यावर आवाज चढवून त्याने बोगोवोईला मशिनगनचा मारा सुरू करण्याचा हुकूम दिला. आपला हसतमुख फिक्कट चेहरा दस्त्याला भिडवून बोगोवोईने घोडचावर बोटे गुंतवली. मशिनगनचा परिचित दुरटा बुनचुकच्या कानाचे पडदे फाडून गेला. गनिमाच्या दिशेने त्याने न्याहाळले. आगमाराची अचूकता अजमावली. लफ्यावरून तो दुसऱ्या मशिनगन्सकडे धावला.

"फायर!"

"हाण सख्या! हो: हो: हो: !" त्याच्याकडे आपला भयभीत पण आनंदी चेहरा वळवून ख्विलिचको गरजला.

मध्यभागापासून तिसरी मशिनगन चालवणारे जवान तितकेसे हुकूमी नव्हते. बुनचुकने तिकडे धाव घेतली. अर्ध्यावरच तो थबकला आणि खाली वाकून आपल्या दुर्बिणीच्या धूसर भिंगातून त्याने न्याहाळले. दूर अंतरावर दाट जुटीचा कबरा आकार हलताना त्याला दिसला. त्यांच्या अखंड गोळीबाराचा आवाज त्याने ऐकला. तो चटकन पालथा पडला आणि पडल्या पडल्या त्याच्या दृष्टीस पडले की तिसऱ्या मशिनगनचे निशाण चुकीचे आहे.

"खाली घ्या रे, भडव्यो!" सफ्यावरून रांगत तो किंचाळला. त्याच्या अंगावरून काडतुसे खतरनाकपणे सणाणत जात होती. कवायत चालावी इतक्या अचूकपणे गनीम मारा करीत होता.

तिसऱ्या मशिनगनचे मुसकूट हास्यास्पद कोनावर कलले होते. त्याच्या भोवती गोलंदाज पोटावर पालथे पडले होते.

ग्रीक मिखालिदी उसंत न घेता भडीमार करीत होता, आणि दारुगोळा फुकट घालवीत होता. त्याच्या निकट हबकलेला स्तिपानोव होता. त्याच्या मागे तोंड भुईत खुपसून आणि कासवासारखे पाठाड उंचावून एक रेल्वे कामगार पडला होता.

मिखालिदीला बाजूला ढकलून बुनचुकने बराच वेळ आणि काळजीपूर्वक नेम साधला. मशिनगनमधून काडतुसे परत एकदा सटाटू लागताच तात्काळ परिणाम झाला. धावत पुढे येणाऱ्या कॅडेटसच्या गटाने मोहरा फिरवला आणि उताराखाली धाव घेतली. त्यातला एकजण चिखलाळ जमिनीवर मागे राहिला.

मशिनगन परत त्यांच्या हवाली करून बुनचुक आपल्या मशिनगनकडे परतला. तेव्हा त्याच्या दृष्टीस वोगोवोई कुशीवर पडलेला आढळला. शिव्या घालीत तो आपल्या पायावरील मांसल जागेवरची जखम बांधीत होता. त्याच्या फिक्कट चेहऱ्यावरील दारुगोळ्याच्या निशाण्या जास्तच उठून दिसत होत्या.

"मारगिरी थांबवू नको तुझ्या आयला!" त्याच्या बाजूला धडपडत गुडघ्यावर बसत तांबूस केसांचा एक रेडगार्ड किंचाळला, "दिसत नाय ते जवळ येतायत ?"

निहायत कवायती कुशाग्रतेने चढावरून अंमलदारांच्या पथकांचे सफे सरकत होते.

रेबिन्देरने बोगोवोईची जागा घेतली आणि दारुगोळा वाया न घालवता किंवा भावनेच्या आहारी न जाता त्याने हुशारीने मारा सुरू केला.

डाव्या बगलेवरून ग्येवोरक्यानत्स सशाप्रमाणे उड्या टाकीत--डोक्यावरून जाणाऱ्या प्रत्येक गोळीगणीक पालथा पडत विव्हळत किंचाळत आला;

" मला शक्य नाय . . . . . शक्य नाय . . . . . बार उडत नाय ! बूच बसवलंय ! "

सफ्यावरून धावत बुनचुक त्या नादुरुस्त मशिनगनकडे गेला. त्याला पोचायला थोडे अंतर उरले होते तेवढ्यात आन्ना त्याच्या दृष्टीस पडली. गुडघ्यावर बसून आणि डोळ्यावर हाताच्या तळव्याचा आडोसा धरून ती चालून येणारे गनिमाचे सफे न्याहाळीत होती.

"खाली हो !" तो किंचाळला. तिच्याबद्दल वाटणाऱ्या भीतीने त्याचा चेहरा काळवंडून गेला होता. "खाली पड सांगतोय !"

तिने त्याच्याकडे नजर टाकली आणि ती तशीच गुडघ्यावर बसून राहिली. फत्तरासारख्या दणदणीत शिव्या त्याच्या ओठावर आल्या. त्याने तिच्याकडे धाव घेतली आणि बळेच तिला आडवी केली.

ढालीमागे क्रुतोगोरोव गुरगुरत पडला होता, "बूच बसवलंय, चालत नाय !" बुनचुकला पाहून तो पुटपुटला. ग्येवोरक्यानत्सचा शोध घेण्यासाठी त्याने आजूबाजूला पाहिले आणि तो उसळून गरजला, "आता पळून गेला हरामखोर ! भुणभुण लावून माझा सगळा गोंधळ करून टाकला त्यानं ! . . माणसाला काम नाय करू द्यायचा !"

सापासारखा वळवळत ग्येवोरक्यानत्स सरपटत आला. त्याच्या दाढीच्या काळ्या बुरकुलाला चिखल चिकटला होता. कृतोगोरोवने क्षणभर त्याला न्याहाळले. आणि गोळीबाराच्या वरताण गर्जना करीत तो ओरडला,

"किरांचीच्या पट्ट्याचं काय केलंस तू? जनावर साला! बुनचुक! बुनचुक! ह्याला इथून हाकल नाय तर जीव घेईन त्याचा!"

बुनचुकने मशिनगनची तपासणी केली. ढालीवर एक काडतूस काडकन आदळले. त्याबरोबर चटका बसल्यागत त्याने हात चटकन काढून घेतला. त्याने मशिनगन चालू केली. आणि चाल करून येणाऱ्या अलेक्सिएवच्या सैनिकांवर गोळ्यांचा वर्षाव करून त्यांना पालथे होणे भाग पाडले. नंतर आडोशाच्या शोधात तो सरपटत निघून गेला.

गनिमाचे सफे जवळ येऊन ठेपले. त्याचा भडीमाराचा जोर वाढला. 'रेडगार्डस'च्या सफ्यात तिघांना गोळ्या लागल्या. त्यांच्या कॉमरेडसनी त्यांच्या बंदूका आणि काडतुसे घेतली. मेलेल्यांना शस्त्राची गरज नसते. आन्ना आणि बुनचुक कृतोगोरोवच्या मशिनगनजवळ पालथी पडलेली असताना त्यांच्या डोळ्यादेखत एका जवान 'रेडगार्ड'ला गोळी लागली. जमिनीवर लाथा झाडीत तो तडफडला, विव्हळला आणि अखेरीस हातावर देह उंचावून खोकला, अखेरच्या श्वासासाठी धपापला. डोळ्याच्या कोपऱ्यातून बुनचुकने आन्नाकडे नजर टाकली. चिंध्यांचे पट्टे बांधलेल्या त्या मृत जवानाच्या पायाकडे ती अपलख नजरेने टक लावून बघत होती. कृतोगोरोवची गर्जना तिच्या कानी पडत नव्हती,

"पट्टा . . . पट्टा! पोरी, नवा पट्टा दे मला!"

गाढी बगलबंदिश करून कालेदिनच्या सैन्याने 'रेडगार्डस'चे सफे मागे रेटले. माघार घेणाऱ्या कामगारांचे काळे ओवरकोट आणि रेडगार्डसचे फर्गोल ह्यांचे ओहळ उपनगराच्या रस्त्यातून दिसू लागले. उजव्या कमरग्यावरील मशिनगन 'व्हाईट गार्डस'च्या हाती पडली.

ग्रीक मिखालिदीला एका कॅडेटने गोळी घालून मारले. दुसरा अलीगोल संगीनीने भोसकला गेला. कंपोझिटर स्तिपानोव काय तो कसाबसा पळाला.

बंदरातील लाल पडावातून पहिले गोळे उडू लागले तेव्हा माघार थांबली.

"लायनीत . . . माझ्या मागं या!" बुनचुकच्या ओळखीचा क्रांतिकारी-समितीतील एकजण पुढे धावत ओरडला.

रेडगार्डस बावचळले आणि मागे फिरले. हमला चढविण्यासाठी त्यांनी आगेकूच केले आन्ना, ऋतोगोरोव आणि ग्येवोरक्यानत्स ह्यांना बुनचुकने आपल्या भोवती गोळा केले होते.

तीन 'रेडगार्डस' त्यांच्या अंगावरून गेले. एकजण चट्टा ओढीत होता. दुसरा असा चालत होता की चालताना त्याच्या बंदुकीची खिटी त्याच्या गुडघ्याला घसटत होती. तिसरा एकाग्रपणे आपल्या ओवरकोटाची किनार निरखीत चालला होता. त्याच्या मिशीच्या टोकाशी ओशाळगतीचे असे एक स्मित रेंगाळत होते की जणू काय तो मरणाला सामोरा चालला नसून दोस्तांबरोबर पिण्याची मैफल संपवून घराकडे निघाला आहे आणि आपली कजाग बायको आता आपल्याला काय सजा देईल त्याचा अंदाज घेत आपल्या कोटाची पाहणी करीत आहे. एकाएकी ऋतोगोरोवने दूरच्या कुंपणाकडे बोट केले. त्या कुंपणामागे लहानशा दिसणाऱ्या कबऱ्या मानवी आकृत्या गोळा झाल्या होत्या.

"ते पहा ते!" तो ओरडला.

बुनचुक अस्वलासारखा उकीडवा बसला आणि मशिनगनची मुकटी झर्रकन त्याने त्या दिशेला फिरवली.

मशिनगनचा दणकेबाज दुरटा ऐकून आन्नाने कानात बोटे घातली. ती खाली बसली आणि तिच्या दृष्टीस पडले की, कुंपणामागची सर्व हालचाल निपचीत होऊन गेली आहे. पण क्षणभराने 'व्हाइटगार्डस' नी बेतोव गोळीबार सुरू केला. त्यांच्या डोक्यावरून अस्मानाच्या धूसर फलकाला अदृश्य भोके पाडीत काडतुसे सणाणत जाऊ लागली. मशिनगनमधून धावणारी डब्बादवाली ताशासारखी कडाडत होती. काळ्या समुद्राच्या आरमारातील खलाशांनी पडावातून उडवलेले गोळे माथ्यावर गर्जत होते. किरकोळ बार कर्कश टचटचून येत होते. पडावातून माथ्यावर उडणाऱ्या गोळ्यांचा रगडता दणका कानांचे पडदे फाडीत होता. मेन्ढकातडीची टोपी घातलेला आणि छाटीव इंग्रजी धाटणीच्या मिशा राखलेला एक जाडेला 'रेडगार्ड' डोक्यावरून जाणाऱ्या प्रत्येक गोळ्यागणीक नकळत ओणावत असलेला आन्नाने पाहिले.

"लगाव साल्यांना सिम्योन! लगाव साल्यांना!" तो ओरडत होता.

खलाशांना आता पल्ला गवसला होता. आणि त्यांनी एकठाव सळक चालविली होती. माघार घेणाऱ्या कालेदिन सैनिकांचे तुरळक गट फुटणाऱ्या कुलपी गोळ्यांच्या माऱ्यात सापडले होते. एक गोळा त्यांच्या अगदी ऐन मधोमध फुटला आणि स्फोटाच्या पिंगट खांबाने ती माणसे चौफेर उधळली. आन्नाने

हातची दुर्बिण सोडून दिली आणि आपल्या घाणेजल्या तळव्यांनी भयकंपित डोळे झाकून घेत तिने आर्त उद्‌गार काढला. तिचा गळा विलक्षण दाटून आला.

"काय झालं ?" तिच्या दिशेने वाकत बुनचुकने विचारले.

तिने ओठ दाताखाली घट्ट दाबून धरला होता. तिचे विस्फारीत नेत्र गढूळले होते.

"बघवत नाही . . ."

"हिंमत दाखव ! ए . . . आन्ना . . . ऐकत्येस का ? ऐकत्येस का तू ? असं करता कामा नये ! नाही करायला पाहिजे . . ." त्याचा अधिकारी आवाज तिच्या कानात घुमत होता.

उजव्या बगलेवर काही गनिम एका बदाडीत आणि ढिम्याच्या उतारावर गोळा झाले होते. बुनचुकने त्यांना हेरले. आपली मशिनगन घेऊन तो जास्त सोईस्कर जागी गेला आणि त्या बदाडीवर त्याने आगमार सुरू केली.

'टाटाटाटा . . . . टाटाटाटाक . . !'

रेंबिदेरची मशिनगन तुटक तुटक उसळून बेअंदाज मारा करीत होती. वीस एक पावलावर घरघरीत संतप्त आवाजाचा ओरडा ऐकू येत होता.

"स्ट्रेचर ! अरे स्ट्रेचर आहे की नाय ? स्ट्रेचर !"

"निशाऽऽण !" एका पायदळ प्लटून अंमलदाराची दीर्घ आरोळी आली.

' प्लटून . . . फायर !"

संध्याकाळच्या सुमारास पहिल्या हिमशलाका गिरक्या घेत खरबरीत धरतीवर उतरू लागल्या. तासाभरात ओल्या चिकट हिमाने मैदान आणि मुडद्यांची चिखलकाळी मुटकुळी पुरती झाकून टाकली.

कालेदिनच्या सैन्याने माघार घेतली.

ती हिमधूसर रात्र बुनचुकने मशिनगनच्या मोर्चेठाण्यावर गुजरली. कुठेतरी सापडलेले जाडेभरडे उडतक डोक्याभोवती गुंडाळून ऋतोगोरोव चौथट सागुती चावून चावून खात थुंकत आणि शिव्या घालीत होता. आवाडाच्या फाटकाशी अंगाची जुडी करून ग्येवोरकियानत्स चुट्टयावर आपले निळे हात शेकत होता. एका किरांचीवर बुनचुक बसला होता. थरथरणाऱ्या आन्नाला त्याने आपल्या

फर्गोलात गुरफटून घेतले होते. तिचे दमट हात तिच्या डोळ्यावरून ओढून काढीत तो त्या हातांचे मुके घेत होता. अपरिचित कोवळीकेचे शब्द त्याच्या ओठावर मुष्किलीने येत होते. "हे काय असं करावं? केवढी कणखर होतीस तू . . . आन्ना . . . हे बघ . . . हिम्मत धर . . . ! आन्या ! . . . लाडके . . सखे . . . ! . . . होईल तुला सवय . . तुझा स्वाभिमान तुला पाय मार्ग घेऊ देत नसेल तर तू फार वेगळी आहेस ! मेलेल्यांच्याकडं असं बघायचं नसतं . . . सरळ त्यांच्या पुढ्यातून चालतं व्हायचं . . . बस्स ! ते विचार मनात आणू नको . . . झटकून टाक ते . . . पाहिलंस ? तुझं स्त्रीपण जिंकतंय !"

आन्ना चूप होती. तिच्या हाताला पतझडीच्या धरतीचा–बाईच्या उबेचा वास होता.

पडत्या हिमाने आकाश मायेच्या घनदाट पांघरूणाने झाकून टाकले ते आवाड मैदान, चिडीचिप झालेले गाव निद्रेच्या तंद्रीत गुरफटले होते.

---------

## ७

सहा दिवस रोस्तोवमधे आणि रोस्तोवच्या आजूबाजूला लढाई चालू होती. रस्त्यातून, फाटयावर लढाई चालू होती. 'रेडगार्डस' नी स्टेशन दोनदा सोडून दिले आणि दोनदा गनिम तेथून हुसकला. ह्या सहा दिवसात दोन्ही बाजूंना कुणी कैदी मिळाला नाही.

२६ नोव्हेंबर रोजी कलत्या दुपारी बुनचुक आणि आन्ना मालाच्या स्टेशना-जवळून चालले होते. धरलेल्या एका अंमलदाराला दोन रेडगार्डसनी गोळ्या घालून मारलेला त्यांनी पाहिला. तिथून निघून गेलेल्या आन्नाला अगदी आव्हानाच्या सुरात बुनचुक म्हणाला, " हाच शहाणपणा आहे ! त्यांना ठार मारलंच पाहिजे. निष्ठूरपणे त्यांना नष्ट केलं पाहिजे. आम्हाला ते दया दाखवीत नाहीत आणि दया आम्ही मागतही नाही. मग त्यांना आम्ही दया का दाखवावी ? ही घाण धरती-वरून साफ करून टाकली पाहिजे. क्रांतीच भवितव्य टांगणीला लागलेलं असताना भावनांचा प्रश्नच येऊ शकत नाही. ह्या कामगारांचं बरोबर आहे."

लढाईच्या तिसऱ्या दिवशी त्याला ताप आला पण दिवसभर तो पायावर उभा होता. त्याला सतत वाढते मळमळत होते. गात्रे निःशक्त झाल्यासारखी वाटत होती. डोक्यात घणाचे घाव बसत होते. ते अगदी जड होऊन गेले होते.

गळहाटलेल्या 'रेडगार्डस' पथकांनी २ डिसेंबरच्या पहाटेस गाव सोडून दिले. जखमी आणि मशिनगन भरलेल्या गाडीच्या मागोमाग आणि कृतोगोरोव ह्यांचा आधार घेऊन बुनचुक लटपटत चालला होता. लोखंडासारखे जडशीळ झालेले पाय उचलीत आपला असहाय्य देह अतीव कष्टाने ओढीत तो चालला होता.

खूप दूरून आपण आन्नाचे सचिंत डोळे पहात आहोत आणि तिचा आवाज आपल्याला ऐकू येत आहे असे त्याला वाटत होते. ती म्हणत होती,

" गाडीत बैस इल्या ! ऐकलंस का ? मी काय बोलत्येय समजतंय ना ? मी म्हणत्येय तू आत बैस तुला बरं नाही !

पण तिचे शब्द त्याला उमगले नाहीत. आपण कोसळलो आहोत आणि टायफसच्या तडाख्यात सापडलो आहोत हेही त्याला उमगले नाही. ओळखीचे अनोळखीचे आवाज त्याच्या जाणीवेच्या बाह्य कवचावर टोचावत होते. कुठतरी दूर अंतरावर आन्नाचे गर्द डोळे अनिवार चिंतेत जळत होते आणि ऋतोगोरोवची दाढी हलून त्यातून अफलातून आकृत्या उमटत होत्या.

बुनचुकने आपले मस्तक दाबून धरले. आपले थोराड हात आपल्या गरम जळजळीत चेहऱ्यावर दाबले. आपल्या डोळ्यातून जणू काही रक्त ठिबकत आहे असे त्याला वाटत होते. सगळे अमर्याद अस्थिर जग आणि आपण ह्यांच्या दरम्यान एक अदृश्य पडदा आहे आणि ते जग वर उंचावून आपल्या पायाखालची धरणी दुभंगते आहे असे त्याला वाटत होते. वात झालेल्या अवस्थेत त्याच्या कल्पनेला चमत्कारिक दृश्यं दिसू लागली. तो परत परत थबकत होता. त्याला गाडीत बसवू पाहणाऱ्या ऋतोगोरोवशी झगडत होता.

"नाय पायजे ! थांब ! तू कोणायस . . . ? न् आन्ना कुठाय ? माझ्या हाती मूठभर माती दे . . . न ह्या . . . नष्ट करून टाक . . . हुकूम देतोय मी . . . डाग त्यांच्यावर मशिनगन . . . थांब ! फार गरमी होत्येय . . . !" आन्नाच्या मिठीतून हात खसकन काढून घेत तो घरघरीत आवाजात किंचाळला.

त्यांनी बळेच उचलून त्याला गाडीत घातला. आणखी एक क्षणभर त्याला निरनिराळ्या वासांची सरमिसळ जाणवली. शुद्धीवर येण्यासाठी तो भयभीतपणे धडपडू लागला. स्वतःशी लढण्याचा तो प्रयत्न करीत होता पण त्याला लढवत नव्हते. एका कभिन्न निःशब्द पोकळीत तो बुडून गेला. फक्त उंच कुठेतरी इंद्रनीळ घननीळ ठिपके जळत होते. लालगुंद विजेच्या नागमोडी ज्वाळा त्याच्या डोळ्यापुढे गुंफल्या जात होत्या.

---

## ८

केंबळचाने डागाळलेल्या बर्फाच्या झिळमिळचा वळचणीतून ठिबकत काचे-सारखी किणकिण करीत फुटत होत्या. खेडचात बर्फ पाघळणीतून डबकी आणि अनावृत्त धरतीचे पुंजके उमलले होते. अद्याप हिवाळी अंगडी घातलेली गुरेढोरे हुंगल्या नाकपुडचांनी रस्त्यावर भटकू लागली होती. आवाडातील झुडतरांच्या ढिगाऱ्यातून चोची मारताना चिमण्या जणू वसंतकाळ असल्यागत चिवचिवत होत्या. तबेल्यातून उधळलेल्या आपल्या तुकतुकीत कुमायती घोडचाचा मार्तिन शामिल चौकातून पाठलाग करीत होता. घोडचाची झुबकेदार शेपटी उंच उभारलेली होती. विस्कळीत आयाळ वाऱ्यावर उडत होती. त्याने चारी पायावर उसळी घेऊन अधंवट पाझरलेले बर्फाचे कपचे खुराने उधळले. चौकाला रिंगण घातले. गिरजाघराच्या भिंतीशी ते थबकले आणि तिथल्या विटा हुंगल्या. आपल्या धन्याला त्याने भरपूर जवळ येऊन दिले. त्याच्या हातातील लगामाकडे जांभळचा डोळचाच्या कोपऱ्यातून नजर टाकली आणि परत ते भन्नाट उधळले.

उबदार ढगाळ दिवस घेऊन आलेला जानेवारी महिना धरतीचे लाड करीत होता. अकाली आऊर लोटण्याच्या अपेक्षेने कझाक डॉनला निरखीत होते. परस-दारी उभे राहून मिरोन ग्रिगेरिएविच बर्फग्रस्त कुरणरान, डॉनचे मातकट हिरवेपण न्याहाळीत बराच वेळ उभे होते. त्यांच्या मनात येत होते, 'गुदस्सालासारखा यंदाही पूर येणार. बर्फ ... बर्फ . . नुसता एक बर्फ ! धरणीमाय त्या भारानं गुदमरून गेली असंल."

खाकी लांबकोट घालून मितका गोठा साफ करीत होता. एक चमत्कार म्हणून त्याची पांढरी लोकरी टोपी त्याच्या डोक्याच्या मागच्या बाजूला अटकून

बसली होती. घामाने ओले झालेले त्याचे सरळ केस कपाळावर झेपावत होते. आणि आपल्या धाणेजल्या तळव्याच्या उलटीकडून तो ते मागे सारीत होता. दाट केसांचा एक बोकड फाटकाशी खूर आपटीत होता. आपल्या आईपेक्षा थोराड असलेले कोकरू तिला चुभायला बघत होते पण आपली मुंडी खाली घालून ती त्या कोकराला हुसकावीत होती. कडीदार शिंगांची एक मेन्ढी नांगराला अंग घाशीत होती.

पिवडीने रंगवलेल्या दाराजवळ एक धिप्पाड पिवळचा भुवयांचा शिकारी कुत्रा बर्फ झरून गेला होता. त्या जमिनीच्या तुकड्यावर पासलला होता. वळचणी-खाली बाहेरच्या भिंतीवर जाळी आणि मासे पागायचे सामायन लटकत होते. त्या सामायनाकडे बघत कुबडीवर रेलून म्हातारे ग्रिशाका तेथे उभे होते. त्यांच्या मनात अर्थातच उद्याच्या वसंत काळाचा आणि जाळी दुरुस्तीच्या कामाचा विचार होता.

मिरोन मळणीच्या खळ्याकडे गेले आणि अजून किती कडबा शिल्लक आहे ह्याचा त्यांच्या कंजुष डोळ्यांनी अंदाज घेतला. बकऱ्यांनी उधळून टाकलेल्या मक्याच्या काठ्या दांताळे घेऊन ते एकत्र करू लागले पण अपरिचित आवाज त्यांच्या कानी पडले. त्या ढिगावर त्यांनी दांताळे टाकून दिले आणि ते आवाडात आले.

चुट्टा वळीत मितका पाय लांब फाकून उभा होता. कुठल्यातरी खेडवळ प्रियकरणीने भेट दिलेली विपुल भरतकाम केलेली चंची त्याने दोन बोटात धरली होती त्याच्या बरोबर ख्रिस्तोनिया आणि इवान अलेक्सिएविच होते.

ख्रिस्तोनिया आपल्या टोपीतून कुठलातरी चुट्ट्याचा कागद बाहेर काढीत होता. कुपाटीवर रेलून इवान अलेक्सिएविच पाटलुणीचे खिसे ढुंढाळीत होता. दाढी घोटलेला त्याचा चेहरा त्रासीक होता. तो काहीतरी विसरून आल्याचे दिसत होते.

"रात्र चांगली गेली ना मिरोन ग्रिगोरिएविच ?"

ख्रिस्तोनियाने त्यांना सलाम केला.

"देवाची कृपा."

"या आमच्याबरोबर चुट्टा ओढायला !"

"येशू तुझं भलं करो. आताच ओढला !"

त्या कझाकांशी हस्तांदोलन करून मिरोन ग्रिगोरिएविचनी आपली वरचा भाग लाल असलेली हॅट काढून हातात घेतली. आपले सफेद केसांचे खुंट थोपटले आणि स्मित केले.

" न् आज आमच्याकडं काय काम काढलंत भाऊ ?"

ख्रिस्तोनियाने त्यांच्याकडे खालपासून वरपर्यंत नजर टाकली. पण ताबडतोब उत्तर दिले नाही. एका कागदाच्या कपट्यावरून त्याने शांतपणे जीभ फिरवली आणि चुट्टा वळून झाल्यावर त्याने उत्तर दिले,

" मितकाशी आमचं कामाय !"

आपल्या लांबवलेल्या हातावर मासे पागायचे जाळे धरून ग्रिशाका आजोबा जवळून पाय ओढीत गेले. इवान आणि ख्रिस्तोनियाने आपल्या टोप्या काढून त्यांना सलाम केला. ते जाळे पावलाणापर्यन्त नेऊन ग्रिशाका मागे वळले.

" ए शिपाईगडे हो, घरी का थांबलायत ? बायकांच्या कुशीत झोपायला मजा वाटयेय काय ?" त्यांनी विचारले.

" का ? काय झालंय ?" ख्रिस्तोनियाने चौकशी केली.

" चूप ए ख्रिस्तोनिया ! आपल्याला जसं काय माहितच नाय म्हणून मला सांगू नकोस !"

" देवच्यान मला ठाऊक नाय !" ख्रिस्तोनियाने शपथ खाल्ली.

" ऋसाशपथ मला ठाऊक नाय आजोबा !"

" परवा वोरोनेझहून एकजण आला होता. व्यापारी. सेर्गेई मोखोवचा कुणी मित्र होता का नातेवाईक का आणीक कुणा होता मला नेमकं ठाऊक नाय. तर हा येतोय न म्हणीततोय की चेर्तकोवला चमत्कारिक सैनिक–ते वाल्शेव्हिक आलेत. रशिया आपल्याशी लढाई करणाराय. न तुम्ही घरी बसलाय ! तू सुद्धा तू भडव्या . . . काय म्हणीतोय मी मितका ? थोबाड का मिटलंस? काय विचाराय?"

" आम्ही याचा काय पण विचारच करीत नाय !" इवान अलेक्सिएविच हसून म्हणाला

" लाज नाय वाटत विचार करीत नाय म्हणायला ?" म्हातारबुवा ग्रिशाका चिडून म्हणाले.

" तित्त रासारखं फासवयात धरतील ! नांगरमूठ नेतील तुम्हाला धरून बांधून न टाकीतील नाकाड चेचून !"

मिरोन ग्रिगोरिएविच सूज्ञपणे हसले. ख्रिस्तोनियाने आपल्या हजामत न केलेल्या गालावरून हात खसखसून चोळला. इवान अलेक्सिएविच धूर सोडीत मितकाकडे बघत उभा होता. मितकाच्या मांजरासारख्या डोळ्यातून सूक्ष्म ठिणग्या उडत होत्या. त्याचे हिरवट डोळे हसत होते का अतृप्त मत्सराने जळत होते ते सांगणे कठीण होते.

थोडावेळ गप्पा झाल्यावर इवान अलेक्सिएविच आणि ख्रिस्तोनिया जायला निघाले. मितकाला 'फाटकापर्यन्त चल' म्हणाले.

" काल सभेला का नाय आल स ?" इवान अलेक्सिएविचने खरमरीतपणे विचारले.

" मला वेळ नाय झाला."

" पण मेलीखोवच्या घरी जायला वेळ झाला ?"

डोक्याला हिसका देऊन मितकाने आपली टोपी कपाळावर आणली आणि संताप आवरून तो म्हणाला,

" मी आलो नाय म्हणजे नाय आलो. त्याची वाटाघाट कशाला हवीय ?"

" तू न प्योत्र मेलखोव सोडून युद्धावर गेलेले खेडयातले सगळेजण होते. कामेनस्कायाला आमची माणसं पाठवायचं आम्ही ठरवलंय. जानेवारीच्या दहा तारखेला तिथं युद्धावर गेलेल्यांची परिषद व्हायच्येय. आम्ही चिठ्ठ्या टाकल्या त्यात मी, ख्रिस्तोनिया न तू जायचं असं ठरलंय."

" मी जायचो नाय !" मितकाने निर्धाराने सांगून टाकले.

" काय मनाताय तुझ्या ?" कपाळाला आठ्या घालून ख्रिस्तोनियाने त्याच्या लांब कोटाची गुंडी पकडली. " तुझ्या कामरेडापासून तू फुटतोयस ? हे चांगलं नाय !"

" प्योत्र मेलिखोवला तो मथलाय." इवान अलेक्सिएविच म्हणाला. ख्रिस्तोनियाच्या फर्गोलाच्या बाहीला त्याने स्पर्श केला. त्याचा चेहरा फिक्कट पडला होता. तो म्हणाला, " चल ! इथं आपल्याला काय करीता येणार नाय. तर तू नाय जाणार मितका ?"

"नाय ! नाय म्हणीतलं मंजे नाय !"

"बराय तर ! अच्छा !" मान बाजूला फिरवून ख्रिस्तोनिया म्हणाला, "तुझं भलं हो !"

नजर टाकून मितकाने हात पुढे करून "अच्छा !" म्हटले आणि मोहर वळवून तो सायवानात गेला.

"सापाची जात !" इवान अलेक्सिएविच पुटपुटला. त्याच्या नाकपुड्या थरथरत होत्या. मितकाच्या रुंद पाठीकडे रोखून बघत तो मोठ्याने म्हणाला, "सापाची जात !"

घराच्या वाटेवर त्यांनी युद्धावर जाऊन आलेल्या काही लोकांना कळवले की मितकाने जाण्याला नकार दिला असून उद्या ते दोघेजण परिषदेला जायला निघतील.

जानेवारीच्या आठ तारखेला पहाटेस ख्रिस्तोनिया आणि इवान अलेक्सिएविच ह्यांनी गाव सोडले. त्यांना कामेनस्कायापर्यंत गाडीतून नेण्याला 'नालवाला' याकोव आपण होऊन तयार झाला. घोड्यांची उत्तम जोडी जुंपलेल्या त्याच्या गाडीने त्यांना झपाट्याने खेड्याबाहेर आणि चढावरून नेले. पाघळणीने रस्ता उघडा पडला होता आणि जिथून बर्फ नाहीसा झाला होता तिथे घसरगाडीचे पाटे धरणीला चिपटत आणि घसरगाडी हिसका घेऊन पुढे जात होती. घोडी काढण्या ताणीत होती. ते कझाक घसरगाडीच्या मागून चालले होते. सकाळच्या गोठवत्या वाऱ्यात तोंड लालबुंद झालेला याकोव टांगा टाकीत चालला होता. बर्फाच्या पातळ कवचावर त्याचे बूट करकरत होते त्याच्या चेहऱ्यावरील अंडाकृती निशाणी तेवढी गर्द निळी राहिलेली होती. वाटेच्या बाजूला असलेल्या बर्फाच्या पोपड्यावरून टेकाड चढताना ख्रिस्तोनिया धापा टाकीत होता. १९१६ साली दुबनो इथे जर्मन विषारी वायू फुफ्फुसात गेल्याने तो धापावत होता.

टेकडीच्या माथ्यावर वाऱ्याचा जोर होता आणि जास्तच गारठा होता. कझाक गुपचूप होते. इवान अलेक्सिएविचने आपला चेहरा मेन्ढकातडी कोटाच्या कॉलरीने झाकून घेतला. ते एका रानाजवळ आले. रानातून टेकाडाच्या पगदंडीवर वाट चढली होती. रानातून वाऱ्याचा ओघ झुळकत होता. सांबरशिंगाचे आकार धारण केलेले सीताचौरीचे बुंधे सोन-हिरव्या शेवाळ्याच्या खवलेदार पापुद्र्यांनी नकसले होते. दूर अंतरावर एका दयाळ पक्षाने चिवचिवाट केला आणि रस्ता

पालंडून तो फडफडत गेला. त्याच्या मार्गातून वारा त्याला लोटून देत होता आणि तो कलंडत, आवेशाने उडत होता. त्याचे चित्रविचित्र पंख लहरत होते.

याकोवने खेडे सोडल्यापासून तोंडातून 'ब्र' काढला नव्हता. इवानकडे त्याने तोंड फिरवले. बराच वेळ मनात घोळणाऱ्या विचारांना वाचा फोडीत तो मुद्दाम म्हणाला, "परिषदेत असं करायचं बघा की, लढाई होणार नाय! लढाईला स्वयंसेवक मिळणार नैत!"

"अर्थात!" ख्रिस्तोनियाने रुकार दिला. विमुक्तपणे उडत जाणाऱ्या त्या दयाळ पक्षाकडे तो हेव्याने निरखून बघत होता. आणि त्या पाखराच्या विचाररहित सुखी जीवनाची माणसाच्या जगण्याशी मनोमनी तुलना करीत होता.

दहा तारखेला दुपार कलून गेल्यावर ते कामेनस्कायात येऊन पोचले. कझाकांचे घोळके रस्त्यावरून शहराच्या केन्द्रभागाकडे चालले होते. जिकडेतिकडे सनसनाटी जाणवत होती. इवान आणि ख्रिस्तोनियाने ग्रिगरी मेलिखोवचे घर शोधून काढले. पण तो घरी नसल्याचे त्यांना कळले. घराची मालकीण एक दणकट सोनेरी केसांची बाई होती. तिने त्यांना ग्रिगरी परिषदेला गेल्याचे सांगितले.

"परिषद कुठं भरलेय?"

"असेल जिल्हा कचेरीत नायतर पोष्टात." असे म्हणून घरमालकिणीने धाडकन दरवाजा लाऊन घेतला.

ते येऊन पोहोचले तेव्हा परिषद ऐन भरात चाललेली त्यांना आढळली. अनेक खिडक्यांच्या त्या मोठ्या खोलीत सगळे प्रतिनिधी मावत नव्हते. अनेक कझाकांनी जिन्यावर, कारिडारमधून आणि शेजारील खोल्यातून दाटी केली होती. "माझ्या मागोमाग ये!" जोरजोराने रेटारेटी करीत ख्रिस्तोनियाने घरघरीत आवाजात इवानला सांगितले. त्याने केलेल्या अरुंद फटीतून इवान त्याच्या मागोमाग जात होता.

जिथे अधिवेशन चालू होते त्या खोलीशी ते जवळ जवळ पोचले, तेव्हा आपली वाट एका कझाकाने अडविल्याचे ख्रिस्तोनियाला आढळून आले. त्याच्या उच्चारावरून तो कझाक डॉनच्या खालच्या खोऱ्यातला दिसत होता.

"गड्या, जरा हळू धक्का का देईनास!" तो डाफरून म्हणाला.

"जाऊ दे की!"

" हिथंच ऱ्हा उबा. तिथं कुठं जागा हाए का ?"

" जाऊं दे रे घुंगुरट्या! सोड नाय तर देईन ठेवून एक."

ख्रिस्तोनिया गडगडून म्हणाला. त्याने लीलया त्या कझाकाला बाजूला केला आणि खोलीत प्रवेश केला.

" –धसमुसळचाय !"

" नमस्ते कझाकानुं !"

दाराजवळच्या गर्दीतून चकित कौतुकाची कुजबुज उडाली. कझाक हसून नकळत आदरपूर्वक ख्रिस्तोनियाकडे पाहू लागले. त्या सर्वांहून ख्रिस्तोनिया चांगला वीत दीड वीत उंच होता.

मागच्या बाजूला भिंतीजवळ ग्रिगरी त्यांना आढळला. उकीडवा बसून धूर सोडीत दुसऱ्या एका प्रतिनिधीशी तो बोलत होता. आपल्या गावकऱ्यांना पाहून त्याच्या उतरत्या काळचा मिशा स्मिताने थरथरल्या.

" इकडं कुठं झुकलात ? नमस्ते इवान अलेक्सिएविच ! बराय ना ख्रिस्तोनिया काका ?"

" ठीकाय !" आपल्या थोराड पंजात ग्रिगरीचा अख्खा तळवा धरून ख्रिस्तोनिया हसून म्हणाला

" माझ्या घरचे कसेयत ?"

" त्यांनी तुझी खुशाली विचारल्येय. तुझ्या बापाच हुकूमाय की तू येऊन त्यांना भेटावंस !"

" न् प्योत्र कसाय ?"

" प्योत्र . . . " इवान अलेक्सिएविचने संकोचून स्मित केले.

" प्योत्र आमच्यात मिसळत नाय."

" मला माहिताय. न नतालिया ? न् पोरं ? दृष्टीला पडली होती का ?"

" सगळी ठीकायत्. नमस्कार सांगीतलेत तुला. तुझा बाप चिडलाय !"

त्यांचे बोलणे चालू असता व्यासपीठावरील मेजामागे बसलेल्या गटाकडे ख्रिस्तोनिया रोखून बघत होता. सगळ्यांच्या मागे असूनही त्याला इतर कुणापेक्षा जास्त चांगले दिसत होते. कामकाजात थोडा खंड पडला की त्याचा फायदा घेऊन

ग्रिगरी त्यांना प्रश्नावर प्रश्न विचारीत राहिला. इवान अलेक्सिएविचने त्याला खेड्याची खबर दिली आणि आपल्याला कामेनस्कायला ज्यांनी पाठवले त्या युद्धावर जाऊन आलेल्या लोकांच्या सभेबद्दल त्याला सांगितले. आपल्याकडून तो कामेनस्कायातील घटनाबद्दल विचारपूस करू लागला. पण मेजाजवळ बसलेले कुणीतरी ओरडले,

" कझाकानुं, खाण कामगारांचे प्रतिनिधी आता बोलतील. कृपा करून त्यांचं नीट ऐकून घ्या आणि शांत रहा ! "

साधारण उंचीच्या एका माणसाने आपले सोनसळे केस मागे सारले आणि बोलायला प्रारभ केला. गोंगाट एकदम शांत झाला.

त्या खाणकामगाराच्या जळजळीत आवेशयुक्त भाषणाच्या पहिल्याच शब्दातून ग्रिगरी आणि इतर कझाकांना त्याच्या श्रद्धेचा ठामपणा प्रत्ययाला आला "रशियाच्या कामगार आणि किसानाविरूद्ध कझाकांना युद्धात लोटणाऱ्या कालेदिनच्या घातकी धोरणाविरूध्द, कझाक आणि कामगारांच्या सामाईक हितसंबंधाबद्दल, कझाक प्रतिक्रांतिकारकाविरूध्द लढा चालविलेल्या बोल्शेव्हिकाबद्दल खपणाऱ्या कझाकांच्या हाती आम्ही बंधू म्हणून आमचा हात देत आहोत न् आम्हाला अशी आशा वाटते की, ' व्हाइट गार्डस् ' टोळ्याविरूध्द लढा देण्यात आघाडीचे कझाक आमचे विश्वासू दोस्त ठरतील. झारशाही युध्दात आघाडीवर कामगारांनी न् कझाकांनी मिळून रक्त सांडलंय. आज ज्यांना कालेदिननं जवळ केलंय त्या बुर्ज्वाजी विरूद्धच्या युद्धातही आपण मिळून उभं रहायला पाहिजे न आम्ही मिळूनच उभे राहू ! शेकडो वर्षं ज्यांनी खपणारांना गुलाम केलंय त्यांच्याविरूद्ध आम्ही खांद्याला खांदा भिडवून लढा देऊ "

ख्रिस्तोनिया हर्षभरित होऊन कुजबुजला आणि ग्रिगरीचे कोपर त्याने इतके जाम दाबले की, ग्रिगरी वेदनेने कळवळला.

" बरोब्बर ! अगदी बरोब्बर ! " तोंड अर्धवट उघडे टाकून ऐकत असता इवान अलेक्सिएविच परत परत पुटपुटत होता.

त्या खाणकामगाराचे भाषण संपल्यावर एक उंच खाणकामगार उठून उभा राहिला. वाऱ्यात अॅश वृक्ष आंदोळावा तसा झोकांडे खात तो ताठ उभा राहिला. आपल्या समोर पसरलेल्या नेत्रांच्या सागरावरून त्याने दृष्टी फिरवली. गोंगाट

थांबेपर्यन्त तो थांबला. एकाद्या दोरखंडाप्रमाणे तो शिडशिडीत आणि काटक दिसत होता. त्याच्या चेहऱ्यावरील छिद्रे कोळशाच्या धुळीच्या बारीक कणांनी भरलेली होती. भूगर्भातील शाश्वत काळोखात चकचकीत आणि वर्णहीन झालेल्या डोळ्यात तीच कोळशासारखी चमक होती. बारीक केस कापलेले आपले डोके त्याने हलविले आणि टिकाव मारावा अशा आपल्या घट्ट मुठी उभारून खाली आणल्या.

" आघाडीवर सैनिकांना गोळ्या घालून मारायची शिक्षा कुणी सुरू केली ? कोर्निलोवनं ! आपले गळे दाबायला कालेदिनला मदत कोण करतोय ? कोर्निलोव !" तो झपाट्याने बोलू लागला. मधून मधून त्याचे शब्द धड फुटेनात.

" कझाकानु ! भाऊ ! भाऊ ! भाऊ ! तुम्ही कुणाच्या बाजूला सामील होणार ? कालेदिनला आपण आपल्या भावाचं रगत प्यायला हवंय. नाय ! आम्ही ते कधीही करणार नाय ! त्यांना आम्ही चिरडून टाकू ! समुद्रात बुडवून टाकू . . . !"

. . . . . . . . .

ख्रिस्तोनिया आकर्ण हसत होता. न राहवून त्याने आपले हात उंचावले आणि त्याने हास्याचा गडगडाट केला.

"असा दणका पायजे ! हाण तिच्या मारी !"

" चूप ख्रिस्तोनिया ! झालंय काय तुला ? तुला लाथ मारून हाकलून देतील !" अलेक्सिएविच घाबरून उद्गारला.

सोव्हिएटांच्या मध्यवर्ती कार्यकारिणीच्या कझाक विभागाचा पहिला अध्यक्ष लागुतिन हा बुकानोवस्की कझाक होता. जळजळीत शब्दांनी त्याने कझाकांना फटकावले. ते शब्द असंबद्ध पण काळजाला भिडणारे होते.

त्यानंतर अध्यक्ष पोदतियालकोवचे भाषण झाले. त्याच्यानंतर इंग्रजी धाटणीच्या लहानशा मिशा राखलेल्या श्यादेनको हा देखणा माणूस बोलला.

" कोणाय तो ?" आपला थोराड पंजा रोखून ख्रिस्तोनियाने विचारले.

" श्यादेनको. बोलशेव्हिक कमांडर !"

" न् तो ?"

" मांदेलस्ताम !"

" कुठचाय तो ?"

" मॉस्कोचा !"

"'न् ते कोणायत ?" वोरोनेझ प्रतिनिधींचा एक गट दाखवून ख्रिस्तोनियाने विचारले.

"बापरे ! ख्रिस्तोनिया, थोडा वेळ जरा गप् बस !"

"अरे देवा, गंमताय ! माणसानं माहिती करून घेऊ नाय का काय ? चल . . चल . . पोदतियालकोवच्या बाजूला बसलेला तो लंबू कोणाय सांग ?"

"क्रिवोशलिकोव . . . गोर्बातोव खेडचाचा. आपले लोक त्याच्या पाठीमागायत. कुदिनोव. दोनेत्सकोव."

"आता आणखी एकच प्रश्न. तो माणूस कोणाय ? नाय. तो नाय. तो टोकाचा. कपाळावर झुबका आलेला !"

"येलिसीएव. तो कुठच्या गावचा ते मला माहित नाय !"

ख्रिस्तोनियाचे समाधान होऊन तो गप्प बसला. आणि तन्मयतेने प्रत्येक वक्त्याचे भाषण ऐकू लागला. "बरोब्बर !" हा त्याचा गाढा दणदणीत उद्गार इतर शेकडो आवाजांच्या बरताण ऐकू येत होता.

इतर वक्त्यांची भाषणे झाल्यावर ४४ व्या रेजिमेन्टचा एक प्रतिनिधी उभा राहिला. आपली क्लीष्ट वाक्ये बळेच उच्चारायला त्याला बराच वेळ लागला. तळपत्या तेग्यासारखा तो एकादा शब्द उच्चारी. नंतर थांबून हुंगल्यासारखे नाक करी. पण कझाक त्याचे भाषण मोठ्या सहानुभूतीने ऐकत होते. मधूनच रुकाराच्या आरोळ्यांनी ते त्याच्या बोलण्यात खंड पाडीत. त्याच्या शब्दांना कझाकांचा गाढा प्रतिसाद मिळत असल्याचे दिसत होते. "भाऊ ! आपल्या अधिवेशनाने ह्या गंभीर कामाचा विचार अशा प्रकारे केला पाहिजे की ज्यानं लोकांना लांछन लागणार नाही. आणि सगळ्याचा शेवट शांतपणे न् चांगला होईल." तो तोतऱ्यासारखे बोलत होता, "माझा सांगण्याचा उद्देश हा की, घोरंदर युद्धाशिवाय आपण मार्ग शोधून काढला पायजे. आधीच गेली साडेतीन वर्षे आम्ही अलंगातून पुरलेले आहोत आणि आपल्याला जर लढत रहावं लागलं तर कझाक शिणवट्यानं मरतील."

"खराय !"

"आम्हाला युद्ध नकोय !"

"आपण बोल्शेव्हिक आणि सेनापरिषदेकडं बोललं पायजे."

"उगाच आपलं कसं तरी नाय! आपण 'मिळून' ह्याचा निकाल केला पायजे!"

अध्यक्ष पोदतियालकोवनी दाणकन मेजावर मूठ आपटली. त्याबरोबर कोलाहल शांत झाला.

आपल्या आखूड दाढीचे केस उपटीत ४४ व्या रेजिमेन्टचा प्रतिनिधी बोलतच होता.

"नोवोचेरकास्कला आपण शिष्टमंडळ पाठिवलं पायजे. न् स्वयंसेवक न् गनिमी सैनिकांना इथून निघून जायला गोडीनं सांगितलं पायजे. न् बाल्शेव्हि-कांचंही इथं काही काम नाही. कामकरी लोकांच्या शत्रूंच आमचं आम्ही बघून घेऊ. परक्या लोकांची मदत आज आम्हाला नकोय. न् मदत लागली तर सांगू मदत करा म्हणून!"

"या बोलण्याचा काय उपयोग नाय!"

"बरोब्बर!"

"थांब! थांब! काय 'बरोब्बर?' समजा त्यांनी आपल्याला खिंडीत गाठलं तर? मग कुठून मदत मागणार? आग लागली तर विहिर खणायची काय?"

"आपल सरकार आपण बनवलं पाहिजे."

"बोलण सोपाय!"

चव्वेचाळीसाव्या रेजिमेन्टमधून आलेल्या प्रतिनिधीनंतर लागुतिनीनी केलेलें भाषण म्हणजे जळजळीत आव्हान होतं तो बोलत असताना माणसं आरडा ओरड करून त्याला अडवीत होती. दहा मिनिटं सभा तहकूब करावी अशी कोणी-तरी सूचना मांडली. पण थोडं शांत झाल्यावर पोदतियालकोव कझाकांच्या शुद्ध जमावाला उद्देशून गरजला,

"कझाक बंधूनो! आपण इथे वाद घालीत बसलोय तेव्हा खपणाऱ्या माणसांचा गनिम काही झोपलेला नाही. लांडग्याचं तर पोट भरलं पाहिजे आणि शेळी जिवंत राहिली पाहिजे असलं आपलं चाललय. पण कालेदिनला तसं वाटत नाय ह्या सभेत भाग घेतील त्या सगळ्यांना अटक करण्यात यावी म्हणून काढ-लेल्या हुकूमाची नक्कल आम्ही हस्तगत केल्येय. मी ती मोठ्यांदा वाचून दाखवितो.

अधिवेशनाच्या सदस्यांना अटक करण्याबद्दल कालेदिनने काढलेला तो हुकूम त्याने वाचून दाखवल्यावर प्रतिनिधीत सनसनाटीची एक लाट पसरली. आणि पूर्वीपेक्षा जास्त गोंगाट उसळला.

" काम करा. बडबडीत वेळ नका घालवू ! श्शू . . .!"

" कोण म्हणतय श्शू . . . ! हुट्ट ! लोबो, लोबो . . ! तू बोल."

" थांब जरा."

" कालेदिन काय भोट नाय ! "

त्या गर्दीतून आंदोलणारी डोकी आणि होणारे हातवारे बघत ग्रिगरी शांतपणे ऐकत होता. अखेरीस त्याला ते सहन होईना. चवडयावर उभा राहून तो किंचाळला,

" खामोश, भडव्यो ! हा काय बाजार हाय नाय ! पोदतियालकोवला बोलू द्या."

इवान अलेक्सिएविचनं एका प्रतिनिधीच्या कोटाच्या काज्यात बोट घातलं आणि तो त्याच्याशी वाद घालू लागला.

आपल्या रेजिमेन्टमधल्या एका माणसाला क्रिस्तोनिया डुरकत झाडीत होता, " आपण सावध राहिलं पाहिजे ! "

" मला असल्या बाता मारू नको. आपलं आपण हे करायला शकतो नाय, ह तुला कळत नाय ?"

अखेरीस आवाजांचा गदारोळ मंदावला. वारा पडल्यावर गव्हाचं पीक निश्चल व्हावं तसं झालं. व्यासपीठावरून क्रिवोश्लीकोवचा किरटा बायकी आवाज ती स्तब्धता चिरत गेला.

" कालीदीन मुर्दाबाद ! कझाक लष्करी क्रांतीकारक समिती झिंदाबाद ! "

जमाव विव्हळला.

दणदणीत फटकारल्या आसुडाचा ध्वनी व्हावा अशा होकाराच्या आरोळ्या एकदम उसळल्या. हात उभारून क्रिवोश्लीकोव तसाच उभा होता. त्याची बोटं अ‍ॅश वृक्षाच्या पानासारखी किंचित थरथरत होती. कानठळ्या बसवणाऱ्या त्या गर्जना ओसरतात न ओसरतात एवढ्यात त्याच किनऱ्या उंच आवाजात तो ओरडला,

" माझी अशी सूचना आहे की आपण जमलेल्या प्रतिनिधींतून कझाक लष्करी क्रांतिकारक समितीची निवडणूक करू या. कालेदिनविरुद्ध लढा चालू ठेवण्याचा आदेश ह्या समितीला देण्यात यावा अशी जमवा . . ."

" आ ऽ ऽ हा !"

हातगोळा फुटावा अशा गर्जना उसळल्या. आणि तक्तपोशीच्या चुन्याच्या पापुद्र्याच्या कडा निखळल्या.

समितीच्या सदस्यांची निवडणूक सभेने ताबडतोब सुरू केली. ४४ व्या आणि इतर रेजिमेन्टमधील प्रतिनिधींच्या नेतृत्वाखाली कझाकांचा एक लहानसा गट म्हणत राहिला की कालेदिन सरकारबरोबर संघर्षाची शांततापूर्ण सोडवणूक करावी. पण बहुमताने आता त्यांना पाठिंबा दिला नाही त्यांना अटक करण्याबद्दल कालेदिनने सोडलेल्या हुकूमानं कझाक चिडले होते त्याचा सक्रिय प्रतिकार करावा अशी त्यांची मागणी होती.

रेजिमेन्टच्या ठाण्यावरून ग्रिगरीला तातडीचे बोलावणे आले. निवडणूका होईपर्यन्त तो थांबला नाही. तो जायला निघाला तेव्हा ख्रिस्तोनिया व इवानने त्याला विचारले, " हे संपलं की माझ्या खोलीकडे या. कोण निवडून आलं ते मला कळलं पाहिजे."

रात्र पडल्यानंतर इवान अलेक्सिएविच आला. " पोदतियालकोव अध्यक्ष न् क्रिवोशलिकोव चिटणीस झालेत." उंबऱ्यावर उभे राहूनच त्याने ग्रिगरीला माहिती पुरवली.

" अन् सभासद !"

" इवान लागुतीन आणि गोलोवाचोव, मिनाएव, कुदिनो आणि इतर काही."

" पण ख्रिस्तोनिया कुठाय ?"

" कामेनस्कायाच्या अधिकाऱ्यांना अटक करायला इतर काहीजणांबरोबर तो गेलाय. तो इतका तापलाय की त्यावर थुंकलास तर वाफ होईल."

पहाट होईपर्यन्त ख्रिस्तोनिया परत आला नाही. आला तो खोलीत धापा टाकीत उभा राहिला. धपापत तो काहीतरी पुटपुटत होता. ग्रिगरीने दिवा

लावला. तेव्हा त्याला दिसलं की त्याचा चेहरा रक्तबंबाळ झाला असून बंदुकीच्या गोळीचा चरा त्याच्या कपाळावर उमटला होता.

"कुणी मारलं तुला ? फडकं बांधू ? थांब जरा. फडकं शोधतो." ग्रिगरी उडी मारून उभा राहिला आणि आपल्या प्रथमोपचार पेटीकडे वळला.

"येईल साली जखम भरून !" ख्रिस्तोनिया गुरगुरला.

"लष्करी कमांडरने माझ्यावर पिस्तुल झाडलं. पुढच्या दाराने आम्ही त्याच्याकडे पाव्हण्यासारखे गेलो. न् त्याने लढायला सुरवात केली. आणखी एका कझाकाला त्याने जखमी केलंय. त्याची छाती फोडून आणि काळीज बाहेर काढून मला बघायचं होतं अंमलदाराचं काळीज कसं असतं. पण दुसऱ्या कझाकांनी मला करू दिलं नाय! त्याचं काळीज बघायला पाहिजे होतं रे! काळीज बघायला हवं होतं !"

---

९

कामेनस्काया अधिवेशन झाल्यानंतर दुसऱ्या दिवशी त्या अधिवेशनाच्या सदस्यांना अटक करण्यासाठी कालेदिनने दहावं डॉन कझाक रेजिमेन्ट पाठवलं. कझाक डिव्हीजनमधील बहुतेक क्रांतिकारकांची शस्त्रे काढून घेण्याचा हुकूम देण्यात आला. कामेनस्काया स्टेशनावर हे रेजिमेंट पोहोचलं आणि ते जेव्हा गाडीतून खाली उतरत होते तेव्हा स्टेशनावर सभा भरली होती. पोदतियालकोव व्यासपीठावर होता.

"बाप हो आणि बंधूनो," तो बोलत होता. "मी कुठल्याही पक्षाचा सभासद नाय बोल्शेव्हिक नाय. माझी धडपड एकाच गोष्टीसाठी हाय न्यायासाठी. सर्व कामगारांच्या सुखासाठी. त्यांच्या भावासारख्या एकीसाठी. असं झालं की जुलूम होणार नाय! जमीनदार रहाणार नाय! भांडवलदार रहाणार नाय! श्रीमंत मनुष्य रहाणार नाय! सगळेजण स्वतंत्रपणे आपल्या इच्छेप्रमाणे जगतील! हे मिळवायचा बोल्शेव्हिकांचा प्रयत्न आहे. न त्यासाठी ते रडतायेत! बोल्शेव्हिक कामगार आहेत. आपण कझाग तसेच ते कामकरी माणसं हायेत. फरक एवढाच की बोल्शेव्हिकांना कामगारांची आपल्यापेक्षा जास्त जाण आहे न् एकजुटीचे हायेत. आपल्याला अंधारात ठेवण्यात आलेय पण ते शहरात रहातात. आपल्यापेक्षा जिंदगी जास्त चांगली समजू शकलेत. तेव्हा सांगायची गोष्ट म्हणजे मी बोल्शेव्हिक पक्षाचा सभासद नसलो तरी मी बोल्शेव्हिक हाये!"

गाडीतून खाली उतरून दहावं डॉन कझाक रेजिमेन्ट त्या सभेच्या जागी आलं. हे कझाक देखण्या बांधणीचे खास वेचून घेतलेले सैनिक होते. त्यांनी सभेच्या भोवती घोळका केला. इतर रेजिमेन्टच्या सैनिकात ते मिसळून गेले. बोल्शेव्हिकांच्या अनुयायांनी जो रसरशीत क्षोभ त्यांच्या मनात जागृत केला तो चटकन फेसाळला. न् रेजिमेन्ट कमांडरनी कालेदिनच्या हुकूमाची तामील करण्याचा हुकूम दिला गेला तेव्हा त्यांनी नकार दिला.

इकडं कामेनस्कायामधे धूम उसळली होती. झटपट जमवलेली कझाकांची पथकं स्टेशनं ताब्यात घेण्यासाठी रवाना होत होती. सैनिकांच्या गाड्या सुटत होत्या. झ्वेरेवो लिखाया दिशेनं ती रवाना होत होती. ताज्या कमांडरच्या निवडणूका पथकातून होत होत्या. युद्ध टाळायला उत्सुक असलेले कझाक हळूच गावाबाहेर सटकले तर निरनिराळ्या खेड्यातून उशीर झालेले प्रतिनिधी अजूनही येतच होते. कामेनस्कायाच्या रस्त्यावर कधीही अशी धूमधाम उसळली नव्हती.

१३ जानेवारी रोजी डॉन श्वेतरक्षक सरकारचे शिष्टमंडळ बोलणी करण्यासाठी गावात येऊन दाखल झालं. त्यात रेजिमेन्टचे अध्यक्ष आशिएव श्वेलोझारोव, मंडळाचे सदस्य, उलानोव, कारेव, बाझेलोव आणि कुश्नारेव. स्टेशनात एक मोठा जमाव त्यांना भेटला. आतामानच्या हुजराती रेजिमेन्ट कझाकांनी त्यांना रक्षण देत पोस्ट ऑफिसच्या इमारतीकडे नेले. इथं लष्करी क्रांतीकारक समितीने बहुतेक रात्र सरकारी शिष्टमंडळाबरोबर झालेल्या बैठकीत घालवली. लष्करी क्रांतीकारक समितीचे सतरा प्रतिनिधी हजर होते. डॉनचा द्रोह करून बोल्शेव्हिकांशी सहकार्य केल्याचा आरोप सरकारी प्रतिनिधींनी ज्या भाषणात केला त्याला पोदतियोलकोवने मर्मभेदक उत्तर दिले. त्याच्यानंतर क्रिवोश्लीको न् लागुतीन बोलले. कर्नल कुश्नारेवच्या भाषणात व्हरांड्यात जमलेल्या कझाकांच्या जमावाने आरडाओरड करून अडथळे आणले. क्रांतीकारक कझाकांच्या वतीने एका मशिनगनवाल्याने सरकारी शिष्ट मंडळाला अटक करण्याची मागणी केली.

कोणताही समेट न होता परिषद फिसकटली. आता कोणताही सलोखा होत नाही असं स्पष्ट झाल्यावर ह्या शिष्टमंडळाचे एक सदस्य कारेव ह्यानी पहाटे दोन वाजता अशी सूचना मांडली की भावी सरकारच्या प्रश्नावर काही तरी अंतीम निर्णय घेण्यासाठी क्रांतीकारक समितीने नोवोचेरकास्कला एक शिष्ट मंडळ पाठवावं. ही सूचना मान्य झाली.

डॉन सरकारच्या शिष्टमंडळाने प्रयाण केलं. त्यांच्या मागोमाग लष्करी क्रांतिकारक समितीचे प्रतिनिधी नोवोचेरकास्कला निघाले. ह्या शिष्टमंडळाचे प्रमुख पोदतियोलको होते. ह्यांच्या खेरीज शिष्टमंडळात कुदीनो, क्रिवोश्लोको, लागुतीन, स्काचकोव, गोलोवाच आणि मिनाय हे होते. कामेनस्कीत ज्यांना अटक करण्यात आली होती त्या आतामान रेजिमेन्टमधील अंमलदारांना ओलीस ठेऊन घेण्यात आले.

———

## १०

गाडीच्या खिडकीबाहेर हिमवादळाचे थैमान चालू होते. वाऱ्यावर हेलावणारा हिमझोत ढिसाळलेल्या बरफढिगाऱ्यावर भासमानसा होत होता. वेड्यावाकड्या छपरावर पक्षांच्या पावलांची नक्षी उमटली होती. रेल्वेच्या केबिन्स, तारेचे खांब आणि बोडक्या माळांचा कंटाळवाणा हिमाळलेला नजारा झराझर मागे उत्तरेला सरकत होता.

नवीन कातडी जाकीट घातलेला पोदत्योलकोव खिडकीजवळ बसला होता अरुंद खांद्यांचा एकाद्या पोरासारखा सडसडीत असणारा क्रिवोशलिकोव त्याच्या समोर बसला होता. आपली कोपरे त्याने टेबलावर टेकली होती. त्याच्या पोरसवदा नितळ डोळ्यात चिंता आणि अपेक्षा होती. आपली विरळ पिंगट दाढी लागुतिन विंचरत होता. मिनाएव हा दांडगा कझाग आपले हात गरम नळावर शेकत अस्वस्थपणे अंगाची चाळवाचाळव करीत बसला होता. गोलोवाचोव आणि स्काचकोव वरच्या बाकावर पडून हळूहळू बोलत होते.

तंबाखुच्या धुराने आणि थंडीने डबा कोंदून गेला होता. नोवोचेरकास्कला ज्यासाठी ते चालले होते त्या कामगिरीबद्दल शिष्टमंडळाच्या सदस्यांना मुळीच खात्री वाटत नव्हती. ते बोललेच तर त्रोटक बोलत होते. त्यांची मुग्धता कंटाळवाणी होती. अखेरीस पोदत्योलकोवने सर्वांची खात्री बोलून दाखवली.

"त्यातून काही निष्पन्न होणार नाय. आपलं एकमत होणार नाय."

"हा . . .! वेळ फुकट दवडणं आहे!" लागुतिनने होकार दिला.

परत ते बराच वेळ गप्प बसले. जाळीच्या भोकातून बॅटमिंटनचे फूल हचा हाताने घालून त्या हाताने काढावे अशी मनगटे संथपणे हलवीत पोदत्योलकोव बसला होता. पुन्हा पुन्हा तो आपल्या जाकीटाकडं बघत त्या कातड्याच्या नरम झळाळीचे कौतुक करीत होता.

ते नोवोचेरकास्कच्या जवळ आले. गावापासून दूर धावत जाणाऱ्या डॉनच्या नकाशाकडे पाहून मिनाएव हळूहळू सांगू लागला :

"जुन्या काळी आतामान रेजिमेन्टच्या कझाकांनी आपली चाकरी पुरी केली की, त्यांची घरी जाण्याची तयारी व्हायची. ते आपल्या संदुका, घोडी आणि सामानसुमान गाडीत चढवीत. गाडी सुटायची. अन् वोरोनेझच्या जवळ जिथं 'लाईन' डॉन ओलांडून जाते – तिथं आलं की एंजिन ड्रायव्हर गाडी हळू करायचा – करवेल तेवढी हळू करायचा . . . आता काय होणाराय ते त्यांना ठाऊक असायचं. एकदा का गाडी पुलावर चढली . . . की बापरे ! काय देखावा दिसायचा ! कझाक वेडे व्हायचे. 'डॉन ! डॉन ! शांत डॉन ! आमचा मायबाप ! आमचाच ! हुर्रा !' अन् खिडकीतून पुलावरून थेट खाली पडत – टोप्या, फर्गोल, तुमानी, सदरे अन् काय काय ते भगवान जाणे ! चाकरी करून परत आले म्हणून डॉनला ते ओवाळणी देत. कधी कधी पाण्याकडं पाहिलं की, आतामानच्या निळचा टोप्या बदकागत नायतर फुलागत तरंगताना दिसत. फार फार जुनी रीत होती."

गाडीने वेग कमी केला. अखेरीस ती थांबली. कझाक उठून उभे राहिले. फर्गोलाच्या गुंड्या लावीत कसनुसं हसून क्रिवोशलिकोव म्हणाला–

"आलो तर !"

"आपल्यासाठी काय झेंडे लावले नाहीत !" स्कायकोवने मस्करी करण्याचा प्रयत्न केला.

ठकठक न करता एका उंच कॅप्टनने धाडकन दार उघडले. आणि तो डब्यात आला. शिष्टमंडळाच्या सदस्याकडे त्याने वैरी नजरेने पाहिले आणि मुद्दाम आडदांडपणे तो म्हणाला, "तुम्हाला घेऊन येण्याचा मला हुकूम आहे. मिस्टर बोल्शेव्हिक्स् ! मेहेरबानी करून डब्यातून शक्य तेवढे लौकर बाहेर पडा ! गर्दीची न तुमच्या सुरक्षेची मी हमी देऊ शकत नाही."

आपली नजर त्याने इतरापेक्षा पोदत्योलकोववर–विशेषत: त्याच्या कातडी जाकिटावर–रोखून धरली आणि मग ठोस द्वेषाने तो ओरडला, "बाहेर व्हा !

जल्दी !" "हे आले ! बदमाश ! कझाकांवर उलटणारे !" ते बाहेर पडत असताना फलाटावरील गर्दीत उभा असलेला एक पल्लेदार मिशांचा अंमलदार गरजला. पोदत्योलकोव गोरामोरा झाला. त्याने मागे वळून क्रिवोशलिकोवकडे गडबडलेल्या नजरेने पाहिले. स्मित करून क्रिवोशलिकोव कुजबुजला, "रुकार नाही उदो ओविचा । हासडलेल्या बोल शिवीचा । असतो तोही ।।" माहिताय ना फ्योदोर ?"

त्याचे शेवटचे शब्द ऐकू आले नाहीत तरी प्योदत्योलकोवने उत्तरादाखल हसून दाखवले.

अंमलदारांच्या दरोबस्त सोबतीने शिष्टमंडळाला राखण दिली. मुख्य सरकारी ठाण्याच्या दरवाजापर्यन्त पिसाट जमाव त्यांच्याबरोबर येत त्यांना जागच्या जागी ठेचा म्हणून मागणी करीत येत होता. अंमलदार आणि कॅडेटसच नव्हे तर नटूनथटून आलेल्या बायका आणि विद्यार्थी–काही कझाकसुद्धा–त्यांना शिवीगाळ करीत होते.

"ही शुद्ध दांडगाई आहे." बरोबरच्या एका अंमलदाराकडे वळून लागुतिन म्हणाला.

"देवाला दुवा द्या की तुम्ही अजून जिवंत आहात. माझ्या जर तुम्ही हातात असता . . . तर . . . थुत् तुमची डोंबकावळचांनो !" त्याच्याकडे द्वेषाने बघत तो अंमलदार फुत्कारला.

त्याच्याहून लहान असणाऱ्या एका अंमलदाराची धि:कारणारी नजर पाहून तो बोलायचा थांबला.

"काय गोंधळाय !" मिळालेली पहिली संधी साधून स्काचकोव गोलोवाचोव जवळ कुजबुजला.

"असं वाटतंय जसं आपल्याला फाशी द्यायला चालवलंय."

जमलेला सगळा जमाव मावू शकेल एवढा स्थानिक सरकारचा तो हॉल मोठा नव्हता. लेफ्टनंटने सांगितल्याप्रमाणे मेजाच्या एका बाजूला शिष्टमंडळाचे सदस्य बसतात न बसतात एवढ्यात सरकारी लोक आले. बाजूला बोगाएवस्की असलेला कालेदिन किंचित वाकला होता. लांडग्यासारखी ठाशीव पावले टाकीत कालेदिन मेजाजवळ आला. त्याने आपली खुर्ची मागे ओढली आणि तो खाली बसला. अंमलदारीचा तुरा लावलेली आपली टोपी त्याने शांतपणे मेजावर ठेवून हाताने केस मागे वळवले. आणि आपल्या बाजूला प्रशस्त खिशाला गुंड्या लावल्या.

नंतर आपल्या कानाशी कुजबुजणाऱ्या बोगाएवस्कीच्या बाजूला तो झुकला. त्याच्या प्रत्येक हालचालीत आणि आविर्भावात खंबीर, उद्दाम, आत्मविश्वास आणि पोक्त ताकद दिसत होती. सत्ता ज्याने अजमावली आहे आणि अनेक वर्षांच्या ओघात इतरापेक्षा वेगळेपण ठरवणारा डौल ज्याने मिळवलेला आहे असा त्याचा एकूण ढंग होता. त्याचे पोदत्योलकोवशी बरेच साम्य होते. प्रभावी कालेदिनच्या तुलनेने कमी प्रतीचा वाटणारा बोगाएवस्की होऊ घातलेल्या वाटाघाटींच्या जाणीवेने जास्त खळबळलेला वाटत होता. तो कुजबुजत होता पण छपरी मिशांनी झाकलेले त्याचे ओठ सहसा विलग होत नव्हते. एकभिंगी चष्म्याआडून त्याचे तिखट तिरपे डोळे चमकत होते.

गळपट्टी नीट करणारे, हनुवटी चाचपणारे त्याचे अस्वस्थ हात, वारंवार उंचावणाऱ्या त्याच्या केसाळ भुवया, ह्यातून त्याची घबराट दिसून येत होती. बाकीच्या सरकारी मंडळींनी कालेदिनच्या दोन्ही बाजूंना बसून घेतले. त्यापैकी काही जण कामेनस्कायला आलेल्या शिष्टमंडळापैकी होते. त्यात कोरव, स्वेतो-झारोव, उलानोव, आगीएव होते. जरा लांब अंतरावर बसले होते एलातोंत्सेव, मेलिनिकोव, बोस्से, शोशनिकोव, पल्याकोव.

कालेदिनशी बोगाएवस्की काहीतरी कुजबुजत असल्याचे पोदत्योलकोवने ऐकले. आपल्या समोर बसलेल्या पोदत्योलकोवकडे त्या सेनापतीने तीक्ष्ण नजरेने पाहिले आणि तो म्हणाला, " मला वाटतं आपण सुरवात करू शकतो."

पोदत्योलकोवने स्मित केले. शिष्टमंडळाच्या आगमनाचे कारण त्याने खणखणीत सुरात सांगितले. लष्करी क्रांतिकारक समितीने तयार केलेला निर्वाणीचा खलिता क्रिवोशलिकोवने उचलला आणि तो मेजावर पसरला. परंतु आपल्या पांढऱ्या हाताच्या फटकाऱ्याने कालेदिनने तो फेटाळून लावला आणि तो ठामपणे म्हणाला,

"प्रत्येक सरकारी सभासद स्वतंत्रपणे ह्या कागदपत्राचा अभ्यास करतोय तेव्हा वेळ फुकट दवडण्यात अर्थ नाही. मेहरबानी करून आपला निर्वाणी खलिता मोठ्यानं वाचून दाखवा. नंतर त्यावर चर्चा करू."

"वाच !" पोदत्योलकोवने हुकूम दिला. तो आपला आब सांभाळून होता पण त्या शिष्टमंडळाच्या इतर सदस्यांप्रमाणेच त्यालाही सावधगिरी बाळगण्याची जरूरी उघडच भासत होती.

क्रिवोशलिकोव उभा राहिला. गच्च भरून गेलेल्या त्या हॉलमधून त्याचा एकाद्या पोरीसारखा असणारा किनरा मंद आवाज ओघळत होता.

" १० जानेवारी १९१८ पासून डॉन प्रदेशातील फौजावरील सर्व सत्ता आतामानकडून डॉन कझाक क्रांतिकारक लष्करी समितीकडे सुपूर्द करण्यात आलेली आहे.

क्रांतिकारक सेनेविरूद्ध कारवाया करणाऱ्या सर्व फौजा त्याचप्रमाणे सर्व स्वयंसेवक पथके, कॅडेट अकादमी, पाएतोग शाळा ह्यांना १५ जानेवारीपर्यंत रजा देऊन बेहत्यारी करण्यात यावयाचे आहे. वरील संघटनाचे सभासद असून आणि जे डॉन प्रदेशाचे रहिवाशी नाहीत त्यांना त्यांच्या कायम जागी मुक्कामाच्या जागी तडीपार करण्यात येणार आहे.

टीप–हत्यारे, सरंजाम, गणवेष हे क्रांतिकारक लष्करी समितीच्या कमिसारच्या हवाली केलेच पाहिजेत. ते नोवोचेरकास्क सोडून जाण्याचे परवाने देतील.

क्रांतिकारक लष्करी समितीच्या हुकूमावरून कझाक नोवोचेरकास्क शहर ताब्यात घेतील. कझाक लष्करी परिषदेच्या सभासदांची अधिकारपत्रे १५ जानेवारी पासून रद्दबातल होत असल्याचे घोषीत करण्यात आले आहे.

डॉन सरकारने डॉन प्रदेशाच्या कारखाने आणि खाणीवर ठेवलेले पोलीस काढून घेण्यात येतील.

रक्तपात टाळण्यासाठी डॉन प्रदेशातील सर्व खेडी आणि जिल्हे ह्यांना उद्देशून सरकारने जाहीर केले पाहीजे की, आपण राजीखुषीने राजीनामा देत आहोत आणि ह्या प्रदेशात श्रमिकांचे स्थायी सरकार स्थापन होईपर्यंत सर्व सत्ता कझाक क्रांतीकारक लष्करी समितीच्या ताबडतोब हवाली करीत आहोत."

त्याचा आवाज विरतो न विरतो तोच कालेदिनने जोराने विचारले, "ह्या निर्णायक खलित्याचा अधिकार कोणत्या फौजेनं तुम्हाला दिला?"

पोदत्योलकोवनं क्रिवोशलिकोवशी नजरानजर केली आणि तो मोठ्याने मोजू लागला,

"आतामानची हुजरत, कझाक हुजरात, ६वी बतारी, ४४ वं रेजिमेंट, ३२वी बतारी, १५वं खास स्क्वाड्रन . . . " प्रत्येक डिव्हिजनचे नाव घेताना तो डाव्या हाताचे एकेक बोट घालीत होता. आणि हॉलमध्ये कुचेष्टेची खसखस पसरली. पोदत्योलकोवने कपाळाला आठ्या घातल्या, मेजावर हात ठेवले आणि आवाज चढवला, "२८ वं रेजिमेंट, २८ वी बतारी, १२ वी बतारी, १२ वं रेजिमेंट . . . "

". . . १९ वं रेजिमेंट." पोदत्योलकोव आता जास्त आत्मविश्वासपूर्वक बोलू लागला.

"१३ वी बतारी, कामेनस्काया स्क्वाड्रन, १० वं रेजिमेंट, २७ वं रेजिमेंट, २रं पायदळ बटालियन, २ रे राखीव बटालियन, ८ वं रेजिमेंट, १४ वं रेजिमेंट."

त्याचे झाल्यावर कालेदिनने काही किरकोळ प्रश्न विचारले. नंतर मेजावर पुढे झुकून पोदत्योलकोवच्या नजरेला नजर भिडवून त्याने विचारले,

"जनता कमिसार परिषदेचा अधिकार तुम्हाला मान्य आहे का नाही?"

पोदत्योलकोवने पाण्याचा ग्लास संपवला. तो परत मेजावर ठेवला. बाहीने आपल्या मिशा पुसल्या आणि उत्तर दिले, "सगळी जनताच ह्याचं उत्तर देईल."

विशेष भोळा असणारा पोदत्योलकोव काहीतरी सांगून जाईल म्हणून क्रिवोश-लिकोव मधेच म्हणाला, "जनता* स्वातंत्र्य पक्षाचे प्रतिनिधी ज्यात असतील असं सरकार कझाक सहन करणार नाहीत, पण आम्ही कझाक आहोत आणि सरकार आमचं कझाक सरकार असलं पाहिजे."

"परिषदेच्या मुख्य जागेवर यहुदी किंवा तसेच लोक आहेत तेव्हा ह्या शेऱ्याचा अर्थ आम्ही काय लावायचा?"

"रशियानं त्यांच्यावर विश्वास टाकलेला आहे. आम्हीही त्यांच्यावर विश्वास टाकू."

"त्यांच्याशी तुम्ही संबंध ठेवणार?"

"हो."

पोदत्योलकोवने गुरगुरून होकार भरला आणि क्रिवोशलिकोवचे म्हणणे उचलून धरावे म्हणून तो म्हणाला, "अमुक एका माणसाशी आम्हाला कर्तव्य नाही. आम्हाला कर्तव्य आहे विचारांशी."

सरकारी सभासदापैकी एकाने भाबडेपणाने विचारले, "जनता कमिसार परिषद लोकांच्या भल्यासाठी काम करीत आहे का?"

पोदत्योलकोवची भेदक नजर हळूहळू त्याच्यावर सरकली. हसून त्याने पाण्याची बाटली घेतली आणखी एक ग्लासभर पाणी ओतून घेतले आणि ते

---

* टीप : घटनात्मक लोकसत्तावादी किंवा ज्यांना सर्वसामान्यपणे कॅडेटस् म्हणत ते.

घटकन पिऊन टाकले. आत जणू काही आग पेटल्यासारखा तो तहानेने करपला होता.

कालेदिनने बोटांचा तबला बाजवीत चौकशी केली. " बोल्शेव्हिकाशी तुमचं कुठं जमतं ?"

" डॉन प्रदेशात आम्हाला कझाक स्वराज्य हवंय."

" हो. पण हे तुम्हाला ठाऊकच आहे ना की, ४ फेब्रुअरी रोजी नवीन लष्करी परिषद बोलवण्यात यायच्येय ? सभासदांची फेरनिवडणूक होईल एक-दुसऱ्यावर नियंत्रण ठेवायला. मान्यता द्याल ?"

" नाय !" नजर वर उचलून पोदत्योलकोवने ठाम उत्तर दिले. " तुमच्या पक्षाला कमी मतं पडली तर आम्ही आमची इच्छा तुमच्यावर लादू."

" पण ती जबरदस्ती होईल !"

" होय !"

मित्रोफान बोगाएवस्कीने आपले डोळे पोदत्योलकोवकडून क्रिवोशलिकोवकडे वळवले. आणि विचारले–

" लष्कर परिषदेला तुमची मान्यता आहे ?"

" फक्त एवढ्याच पुरती की . . ." पोदत्योलकोवने आपले रुंद खांदे उडवले. " प्रादेशिक लष्करी क्रांतिकारक समिती लोकांच्या प्रतिनिधींचं अधिवेशन बोलावेल. लष्करी नियंत्रणाखाली त्याचं कामकाज चालेल, अधिवेशनानं आमचं समाधान झालं नाही तर त्याला आम्ही मान्यता देणार नाय !"

" ह्या सगळ्या बाबतीत परीक्षा कोण करणार ?"

" जनता !" पोदत्योलकोवने आढ्यतेने गर्दन मागे केली. खुर्चीच्या कोरीव पाठीवर तो रेलला तसे त्याचे कातडी जाकीट करकरले.

किंचित विरामानंतर कालेदिन बोलायला उभा राहिला. हॉलमधली सगळी गडबड शांत होऊन गेली. त्याच्या आवाजाचा खर्जातील कंटाळवाण्या पतझडी-सारखा सूर त्या शांततेत स्वच्छ निनादत होता.

" प्रादेशिक लष्करी क्रांतिकारक समितीच्या मागणीवरुन सरकार आपला अधिकार त्याग करणार नाही. सद्याचं सरकार डॉनच्या सगळया लोकांनी निवडून दिलेलं आहे. आणि एकाद दुसरे विभाग नव्हेत तर ते सगळे लोकच आमच्या सत्तात्यागाची मागणी करू शकतील. बोल्शेव्हिकांनी चालवलेल्या गुन्हेगार चळवळीला बळी पडून आणि आपली इच्छा ह्या प्रदेशावर लादण्याची बोल्शेव्हिकांची इच्छा आहे म्हणून तुम्ही मागणी करीत आहात की आम्ही सत्ता तुम्हाला द्यावी. कझाकांच्या दृष्टीनं आपण केवढी प्रचंड जिम्मेदारी अंगावर घेत आहोत हे न ओळखता तुम्ही जर्मन भाडोत्र्यांची इच्छा अंमलात आणीत आहात ह्या प्रकरणाचा तुम्ही फेरविचार करावा असा माझा तुम्हाला सल्ला आहे कारण समग्र लोकांची इच्छा ज्यातून प्रकट झाल्येय त्या सरकारशी वैर करून तुम्ही आपल्या मायभूमीला भयानक आपत्तीत लोटीत आहात. मी माझ्या अधिकाराला चिकटून राहणार नाही. डॉन कझाक सेनेची महान परिषद बोलवायची आहे तीच आपल्या देशाचं भवितव्य ठरवेल. पण ती भरेपर्यंत मी माझ्या जागेवर राहिलंच पाहिजे. तुमच्या भूमिकेचा फेरविचार करा असा माझा तुम्हाला शेवटचा सल्ला आहे."

त्यानंतर सरकारी सभासदांनी भाषणे केली. त्यात कझाक होते आणि बिन-कझाक होते. समाजवादी क्रांतिकारक पक्षाचे सदस्य असणाऱ्या बोस्सेनी लांबलचक भाषण ठोकले. त्यात मधून मधून भुरळ घालणारी आश्वासनं घुसडलेली होती. लागुतिन ओरडला तेव्हा त्यांच्या भाषणात खंड पडला.

"आमची मागणी अशी आहे की तुम्ही सत्ता लष्करी क्रांतिकारक समितीच्या हवाली करावी. ह्या प्रश्नाची शांततेने सोडणूक करायची डॉन सरकारची इच्छा आहे तर मग तुम्ही वाट कसली बघताय?"

बोगाएवस्कीने स्मित केले. " ह्याचा अर्थ . . . ? तुम्हाला हे जाहीर केलं पाहिजे की सत्ता क्रांतिकारक समितीकडे सोपविण्यात आल्येय. तुमची परिषद एकत्र जमेपर्यन्त दोन आठवडे आम्ही वाट बघू शकत नाय ! आताच लोक रागाने चवताळलेत."

आणखी एक सरकारी सभासद असणाऱ्या कारेवने लंबेचौडे वळणावेलांट्यांचे भाषण केले. दुसरा सभासद स्वेतोझारोवने अशक्य तडजोड शोधायचा प्रयत्न केला.

पोदत्योलकोव चिडून त्यांची भाषणे ऐकत होता. आपल्या स्वतःच्या सहाय्यकांकडे त्याने नजर टाकली. त्याच्या लक्षात आले की, लागुतिनचा चेहरा

विवर्ण झाला असून त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या आहेत. क्रिवोशलिकोव मेजाकडे टक लावून बघत होता आणि गोलोवाचोव काहीतरी बोलण्यासाठी अनावर झाला होता. ज्या क्षणाची वाट क्रिवोशलिकोव बघत होता तो क्षण आला आणि तो हळूच कुजबुजला, " सांगून टाक !"

पोदत्योलकोव जण ह्याची वाटच बघत होता. त्याने खुर्ची मागे ओढली आणि तो दाटीवाटीने बोलू लागला. क्षुब्धतेने तो अडखळत होता. सगळ्या संशयाचा ज्याने निरास होईल असे शब्द शोधू बघत होता.

" तुम्ही हे असं बोलू शकत नाय ! लष्करी सरकारवर विश्वास टाकता आला असता तर मी राजीखुषीनं आमच्या सगळ्या मागण्या सोडून दिल्या असत्या. पण लोकांचा त्या सरकारवर विश्वास नाय ! यादवी आम्ही नाय तर तुम्ही सुरू करताय. ह्या पाय लावून पळालेल्या सेनानींना कझाक भूमीवर तुम्ही का आसरा देताय ? म्हणूनच बोल्शेव्हिकांनी कझाकाविरुद्ध लढाई सुरू केल्येय. आम्ही तुमच्यापुढं तुकणार नाय ! आम्ही हे चालू देणार नाय ! गोष्टी आमच्या बाजूनं आहेत. लष्करी सरकार डॉन बचावू शकेल ह्यावर माझा विश्वास नाय. तुमचा हुकूम पाळायची ज्यांची इच्छा नाय त्या पथकाविरुद्ध तुम्ही काय इलाज करताय . . . ? आ . . . हा ! आता कस्सं ! खाण कामगाराविरुद्ध स्वयंसेवक का पाठवताय ? अशानंच सगळीकडं दुष्टावा पसरवताय. लष्करी सरकार यादवी टाळेल याची हमी काय ते मला सांगा ? आ . . . हा ! ह्याला तुमच्याजवळ काय उत्तर नाय ! लोक न् आघाडीवरचे कझाक आमच्या बाजूनं आहेत !"

वाऱ्याची झुळूक यावी तसं त्या हॉलमधे हसणं पसरलं. पोदत्योलकोवविरुद्ध संतप्त उद्गार ऐकू आले. आपला लालबुंद चेहरा त्याने त्या बाजूला वळवला आणि आपला तीव्र संताप लपवण्याचा यत्किंचितही प्रयत्न न करता कडाडला. "आज हसताय पण लौकरच रडायला लागंल !"

तो परत कालेदिनकडे वळला. आपले छऱ्र्यासारखे डोळे त्याच्यावर रोखून म्हणाला, "आमच्या . . . खपणाऱ्या लोकांचे प्रतिनिधी असणारांच्या हाती सरकार द्या आणि सगळे बूर्ज्वा . . . स्वयंसेवक लष्कर काढून घ्या अशी आमची मागणी आहे . . . तुमच्या सरकारनंही राजीनामा दिला पायजे !"

कालेदिनने थकून मान खाली घातली. तो म्हणाला, " नोवोचेरकास्क सोडून मी जाणार नाही !"

थोडावेळ मध्यंतर होऊन कामकाज पुढं चालू करण्यासाठी दुसरा एक सरकारी वक्ता मेलिनिकोव बोलू लागला –

" कझाकांना नष्ट करण्यासाठी रेडगार्डच्या तुकड्या डॉनवर चालून येतायत! आपल्या पागल राजवटीनं त्यांनी रशियाचा सत्यानाश केलाय आणि आता त्यांना इथं तेच करायचंय! तोतयाच्या टोळक्यानं देशावर चांगलं न् लोकांच्या भल्यासाठी राज्य केलंय असा इतिहासात एकही दाखला नाही. दुसऱ्याच्या पागलपणानं तुम्ही आंधळे झालाय न् आमची सत्ता हिरावून घेऊन तुम्हाला बोल्शेव्हिकांना दारं सताड मोकळी करायचीत. पण आम्ही तुम्हाला हे करू देणार नाही!"

" सत्ता क्रांतिकारक समितीच्या हवाली करा म्हणजे रेडगार्डस् आपली चढाई थांबवतील." पोदत्योलकोव मधेच उद्गारला.

कालेदिनच्या परवानगीने कनिष्ठ कॅप्टन शेइनने सामान्य जनतेच्या वतीने भाषण केले. अगदी खालच्या जागेपासून तो वर चढत गेला होता. सेंट जॉर्ज सन्मानाचे चार क्रूस त्याला मिळाले होते. कवायतीला आल्यासारखा त्याने आपला लांब कोट नीट केला आणि घोडदौड सुरू केली.

"कझाकानुं, आपण काय म्हणून त्यांचं ऐकायचं!" असे कडाडून तलवारीचा वार केल्यागत त्याने हात खाली फेकला. " बोल्शेव्हिकांचा रस्ता आपला रस्ता नाय! सोव्हिएतांच्या हाती सत्ता द्यायच्या गोष्टी बोलणं न् बोल्शेव्हिकांना सामील व्हा म्हणून कझाकांना गळ घालणं हे फक्त डॉनवर न् कझाकांवर उलटणारेच करू जाणोत !" थेट पोदत्योलकोववर बोट रोखून तो पुढे वाकला आणि ओरडला, " पोदत्योलकोव, तुम्हाला काय असं म्हणायचंय की, डॉनची माणसं तुमच्यासारख्या धेडगुजरी निरक्षर माणसाच्या मागं येतील? कुणी आलंच तर उनाडटप्पू कझाकांची टोळकीच काय ती येतील ! पण त्यांचीही टाळकी जाग्यावर येतील न् भाऊ देतील तुम्हाला टांगून !"

सूर्याकडं सूर्यफुलाने वळावे तशी जमलेल्यांची डोकी त्याच्याकडे वळली. संमतीदर्शक आरोळ्या उठल्या. शेइन आपल्या जागेवर बसला. खांद्यावर लेफ्टनंट कर्नलच्या फिती लावलेल्या आणि कुडची घातलेल्या एका उंच अंमलदाराने पुढे वाकून त्याची पाठ थोपटली. अंमलदारांनी त्याच्या भोवती घोळका केला. एक बाई उन्मादाने किंचाळली,

" धन्य ! शेइन धन्य !"

" शाबास मेजर शेइन !  शाबश !" त्या कॅप्टनला तिथल्या तिथे बढती देऊन गॅलरीतून नुकताच कंठ फुटलेला एक आवाज केकाटला.

नव्यानंच स्थापन झालेल्या कामेनस्की क्रांतिकारक समितीच्या कक्षाकांची रुजवात पटवण्यासाठी सरकारी वक्ते बराच वेळ बोलत होते. तंबाखूच्या धूराने वातावरण निळे, कोंदून गेलेले झाले. खिडकीपलीकडे दिसणाऱ्या सूर्याची दिनयात्रा संपायला आली होती. गोठलेल्या फिर डहाळ्या बाहेरील तावदानाला लगटल्या होत्या. सायंप्रार्थनेचे सूर, विव्हळत्या वाऱ्यातून स्टेशनावरून येणारी एंजिनाची कर्कश शिटी, हे आवाज खिडकीच्या कट्ट्यावर बसलेल्यांच्या कानी पडत होते.

अखेरीस लागुतिनला ते असह्य झालं. एका वक्त्याला मधेच अडवीत तो कालेदिनकडे वळून म्हणाला, " काय तो विचार ठरवा. हे संपवण्याची वेळ झाल्येय !"

बोगाएव्स्की खवचटपणे कुजबुजला, " एवढं पेटू नका लागुतिन ! थोडं पाणी प्या. बायकामुलं असणाऱ्या न् फेफटं येणाऱ्या माणसानं असं पेटणं धोक्याचं असतं. शिवाय बोलणाऱ्याला अडवणं बरं नव्हे. इथं काही सोव्हिएत नाही !"

लागुतिननेही त्याला कडक उत्तर ऐकवले. पण सगळे डोळे आता कालेदिनकडे लागले होते राजकीय डाव तो पूर्वीसारखाच आत्मविश्वासपूर्वक खेळत होता. पण तरीही पोदत्योलकोवच्या उत्तराच्या बाळबोध कवचापुढे तो नामोहरम होत होता.

" तुमच्या हाती सत्ता सोपवली तर बोल्शेव्हिक डॉनविरुद्धची चढाई थांबवतील असं तुम्ही म्हणालात. पण हे फक्त तुमचं मत झालं. डॉनला पोचल्यावर बोल्शेव्हिक कसे वागतील हे आम्हाला काय ठाऊक ?"

" मी म्हणालो त्याला बोल्शेव्हिक दुजोरा देतील ह्याबद्दल क्रांतिकारक समितीची खात्री आहे. अजमावून पहा. सत्ता आमच्या हाती द्या. स्वयंसेवकांना डॉनबाहेर काढून लावा. न् मग पहा. बोल्शेव्हिक लढाई थांबवतील."

क्षणभरानंतर कालेदिन उभा राहिला. त्याचे भाषण आधीच तयार करून ठेवलेले होते. लिखाया ह्या शेजारील स्टेशनावर चाल करून जाण्यासाठी फौजांची जमवाजमव करण्याचा हुकूम त्याने चेर्नेत्सोवला आधीच दिला होता. पण ते वेळ काढू बघत होते. चालढकलीची सूचना मांडून त्यांनी ती परिषद संपवून टाकली.

" क्रांतिकारक समितीच्या सूचनांचा डॉन सरकार विचार करेल आणि उद्या सकाळी दहा वाजेपर्यंत लेखी उत्तर देईल."

---

## ११

दुसऱ्या दिवशी सकाळी कझाक सेना सरकारने क्रांतिकारक समितीच्या सदस्यांच्या हाती दिलेले उत्तर पुढील प्रमाणे होते.

'आतामान हुजुरात, कझाक हुजुरात, ४४ वं, २८ वं आणि २९ वे रेजिमेंट, दुसऱ्या राखीव फौजेची १० वी, २७ वी, २३ वी आणि ८ वी पथके, ४३ वे रेजिमेन्ट, १४ वे स्वतंत्र स्क्वाड्रन, ६ व्या, ३२ व्या, २८ व्या, १२ व्या आणि १३ व्या बतारी, २ री पायदळ बटालियन आणि कामेनस्काया स्क्वाड्रन ह्यांच्या वतीने कझाक लष्करी क्रांतिकारक समितीच्या शिष्टमंडळाने ज्या मागण्या पुढे मांडल्या त्यावर डॉन कझाक सेनेच्या कझाक सेना सरकारने चर्चा केली आहे आणि कझाक सेना सरकार येणेकरून असे प्रतिपादन करीत आहे की, हे सरकार ह्या प्रदेशातील तमाम कझाक जनतेचे प्रतिनिधित्व करीत आहे. लोकांनी निवडून दिलेले सरकार असल्याने त्याला नवीन परिषद बोलवण्यात येईपर्यन्त आपल्या सत्तेचा त्याग करण्याचा अधिकार नाही.

डॉन कझाक सेनेच्या कझाक सेना सरकारच्या मते पूर्वीची परिषद विसर्जित करणे आणि दोन्ही प्रांत आणि सेना पथके ह्यांच्या प्रतिनिधींची फेर निवडणूक घेणे आवश्यक आहे. थेट, समसमान आणि गुप्त मतदानपद्धतीच्या आधारे कझाक जनतेकडून नवीन परिषदेची मुक्त निवडणूक होईल (प्रचाराचे संपूर्ण स्वातंत्र्य असेल) आणि ४ फेब्रुअरी १९१८ रोजी नोवोचेरकास्क इथे नवीन परिषदेची सभा समग्र बिनकझाक जनतेच्या अधिवेशनाच्या वेळीच भरेल.

क्रांतीने पुन:स्थापना केलेल्या आणि ह्या प्रदेशातील कझाक जनतेचे प्रतिनिधित्व करणाऱ्या कायदेशीर संस्थेला, म्हणजेच परिषदेलाच कझाक लष्करी सरकार अधिकारपदावरून दूर करण्याचा आणि नवीन सरकार निवडून देण्याचा अधिकार आहे. ह्याच बरोबर ही परिषद लष्करी पथकावर नियंत्रण ठेवण्याच्या आणि सरकारच्या अधिकाराचा बचाव करण्यासाठी स्वयंसेवक पथक असावे किंवा नसावे ह्या प्रश्नावर चर्चा करेल. स्वयंसेवक सेनेची घडण आणि कार्य याबद्दल सध्याच्या संयुक्त सरकारने ह्यापूर्वीच असा निर्णय घेतला आहे की, स्वयंसेवक सेना सरकारी नियंत्रणाखाली असावी आणि त्यांत प्रादेशिक लष्करी समितीने भाग घ्यावा.

कझाक सेना सरकारने ज्यांना अभिकथितपणे पाठवले आहे त्या पोलिसांना खाणीच्या प्रदेशातून काढून घेण्याच्या प्रश्नाबद्दल सरकार असे जाहीर करीत आहे की, ४ फेब्रुअरी रोजी हा प्रश्न परिषदेपुढे ठेवण्यात येईल.

सरकार असे जाहीर करीत आहे की, स्थनिक जीवनाची व्यवस्था ठेवण्यात केवळ स्थानिक जनताच भाग घेऊ शकते. त्यामुळे परिषदेच्या इच्छेनुसार सरकारला हे आवश्यक वाटते की, ह्या प्रदेशावर आपली जीवनप्रणाली जुलूम जबरदस्तीने लादण्याची इच्छा करणाऱ्या सशस्त्र बोल्शेव्हिक तुकड्यांच्या ह्या प्रदेशातील शिरकावाला हरसाधनाने विरोध केला पाहिजे.

यादवी युद्धाची सरकारची इच्छा नाही. आणि प्रत्येक पावलाला शांततापूर्ण सोडवणूक करण्यासाठी सरकार धडपडत आहे. ह्या कारणाने सरकार अशी सूचना करीत आहे की, बोल्शेव्हिक फौजाकडे पाठवण्यात येणाऱ्या संयुक्त शिष्ठमंडळात लष्करी क्रांतिकारक समितीनेही भाग घ्यावा

सरकारची धारणा आहे की, ह्या प्रदेशात परकी फौजांना प्रवेश करू दिला नाही तर यादवी युद्ध होणार नाही. कारण सरकार केवळ डॉन प्रदेशाचा बचाव करीत आहे. ते कोणतीही चढाईची कृती करीत नाही. शेष रशियावर आपली इच्छा लादण्याची त्याची इच्छा नाही आणि तदनुसार सरकारची अशी इच्छा आहे की, कोणत्याही परकी संस्थेने आपली इच्छा डॉनवर लादू नये.

प्रांतातून आणि सेनापथकातून निवडणूकीच्या संपूर्ण स्वातंत्र्याची सरकार हमी देईल. कझाक सेना परिषदेच्या निवडणुकीत प्रत्येक नागरिकाला आपल्या इच्छेनुसार प्रचार करता येईल आणि स्वत:चा दृष्टीकोण मांडता येईल.

सर्व 'डिव्हिजन्स' मधील कझाकांच्या गरजांची चौकशी करण्यासाठी निरनिराळ्या पथकांचे प्रतिनिधित्व करणारे आयोग नेमलेच पाहिजेत.

लष्करी क्रांतिकारक समितीकडे ज्यांनी प्रतिनिधी पाठवले आहेत त्या सर्व पथकांनी डॉन प्रदेशाचा बचाव करण्याची आपली नेहमीची कामगिरी बजावणे परत सुरू करावे. असा आदेश डॉन कझाक सेनेचे कझाक लष्करी सरकार सर्व पथकांना देत आहे.

आपल्या स्वतःच्याच पथकांनी सरकारविरुध्द वर्तन करावं आणि अशा प्रकारे शांत डॉनवर अन्योन्य संहारक कलह भडकवावा ही कल्पनाच डॉन कझाक सेनेच्या कझाक सेना सरकारला अतर्क्य वाटते ज्यांनी तिला निवडून दिले त्या पथकांनी ती लष्करी क्रांतिकारक समिती विसर्जित करून टाकावी आणि तिच्या जागी सर्व पथकांनी आपले प्रतिनिधी सध्याच्या ह्या प्रदेशातील सर्व लष्करी पथकांचं प्रतिनिधित्व करणाऱ्या प्रादेशिक लष्करी समितीवर पाठवावेत.

कझाक सेना सरकार अशी मागणी करीत आहे की, लष्करी क्रांतिकारक समितीने अटक केलेल्या सर्व व्यक्तींची सुटका करण्यात यावी. ह्या प्रदेशात नित्याच्या जीवनाचे पुनर्वसन व्हावे म्हणून प्रशासकाला आपले काम परत सुरू करण्याची मुभा मिळाली पाहिजे.

कझाक पथकांच्या अगदी किरकोळ संख्येचे प्रतिनिधित्व लष्करी क्रांतिकारक समिती करीत असल्याने सर्व पथकांच्या वतीने मागण्या करण्याचा तिला काहीही हक्क नाही आणि सर्व कझाकांच्या वतीने तर नाहीच नाही.

ह्या समितीचे जनता कमिसार परिषदेशी संबंध असावेत आणि परिषदेकडून तिला आर्थिक सहाय्य मिळावू ही गोष्ट निखालस अक्षम्य आहे असे कझाक सेना सरकारला वाटते.

कारण युक्रेन, सैबेरिया, कॉकेशस आणि आणि निरपवाद सर्व कझाक सैन्याने सोव्हिएटांचा अधिकार अस्वीकारणीय असल्याचे मान्य केले असता अशाने जनता कामिसार परिषदेचा प्रभाव डॉन प्रदेशात बोकाळेल.

मि. बोगाएवस्की – अध्यक्ष
कझाक सेना सरकार
कझाक सेनेचे उप आतामन

यालेंत्सेव, पल्याकोव, मेलनिकोव — डॉन कझाक सेनेचे सेनानी



डॉन शांत वाहतच आहे

सोव्हिएत सत्तेच्या प्रतिनिधीबरोबर वाटाघाटी करण्यासाठी डॉन सरकारने तागानरोगल पाठविलेल्या शिष्टमंडळात कामेनस्काया क्रांतिकारक समितीचे लागुतिन आणि स्काचकोव सामील झाले. पोदत्योलकोव आणि ह्या समितीचे इतर सभासद ह्यांना नोवोचेरकास्क इथे तात्पुरता अटकाव करुन ठेवण्यात आले. काही शेकडा बागनटे, अवजड बतारी आणि दोन हलक्या तोफा रेल्वेच्या डब्यात चढवून चेर्नेत्सोवच्या हाताखालील कालेदिनच्या सेनेने इवेरेवो आणि लिखाया स्टेशने चपळाई करुन ताब्यात घेतली. तिथे छोटा बंदोबस्ताचा फौजफाटा ठेवून त्यांनी कामेनस्कायाच्या दिशेने कूच चालू केले. उत्तर दोनेत्स्कच्या रेल्वे स्टेशनाजवळ क्रांतिकारक कझाक रेजिमेंटचा प्रतिकार मोडून काढून जानेवारीच्या १७ तारखेला त्यांनी तो प्रांत काबीज केला. परंतु कामेनस्काया काबीज करून काही तास लोटतात न लोटतात तोच अशी बातमी येऊन थडकली की, लालसेनेने इवेरेके आणि लिखायातून बंदोबस्ताचा फौजफाटा हुसकावून लावला आहे चेर्नेत्सोवने आपल्या फौजांचा मोहरा झपाट्याने उलट वळवला. चपळाईचा तोंडावरील हल्ला चढवून त्याने ३ री मॉस्को तुकडी नेस्तनाबूत केली खारकोव तुकडीला जाम झोडपून काढले आणि 'रेड गार्डस्' ना परत त्यांच्या मूळच्या जागेपर्यन्त पिटाळून लावले.

लिखाया दिशेकडील परिस्थितीची परत घडी बसवून चेर्नेत्सोवने परत माराचा पवित्रा घेतला अणि तो कामेनस्कायाला परतला. जानेवारीच्या १९तारखेला त्याला नोवोचेरकास्कहून कुमक मिळाली. दुसऱ्या दिवशी त्याने ग्लुबोकायावर चाल करून जाण्याचे ठरवले.

युध्द परिषदेत असे ठरविण्यात आले की, पल्लेदार कमरग्यांची चाल करून ग्लुबोकाया सर करण्यात यावे. कामेनस्काया क्रांतिकारक समिती आणि चेर्तकोवहून धाडण्यात आलेली रेडगार्डची कुमक ह्यांच्या जबर प्रतिकाराला तोंड द्यावे लागेल ह्या भीतीने रेल्वेच्या बाजूने आगेकूच करायला चेर्नेत्सोव कचरत होता.

त्या रात्री कमरग्याची चाल सुरू झाली. चेर्नेत्सोवने जातीने तिचे नेतृत्व केले.

पहाटेपूर्वी ते ग्लुबोकायाला पोचले. पहाडींनी शिताफीने सफेबंदी बदलून त्या एककतार पसरल्या. चेर्नेत्सोवने आपले शेवटीचे हुकूम सोडले. तो पायउतार झाला. अवघडलेले पाय मोकळे करता करता त्याने घोगऱ्या आवाजात त्यातील एक कंपनीच्या कमांडरला फर्मावले,

"फार घोळ नाही घालायचा कॅप्टन. समजलं ?"

कडक बर्फावर त्याचे बूट करकरत होते. लाल पडलेला कान चोळण्यासाठी त्याने आपली कबरी आस्त्राखान टोपी एकीकडे कलती केली. तेजाने चकाकणाऱ्या त्याच्या डोळ्याखाली गर्द निळी वर्तुळे होती. थंडीने त्याने ओठ घट्ट मिटून घेतले होते. त्याच्या बारीक कापलेल्या मिशा गोठलेल्या हिमाने विसविशीत झाल्या होत्या.

अंगात ऊब आणल्यावर त्याने उडी मारून घोड्यावर मांड घेतली. आपल्या अंमलदारी कुडतीच्या घड्या ठाकठीक केल्या. खंबीर आत्मप्रत्ययाने स्मित करीत त्याने वेग हाती घेतले आणि आपल्या कस्तानी घोड्याला टाच देत तो म्हणाला, "होऊन जाऊ दे!"

———

## १२

आघाडीवरील कझाकांचे अधिवेशन कामेनस्काऱ्याला भरण्याच्या आधी थोडेच दिवस ग्रिगरीचा मित्र कनिष्ठ कॅप्टन इझवारिन आपल्या रेजिमेंटमधून पळून गेला. आपल्या प्रयाणाच्या आदल्या रात्री तो ग्रिगरीकडे आला आणि आपण काय करायचे ठरवले आहे ह्याबद्दल त्याने संदिग्ध सूचना केली.

"सध्याच्या परिस्थितीत रेजिमेंटमधे चाकरी करणं मला कठीण वाटतंय. बोल्शेव्हिक आणि पूर्वीची राजेशाही ह्यांच्या दरम्यान कझाक हेलकावे घेतायत. कालेंदिनच्या सरकारला टेकू द्यायची कुणाचीच इच्छा नाय कारण नवीन खेळण हातात मिळालेल्या पोरागतच तो वागतोय. उपऱ्यांना बरोबर वठणीवर आणंल असा खंबीर निर्धाराचा माणूस आम्हाला हवाय. पण मला वाटतं ह्या क्षणी तरी आपण कालेदिनलाच टेकू द्यावा नायतर आपला सगळाच डाव मातीत जाईल." थोडावेळ तो गप्प बसला. तेवढ्या वेळात त्याने आपला चुट्टा पेटवला आणि विचारले,

" तू म्हणे लाल धरम पत्करलायस ?"

" जवळ जवळ ! " ग्रिगरीने कबुली दिली.

" मनापासून ? का तुझं त्या गोलुबोवगत आहे ? काही करून कझाकांची वाहवा मिळवायची ? "

"मला वाहवा मिळवायची काय गरज नाय. मी स्वत:च बाहेर पडायची वाट शोधतोय ! "

" तू उगाच भितीवर डोकं आपटून घेतोयस. तुला अजून बाहेर पडायची वाट सापडली नाय ! "

" बघू या !"

" मला भय वाटतं ग्रिगरी, आपण गनिम म्हणून एकमेकाला भेटणार."

" लढाईत माणूस तर मित्रालाही ओळखत नाय !" ग्रिगरीने स्मित करून म्हटले.

आणखी थोडावेळ इझवारिन बोलत बसला नंतर निघून गेला. दुसऱ्या दिवशी पाण्यात पडलेल्या दगडागत तो दिसेनासा झाला.

अधिवेशनाच्या दिवशी व्येशेनस्काय जिल्ह्यातील लवेबेझी खेड्यातील एक तैनाती कझाक ग्रिगरीला भेटायला आला. ग्रिगरी आपले पिस्तुल साफ करून त्याला तेलपाणी करीत होता. हा तैनाती सैनिक पूर्वी लिस्तनिस्तकीच्या रेजिमेंटमधे होता. लिस्तनिस्तकीने ग्रिगरीची बाई पळवल्याचे त्याला ठाऊक होते. त्या माजी अंमलदाराला स्टेशनावर पाहिल्याचे ग्रिगरीला सांगण्यासाठी तो आला होता. अगदी जायला निघेपर्यंत तो त्याबद्दल काही बोलला नाही. जाताना मात्र सहजगत्या सांगावे असे तो म्हणाला,

" ग्रिगरी आज तुझा मित्र दिसलाता स्टेशनात."

" कोण ?"

" लिस्तनिस्तकी, आठवतोय ना ?"

" अलीकडं कधी पाहिलास त्याला?" ग्रिगरीने झटकन विचारले.

" एक तासापूर्वी !"

ग्रिगरी खाली बसला जुन्या वेदनेने त्याच्या काळजाला लांडग्याची मिठी घातली. आपल्या वैऱ्याबद्दल त्याला पूर्वीसारखी जळजळीत संतापाची भावना वाटत नव्हती पण यादवी युद्धाला तोंड लागत असता आता ते भेटले तर त्यांच्यात रक्तपात होईल हे त्याला ठाऊक होते. लिस्तनिस्तकीबद्दल ती अनपेक्षित बातमी ऐकून त्याला ही जाणीव झाली की ती अद्याप जुनी जखम भरून आलेली नाही. ती बाहू लागायला केवळ स्पर्शमात्र पुरेसा होता. लिस्तनितस्कीने त्याच्यावर कटू अन्याय केला होता. एकेकाळी त्याच्या अंगवळणी पडलेला रसरसलेला आनंद जाऊन त्या जागी विषण्ण, अतृप्त तळमळ आली होती. आपल्या जीवनाचे असे चिपाड केल्याबद्दल लिस्तनिस्तकीचा सूड उगवणे ग्रिगरीला गोड वाटले असते.

तो थोडा वेळ गप्प होता. तापलेली कानशिले निवताहेत हे जाणवल्यावर त्याने विचारले,

" तो इथं येणाराय ? तुला ठाऊकाय ?"

" मला नाय वाटत येईलसं. बहुधा नोवोचेरकास्कला निघाला असावा."

" अस्सं."

नंतर तो तैनाती सैनिक अधिवेशनाबद्दल काहीतरी बोलला. रेजिमेंटची ताजी बातमी त्याने ऐकवली आणि तो निघून गेला.

त्यानंतर लोटलेल्या दिवसात ग्रिगरीने कितीही प्रयत्न केला तरी त्याला अंतर्यामीची वेदना काही दाबून टाकता आली नाही. तो सुन्नपणे वावरत होता, आक्सिनियाची सय वारंवार येत होती. त्यानं त्याचे तोंड कडवट होऊन जायचे. काळजाची शिळा व्हायची. त्याने नतालियाचा आणि मुलांचा विचार केला. पण वयाने त्यातील आनंद विटून डागाळून गेला होता. त्याच्या अंतःकरणात आक्सिनिया होती. तिच्यासाठी तीच दुःसह जबरदस्त तळमळ त्याला लागून राहिली होती.

चेर्नेत्सोवने हल्ला चढवला तेव्हा क्रांतिकारक सैन्याला घाईगडबडीने कामेन्स्काया खाली करावे लागले. कझाकांच्या रोडावलेल्या स्क्वाड्रन्सनी कशीतरी गाडीत दाटी केली होती. सहजासहजी हाती घेऊन येण्यासारखे नव्हते ते त्यांनी तसेच मागे सोडून दिले होते. त्यांच्यात संघटनेचा अभाव होता. वस्तुतः ते चांगलेच सेनादल होते. पण त्यांना एकत्रित करुन नीट व्यवस्था लावील अशा निर्धाराच्या सेनानीचा अभाव होता. हे सगळे चांगलेच जाणवत होते. त्या काळात गोलुबोव नावाचा मेजर कुठून तरी उपटल्यासारखा आला होता. निवडून दिलेल्या सेनानीत त्याचा हात धरणारा कुणी नव्हता. २७ व्या लढाऊ कझाक रेजिमेंटचा अधिकार हाती घेऊन त्याने तात्काळ निष्ठूरपणे परत घडी बसवली. कझाक अनन्यभावाने त्याची आज्ञा पाळीत. रेजिमेंटकडे ज्याची वाण होती ते गुण त्यांच्यात आहेत ही त्यांना जाणीव होती. रेजिमेंट एका पथकाच्या मुशीत ओतण्याचे, त्यांना कामे वाटून देण्याचे आणि अधिकार हाती घेण्याचे कर्तृत्व त्याच्याजवळ होते. गाव खाली करायच्या वेळी लठ्ठ, गोबऱ्या गालांचा, उर्मट चेहऱ्याचा गोलुबोव तलवार फिरवीत होता. वाघिणीत माल चढवायला मंद असणाऱ्या कझाकांवर तो खेकसत होता.

" काय झालंय् तुम्हाला ? काय लपंडाव खेळताय ? तुमच्या आईला साल्यो! चला आटपा! क्रांतीच्या नावानं फर्मावतोय की झटपट हुकूम पाळा—काय? कोण तो आगाव ? गोळी घालीन त्याला. बदमाश ! खामोश ! तुम्ही साथी नाही —घातपाते. . . चोरटे—प्रतिक्रांतिकारक आहात !"

आणि कझाक पाळीतही ते हुकूम. त्याचे गुरकावणे त्यातील अनेकांना आवडे कारण अजून त्यांना गेल्या दिवसांची ओढ होती. त्या काळात सगळ्यात मोठा अडदांड तो कझाकांच्या दृष्टीने नेहमीच सर्वात उत्कृष्ट सेनानी असायचा.

लष्करी क्रांतिकारक समितीच्या तुकड्यांनी ग्लुबोकायाकडे माघार घेतली. जवळ जवळ सर्व अधिकार गोलुबोवकडे आले. विखुरलेले सैन्य त्याने दोन दिवसात एकत्र आणले आणि ग्लुबोकाया लढवण्यासाठी जरूर ती पावले उचलली. त्याच्या हुकुमाने ग्रिगरी मेलिखोवच्या हाताखाली एक तुकडी देण्यात आली. ह्या तुकडीत एका राखीव रेजिमेंटची दोन स्क्वाड्रन्स् आणि हुजुरातीचे एक स्क्वाड्रन होते.

जानेवारीच्या २० तारखेला आपल्या मोर्चे चौक्यांची पाहाणी करण्यासाठी ग्रिगरी निघाला होता. खेड्याच्या वेशीवर त्याला पोदत्योलकोव भेटला. पोदत्योलकोवने त्याला ओळखले.

" तू रे मेलिखोव?"

" हो."

" कुटं रं निघाला? तूच ना रे तो ?"

" पुरं झाली ओळखा ओळखी ! बरेच दिवस झाले चेरकास्कहून येऊन ? कसं कायाय?"

पोदत्योलकोवने कपाळाला आठ्या घातल्या. " लोकांचे हाडवैरी असणाऱ्या माणसांशी जमवून घेणं शक्य नसतं त्यांनी काय डाव केला पाहिलं ? वाटाघाटी करा . . . इकडं स्वत: मात्र चेर्नेत्सोवला फूस देत होते. कालेदिनसारखा सुव्वर नाय. बराय ! मला फारशी सवड नाय. मला ठाण्यावर पोचलं पायजे !"

ग्रिगरीचा निरोप घेऊन तो गडबडीने घोड्यावरून निघून गेला.

क्रांतिकारक समितीचा अध्यक्ष म्हणून निवडून येण्याआधीच ग्रिगरी आणि त्याचे इतर कझाक मित्र ह्यांच्याबाबत त्याची वृत्ती लक्षात यावी अशी बदलून गेली होती. त्याच्या आवाजात वरिष्ठपणा आणि वरचढपणाचा सूर होता. सत्तामदाने तो साधाभोळा कझाक झिंगल्यागत झाला होता.

ग्रिगरीने कोटाची गळपट्टी वर केली आणि तो झपाट्यानं चालत तिथून निघून गेला. रात्री गोठवणी पडणार असे दिसत होते. पूर्वेकडून वाऱ्याच्या मंद झुळुका येत होत्या. आकाश स्वच्छ होते. त्याच्या पायाखाली बर्फ करकरत होता. एकाद्या लंगड्या माणसाने जिना चढावा तसा चंद्र हळूहळू चढत होता घरांच्या

पलीकडे माळरानाला धूसर निळी अंधुकता आली होती. सगळ्या रेषाकृती, सगळे रंग आणि सगळे अंतर जेव्हा पुसून जातात, दिवसाचा प्रकाश रात्रीत जेव्हा अतूटपणे कालवला गेलेला असतो, सगळे वस्तुजात जेव्हा आभासमय आणि ओघळते वाटते —असा तो संध्याप्रहर होता. अशा समयी सुगंधानाही स्वत:च्या जास्तच तरल छटा असतात.

फेरी मारून तो आपल्या निवासस्थानाकडे परतला. त्याचा यजमान एक बेरड चेहऱ्याचा रेल्वेतील कर्मचारी होता. त्यानं चहाच्या बंबात चहाचं आधण ठेवलं आणि तो मेजापाशी बसला.

"तुम्ही हमला चढवणार का?"

"मला माहिती नाय."

"का ते इथं येईस्तो तुम्ही थांबणार?"

"बघू!"

"अगदी योग्यच. तुमच्याजवळ हमला चढवण्यासारखं काही नाही. अन् थांबलेय बरंच सबंध जर्मन युध्दात मी खंदक खोदायच्या कामावर होतो. तेव्हा लढण्याचे डावपेच मला पुरते ठाऊक आहेत. तुमचं सैन्य लहान आहे, नाही का?

"पुरेसाय !" नको असलेलं संभाषण टाळण्याची कोशीश ग्रिगरी करीत होता.

पण मेजाभोवती घोटाळत, जाकीटा आतले आपले सपाट पोट खाजवीत, तो माणूस उत्साहाने प्रश्नांचा भडिमार करीतच होता.

"तोफखाना भरपूर आहे? तोफा गरनळे?"

"फौजेत होतास् न् सैनिकाची चाकरी ठाऊक नाय?" संथ क्रोधाने ग्रिगरीने विचारले. त्याने आपले डोळे अशा हिंस्त्रपणे फिरवले की तो माणूस दचकून मागे झाला.

"आमची फौज किती आहे, आमचा बेत काय आहे, ह्या चौकशा करण्याचा तुझा काय संबंध? तुला गिरफदार करून उलट तपासणी घेतो तुझी . . ?"

"अरे देवा अंमलदारसाहेब! साहेब. . ." त्या माणसाचे तोंड पांढरे फटक पडले आणि चिंतेने तो अगदी गुदमरून गेला. "माझा मूर्खपणा झाला. . . मूर्खपणा. क्षमा करा !"

चहा घेता घेता ग्रिगरीची नजर त्या माणसावर गेली. विजेचा लोळ दिसावा तसे त्याचे डोळे किलकिले झाले होते. त्याने परत डोळे उघडल्यावर त्याची नजर प्रेमळ आणि कौतुकाची होती. त्याची बायको आणि दोन मोठ्या मुली कुजबुजत होत्या. आपला दुसरा कप पुरता न संपवताच ग्रिगरी आपल्या खोलीकडे निघून गेला.

त्याच घरात वस्तीला असलेले दुसऱ्या राखीव रेजिमेंटचे सहा कझाक परत आले आणि चहा प्यायला बसले. ते हंसत – खिदळत मोठमोठ्यानं बोलत होते. ग्रिगरीचा अर्धवट डोळा लागला होता. पण त्यांच्या संभाषणाची तुटक वाक्ये त्याच्या कानावर पडत होती. त्यातला एक लुगानस्की खेड्यातील बाखमाचेव नावाचा कझाक आहे हे त्याच्या आवाजावरून ग्रिगरीने ओळखले. बाकीचे मधून मधून शेरे मारीत होते. त्यातील एकजण त्या दिवशी घडलेला प्रसंग सांगत होता.

" हे घडलं तेव्हा मी तिथंच होतो. अकरा नंबरच्या खाणीतले तीन खाण-कामगार गोरलोवकाहून आले न् म्हणाले की त्यांनी फौज गोळा केल्येय पण त्यांच्याजवळ काही हत्यारं नाहीत. तेव्हा आम्हाला काय देता येतील ती द्या म्हणत होते. न् समितीचा एक मेंबर-मी स्वत: ऐकलं त्याचं बोलणं. . " ऐकून आलेल्या आवाजात विचारलेल्या कोणत्याही प्रश्नाचं उत्तर देण्यासाठी सांगणारानं आवाज चढवला." तो त्यांना सांगतो. – साथीनु, त्या साबकोनला जाऊन विचारा. इथं आमच्याकडं काय नाय! पण आमच्याकडं कांय नाय हे त्याला काय ठाऊक? मला ठाऊकाय, आमच्याकडं बंदुकाचा राखीव साठाय! मुद्दा तो नाय! नांगर-मुठ्यानी ह्यात नाक खुपसण्याचा त्याला मत्सर वाटत होता. . ."

"न् ते बरोबरचाय ! " दुसरा उद्गारला.

"त्याना हत्यार दिलं तर ते लढतील नाय तर नाय लढतील. पण जमिनीचा प्रश्न आला रे आला की त्यानी ती पदरात घातलीच समजा! "

" ती जात आम्ही ओळखून आहोत! " तिसरा गुरगुरला.

बाखमाचेवने विचारात गढून चमचा ग्लासावर वाजवला. तोलून उत्तर देताना तो शब्द मापून बोलत होता. "नाय! असला प्रकार चालायचा नाय! सगळ्या लोकांसाठी बोल्शेव्हिक आपल्याशी तडजोड करतील. पण आपण काय खरे बोल्शेव्हिक नाय. कालेदिनला लाथ घालायची एवढंच आपलं काम. आपण करू सुरु– – – –"

"पण गड्या हे बघ!" एका वरच्या पट्टीच्या आवाजाने खात्रीच्या सुरात म्हटले, "आपल्याकडं खायला तर काय नाय हे मान्य? आपल्या वाटचाची चारेक एकर जमीनच काय ते देते न् बाकीची भाकड. तेव्हा आमी त्यांना काय द्यावं ?"

"तुझ्याकडून ते काय घेणार नैत पण ज्यांच्याजवळ रग्गड जमीनाय असे दुसरे आहेत"

"कझाक सेना जमिनीचं काय?"

"फार फार उपकारायत! आपली जमीन आम्ही द्यायची न् दुसऱ्याच्या दारात काय भीक मागत हिंडायचं? झकासाय कल्पना!"

"सेना जमीन आम्हालाच लागेल!"

"कसं म्हणीतलंस !"

"हाव पुरे झाली !"

"ह्यात कसली हाव ?"

"डॉनच्या वरच्या खोऱ्यातून आपले कझाक हलवण्याची कल्पना कुणाला तरी सुचल. तिथं कायाय दगड !"

"खराय !"

"ह्या गोष्टी ठरवायचं काम आपलं नाय !"

"व्होडक्याशिवाय जमायचं नाय !"

"पोरांनु, त्या दिवशी दारुच्या दुकानात ते घुसले. एक गडी दारुच्या पिंपात बुडून मेला"

"मिळाली तर गपकन घेतली असती ! अंगात ऊब आलीस्ती !"

ग्रिगरीचा डोळा लागत होता. कझाक रात्रीसाठी जमिनीवर आडवे होत असल्याचं त्याला ऐकू आलं. जमिनीबद्दल आणि तिची वाटणी कशी करावी ह्याबद्दल अजून ते वाद घालीत होते.

खिडकीच्या अगदी बाहेरच झालेल्या गोळीच्या बारानं, उजाडता त्यांना जाग आली. कझाक उठले. ग्रिगरीने आपली चपकन चढवली. धांदलीत त्याचा हात बाहीत नीट जाईना. त्याने लांब कोट घातला, बूट घातले आणि तो धावला. बाहेर रस्त्यावर बार कडाडत होते. एक गाडी तिथून धडधडत गेली. दाराबाहेर कुणी तरी भेदरून किंचाळला, "हत्यारं घ्या . . . ! हत्यारं घ्या . . . !"

चेरनोत्सीवच्या सैन्याने मोर्चाच्या चौक्या मागे पिटाळून लावल्या होत्या. आणि त्यांचे लोंढे गावात घुसत होते. कबऱ्या धूसर अंधारातून स्वार घोडी फेकीत जात होते. पायदळ रस्त्यातून धावत होतं. त्यांचे बूट खडखडत होते. रस्त्याच्या कोपऱ्यावर मशिनगन लावून ठेवलेली होती. सुमारे तीस कझाकांचा सफा रस्त्यावर उभा करण्यात आला होता. आणखी कझाक धावत येत होते. शिलेखणीत ते काडतुसे चढवीत होते. त्याने खिटचा खटखटत होत्या. पलीकडच्या आवाजात एक खणखणीत आवाज हुकूम देत होता, "तिसरं स्क्वाड्रन! हुशारी पायजे! तो सफ्यातून कोण बाहेर पडलाय? अटेन्–शन! मशिनगनसं! उजवीकडं! तयार? स्क्वाड्रन . . ."

जवळून बतारी गर्जत गेली. घोडी चौखुर उधळत होती. गाडीवाले चाबूक फिरवीत होते. जवळच कुठंतरी एकाएकी मशिनगनचा ताशा सुरू झाला. पलीकडील रस्त्यावर एक फौजी रसोई गाडी उलथून पडली होती. बेफाम उधळताना तिचे एक चाक कुपाटीच्या डांबात अडकले होते. "आंधळा सैतान साला! डोळे फुटले तुझे?" जीवाच्या आकांताने एक भेदरलेला आवाज गरजला.

मुष्किलीने ग्रिगरीने आपल्या स्क्वाड्रनची जमवाजमव केली. आणि ती घेऊन स्टेशनाकडे दौड ठोकली. कझाकांचा दाट ओघ आधीच माघार घेत असलेला त्यांना दिसला.

"कुठं निघाला?" सगळ्यात पुढे असलेल्या एकाची बंदूक पकडून ग्रिगरीने विचारले.

"सोड!" त्या कझाकाने बंदुकीला हिसडा दिला.

"सोड ए डुकरा! तुला काय वाटलं? दिसत नाय आम्ही माघार घेतोय!"

"आम्हाला ते फार भारी आहेत!"

"आता त्यांना कुणी थांबवू शकत नाय!"

"कुठं? कुठं जायचं आपण?" इतरांचे आवाज धपापत किंचाळले.

स्टेशनाच्या टोकाशी एका प्रशस्त कोठाराजवळ ग्रिगरीने आपल्या कंपनीची पल्लेदार फळी उभारण्याचा प्रयत्न केला. पण पळत सुटलेल्या कझाकांची एक नवीन लाट येऊन त्यांना उधळून गेली. ग्रिगरीच्या स्क्वाड्रनचे कझाक त्या घोळक्यात मिसळू लागले. त्यांच्याबरोबर ते रस्त्यावरून धावत सुटले.

" थांब ! पळू नको ! गोळी घालीन !" संतापाने थरथरत ग्रिगरी गरजला.

पण त्यांनी त्याच्याकडे लक्ष दिले नाही.

मशिनगन काडतुसांच्या धुवांधार माराने रस्त्याची चाळण केली होती. क्षणभर कझाक जमिनीवर पालथे पडत. भिंतीजवळून सरपटत जात आणि मग बाजूच्या आड गल्ल्यातून धूम ठोकीत.

" आता तू त्यांना थांबवू शकत नैस मेलिखोव !" त्याच्या अंगावरून धावता धावता त्याच्या डोळयांना डोळे भिडवून बाखमाचेब ओरडला.

दात ओठ खात हातातील बंदुकीला हेलकावे देत ग्रिगरीने त्यांच्याकडे पाहिले.

घबराटीने कझाक बिथरून गेले. त्याची अखेर ग्लुबोकायातून संपूर्ण बेशिस्त माघार घेण्यात झाली. आपली बहुतेक साहित्यसामुग्री मागेच ठेवून ते पळाले. स्क्वाड्रनची परत जुळवाजुळव करून उलट हमला चढवण्यासाठी त्यांना फेक साधायला पहाट उजाडली.

गोलुबोव काळानिळा होऊन घामेजून गेला होता. त्याचे मेन्ढकातडीचे जाकीट सुटले होते. आपल्या २७ व्या रेजिमेन्टमधून धावत खणखणीत आवाजात तो किंचाळत होता,

" जल्दी ! मरणबिरण कुछ नाय ! आगे कदम ! आगे कदम !"

१४ व्या बतारीने मोर्चे बांधले. तोफखान्याचे अरावे सोडण्यात आले. दुर्बिणीतून निरखीत कमांडर करांचीवर खडा झाला.

सहा वाजतां लढाईला तोंड लागले. कझाक आणि वोरोनेझचे 'रेडगार्डस्' ह्यांनी घनदाट जुटीने गर्दी केली. त्यामुळे त्या हिमाच्छादित भूमीवर आकृत्यांचे गर्द झालरकामच होऊन गेले. पूर्वेकडून गोठवणारा वारा वहात होता. वाऱ्याने उधळलेल्या ढगाखालून फुटलेल्या तांबडयाने डॉन रक्तरंगी होऊन गेली. १४ व्या बतारीला संरक्षण देण्यासाठी ग्रिगरीने निम्मे आतामान स्क्वाड्रन पाठवले. बाकी-च्यांना पाठीवर घेऊन तो हमल्यावर निघाला.

पहिला गोळा चेरनेत्सोवच्या सैन्याच्या अगदी पुढयातच फुटला. त्या स्फोटाचा धांदोटया झालेल्या नारिंगी निळा ध्वज उंच उधळला. दुसरा गोळा मारण्यात आला. बंदुकीच्या गोळीबाराने उठाव दिलेला ताणलेला शांततेचा क्षण ! तो गोळा

फुटल्यावर दूरवर उमटलेले त्याचे प्रतिध्वनी! गनिमाच्या आघाडीवर गोळे फुटू लागले. वाऱ्याच्या झोताने डोळे किलकिले करीत ग्रिगरीच्या मनी समाधानाच्या भावनेचा विचार आला—'साधलं टिपण!!"

उजव्या फळीवर ४४ व्या रेजिमेन्टची स्क्वाड्रन्स होती. मध्यावर गोलुबोव आपल्या स्वतःच्या रेजिमेन्टची धुरा सांभाळीत होता. त्याच्या डाव्या अंगाला ग्रिगरी होता. त्याच्या पलीकडे डाव्या फळीचा बचाव करणारी रेडगार्डसची तुकडी होती. ग्रिगरीच्या स्क्वाड्रनला तीन मशिनगन्स देण्यात आल्या होत्या. त्यांचा कमांडर एक ठोसर बांध्याचा, दुर्मुखल्या चेहऱ्याचा, रुंद केसाळ हाताचा 'रेडगार्ड' होता. मशिनगनच्या मारगिरीचे उत्कृष्ट संचालन करून गनिमाचे उलट चढाईचे प्रयत्न त्याने लटके करून टाकले होते. आतामानच्या कझाकांबरोबर आगेकूच करणाऱ्या मशिनगनच्या तो सदैव निकट होता. त्याच्या बाजूला सैनिकाचा लांब कोट घातलेली एक धष्टपुष्ट बाई होती. कझाकांचे सफे ओलांडून पुढे जाताना ग्रिगरीच्या मनात संतापाने विचार आला :

'झगेबाज साले! लढायला येतात. बाईला मागं ठेववंत नाय! बरोबर पोरं बाळं न् पराची गादी तेवढी नाय आणलीन!'

छातीवरचा पिस्तुलाचा पट्टा सारखा करीत मशिनगन तुकडीचा कमांडर ग्रिगरीजवळ आला.

"तुम्ही या तुकडीचे कमांडर का?"

"हो!"

"आतामानच्या अर्ध्या स्क्वाड्रनच्या पुढच्या अंगाला सरबत्ती हाणायला सांगतो. गनिम त्याचं आगेकूच रोखतोय म्हणून!"

"ठिकाय!" ग्रिगरीने संमती दिली. क्षणभर शांत असलेल्या मशिनगनच्य बाजूने आलेली आरोळी ऐकून तो वळला. दाढीवाला मशिनगनर त्वेषाने गरजत होता—

"बुनचुक! तोफ वितळून जाईल! हे असं चालायचं नाय!"

सैनिकाचा लांब कोट घातलेली बाई त्याच्या शेजारी गुडघे टेकून बसली होती. डोक्याला बांधलेल्या रुमालाखालचे तिचे काळेभोर डोळे पेटलेले होते ग्रिगरीला आक्सिनियाची आठवण झाली. क्षणभर श्वास रोखून त्याने आर्तपणे सेकंदभर तिच्याकडे टक टावून पाहिले. मध्यान्हीला गोलुबोवकडून पत्र घेऊन एक

जासूद घोडा फेकीत ग्रिगरीकडे आला. फौजीवहीच्या एका पानावर वेड्यावाकड्या अक्षरात खरडलेले होते :—

"डॉन क्रांतिकारक समितीच्या वतीने मी तुम्हाला आणि तुमच्या दोन स्क्वाड्रन्सना हुकूम देतो की तुम्ही आपल्या जागावरून माघार घ्यावी आणि गनिमाच्या उजव्या फळीला, त्याला शक्य तो कळू न देता वेढा घालावा. धुरेच्या फौजांनी निकाली हमला चढवल्याबरोबर तुम्ही ह्या फळीवर तुटून पडायचे आहे."

गोलुबोव

ग्रिगरीने आपली स्क्वाड्रन्स तात्काळ काढून घेतली. स्क्वाड्रनने घोड्यावर मांड घेतली. एका उथळ दरीतून सुमारे तेरा चौदा मैल अर्धवर्तुळाकृती वाटेने त्यांना ग्रिगरीने नेले. दाट साचलेला बर्फ कुठे कुठे घोड्यांच्या पोटापर्यन्त लागत होता. त्यात घोडी अडखळत अडमडत होती. आगमारीच्या आवाजाकडे कान देऊन ग्रिगरी चिंतेने आपल्या मनगटी घड्याळाकडे बघत होता. रुमेनियात एका मेलेल्या जर्मन अंमलदाराच्या मनगटातून त्याने हा पाडाव जिन्नस मिळविला होता. आपल्याला उशीर होईल अशी त्याला भिती वाटत होती. होकायंत्राच्या सहाय्याने तो त्यांना वाटेची दिशा दाखवीत होता, तरीही जरूरीपेक्षा जास्त डावीकडे तो घसरला होता. एका विस्तिर्ण माळरानावर खुल्या सदरेवर ते बाहेर पडले. घोडी घामाने निथळली होती. मांड्यात भिजली होती. ग्रिगरीने पायउतार होण्याचा हुकूम सोडला आणि सर्वांच्या आधी तो टेकडी चढू लागला. घोडी दरीत सोडून देण्यात आली. बर्फ साचलेली चढण कझाक त्याच्या मागोमाग धडपडत चढू लागले. त्याने मागे वळून बघितले, एकाच स्क्वाड्रनहून जास्त कझाक बर्फात चढणीवर विखुरलेले त्याच्या दृष्टीस पडले. आणि त्याला जास्त ताकद, जास्त आत्मविश्वास वाटू लागला. इतर बहुतेक माणसाप्रमाणे रणधुमाळीत तो कळपाच्या प्रेरणेने जबरदस्त झपाटून जायचा.

एका दृष्टीक्षेपात परिस्थितीचा अंदाज घेऊन त्याने ओळखले की, आपल्याला निदान अर्धा तास तरी उशीर झाला आहे. धडाडीची हिकमती चाल करून गोलुबोवने चेर्ननित्सोवच्या फौजांची पिछाडी जवळ जवळ तोडली होती. दोन्ही फळ्यावर त्याने बगल तुकड्या पाठवल्या, आणि आता आघाडीवर तो दणके देत होता. तापला तवा तडतडावा तसे बंदुकीच्या आगेलीत छर्रे तडतडत होते. घबराट उडालेल्या गनिमाच्या सफ्यांची कुलपी गोळे दाणादाण करीत होते. तोफांचे गोळे बदाबद आदळत होते.

“आगे बढो” ग्रिगरीने गर्जना केली.

आपली तुकडी घेऊन त्याने बगलेवर दणका दिला. कवायतीत चालावे अशी आगेकूच कझाक करीत होते पण चेर्नेत्सोवच्या सव्यसाची गोलंदाजाने त्यांच्यावर असा काही कुशळ वर्षाव केला की त्यातले तिघेजण कोसळल्यावर इतर कझाकांना खाली झोपणेच बरे वाटले.

मध्यान्ह नुकतीच टळली होती एवढ्यात ग्रिगरीच्या गुडघ्याच्या जरा वर गोळी बसली. जळजळीत वेदनेची भावना आणि रक्तस्त्रावाने येणारी मळमळ ह्यामुळे ग्रिगरीने दातावर दात रगडले. तो सपथातून सरपटत बाहेर आला आणि बसलेल्या हादऱ्यामुळे अर्धवट उन्मादात मुंडी हालवीत उडी मारून उभा राहिला. काडतूस बाहेर पडले नसल्याने वेदना जास्तच तीव्र होत्या त्याच्या अंगात शिरण्यापूर्वी ते, त्याचा लांब कोट, पाटलूण, कातडी ह्यांचा भेद करता करता निष्प्रभ झाले होते आणि आता मांसात निवत राहिले होते विदारक वेदनेने कोणतीही हालचाल अशक्य झाली आणि तो परत पालथा पडला.

त्रान्सलिवेनियन पर्वतात १२ व्या रेजिमेन्टने चढवलेल्या हल्ल्यात तो दंडात जखमी झाला होता. ती आठवण त्याच्या मनात तिथे पडल्या पडल्या सुस्पष्टपणे उभी राहिली. उन्युपिन, क्रोधाने पिळवटलेला मिशा कोशेवोईचा चेहरा, आपल्या पाठोपाठ डोंगरावरून जखमी कॅप्टनला फरफटत खाली नेणारा येमेलियान ग्रोशेव . . .

ग्रिगरीच्या हाताखालील ल्युबिशकिन पावेलने स्क्वाड्रनचे अधिकार हाती घेतले आणि ग्रिगरीला घोड्याकडे परत घेऊन जाण्याबद्दल दोन कझाकांना फर्मावले.

त्याला घोड्यावर चढवून त्या कझाकांनी त्याला जखम बांधण्याचा सल्ला सहानुभूतिपूर्वक दिला. ग्रिगरी घोड्यावर आरूढ झाला होता. पण तो खाली घसरला. त्याने पाटलूण काढली अंगावर थंडीने सरसरून काटा आल्याने कपाळाला आठ्या घालीत, ती जळजळीत, सुरीच्या घावाने वाहावी अशी वाहती जखम त्याने घाईघाईने बांधली. त्यानंतर आपल्या अडलीला सोबतीला घेऊन दरीतील तीच चक्राकार वाट त्याने धरली आणि जिथून उलट हमला सुरू झाला होता त्याच ठिकाणी तो परतला. बर्फात उमटलेल्या घोड्याच्या टापांच्या खुणा, दरीतील ती परिचित रुपरेषा इकडे झोपेने पेंगुळलेल्या नजरेने बघता बघता त्याला टेकडीच्या पलीकडे घडलेले प्रसंग दूरवरचे आणि बिनमहत्त्वाचे वाटत होते.

बंदुकीचे कानवाथरे अग्येल चालू होते. गनिमाचा पोक्त तोफखाना धडाडू लागला होता लढाईचा निकाल काय लागतो त्याची अदृश्य ठिपक्यांची ओळ छिद्रांकित करण्यासाठी मधूनच मशिनगनच्या आगमारीचा दुरटा उसळत होता.

त्या दरीतून ग्रिगरी सुमारे दोन मैल गेला. घोडी थकावटीने अडत होती.

"मैदानाकडं चल . . . !" आपल्या अडलीवर ग्रिगरी गुरगुरला. स्वतःचा घोडा त्याने दरीच्या बर्फाच्छादित चढावावर वळवला.

स्तब्ध बसलेल्या कावळचागत दूर अंतरावर त्यांना मुडद्यांच्या विखुरलेल्या आकृत्या पडलेल्या दिसत होत्या क्षितिजाच्या काठावर एक चिमुकला स्वारविहिन घोडा उधळला होता. ग्रिगरीने पाहिले की गनिमाच्या नगर फौजेचा धुव्वा उडाला होता. तो रोडावून लढाईतून उतरून ग्लुबोकायाकडे माघार घेत होती. आपल्या सारगी घोड्याला त्याने टाच मारली. थोड्या अंतरावर कझाकांचे काही विखुरलेले घोळके होते. त्यापैकी एकाच्या अगदी जवळ जाता ग्रिगरीने गोलुबोवला ओळखले. तो कमांडर जीनात रेलून बसला होता. त्याचे मेंढकातडी जाकीट सताड उघडे पडले होते. लोकरीची टोपी डोक्यावरून मागे सरकली होती. कपाळ घामाने भिजून गेले होते. आपल्या 'सार्जंटमेजरी' मिशांना पीळ भरीत तो घरघरीत आवाजात ओरडला :

"मेलिखोव, शाबास ! अरे ! तू काय जखमी झालायस ! तिच्या आयला ! हाड धडाय का ?" उत्तराची वाट न पाहता त्याच्या तोंडावर हसू फुटले. "त्यांच्या ठिकऱ्या उडवल्या, ठिकऱ्या ! अंमलदाराची तुकडी ऐशी लोळवल्येय की परत काय उभे ऱ्हात नैत !"

ग्रिगरीने चुट्टा मागितला. माळरानावरून कझाक आणि रेडगार्डस्चा ओघ वहात होता. दूरवरच्या दाट गर्दीतून एक कझाक घोडा फेकीत आला. "चाळीस जण कैद केले गोलुबोव !" अजून थोडा दूर असतानाच तो ओरडला, "चाळीस अंमलदार आणि चेरनेत्सोव सुद्धा !"

"थापा मारतोयस !" गोलुबोवने चितेने जीनातून आपला मोहरा फिरवला आणि आपल्या हलायकी घोड्यावर निर्दयपणे चाबूक चालवीत कैदी पाहण्यासाठी त्याने दौड मारली.

क्षणभर ग्रिगरी थांबला आणि मग दुडक्या चालीने त्याच्या पाठोपाठ त्याने घोडा काढला.

कैद केलेल्या अंमलदारांच्या घोळक्याबरोबर बंदोबस्तासाठी ४४ व्या आणि २७ व्या रेजिमेंटचे तीस कझाक होते. सगळ्यांच्या पुढे चेर्नेत्सोव चालला होता.

निसटून जाण्याच्या धडपडीत त्यानें मेन्ढकातडी कोट टाकून दिला होता आणि त्याच्या अंगात फक्त हलके कातडी जरकीन होते. त्याचा माकुल डाव्या खांद्यावर फाटला होता. डाव्या डोळ्यावरील ताज्या ओरखड्यातून रक्त येत होते. तो झपाट्याने आणि ठामपणे चालत होता. त्याची मेन्ढकातडी टोपी बाजूला कलली होती. त्यामुळे तो बेफिकीर न् अक्कडबाज वाटत होता. गुलाबी गालाच्या त्याच्या मुखावर भयाचा लवलेशही नव्हता. बरेच दिवस त्याने दाढी न केल्याचे दिसतच होते कारण सफेद केसांच्या खुंटांनी त्याच्या गाला-हनुवटीला मुलामा दिला होता. आपल्या दिशेने धावत येणाऱ्या कझाकाकडे त्याने कडक, चपळ नजर फेकली आणि विलक्षण तिटकाऱ्याने त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या. त्याने काडी उजळली आणि घट्ट ओठांच्या कोपऱ्यात धरलेला चुट्टा शिलगावला.

बहुतेक अंमलदार तरुण होते. फक्त एक दोघांचे केस पिकलेले होते. पायात जखमी झालेला एकजण मागे रेंगाळला होता. माताचे वण असलेला एक ठेंगणा कझाक बंदुकीच्या दस्त्याने ठोसून त्याला पुढे हाकलीत होता. चेर्नेत्सोवच्या अगदी बाजूलाच एक उंच धडाडीचा कॅप्टन चालला होता. आणखी दोघेजण हातात हात अडकवून हसत हसत चालले होते. त्यांच्या मागोमाग एक बोडका कुरळ्या केसांचा कॅडेट चालला होता. दुसऱ्या एका अंमलदाराने गडबडीने सैनिकाचा लांब कोट खांद्यावरून घेतला होता तर आणखी एकजण जो बिनटोपीचा होता त्याने आपल्या काळ्याभोर सुंदर बायकी डोक्यावर अंमलदाराची लाल फर्गोल फणाटोपी ओढून घेतली होती.

गोलुबोवने आपला घोडा त्यांच्या मागोमाग चालवला होता. तो थांबला आणि कझाक बंदोबस्ताला ओरडून म्हणाला,

"ऐका रे ! लष्करी क्रांतिकारक वक्ताच्या सक्त खबरदारीनं ह्या कैद्यांची जिम्मेदारी तुमचीय् ! सदर–ठाण्यावर ते सहिसलामत पोचतील्स बघा !"

त्याने एक चिठ्ठी खरडली आणि एका कझाक राउताला हाकारून ती चिठ्ठी पोदत्योलकोवकडे पोचवण्याचा हुकूम दिला. नंतर ग्रिगरीकडे वळून त्याने विचारले, "तू तिकडंच जातोयस रे मेलिखोव ?"

होकारार्थी उत्तर मिळाल्यावर गोलुबोवने आपला घोडा ग्रिगरीजवळ आणून म्हटले, "पोदत्योलकोवला म्हणावं की, चेर्नेत्सोवची जिम्मेदारी माझ्याकडय्. कळलं ? ठीकाय ! चल नीघ !"

कैद्यांच्या घोळक्याला ग्रिगरीने मागे टाकले आणि त्याने क्रांतिकारक समितीच्या ठाण्याकडं दौड मारली. एका लहान खेड्याजवळच हे ठाणे थाटलेले होते. एक मशिनगन गाड्याच्या जवळ पोदत्योलकोव येरझारे मारीत असलेला त्याला दिसला. त्याच्या अवतीभोवती ठाण्याचे अंमलदार, हारकारे आणि अडली होते. पोदत्योलकोव प्रमाणेच मिनाएव नुकताच रणांगणातून परतला होता. गोठलेला पांढरा पाव चघळीत मिनाएव गाडीच्या पंख्यावर बसला होता. ग्रिगरीने पोदत्योलकोवला बाजूला बोलावून घेतले.

“मिनिटाभरात कैदी इकडं येतील.” त्याने कळवले, “गोलुबोवची चिठ्ठी वाचलीस?”

अकांडतांडवाने पोदत्योलकोवने चाबूक फिरवला, आपले खोल गेलेले डोळे जमिनीवर रोखले. लालबुंद होऊन तो कडाडला,

“उडत गेला गोलुबोव! इलुसंच मागतोय जसा काय! तो काय चेर्नेत्सोवचा ताबा घेणाराय? आ? त्या प्रतिक्रांतिकारक लुटारूचा ताबा? अरे जा! सोडणार नाय मी त्याला. त्या एकजात सगळ्यांना गोळ्या घातल्या पायजेत, खतम केलं पायजे!”

“गोलुबोव म्हणाला की, तो त्याची जिम्मेदारी घेईल!”

“मी त्याला सोडणार नाय. एकदा सांगितलं तेच पुन्हा सांगतो. ते कायम! क्रांतिकारक कोर्टात त्याच्यावर खटला होईल न् सजा ताबडतोब अंमलात येईल. इतरांना धडा घालून द्यायचाय! समजलास?” जवळ येणाऱ्या कैद्यांना निगूतीने न्याहाळीत तो आता जरा शांतपणे बोलू लागला होता. “किती रक्त सांडायला तो कारणाय ठाऊकाय? समुद्र...! किती खाणकामगारांना त्यानं गोळ्या घातल्या?” परत संतापाने कापरे बोलत त्याने डोळे नाचवले. तो कडाडला “त्याला मी सोडणार नाय!”

“त्यात ओरडायचं काय कारणाय?” ग्रिगरीनेही आवाज चढवला. आपला उन्माद पोदत्योलकोवने जसा काही त्याच्यापर्यंत संक्रमीत केला होता असा तो आतून थरथरत होता. “तुमच्याकडं निवाडा द्यायला खूप जणायत! तिकडे जाऊन बघ स्वता!” त्याच्या नाकपुड्या स्फुरण पावत होत्या. आपल्या पाठीमाग रणांगणाकडे बोट करून तो म्हणाला, “कैद्याचा हिशेब चुकता करायला बघणारे तुझ्यासारखे खुपायत!”

हातात चाबूक घट्ट आवळून पोदत्योलकोव चालता झाला. अंतरावरून तो कडाडला,

"मी होतो तिथं ! ह्या गाडीच्या आड बसून माझी कातडी वाचवीत होतोस समजू नको ! जबान आवर मेलिखोव ! समजलास ? कुणाशी बोलतोयस? तुझं अंमलदारी ढंग सोडून दे ! क्रांतिकारक समिती निवाडा करील. उगाच आपला कुणीतरी . . ."

ग्रिगरीने आपला घोडा त्याच्याकडे वळवला आणि क्षणभर आपल्या जखमेचा विसर पडून त्याने जीन सोडून खाली उडी घेतली. पण जखमेने झोकांड्या जाऊन तो साफ कोसळला. त्याच्या पायातून भळभळा रक्त वाहू लागले. कुणाच्या मदतीविना तो उठला, कसातरी रखडत गाड्यापर्यन्त गेला आणि मागच्या पायरीवर जाऊन आदळला

कैदी तिथे आले. चाऊसदफेदारांनी आपल्या जागा सोडल्या आणि अंमलदाराच्या रखवालीचे स्वार म्हणून काम करणाऱ्या अडली आणि कझाकांच्या घोळक्यात ते मिसळले. त्यांच्या अंगातील रणाची आग अद्याप विझली नव्हती. नुकत्याच झालेल्या लढाईबद्दल एकमेकांना मते सांगताना त्यांचे नेत्र धुंदीने आणि संतापाने चमकत होते.

तुडूंब साचलेल्या बर्फातून शिकस्तीची पावले टाकीत पोदत्योलकोव कैद्यांजवळ गेला. पुढे अद्याप काही अंतरावर असलेल्या चेर्नेत्सोवचे डोळे तुच्छतेने किलकिले झाले होते. स्वच्छ बेगुमान नजरेने तो न्याहाळत होता. आपल्या डाव्या पायावर मागील बाजूस भार देऊन तो निर्विकारपणे उभा होता. कणखर पांढऱ्याशुभ्र दातात त्याने अधरोष्ठ धरला होता. त्वेषाने थरथरत खाली चाकोरलेल्या बर्फाकडे बघत पोदत्योलकोव थेट त्याच्यापाशी आला. त्याने डोळे वर केले आणि चेर्नेत्सोवच्या निर्भय हेटाळणीच्या नजरेला त्याची नजर टकरली. त्यातील द्वेषाच्या भयानक दडपणाने चेर्नेत्सोवची नजर बोथाटून टाकली.

"आम्ही तुला धरला रे डुकरा !" एक पाऊल मागे जात तो गुदमरलेल्या खालच्या आवाजात म्हणाला. तलवारीचा वार झाल्यागत त्याचे गाल कुत्सित स्मिताने आक्रसले.

"कझाकांचा निमकहराम ! बदमाश ! गद्दार !" असे म्हणून चेर्नेत्सोव दातांच्या फटीतून पचकन थुंकला.

जसे काही प्रहार चुकवावेत अशी पोदत्योलकोव मुंडी हलवीत होता. त्याचे मूख झाकोळून गेले. त्याच्या उघडलेल्या तोंडातून त्याला धाप लागली.

त्यानंतर जे घडले ते अजब झपाट्याने घडले. चेर्नेत्सोवचे दात विचकलेले होते. चेहरा विवर्ण झाला होता. मुठी छातीत रोवलेल्या होत्या. त्याचा अवघा देह पुढे झुकला होता. तो ढांगा टाकीत पोदत्योलकोवकडे आला. त्याच्या थरथरत्या ओठातून शिव्यानिशी अबोध शब्द उमटत होते. हलके हलके माघार घेणाऱ्या पोदत्योलकोवच्या तेवढे ते कानी पडले.

" तुझ्यावर वेळ येईल . . समजलास ?" एकाएकी चेर्नेत्सोवने आवाज चढवला. त्यामुळे ते शब्द कैदी, चाऊसदफेदार आणि ठाणेकर अंमलदारांना ऐकू येऊ शकले.

" तुझ्या . . ! " आपल्या समशेरीचा परज चाचपडत पोदत्योलकोव गुदमरून धपापत म्हणाला.

एवढ्यात एकाएकी निःशब्द झाले. पोदत्योलकोवच्या दिशेने झेप घेतलेल्या मिनाएव, क्रित्रोशलिकोव आणि इतर अर्धा डझन जणांच्या पायाखाली बर्फ स्पष्टपणे करकरत होता. पण पोदत्योलकोवने केलेल्या चपळाईला ते पुरे पडले नाहीत. त्याने अवघा मोहरा उजवीकडे वळवला. देहाला झोक दिला, म्यानातून सर्रकन् समशेर उपसली आणि भयानक शक्तिनिशी चेर्नोत्सोवच्या डोईवर घाव घातला.

तो अंमलदार थरथरल्याचे, वार चुकवण्यासाठी त्याने डावे मनगट वर केल्याचे ग्रिगरीने पाहिले. त्याने पाहिले की, कागद टरकवावा अशी ती समशेर ते मनगट फाडून गेली आणि चेर्नेत्सोवच्या मागे केलेल्या डोक्यावर निःशब्दपणे कोसळली. प्रथम ती मेंढकातडी टोपी पडली. नंतर दांडा मोडलेले कणीस पडावे तसा चेर्नोत्सोव हळूहळू खाली आला. त्याचे तोंड वेडेवाकडे पिळवटले. वेदनेने त्याचे डोळे किलकिले झाले. आणि पुढे वीज चमकावी तसे त्याचे कपाळ आठचाळले.

तो अंमलदार पडलेला असताना पोदत्योलकोवने त्याला परत खांडाळला. आणि मग मागे वळून कष्टाने भारावलेल्या चालीने तो चालू लागला. चालता चालता त्याने रक्ताने डागाळलेली आपली समशेर पुसली. गाड्यावर जाऊन आदळत तो चाऊसदफेदाराकडे वळून थकीस्त आवाजात ओरडला,

" कापून काढा त्यांना . . . त्यांच्या आया घातल्या . . . सगळे एकजात का–पू–न काढा ! "

पिसाटासारख्या गोळ्या उडाल्या. ते अंमलदार वळले आणि बेतरतीकीब धडसणीची गर्दी माजवून त्यांनी धूम ठोकली. सुंदर बायकी डोळ्यांचा आणि लाल फणाटोपी घातलेला लेफ्टनंट हात डोक्यामागे बांधून पळत सुटला. एका गोळीने त्याला टिपला. वाटेत येणारा अडथळा पार करण्यासाठी मारावी अशी त्याने उडी मारली. तो जो खाली पडला तो पुन्हा काही उठला नाही. दोन कझाकांनी उंचाड्या कॅप्टनला कापून काढला. त्याने समशेरीची पाती पकडली आणि त्याच्या चिरलेल्या हातातून वाहणारे रक्त त्याच्या बाहीवर सांडत गेले. एकाद्या पोरागत त्याने आरोळी ठोकली. गुडघ्यावर तो पडला, मग पाठीवर झाला. त्याचे डोके बर्फावर घुसळत होते. रक्ताळलेले नेत्र आणि आक्रोशाने विछिन्न झालेले काळे तोंड हेच त्याच्या चेहऱ्याचे रूप होते. नाचणारी पाती त्याच्या मुखावर, तोंडवर कोसळत होती. पण तरी अजूनही वेदनेने आणि भयभीतपणे विरलेल्या आवाजात तो किंचाळत होता. त्यांच्या अंगावर पाय फाकून उभे राहिलेल्या कझाकाने एका गोळीत त्याचा निकाल लावला. कुरळ्या केसांचा कॅडेट त्या कळपातून अगदी निसटलाच होता पण एका आतामानच्या कझाकाने त्याला गाठून खांडाळून टाकला. वाऱ्यावर कोट फरफरा उडणारा एक अंमलदार धावत सुटला होता. ह्याच माणसाने त्याच्या पाठीत गोळी घातली. त्या अंमलदाराने बसकण मारली आणि आपली छाती बोचकारीत बोचकारीत तो मेला. एका पिकल्या केसाच्या कनिष्ठ कॅप्टनला जागच्या जागी ठार करण्यात आले. आयुष्याचा निरोप घेता घेता त्याने पायाने बर्फाला खोलवर भोकसे पाडले. एकाद्या तेज चराऊ घोड्याप्रमाणे तो तंगड्या झाडीत राहिला असता पण एका कझाकाने कीव येऊन त्याच्या वेदना संपवल्या.

ती कत्तल सुरू झाल्याबरोबर ग्रिगरी पाय ओढीत त्या गाड्यापासून निघाला. आपले लालबुंद डोळे पोदत्योलखोववर रोखून झपाट्याने लंगडत तो त्याच्या दिशेने येत होता पण मिनाएवने मागून त्याला कव घातली. त्याचा हात पिरगळला. त्याच्या हातातून पिस्तूल हिसकावून घेत आणि धूसर नजरेने त्याच्या डोळ्यात रोखून बघत धापा टाकीत त्याने प्रश्न केला,

" तुला काय वाटलं होतं रे ?"

---

## १३

उन्हाच्या झळाळीत अणि निरभ्र आकाशाच्या निळाईत दिपवत्या प्रखरतेने ती बर्फाच्छादित टेकडी साखरेसारखी धवळाकार आणि चमकती दिसत होती. टेकडीच्या पायथ्याशी ओलखोवोईरोग गावठाण तुकड्या तुकड्याच्या गोधडीसारखे विखुरले होते. डावीकडे स्वीन्यूरवा नदीचा निळसर प्रवाह वाहत होता. उजवीकडे लहान लहान गावठी आणि जर्मन वस्त्या निळ्या ठिपक्यागत दिसत होत्या. दूर कोपऱ्यात तेरनोवस्कायाचे आकाशी पात्र वाहत होते. गावठ्याच्या उगवतीला पायदंड्यांनी चिरफाळलेली आणखी एक उतरवट टेकडी होती. टेकडीच्या दावणी-वरून तारेच्या खांबाच्या मेठी काशारी खेड्याकडे गेल्या होत्या.

त्या दिवसाचे वायूमान क्वचित असते असे निरभ्र आणि गोठवणीचे होते. सूर्याभोवतीच्या धूपस्तंभातून इंद्रधनूच्या रंगच्छटा धूपावत होत्या. उत्तरेकडून वाहणारा वारा माळरानावरचा बर्फ उधळून देत होता. पण ते बर्फाच्छादित माळरान क्षितिजापर्यन्त निरभ्र होते. मात्र पूर्वेला माळरानाच्या ऐन क्षितिजधारेवर नाफरमानी धूसरता रेंगाळली होती.

ग्रिगरीला घरी घेऊन येण्यासाठी पंतिलेय प्रोकोफिएविच मिलेरोवोला आला होता. त्याने असे ठरवले की, ओलकोव्होय खेड्यात थांबायचे नाही, तर सरळ काशाराला जायचे आणि रात्रीचा मुक्काम तिथे करावयाचा. ग्रिगरीकडून आलेल्या तारेप्रमाणे तो तातारस्कीहून निघाला, आणि २८ जानेवारीला मिलेरोव्होला पोचला. एका खाणावळीच्या आवाडात ग्रिगरी त्याची वाट पहात होता. पहाटेलाच त्यानी प्रस्थान ठेवले, आणि जवळ जवळ ११ वाजता ओलकोव्हिरोय मधून ते

चालले होते. ग्लुबोकाया इथे जखमी झाल्यानंतर फौजी इस्पितळाच्या गाडीतून एक आठवडा प्रवास करून ग्रिगरी मिलेरोव्हाला येऊन पोचला. त्याचा पाय थोडा बरा झाल्यावर त्याने घरी जाण्याचे ठरवले. असमाधान आणि आनंद ह्या सरमिसळ भावनेने तो निघाला होता. असमाधान अशासाठी की, डॉनमधील सत्तेचा लढा ऐन भरात असताना त्याने रेजिमेंट सोडून दिले होते. आणि आनंद ह्या विचाराने की आपली माणसे परत आपल्या दृष्टीला पडतील. अक्सिनियाला भेटण्याची इच्छा तो स्वतःच्याच मनापासून लपवीत होता, पण तिचा विचार न करणे त्याला शक्य नव्हते. आपल्या बापाबरोबर त्याच्या झालेल्या भेटीत एक परकेपणाची भावना होती. पान्तेली ( पेत्रो त्याच्या कानात काहीतरी कुजबुजत होता. ) तन्द्रीत असल्यासारखे ग्रिगरीकडे रोखून बघत होता. त्याच्या डोळ्यात असंतुष्टता आणि आशाळभूत चिंता रेंगाळत होती. डॉन प्रदेशात घडत असलेल्या घटनेबद्दल त्याने ग्रिगरीला विस्ताराने प्रश्न केले. आपल्या पोराच्या उत्तराने त्याचे काही समाधान झाल्याचे दिसले नाही. आपल्या पिकू लागलेल्या दाढीचे केस चघळत आपल्या नमदी बुटाकडे रोखून बघत नाकपुड्या फुलवून तो तिरस्कार व्यक्त करीत होता. वाद घालायला प्रथम तो नाराज होता. पण कालेदिनची कड घेऊन बोलताना तो भडकला. आणि पूर्वीप्रमाणे त्याने ग्रिगरीला चूप बसायला सांगितले. एवढेच नव्हे तर आपला लंगडा पाय जमिनीवर आपटला.

" मला सांगायला बघू नकोस. पतझडीच्या मोसमात कालेदिन तातरस्कीला आला होता. चौकात आमची सभा झाली. आणि टेबलावर चढून तो म्हाताऱ्या माणसांशी बोलला. पवित्र ग्रंथातल्यासारखं त्यानं भाकित वर्तवलं की, नांगरमुठे येतील आणि लढाई होईल. आपण काय करायचं ह्याबद्दल आपला मनाचा निश्चय नाय झाला तर आपल्याकडचं सगळं ते काढून घेतील न् आपल्या जमिनीवर रहायला लागतील. तेव्हा सुध्दा त्याना कळलंतं की लढाई होणाराय. अन् तुम्हाला रांडेच्यांना काय वाटतं रे ! तुम्हा लोकापेक्षा त्याला काय कमी अक्कलाय ? सैन्याचं पुढारीपण केलेला असा शिकलासवरलेला सेनानी ! तुम्हाला काय वाटतं त्याला तुमच्यापेक्षा कमी अक्कलाय ? कामेनस्कायातली माणसं तुझ्यासारखीच अनाडी न् गप्पीष्टायत ! तुझा तो पोद्त्योलकोव ... ! कोणाय तो ? सार्जन्ट मेजर ? ओहो ! माझ्याच दर्जाचा माणूस. ह्या थराला गेलोय आपण ! "

ग्रिगरीनं अनिच्छेनं वाद केला. आपला बाप कोणत्या दृष्टीनं पाहणार हे त्याने आधीच जाणले होते. आणि आता त्याच्या दृष्टीने एकूण परिस्थितीत एका नवीनच गोष्टीचा प्रादुर्भाव झाला होता. कोणत्याही खटल्याचौकशीविना चेरनेत्सो-

वचे मरण आणि कैद केलेल्या अंमलदारांची कत्तल ह्यांना आपण माफ करु शकलो नाही हें तो विसरू शकत नव्हता.

ती छपरी घसरगाडी दोन घोडे सहज ओढीत होते. जिनबंदी केलेला ग्रिगरीचा घोडा गाडीच्या मागे जुंपला होता. काशारी, ओपोका, कामेनका, निझने, याब्लोनस्की, ग्राचेव, यासेनौका ही सुप्रसिध्द गावठी आणि वस्त्या रस्त्याच्या वाटेवर प्रकट होत होत्या. आपल्या स्वतःच्या खेडयाकडे जाताना सगळया वाटभर ग्रिगरीच्या मनात नुकत्याच घडलेल्या प्रसंगाबद्दल असंबध्द आणि उनाड विचार येत होते. आणि भविष्यकाळातील कोणत्या तरी वाटखुणा निदान हेराव्या म्हणून तो प्रयत्न करीत होता. पण घरी विश्रांती घेणं ह्या पलीकडे त्याच्या मनाला काही दिसू शकत नव्हतं.

" घरी गेलो की, थोडीशी विश्रांती घेईन. माझी जखम बरी होऊन देईन आणि त्यानंतर . . . " मनातच तो खांदे झटकायचा. " बघू या ! वेळ आली की दिसेलच."

युध्दाने येणाऱ्या श्रांतपणाने तो मरगळून गेला होता. त्या सगळया द्वेषभरीत आणि अगम्य जगाकडे पाठ फिरवावी असे त्याला वाटत होते. त्या पाठीमागचे सगळे गुंता झालेले, एकमेकांना छेद देणारे होते. अचूक मार्ग सापडणे कठीण होते. दलदलीसारखी त्याच्या पायाखालची जमीन घसरत होती. मार्गाला अनेक दिशेनं फांटे फुटले होते. आपण बरोबर तोच मार्ग निवडला ह्याची त्याला खात्री नव्हती. बोल्शेव्हिकाकडे तो ओढला गेला होता. आपल्या पाठोपाठ त्याने इतरांना आणले होते. मग त्याची चलबिचल झाली आणि काळीज थंडावले.

" अखेरीस इझव्हारीनचं बरोबर आहे की काय ! आम्ही विश्वास टाकायचा कुणावर ?" पण आता लवकरच वसंतासाठी कुळव तयार करण्याची वेळ येईल. वळुंजीच्या गव्हाण्या गुंफायला लागतील. आणि जमिनीचा पोत न्यहार झाला आणि शेते चिराळू लागली की, आपण माळरानाकडे गाडी घेऊन जाऊ. श्रमाला आसुसलेले त्याचे हात निर्माणे पकडतील. एकाद्या सजीव प्राण्यासारखे त्याच्या नाडीचे ठोके आणि धक्के त्या हाताला जाणवतील. हे विचार त्याच्या मनात आले. त्याला हे आठवले की कोवळया गवताचा गोडस गंध आणि वळीवाने उफणलेल्या झिलाण वासाच्या मातीचा गंध आपण लवकरच हुंगणार आहोत. तेव्हा त्याच्या मनाला आतून उब आली. गोठे साफ करण्याची, सुडया रचण्याची, मालमंडी, घोडे कुसळ गवत ह्यांचा कोमेजता गंध, शेणखळीतला उग्र वास

हुंगण्याची त्याला ओढ लागून राहिली. त्याला शांतता आणि निवांतता हवी होती. त्यामुळे माळरान, घोडे आपल्या बापाची पाठ ही नेहटताना त्याच्या उग्र डोळ्यात आवरलेला आनंद दिसू लागला. आपल्या बापाच्या कोटाला येणारा मेंढकातडीचा भपकारा, उपलांण्या घोडयांचे घरेलू स्वरुप आणि आवाडातील कोंबडयाचे आरवणे हया साऱ्यांनी त्याला त्याच्या अर्धविस्मृत पूर्वीच्या जीवनाची आठवण करून दिली. येथील हया निवृत्तीतील जीवन समृध्दीनें आणि गोडव्याने धुंद करणारें आहें असे त्याला वाटले.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळ होता होता ते तातारस्कीला येऊन पोचले. टेकडीवरून ग्रिगरीने डॉनकडे न्याहाळून पाहिले. कळकाच्या श्यामल कोंताने महिर-पलेले भाप झिरे तिथे होते. सुकलेले हिवर तिथे होते. परंतु डॉनवरची उतरण पूर्वीसारखी राहिली नव्हती. ते खेडं, शेतांची परिचित वावरे, गिरजाघर, चौक . . . आपल्या स्वतःच्या घरावर दृष्टी खिळताच त्याच्या डोक्यात रक्त उसळून आले. आठवणींच्या आऊरात तो बुडून गेला. आवाडातील फाफाळे आपल्या उंचावलेल्या वळुंजी हातांनी जणू काही त्याला खुणावत होते.

" तुझे डोळे चुरचुरत नाहीत का रे ? " मागे वळून पान्तेलीने हसत विचारले. आपल्या भावना लपविण्याचा प्रयत्न न करता ग्रिगरीने उत्तर दिले, " हां . . . फारच ! "

" घराला केवढा मोठा अर्थ आहे ! " संतुष्टपणे सुस्कारा टाकून पान्तेलोय प्रोकोफिएविच म्हणाला.

खेडयाच्या चौकाकडे त्यानी गाडी चालवली. टेकडीच्या उतारावरून घोडी झपाटयानं पळत होती. एका तव्यावरून दुसऱ्या तव्यावर घसरगाडी घसरत होती. आपल्या बापाचा इरादा ग्रिगरीने जाणला. तरीही त्याने विचारले, "खेडयातून कशाला नेतोयस गाडी ? स्वतःच्या रस्त्याने घे."

पान्तेलेयनं वळून डोळा घातला. दाढीआडून स्मित करीत तो म्हणाला, " साधेसुधे कझाक म्हणून युध्दावर जाताना मी माझ्या पोराना निरोप दिला. मर्दुमकी गाजवून ते अंमलदाराच्या हुद्यापर्यंत चढले. खेडयामधून माझा पोरगा घेऊन जायला मला अभिमान वाटतो. कसं ? लोकांना बघून माझा हेवा करू दे. माझ्या जीवाला तो विरंगुळा आहे, बेटा !

हमसडकेला लागल्यावर त्याने घोडयांना नावाने हाकारले आणि घसरगाडी-तून पुढे वाकून त्यांच्या पुठ्यावर चाबूक ओढला. आपण घराच्या जवळ आलो

आहोतहे ओळखून घोडी अशा हुरुपानं आणि चपळाईनं धावू लागली की, आतापर्यंत धावलेले सुमारे ९०–९५ मैलांचे अंतर जणू त्यांना जाणवतच नव्हते. वाटेने जाणारे कझाक लवत होते. डोळ्यांना हाताचा आडोसा करून आवाडातून बायका त्यांना न्याहाळत होत्या. कोबड्या कलकलाट करीत रस्त्यावर उधळल्या होत्या. सगळे काही घड्याळाच्या काट्यागत चालले होते. त्यांची गाडी चौकातून गेली.

मोकोव्हच्या कुंपणाला बांधलेल्या दुसऱ्या एका खेड्याकडे ग्रिगरीच्या घोड्याने तिरप्या नजरेने पाहिले. आणि मुस्काट उंचावून तो खिकाळला. खेड्याची आखरी आणि अस्ताखोव्हच्या घराची छपरं दृष्टीपथात आली होती. पण पहिल्याच फाट्यावर एक अपघात झाला. धावत धावत रस्ता ओलांडणारे एक डुकराचे पिल्लू बिथरले. घोड्याच्या टापाखाली आले, केकाटले आणि लोळत गेले. केकाटत आपले मोडलेले पाठाण उंचावण्याचा त्याने प्रयत्न केला.

" कुठं तडफडलास ?" पान्तेलियने ओरडून त्या डुकरावर चाबूक ओढला.

दुर्दैवाने आफोनका ओझेरो ह्याची विधवा आन्युतका हिच्या मालकीचे हे डुक्कर होते. ही एक कोपीष्ट आणि तोंडाळ बाई होती. ती आवाडातून धावत आली. तिने शिव्यांचा असा काही वर्षाव केला की, पान्तेलियने आपल्या घोड्यांच्या लगामाला हिसका देऊन थांबवले आणि तो आपल्या बसल्या जागेवरून मागे वळला.

" तोंड आवर ए सटवे !" तो ओरडला. "किंचाळायला काय झालं ? तुझ्या लूत भरल्या डुकराची किंमत भरून देऊ."

" मेल्या चांडाळा . . . . ! चांडाळा ! तुलाच लूत भरली. लंगडा हलकट मेला ! आता तुला आतामनपुढे खेचते !" हातवारे करीत ती किंचाळली. " एका गरीब रंडकीच्या जनावरावर गाडी घालतोस ! तुला धडा शिकवते."

पान्तेलियनं बरंच ऐकून घेतलं. काळानिळा होऊन तो केकाटला, " शिवराळ साली !"

" नतदृष्ट तुर्क मेला !" त्या बाईनं उत्साहानं जबाब दिला.

" कुतरडी ! शंभर सैतान लागले तुझ्या आईला !" पान्तेलियनं आपला आवाज चढवला.

पण अन्युतका ओझेरोवाकडे शिव्यांचा कधीच तुटवडा नव्हता.

" उपरा ! रंडीबाज ! उचल्या ! दंताळी कोण रे चोरतं ? लढाईवर गेलेल्या नवऱ्यांच्या बायकामागे कोण लागतं ?" पोपटासारखी* तिची चर्पटपंजरी चालू होती.

" फोडून काढीन चाबकानी ! कैदाशिण !" म्हाताऱ्यानं उलट टोला दिला.

पण आता अन्युतत्का असे काही भलते सलते किंचाळू लागली की, आपल्या हयातीत बरेच ऐकलेला आणि पाहिलेला पान्तेलीय संकोचाने चूर होऊन गेला आणि त्याला घाम फुटला.

" हाण पुढं ! कशाला थांबलास ?" ग्रिगरी संतापाने म्हणाला. कारण म्हातारा मेलिकोव्ह आणि सचोटीची विधवा ओझेरोव्हा ह्यांच्या दरम्यान अहेरांची जी दैवदुर्मिळ देवघेव चालू होती ती लक्षपूर्वक ऐकण्यासाठी गर्दी जमा होऊ लागली होती.

" काय जीभ आहे ! घोड्याच्या लगामाएवढी लांबली आहे !" पान्तेलिय तिरस्कारानं पचकन् थुंकला आणि जणू काही अन्युतकालाच फटकरावे असे त्याने घोड्यावर चाबूक ओढले.

पुढच्या वळणावर ते पोचले तेव्हा त्याने सावधपणे वळून पाहिले.

" काय शिव्या घालते . . . कैदाशीण ! माजलेल्या कुतरडे, सूज येऊन फुटशील !" उद्वेगाने तो म्हणाला. " तिच्या डुकरागत ती पण चेंगरून मरायला हवी होती ! कुत्तरडी आपल्या जिभेनं दुसऱ्याची कातडी सोलत्ये !"

त्यांच्या घराची निळी झडपे झपाट्याने त्यांच्या दिशेने येत होती. बोडक्या डोक्याच्या आणि पट्टा सोडलेला सदरा घातलेल्या पित्रोने फाटक उघडले. एका पांढऱ्या रुमालाचे ईषत् दर्शन झाले आणि दुन्या पावलाणावरून धावत खाली उतरली. तिचे काळेभोर डोळे चमकत होते.

पेत्रोने आपल्या भावाचा मुका घेतला आणि ग्रिगरीच्या डोळ्यात रोखून पाहिले.

" ठीकैस ?"

" जखमी झालो. "

---

* टीप – मुळात लेखकाने नीलकंठ पक्षाची उपमा दिली आहे.

" कुठं ?"

" ग्लुबोकाया जवळ "

" तिथं कशाला तडफडलास ! केव्हाच घरी निघून यायचं !"

प्रेमाने आणि स्नेहाने त्याने ग्रिगरीचा देह हालवला आणि त्याला दुन्याच्या हाती दिल. आपल्या बहिणीच्या पुष्ट खांद्यांना ग्रिगरीने मिठी मारली. तिच्या ओठांचे, डोळयांचे मुके घेतले आणि आश्चर्याने एक पाऊल मागे जात तो म्हणाला, " अगं दुन्या ! सैतानाला सुध्दा ओळखू यायची नैस तू ! केवढी मोठी बाई झाल्येस ! मला वाटलं अजून तू तशीच साधी अजागळ असशील !"

" असं रे काय भाऊ " त्याचा चिमटा दुन्याने चुकवला आणि ग्रिगरीसारखेच पाढरेशुभ्र हास्य करीत ती पळून गेली.

इलिनिचवा दोन्ही हातावर पोरांना घेऊन बाहेर आली. तिच्या पुढे नतालिया पळत आली. ग्रिगरीची बायको बहरली होती. विलक्षण सुंदर दिसू लागली होती. मऊसूत विंचरून घातलेल्या तिच्या भरदार अंबाड्याखालील मुख आनंदाने उजळले होते. ती ग्रिगरीला चिकटली. त्याच्या गालावरून, मिशावरून आपले ओठ तिने धांदरटपणे घासले. इलिनिचनाच्या हातून आपला पोरगा हिसकावून त्याला नवऱ्यापुढं धरला.

" बघ तरी कसा गोड पोरगाय तुझा !" आनंदाभिमाने ती किंचाळली.

" मला माझं पोर बघू दे !" इलिनिचनाने तिला आवेगाने बाजूला ढकलली. तिने ग्रिगरीचे डोके खाली ओढले, त्याच्या कपाळाचा मुका घेतला. आपल्या खरबरीत हाताने त्याचे तोंड थोपडले. उचंबळलेल्या भावनांनी, आनंदाने तिचे डोळे वहात होते.

" न् तुझी पोरगी ! ग्रिशा ! घे हिला !" नतालियाने पोरीला त्याच्या दुसऱ्या हातावर ठेवली.

नतालिया, त्याची आई, त्याची पोरे ह्यापैकी कुणाकडे बघावे हे त्या अवघडलेल्या अवस्थेत त्याला समजेना. उदास डोळे आणि आठाळलेल्या भुवयांचा तो लहान पोरगा ' मेलिखोव ' मुशीतून ओतलेला होता. किंचित खिन्न डोळयांच्या त्याच लांबट गर्ता, ठसठशीत निळ्या कवड्या, झुपकेदार भुवया आणि श्यामल कातडी. आपली घाणेरडी चिमुकली मूठ त्याने तोंडात कोंबली आणि बापाकडे तो बेगुमानपणे आणि आढ्यतेने रोखून बघत होता. आपल्या पोरीचे फक्त चिमुकले

एकाग्र काळेभोर डोळे तेवढे ग्रिगरीला दिसू शकले. तिचा बाकीचा चेहरा शालीत गुरफटला होता.

दोन्ही हातात त्यांना धरून तो पावलाणाकडे चालू लागला. पण त्याच्य पायातून वेदनेची सणक आली. " ह्यांना घे नतालिया !" तो कसनुसे शरमिंदे हसत म्हणाला. " नाय तर मला पावलाण चढता यायचं नाय !"

केस सारखे करत दार्या सायवानाच्या मधोमध उभी होती. तिने स्मित केले आणि ठुमकत ग्रिगरीकडे आली. आपले हसरे नेत्र तिने मिटले आणि आपले आर्द्र गरम ओठ त्याच्या ओठावर दाबले.

" तुझ्या तोंडाला तंबाखूचा वास येतोय !" तिने खटयाळपणे आपल्या भृकुटीच्या कमानी उंचावल्या.

" परत एकदा तुला बघू दे ! लाडक्या, माझ्या पोरा !"

ग्रिगरीने स्मित केले. आपल्या आईच्या खांद्यावर गाल टेकताच त्याच्या काळजाला काहीतरी टोचले.

डोईवर लाल गोंडयाची टोपी घालून, लाल कमरबंद बांधलेला पान्तेलेय घसरगाडी भोवती लंगडत लंगडत घोडयांचे जू उतरवीत होता. पेत्रोने ग्रिगरीचा घोडा आधीच तबेल्याकडं नेऊन, जीनखोगीर घरात आणले होते. वंगणाचा डबा घसरगाडीतून उचलून आणलेल्या दुन्याशी तो काहीतरी बोलत होता.

ग्रिगरीने आपले मेंढकातडी जाकीट आणि लांबकोट उतरवून ते खाटेच्या पायथ्याशी टांगले. नंतर केसबीस विंचरले, बाकडयावर बसून त्याने आपल्या पोराला हाक मारली.

" माझ्या जवळ ये मिशा ! अरे ! मला ओळखत नैस ?"

त्या पोराची मूठ अजून तशीच तोंडात होती. ते पोर दबकत पुढे आले पण मेजापाशी येऊन ते थांबले. चुलीजवळून त्याच्या आईने त्याच्याकडे वात्सल्याने आणि अभिमानाने न्याहाळून बघितले.

खाली वाकून ती आपल्या मुलीच्या कानात काहीतरी कुजबुजली आणि तिला तिने हळूच पुढे ढकलले. " जा की ! पुढं हो !"

त्या दोघांना ग्रिगरीने जवळ घेतले, आपल्या मांडीवर बसवले आणि विचारले, " मला ओळखत नाय काय रे दगडांनो ? पोल्या, तुझा बाप तुला ओळखत नाय ?"

" तू आमचा बाप नाय !" आपली बहिण आपल्या शेजारी आहे हे पाहून पोरगा जरा धीटपणे म्हणाला.

" मग मी कोणाय ?"

' तू कोणतरी दुसरा कझाकायस !"

" अशी बाताय काय ?" ग्रिगरी मोठ्याने हसला. त्याने विचारले, " मग तुझा बाप कुठाय ?"

" तो तिकडे लांब फौजेताय !" पोरगी ठासून म्हणाली. त्या दोघात ती जास्त चटपटीत होती.

" बरोबराय रे पोरांनू. ऐकवा त्याला ! इतकी वर्ष निघून गेलाता न् आता शेवटी घरी परतला तेव्हा त्याला वाटतंय की सगळ्यांनी आपल्याला ओळखावं !" लटक्या करडेपणानं इलिनिचना मधेच म्हणाली आणि ग्रिगरीकडे बघून हसली. "तुझी बायकोसुध्दा तुला सोडून जाणार होती ! तिच्यासाठी आम्ही पोरगा शोधायलाही लागलोतो !" " काय ग नतालिया ? काय ह्याचा अर्थ ?" ग्रिगरी बायकोकडे वळून म्हणाला.

ती लाजून गेली. पण आपले संकोचलेपण आवरून ती त्याच्याजवळ गेली आणि त्याच्याजवळ बसली. अमर्याद सुखावालेल्या डोळ्यांनी ती त्याला पीत होती. तिचा गरम खरबरीत हात त्याचा रखरखीत पिंगट बाहू थोपटीत होता.

" दाऱ्या, पानं घे !" इलिनिचनाने हाक मारली.

" त्याची स्वताची बायकोय की !" दाऱ्या हसून म्हणाली. आणि ठुमकत्या पावलांनी चुलीकडे वळली.

ती पुर्वीसारखीच सडसडीत आणि ठुमकठाकडी होती. तिचे जांभळफूल पायमोजे तिच्या रेखीव जांघांना तंग बसले होते. जणू तिच्या पायाबरहुकूम बनवल्यागत जोडे पायाला ठिक्क बसले होते. तिचा डाळिंबी रंगाचा चुणीदार झगा फितीने तंग घट्ट आवळला होता. आणि तिचा भरतकाम केलेला ' एप्रन ' म्हणजे निष्कलंक धवलता होती. ग्रिगरीने आपल्या बायकोकड नजर वळवली. ती काहीशी बदलल्याचे त्याला जाणवले. तो घरी यायचा म्हणून तिने नट्टापट्टा केला होता. बाह्याना झालर लावलेला तिचा निळा मखमली ब्लाऊज, मनगटी आवळलेला तिचा सुडौल बांधा दाखवणारा आणि तिच्या भरदार मृदू वक्षस्थळावर फुगीरलेला होता. चुणीदार आणि भरतकाम केलेल्या काठाचा पुरता झगा, खाली घोळदार होऊन

कटीप्रांती तंग बसलेला होता. तिच्या रसरशीत रेखीव जांघा, घट्ट आवळपोट आणि पुष्ट घोडीसारखा रुंद पुठ्ठा पाहून ग्रिगरीच्या मनात आले, ' हजारजणीत कझाक बाई ओळखावी. सगळं काही प्रकट करण्यासाठी तिने वेशभूषा केलेली असते. बघायचं तर बघा, नायतर नका बघू ! पण नांगरमुठ्या बाईची आघाडी कोणती आणि पिछाडी कोणती ते पण नाय सांगता यायचं जसं काय पोतं पांघरलय . . . . !'

त्याची नजर इलिनिचनाने हेरली, ती फुशारकीने म्हणाली,

" आमच्या कझाकात पहा कशा बायका नटतात ! शहरी बायकांच्या बरोबरीनं मिरवतील !"

" काय तरी काय म्हणीतनाय आई !" दाऱ्या तिला अडवून म्हणाली, "कुठं आम्ही न कुठं त्या शहरी बाया ! माझं एक करनफल मोडलंय. दीडदमडीचं तर होतं म्हणा !" ती हिंपुटी होऊन म्हणाली.

ग्रिगरीने आपल्या हाताने बायकोची रुंद पाठ लपेटली आणि प्रथम त्याच्या मनी आले, 'कुणीही सांगेल की ही देखणी आहे. माझ्याविना ही कशी राहिली ? मला वाटतं कझाक तिच्या मागं लागले असतील. आणि कदाचित तीही त्यातल्या एकाद्याच्या मागं लागली असंल. समजा तसं असलं तर !' ह्या विचाराने त्याचे काळीज थाडथाड उडू लागले. काकडीपासून तयार केलेला मुखलेप लावल्याने तुकतुकीत आणि टवटवीत दिसणाऱ्या तिच्या चेहऱ्याकडे त्याने शोधक नजरेने रोखून पाहिले. त्याच्या एकटक नजरेने नतालिया लाजून लाल झाली आणि कुजबुजली,

" असा का बघतोयस् माझ्याकडं ? मी दिसले म्हणून आनंद झाला ?"

" म्हणजे काय ? अर्थात !'

ते कटू विचार त्याने हाकलून दिले. पण क्षणभर त्याला बायकोबद्दल अंधूक अगदी अजाणता वैराची भावना वाटली.

पांतेलेय खोकत आत आला. देवपुतळ्यापुढे उभा राहून त्याने अंगावर क्रूसाची खूण केली आणि तो केंकाटला, " परत एकदा म्हणतो. सारे धट्टेखट्टे रहा !"

" देवाची दया बाबा ! गारठलास ? थांबलोय तुझ्यासाठी. सूप गरमाय !" चमचे खडखडवीत इलिनिचना इकडे तिकडे लसपसू लागली.

त्याने गळ्याभोवतालच्या लाल रुमालाची गाठ सोडवली. आपले मेंढकातडी जाकीट काढून टाकले. दाढीमिशीतील बर्फाचे लोलक झटकून टाकले आणि ग्रिगरीजवळ बसून तो म्हणाला,

" मी अगदी गारठून गेलोय. पण खेड्यातून येताना जरा ऊब आली होती. आन्यूतकाचं डुक्कर आमच्या गाडीखाली सापडलं. "

" कुणाचं ?" दाऱ्याने उत्साहाने विचारले. मोठा थोरला पावाचा तुकडा कापता कापता ती मधेच थांबली " ओझेरोईचं. कशी धावून आली कुत्तरडी ! काय तोंड वाजवलं. तुला अस्सं करीन – तस्सं करीन ! तू अस्सायस तू तस्सायस्! तू दंताळी चोरलीस ! कुठली दंताळी सैतानाला ठाऊक. "

अन्यूतकाने त्याला घातलेल्या सगळ्या शिव्या त्याने सांगितल्या. फक्त त्याच्या ' रंडीबाजीचा ' जो उल्लेख तिने केला तेवढा त्याने टाळला.

ग्रिगरी हसला आणि मेजापाशी येऊन बसला. आपल्या पोराच्या दृष्टीने स्वतःचे समर्थन करण्यासाठी पांतेलेयने जोरदार समारोप केला, " तिला माझ्या चाबकाची चुणूक दाखवली असती. पण ग्रिगरी बरोबर होता न ती वेळही बरोबर नव्हती. !"

पेत्रोने दरवाजा उघडला आणि मागून येणाऱ्या एका कोवळ्या देखण्या वासराची कसणी धरून दुन्याने प्रवेश केला.

" व्रतमासाला साय लावलेली धिरडी करू आपण !" लाथेने त्या वासराला पुढे ढकलीत पेत्रो आनंदाने ओरडला.

जेवणे झाल्यावर ग्रिगरीने आपली पडदळ उघडली आणि आणलेल्या भेटीच्या वस्तू वाटल्या. " आये, हे तुला !" आईच्या हाती एक गरम शाल देत तो म्हणाला. एखाद्या तरण्यापोरीगत नाक मुरडीत लाजत लाजत इलिनिचनाने ती शाल घेऊन खांद्यावर पांघरली. ती आपल्या रूपाचे कौतुक करीत इतकावेळ आरशापुढे उभी राहिली की पांतेलोय चिडून खेकसला,

" ए थेरडे ! काय उगाच आरशात बघून मुरडत्येस. हत् तुझी !"

" बाबा, हे तुझ्यासाठी !" एक कोरी कझाक टोपी पुडक्यातून बाहेर काढीत ग्रिगरी गडबडीने म्हणाला. दर्शनी उभट असलेल्या त्या टोपीला धगधगीत लाल फीत वेढलेली होती.

"देव तुझं भलं करो! मला घ्यायचीच होती नवी टोपी. गेलं वर्षभर दुकानात टोपीच दिसली नाय. जुन्या टोपीत गिरजावरला जायला बरं नाय वाटायचं. त्या टोपीचं नुस्तं बुजगबाव्हलं झालंय. पण तशीच घालीत होतो." तो खवळलेल्या आवाजात बोलत होता. आणि बोलताना आजूबाजूला असे बघत होता की आपल्या पोराने आपल्याला दिलेली ही भेट कुणीतरी पळवील अशी जणू त्याला भीती वाटत होती.

ती टोपी कशी बसते हे बघायला तो आरशाकडे निघाला पण इलिनिचनाच्या नजरेला नजर भिडताच त्याने एक अचानक गिरकी घेतली आणि लंगडत लंगडत तो चहाच्या बंबाकडे गेला. आपली टोपी घालून बघण्यासाठी तो त्या (चकचकीत) बंबापुढे उभा राहिला. टोपीचा शेंडा त्याने ठसकेबाजपणे बाजूला कलवला.

" तिथं काय करतोय्स रे म्हातारचळ्या !" इलिनिचना त्याच्याकडे वळून म्हणाली. पण पांतेलेयने कडाडून प्रत्युत्तर केले,

" अरे देवा ! तू मूर्खायस ! हा चहाचा बंबाय – आरसा नाय !"

ग्रिगरीने बायकोला झग्यासाठी गरम कापडाचा तुकडा दिला. पोरांना एक पौंड मधुकेक मिळाली. दाऱ्याला चंदेरी करणफुलांचा जोड मिळाला. दुन्याला ब्लाउजला कापड मिळाले. पेत्रोला चुट्टे आणि तंबाखू मिळाली. आपल्याला मिळालेल्या बक्षिसाबद्दल बायका इकडे बडबडत असताना पांतेलेय एखाद्या लाट–साहेबासारखा सायवानात छाती फुगवून तुरतुरत होता. म्हणत होता. –

" हुजुरातील रेजिमेंटचा उमदा कझाक गडी ! बक्षिसं पटकावलीन् ! शाही पाहणीच्या वेळंला पहिलं बक्षिस ! जीनकंठाळी, दुल्याबुरनसी . . . . सगळं ! तो मी . . · !"

आपल्या गव्हाळी मिशा चावीत पेत्रो बापाकडे कौतुकाने बघत होता. ग्रिगरी हसत होता. मग त्यांनी चुट्टे शिलगावले. खिडकीकडे अस्वस्थपणे बघत पांतेलेय ग्रिगरीला म्हणाला,

" आता पाहुणेमंडळी न् शेजारीपाजारी यायला लागतील. त्याच्या आधी तिकडं काय चाललंय ते पेत्रोला सांगून टाक कसा !"

ग्रिगरी हात झटकून टाकीत म्हणाला, " ते लढतायत !"

" सध्या बोल्शेव्हिक कुठायत ?" जरा आरामात बसून पेत्रोने झटकन् विचारले.

" तिखोरेतस्काया, तगानरोग न् वोरोनेज कडून असे तीन बाजूनं येतायत्!"

" न् तुमच्या क्रांतिकारक समितीला त्याबद्दल काय वाटतंय ? आमच्या जमिनीवर त्यांना ते काय म्हणून येऊ देतायत ? ख्रिस्तोनिया न् इवान अलेक्सिएविच परतलेत. त्यांनी नाना गप्पा सांगितल्या. पण माझा त्यांच्यावर विश्वास नाय. ते म्हणतात तसं नायाय . . . !

" क्रांतिकारक समितीचा काय इलाज नाय ! कझाकं घराकडं पळतायत !"

" न् काय म्हणून ही समिती सोव्हिएटावर भार टाकूनाय ?"

" अर्थात म्हणूनच !"

सिगारेटचा झुरका घेताना पेत्रो गप्प होता. मग त्याने भावाकडे निर्भिडपणे रोखून बघत विचारले,

" तू कुणाच्या बाजूला ?"

" मला सोव्हिएट सरकार हवंय !"

" मूर्ख !" दारुच्या स्फोटाप्रमाणे पांतेलेय उसळून म्हणाला,

" पेत्रो सांग त्याला !".

पेत्रोने हसून आपल्या भावाच्या खांद्यावर चापट मारली आणि तो म्हणाला,

" तो तगड्या घोड्यागत तेजाय ! त्याला कुणी काय सांगावं बाबा ?"

" मला सांगण्यासारखं काय नाय !" ग्रिगरी रागेजून म्हणाला, " मी आंधळा नाय. पण गावातली म्होरके मंडळी काय म्हणतात ?"

" म्होरकेमंडळींचा आपल्याशी काय संबंध ? ते खुळं ख्रिस्तोनिया काय तुला ठाऊक नाय? त्याला काय कळतंय ? लोकं बावरून गेलीत. कुठच्या बाजूला वळावं हेच त्यांना उमगनासं झालय. आफत ओढवणाराय !" आपल्या मिशा पेत्रोने चावल्या.

" जरा थांब. वसंत ऋतूत काय होतय बघ. कटकटी तेव्हा सुरू होतील. आघाडीवर आपण बोलशेव्हिक असल्याचं नाटक केलं पण आता डोकी ठिकाणावर आणायची वेळ आल्येय ! दुसऱ्या कुणाच्या मालकीचं आम्हाला नको न् आमच्या वस्तूला तुम्ही हात लावू नका ! – बळकवायला जे इथं येतील त्यांना कझाकांनी हे असं सांगितलं पाहिजे.

कामेनस्कायाला जे चाललंय ते सगळं गलिच्छाय ! त्यांनी बोलशेव्हिकांशी दोस्ती केल्येय न् त्यांची पध्दत ते घालणारायत् म्हणे !"

" ह्यावर तू विचार कर ग्रिगरी !" त्याचा बाप म्हणाला. " तू काय वेडाखुळा नैस ! तू हे समजायला हवं एकदा कझाक तो सदा कझाक ! रशियन

शेतकऱ्यांना आम्ही आमच्यावर राज्य करू नाय देणार. ते परदेशी आता काय म्हणातायत तुला ठाऊकाय ? सगळी जमीन सगळ्यांना सारखी वाटून द्यायची ! तुझं काय म्हणणाय ?"

" वर्षान् वर्ष डॉनवर राहिलेल्या परदेशांना आपण देऊ या जमीन !"

" एक इंच नाय देणार !" ग्रिगरीच्या चोंचदार नाकाखाली जोरदार चुटकी वाजवून पांतेलेय म्हणाला.

बरफमार बसलेल्या बाहेरच्या पावलाणाच्या पायऱ्यावर पायांचे आवाज आले. आनिकुशका, ख्रिस्तोनिया आणि ससाच्या कातडीची बेढब उंच टोपी घातलेला इवान तोमिलिन आत आले.

" नमस्ते ग्रिगरी ! पांतेलेय प्रोकोफिएविच, ग्रिगरी घरी आलेलं साजरं करायला पिणंबिणं होणार का नाय ?" ख्रिस्तोनिया गरजला.

चुल्हाणाजवळ पेंगत बसलेले वासरू त्याच्या ओरडण्याने घाबरून दचकले. आपल्या दुबळ्या पायावर ते धडपडत उभे राहिले आणि तिथं आलेल्या माणसांकडे ते आपल्या गोमेदी डोळ्यांनी टवकारून बघू लागले. त्या भेदरलेल्या अवस्थेत त्याने जमिनीवर बारीक धार सोडली. दुन्याने त्याच्या पाठीवर थोपटले. साचलेले तळे पुसून घेतले आणि त्या जनावराखाली एक घाणेरडे भांडे सरकावले.

" वासराला घाबरवलंस रे बोंबल्या !" इलिनिचना रागाने उद्गारली.

ग्रिगरीने कझाकांशी हस्तांदोलन केले. त्यांना बसायला सांगितले. लवकरच गावच्या दूर टोकावरचे कझाकही येऊन थडकले. गप्पा मारता मारता त्यांचे एवढे काही धूम्रसत्र चालू होते की, त्या धुराने दिव्याची वात फडफडू लागली. वासरू गुदमरू लागले.

" रोग आला मेल्यानू तुम्हाला !" मध्यरात्रीला पाहुण्यांना बाहेर काढीत इलिनिचनाने त्यांना शिव्या घातल्या. " आवाडात जा न् फुंका चुट्टे. धुराडी मेली ! चालायला लागा ! लागा चालायला . . . ! प्रवास करुन आल्यापासून आमचा ग्रिगरी टेकला नाय. देवाच्यान सांगते. व्हा चालते बघू !"

---

## १४

दुसऱ्या दिवशी सकाळी ग्रिगरी सगळ्यांच्या मागून जागा झाला. वळचणीत आणि खिडक्यांच्या तावदानाबाहेर वसंतऋतू आल्यागत चिमण्या गोंगाट आणि चिवचिवाट करीत होत्या. त्यानी त्याला जाग आणली. झडपांच्या फटीतून उन्हाची सोनेरी तिरीप चाळून येत होती. प्रातःपुजेसाठी चर्चच्या घंटा घणघण होत्या. त्यावरून त्याला आज रविवार असल्याची आठवण झाली. नतालिया त्याच्या शेजारी नव्हती पण पराच्या गादीवर अद्याप तिच्या शरीराची ऊब होती. ती उठून फारसा वेळ झाला नसल्याचे उघड होते,

" नतालिया !" त्याने हाक मारली.

दुन्या आता आली, " काय हवंय भाऊ ?"

" खिडकी उघड न् नतालियाला बोलव. काय करत्येय ती ?"

" ती आईच्या हाताशी करत्येय. आत्ता येईलच ती. "

नतालिया आत आली. खोलीत धूसर प्रकाश असल्याने तिने डोळे किलकिले केले. तिच्या हाताला ताज्या कणकेचा वास येत होता. न उठताच त्याने तिल मिठीत घेतले. रात्रीची आठवण होऊन तो हसला.

" खूप वेळ झोपलीतीस ?"

" आं . . . हां ! रात्री . . . दमून गेले मी !" ती हसून म्हणाली आणि लाजून तिने ग्रिगरीच्या छातीवर तोंड लपवले.

त्याच्या जखमांना मलमपट्ट्या करायला तिने मदत केली. हडप्यातून त्याची एक उत्तम पैकी पाटलूण बाहेर काढली आणि विचारले,

" क्रूस लावलेली तुझी अंमलदाराची चपकन घालशील ना ?"

" नको. कशाला उगाच ?" त्याने घाबरून तिला झटकून टाकले.

पण तिने हट्ट धरला.

" घातलीच पाहिजे तू ! बाबा खूष होतील. ते जिंकलेत कशाला ? पेटीत ठेवून द्यायला ?"

तिच्या विनवण्यापुढे त्याने नमते घेतले. तो उठला. आपल्या भावाकडून त्याने वस्तरा मागून घेतला. दाढी केली. तोंड मान धुतली.

" मान तासलीस का ?" पेत्रोने विचारले.

" हत् तिच्या आयला ! विसरलो !"

" बस खाली ! मी तासतो !"

साबणाच्या थंड फेसाने त्याच्या मानेची आग होत होती. त्याने आरशातून भावाकडे पाहिले. तोंडाच्या एका कोपऱ्यातून जीभ बाहेर काढून तो वस्तरा चालवीत होता. " तुझी गर्दन हाडाडली. नांगरणी करून बैलाची होते तशी झाल्येय !"

" फौजेतल्या अन्नानं मास येत नाय !"

कॉर्नेटचे माकुल लावलेली आपली चपकन ग्रिगरीने चढवली. त्यावर क्रुसांची दणदणीत रांग होती. वाफाळलेल्या आरशात त्याने पाहिले तेव्हा त्याची स्वतःची स्वतःलाच ओळख पटेना. एक उंच, रोड आणि जिप्सी सारखा काळेजला अंमलदार त्याच्याकडे त्या आरशातून निरखून बघत होता.

" कर्नलसारखा दिसतोस !" पेत्रो आनंदानं उद्गारला. आपल्या भावाचे कौतीक करताना त्याच्या आवाजात मत्सराची यत्किंचितही छटा नव्हती. तो पोशाख चढवणे मनात नसूनही ते उद्गार ऐकून ग्रिगरीला समाधान वाटले. तो सायवानात गेला. दाऱ्याने कौतुकाने त्याच्याकडे रोखून पाहिले. तर दुन्या किंचाळली,

" अय्या ! काय मस्त दिसतोय्स !"

हे ऐकून मात्र इलिनिचनाला अश्रू आवरेनात. आपल्या 'एप्रन' ने ते पुशीत दुन्याच्या बडबडीला उद्देशून ती म्हणाली,

" तुझ्या पोटीही अशीच पोरं निपजू देत भवान्ये ! मला दोन पोरगे झाले दोघांनी जगात नाव मिळवलं !"

आपली डबडबलेली, उत्कट प्रेमाची नजर नतालियाने नवऱ्यावरून क्षणभरही ढळवली नाही.

आपला फर्गोल ग्रिगरीने दोन्ही खांद्यावर टाकला आणि तो बाहेर आवाडात गेला. त्याच्या जखमी पायामुळे त्याला पावलाणावरून उतरायला अवघड वाटत होते. ' मला काठी वापरायला हवी. ' कठड्याला धरताना त्याच्या मनात आले. मिलेरोवा इथे त्याच्या पायातील काडतूस काढण्यात आले होते. पण त्यावरील खपलीने कातडी आवळून धरली होती. त्यामुळे त्याला पाय नीट वाकवता येत नव्हता.

घराच्या भिंतीच्या कडाशीवर बसून एक मांजर उन्ह खात होते. पावलाणाच्या आजूबाजूच्या डबक्यातून बर्फ पाघळत होता. ग्रिगरीने आवाडात आनंदाने चौफेर निगूतपूर्वक नेहटले. पावलाणाला लागूनच एक डांब रोवलेला होता. त्याच्या अगरावर एक चाक बसवलेले होते. त्याच्या लहानपणापासून तो तिथे होता. बायका त्याचा वापर करीत.

रात्री पावलाणाच्या अगदी वर उभ्या राहून त्यावर त्या दुधाचे हंडे ठेवीत. दिवसा भांडीकुंडी त्यावर वाळत ठेवलेली असत. आवाडातील काही विशिष्ट स्थित्यंतरांनी त्याची नजर चटकन वेधून घेतली. कुणग्याचे दार रंगविण्याऐवजी गेरू फासलेले होते. मांगराची धाबी रायगवताने शाकारली होती. ते गवत अजून पिवळे होते. मेखांचा ढीग जरा लहान वाटत होता. त्यातील काहींचा वापर बहुधा कुपाटीच्या डागडुजीसाठी करण्यात आला होता. बळदावरचे टेंगूळ राखड्याने निळसर झाले होते. सुमारे दहा बारा रंगीबेरंगी कोंबड्यांच्या घोळक्यात एक काळाकुट्ट कोंबडा त्या टेंगळावर आरूढ झाला होता. त्याने पांगुळल्यागत एक पाय अधांतरी उचलला होता. मांगरात शेतीची अवजारे हिवाळी हवेपासून सुरक्षित होती. गाडीचे तारसे त्यातून फासळ्यागत बाहेर पडले होते. आणि कापणीयंत्राचा धातूचा काही भाग छपराच्या भोकातून आत घुसलेल्या उन्हाच्या किरणात तळपत होता. तबेल्याजवळ शेणखळीच्या ढिगाऱ्यावर तित्तर फतकल मारून बसले होते. जवळून ग्रिगरी लंगडत जात असताना एका तुरेदार तित्तराने त्याच्याकडे कुर्रेबाज तिरप्या नजरेने पाहिले.

तो शेतावर गेला आणि मग घरी परतला. सायवानातून कढवलेल्या लोण्याचे आणि गरम पावाचे गोड वास येत होते. एका नक्षीदार काचेच्या थाळीत

ठेवलेली खारवलेली सफरचंदे दुन्या धूत होती. त्यांच्याकडे पाहून त्याने एकाएकी उत्साहाने विचारले,

" खारवलेली कलिंगडं नैत का ?"

" खाली जाऊन त्याच्यासाठी घेऊन ये नतालिया !" इलिनिचनाने हाळी दिली.

पांतेलेय गिरिजाघराहून परतला. त्याने प्रसादाच्या पातळ पावाचे कुटुंबातील प्रत्येकाच्या नावाने नऊ भाग केले आणि मेजाजवळ बसलेल्यांना ते वाटले.

मंडळी जेवायला बसली. पेत्रोनेही सणाचा पोशाख केला होता. मिशांनाही त्याने कसलेतरी रोगण केले होते. तो ग्रिगरीच्या बाजूला बसला होता. त्याच्या समोर दाऱ्या एका स्टुलाच्या कडेला तोल सांभाळीत बसली होती. सूर्यकिरणांचा एक लोटच तिच्या उजळलेल्या गुलाबी चेहऱ्यावर सांडत होता. ती डोळे किलकिले करीत होती. आपल्या भुवयांची काळी चमकती धनुष्ये नाराजीने मुरडीत होती. नतालिया भाजलेले कोहळे मुलांना भरवीत होती. मधून मधून ग्रिगरीकडे दृष्टी टाकून स्मित करीत होती. दुन्या बापाच्या शेजारी बसली होती तर इलिनिचन मेजाच्या दूर टोकाला चुल्हाण्याजवळ बसली होती.

नेहमी सणासुदीला होते तसे त्यांचे जेवण चमचमीत आणि भरपूर होते. आधी मटणाचे पारचे घातलेला कोबीरस्सा, नंतर घरी तयार केलेले नळीदार शेवये, मटण, कोंबडी, मेंढीच्या पायापासून केलेली जेली, तळलेले बटाटे, लोणी घातलेली जाड रव्याची घट्ट लापशी, सुकवल्या चेरीज, मिसळलेल्या शेवया वर गुठळ्याची साय ठेवलेले अंबील आणि खारवलेले कलिंगड.

तुडुंब जेवण झाल्यावर ग्रिगरी कष्टाने उठला आणि धापा टाकीत बिछान्या-वर आडवा झाला. पांतेलेय अजून लापशी खाण्यात गुंगला होता. ती थापटून सपाट केल्यावर त्यात त्याने भोक पाडले आणि लोणकढे तूप त्यात सोडले. मग ते तुपट मिश्रण तो चमचे भरून ओरपू लागला. पोरांची आवड असलेला पेत्रो मिशाला भरवीत बसला होता आणि गंमतीने त्या पोराच्या नाकाला, गालांना आंबट साय चोळीत होता.

" काका, चावटगिरी करू नको !"

" का नको ?"

" असं का करीतोस ?"

" का नको?"

" मी आयेला सांगन. " मिशाचे उदास ' मेलीखोवी ' डोळे संतापानें झळकले आणि चिरडीला जाऊन ते आसवांनी डबडबून आले. त्याने मुठीने नाक पुसले आणि नीट शब्दांनी पेत्रोचे मन वळवण्याचे प्रयत्न फोल आहेत ह्या निराशेने तो किंचाळला,

" तसं करू नको ! मूर्ख ! वेडा !"

पेत्रो खो खो हसत मात्र सुटला आणि परत आपल्या पुतण्याला भरवू लागला. एक चमचा तो त्याच्या तोंडाजवळ नेई, दुसरा त्याच्या नाकापाशी नेई.

" तू सुध्दा पोरायस अगदी !" इलिनिचनाने निषेध प्रकट केला.

दुन्या ग्रिगरीजवळ जाऊन बसली आणि त्याला सांगू लागली :

" पेत्रो अगदी मूर्खाय ! नेहमी कायतरी खोडया काढीत असतो. एक दिवस मिशाला घेऊन तो आवाडात गेला. न् पोराला घाईची लागली. त्यानं विचारलं, ' काका पावलाणाशी करू का ?' पण प्योत्र म्हणीतला ' नाय, तिथं नाय करायची. तिकडं जरा पुढं जा!' मिशा जरा पुढे पळाला न् विचारलं, ' इथ ?' ' नाय, नाय, कुणगीकडं पळ !' कुणगीकडून त्याला ह्यानं तबेल्याकडं पिटाळला. तबेल्याकडून झोडपणीच्या खळयाकडं. बिचाऱ्या पोराला 'इतकं धावडवलं धावडवलं की शेवटी त्याला चड्डीतच झाली. न् वर नतालिया त्यालाच रागावली !"

" मला हातानं खाऊ दे ?" टपालाच्या टांग्याच्या घंटीसारखा मिशाचा एवढासा आवाज निनादला.

पेत्रोने थट्टेने नकार देत मिशांना पीळ भरला.

" नाय रे माझ्या बाळा. मी तुला भरविणार !"

" मी स्वताच्या हातानं खाणार !"

" डुकरवाडयातली डुकरं तसं खातात. आजी त्याना काय देते ते पाहचलय्स ?"

पेत्रो आणि मिशाचा संवाद ऐकता ऐकता ग्रिगरी हसत होता. त्याने चुट्टा वळला. त्याचा बाप त्याच्या जवळ आला.

" आज व्येशेनस्कायाला गाडी घेऊन जाईन म्हणतो.' म्हाताऱ्याने त्याला विश्वासात घेऊन सांगितले.

" कशाला ?"

पांतेलेयने उचकी दिली आणि दाढी थोपटीत तो म्हणाला, " जिनगराकडं कामाय. आपली दोन जोती त्याला दुरुस्तीला दिलीती !"

" आज परत येणार ना ?"

" अर्थात. संध्याकाळला घरी येतो. "

थोडा वेळ विश्रांती घेऊन म्हाताऱ्याने घोडी जुंपली, त्या वर्षी ती आंधळी झाली होती. घसरगाडीचे जू त्याने तिच्या अंगावर चढवले. आणि गाडी हाकली. दोनेक तासात तो व्येशेनस्कायाला पोचला. तो पोस्टात गेला. मग जिनगराकडे गेला. जोती ताब्यात घेतली. मग त्याने गाडी आपला जुना मित्र आणि धरमपिता असणाऱ्या माणसाकडे हाकारली. हा गपीष्ट माणूस नवीन गिरजाघराजवळ रहात होता. अत्यंत अगत्यशील असणाऱ्या ह्या गृहस्थाने त्याला संध्याकाळच्या जेवणा-साठी ठेवून घेतले.

" पोस्टात गेलाता?" ग्लासात काहीतरी ओतीत त्याने विचारले.

"हां!" त्या बाटलीकडे आश्चर्याने बघत आणि श्वापदाच्या मागावर अस-लेल्या शिकारी कुत्र्याप्रमाणे नाकपुड्या विस्फारून हवा हुंगीत त्याने उत्तर दिले.

" नवीन काय ऐकीतलंस ?"

" नवीन ? अजून तर काय नाय ऐकीतलं ! कायाय ?"

" कालेदिन – अलेक्सी माक्सिमोविच कालेदिननी जिंदगीला रामराम ठोकलान् !"

" काय म्हणीत्तोस ?" लक्षात यावी अशी पांतेलेयची चर्या हिरवी – निळी झाली. ती संशयास्पद वाटली आणि तिचा गंध ह्यांचा त्याला विसर पडला. त्याने मागे खुर्चीत अंग टाकून दिले. तंद्रीत असल्यागत डोळ्यांची उघडझाप करीत त्याचा यजमान सांगू लागला.

" आम्हाला तारेनं बातमी कळली की नोवोचेरकास्क इथं अलीकडच त्यानं स्वतावर गोळी झाडून घेतली. सगळ्या मुलूखात तोच काय तो एक खरा सरनौबत होता. पायदळांचा सरनौबत पण रिसाल्यावर हुकमत होती. काय कडवा माणूस ! कझाकांना कधी काळीमा लागू द्यायचा नाय !"

" जरा थांब ! आता काय होणार ?"

" भगवान जाणे ! दिवस वाईटायत ! चांगले दिवस असल्यावर कोण कशाला स्वताला गोळी घालून घेईल ?"

" कशामुळं त्यांनं असं करावं ?"

त्याचा यजमान जुन्या श्रध्दाळू माणसासारखी मते ठाम रुजलेला होता. त्याने रागाने हात झाडला :

" आघाडीची माणसं त्याला सोडून गेली न् बोल्शेव्हिकांना त्यांनी मुलखात घेतलं. त्यानं आमचा आतामान गेला. असा माणूस परत भेटेल का नाय शंकाच वाटते. आपला बचाव कोण करणार ? कामेनस्कायात क्रांतिकारक समिती का कायसं बनवलंय. आघाडीची कझाक मंडळी त्यातायत. न् इथं . . . तू ऐकीतलंस ? कामेनस्कायाहून आम्हाला हुकूम आलाय की आतामानला काढून टाका न् त्या जागी क्रांतिकारक समिती निवडून द्या. हे सगळे लोहार, सुतार न चाकरीच्या शोधावरचे बेकार कुरणरानातल्या घुंगरटयासारखी त्यांची झुंबड माजलयेय.

पांतेलेय बराच वेळ गप्प बसून होता. त्याचे पिकलेले मस्तक झुकलेले होते. त्याने वर पाहिले तेव्हा ती नजर उग्र आणि कडक होती.

" तुझ्या त्या बाटलीत कायाय ?"

" स्पिरिटाय ! माझ्या पुतण्यानं कॉकेशसहून आणलंय्. "

" ठीक. ओत मित्रा ! आपल्या मेलेल्या आतामानच्या आठवणीच्या नावानं पिऊ या. स्वर्गाचं राज्य त्याला खुलं होवो !"

ते प्याले. यजमानाची मुलगी उंच आणि कातडीवर शिबे पडलेली होती. तिने जेवण आणले. घसरगाडीपाशी खिन्नपणे उभ्या असलेल्या घोडीकडे पांतेलेयने दृष्टी टाकली. पण त्याच्या यजमानाने त्याला धीर दिला. " घोडीची काळजी करू नको. तिला चारापाणी द्यायची व्यवस्था मी करीतो."

मग काय ? कडक्याच्या गप्पा आणि बाटली ह्यापुढे पांतेलेयला घोडीचा आणि जगातील इतर सगळ्या गोष्टीचा विसर पडला. तो असंबध्दपणे ग्रिगरीबद्दल बोलत होता. आपल्या झिंगलेल्या यजमानाशी तो वर्दळीला आला. वाद घालीत बसला आणि मग आपण कशासाठी वाद घालतोय तेच तो साफ विसरून गेला. तो उठून उभा राहिला तेव्हा संध्याकाळ झाली होती. रात्री मुक्कामाला राहण्याच्या आमंत्रणाकडे लक्ष न देता त्याने घराकडे निघायचे ठरवले. त्याच्या मित्राच्या पोराने घोडीला जुंपली. यजमानाने त्याला घसरगाडीवर चढवले. मग त्याने पांतेलेयला खेडयाच्या

वेशीपर्यंत घालवून यावे असे ठरविले. घसरगाडीच्या तबकात ते एकमेकांच्या गळ्यात गळा घालून बसले. ती घसरगाडी प्रथम पेट्रूकणच्या तोळंब्याला अडकली. मग खुल्या माळरानावर पोचेपर्यन्त प्रत्येक टेंगूळकोपऱ्यात अडखळत होती. माळ-रानावर पोचल्यावर त्याचा यजमान ढसाढसा रडू लागला आणि मुद्दाम घसरगा-डीबाहेर पडला. बराच वेळ तो उठून उभे राहता न आल्याने हाताढोपरावर बसून शिव्या घालीत होता. आपले नाक बर्फात खुपसून आनंदाने घोगरे हासत बर्फात रांगला. त्याचा यजमान काकुळतीला येऊन म्हणत होता — "गुदगुल्या नको रे करू . . . शप्पत गुदगुल्या थांबव रे !"

पांतेलेयने घोडीवर चाबूक ओढून तिला पळवले. त्यामुळे आपल्या यजमानाची ही अवस्था त्याच्या दृष्टीला पडू शकली नाही.

चाबकाने स्फुरण चढून घोडी आंधळ्या दुडक्या चालीवर वेगाने दौडू लागली. झिंगून बेहोश झालेला तिचा धनी लौकरच मागे घसरगाडीच्या तारशावर कोसळला. आणि गप्पा झाला. लगाम त्याच्या हातून खाली घरंगळले आणि सारथ्यहीन आणि असहाय्य झालेली ती घोडी संथ चालीवर आली. पहिल्या फाट्यावर ती उजव्या रस्त्याला वळली आणि एका गावढ्याच्या दिशेने जाऊ लागली. आणखी काही मिनिटांनी तिची ही वाटही हरवून गेली. मग खुल्या अवघड माळरानात ती शिरली. रानातील दाट बर्फात ती फसली आणि एका वाडग्यात घसरली. घसर-गाडी एका झुडपाला अडकली आणि तिची चाल खुंटली. त्या दचक्याने म्हातारा पळभर जागा झाला. पांतेलेयने मुंडी उचलली आणि घोगऱ्या आवाजात तो खेकसला, "ऊठ ए ऽ भडवे !" असे म्हणून त्याने परत लोळण घेतली.

घोडी पुढे चालू लागली आणि काही बरेवाईट न होता तिने रान पार केले. डॉनच्या काठाने तिने यशस्वीपणे मार्ग काढला आणि पूर्वेकडून वाहणाऱ्या वाऱ्यावर येणाऱ्या धुराच्या वासाने ती सिमेनोवस्काया ह्या पुढील खेड्याच्या दिशेने चालू लागली.

खेड्यापासून सुमारे तीन एक फर्लांगावर नदीच्या डाव्या बाणीला घडण पडलेली आहे ह्या घळणीभोवती रेताडबाणीतून डवरे उसळले आहेत. इथे कधीही —हिवाळ्याच्या ऐन कडक्यातही—पाणी गोठत नाही. त्याची इथे एक घवघवीत अर्धवर्तुळाकृती बेहेड झाली आहे. नदीकाठाने गेलेल्या वाटेने पाणी काळजीपूर्वक टाळून एका बाजूने मुसंडीचे वळण घेतले आहे. वसंतकाळात उघड्या रानमाळावरील पाण्याचे जबरदस्त लोट ह्याच घळणीतून परत डॉनमधे घोघावतात. त्यामुळे तिथे

एक गरजता भोवरा तयार झाला आहे. सबंध उन्हाळयात कार्प मासे वोसणलाकडाच्या जवळ अगदी खोलवर राहतात.

म्हाताऱ्या घोडीने आपल्या आंधळया टापा बेहेडाच्या डाव्या तुंब्याच्या दिशेने टाकल्या. ती सुमारे पन्नास पावलावर असताना पांतेलेय कुशीला वळला आणि त्याने डोळे अर्धवट उघडले. काळया नभातून चांदण्याच्या पिवळट हिरव्या चेरीज त्याला वरून नेहटत होत्या.

" रात्र झाली ! त्याच्या मनात अंधूक विचार आला आणि त्याने लगामाला त्वेषाने खेच दिली.

" आत्ता तुझी ! देईन ठेवून थेरडया शेवरे !" तो घोडीवर खेकसला.

घोडी दुडक्या चालीवर सुटली. जवळच्या पाण्याचा गंध तिच्या नाकाडात शिरला. तिने कान ताठ करून आपला आंधळा शून्य डोळा धन्याच्या दिशेने वळवला. एवढयात गरगरत्या पाण्याचा धोंधाणा तिच्या कानी आला. आवेगाने खिंकाळत तिने मोहरा फिरवला आणि ती मागे हटायला धडपडू लागली. बेहेडाच्या तुंब्याजवळील अर्धा पाघळला बर्फ तिच्या टापाखाली हलकेच कुरकुरला आणि त्याची हिमकिनार फुटली. घोडी जिवाच्या आकांताने खिंकाळली. आपली सगळी ताकद पणाला लावून तिने दुगाण्यांनी प्रतिकार केला. पण तिचे पुढचे पाय आधीच पाण्यात गेले होते आणि तिच्या दुगाण्यांच्या टापाखाली पातळ बर्फ फुटू लागला. रेकत करकरत बर्फ फुटून गेला. तो बेहेड घोडीचा घास घेत असताना तिने बेभानपणे एक दुगाणी झाडून आसकुडाला ठोकरले. त्याच क्षणी काही तरी गफलत झाल्याचे कानी पडून पांतेलेयने घसरगाडीतून खाली उडी ठोकली आणि तो पाठीमागे कोलमडला. घसरगाडीची पिछाडी उचलली गेली आणि चकाकते पाटे उघडे पडले. कारण गाडीची आघाडी घोडीच्या वजनाने खाली ओढली गेली आणि नंतर हिरव्या – काळया डोहात घसरून गेली. हे सारे त्याने पाहिले. बर्फाचे कपचे मिसळलेले पाणी मंद फुत्कारित होते आणि त्याच्या पायाशी त्याची लाट गोळा झाली. अजब चपळाईने तो मागे सरपटत आला आणि उभा राहून आरोळया ठोकू लागला :

" धावा रे धावा ! मायबाप . . . धावा . . . बुडालो !"

घणाचा घाव घातल्यागत त्याची धुंदी खाडकन उतरली. तो बेहेडाकडे धावला. नुकताच विदीर्ण झालेला बर्फ उग्र चमकत होता. वाऱ्याने बर्फाचे तुकडे बेहेडाच्या ऐसपैस अर्धवर्तुळावर उधळत होते. आपली हिरवी आयाळ झुलवीत लाटा खुसखुसत

होत्या. आजूबाजूला स्मशान शांतता होती. दूरवरच्या गावढ्याचे दिवे अंधारातून पिवळट चमकत होते. आकाशाच्या किनखापावरील चांदण्या नुकत्याच पाखडलेल्या दाण्यासारख्या तन्मयतेने तळपत होत्या. वाऱ्याच्या झुळकेवर हिम उचलले जाऊन त्याची पिठूर धूळ सित्कारित बेहेडाच्या काळ्या अथांगतेत उधळली गेली की तो बेहेड किंचित वाफाळायचा आणि मग वशीकरण करावे असा मंत्रभूत काळा होऊन बसायचा.

आता आरडा ओरड करणे व्यर्थ आणि मूर्खपणाचे आहे हे पांतेलेयने ओळखले. त्याने आजूबाजूला न्याहाळून पाहिले. आपल्या बेहोश धुंदीत आपण कुठे आलो ते ताडले आणि स्वत:वरच्या संतापाने आणि जे काही झाले होते ते जाणवून तो थरथरला. त्याचा आसूड अद्याप त्याच्या हाती होता. घसरगाडीतून त्या आसूडासह त्याने उडी मारली होती. भयंकर शिव्या हसडीत त्याने आपली पाठ चाबकाने झोडपून काढली पण त्याला काहीच वेदना झाल्या नाहीत. कारण त्याच्या दणकट मेंढकातडी कोटाने ते प्रहार हलके केले. आणि केवळ झोडपून घेण्याचे सुख होण्यासाठीच अंगावरचे कपडे उतरवणे मूर्खपणा होता. त्याने दाढीचे मूठभरून केस उपटले, त्या घोडीची, घसरगाडीची, जोत्यांची किंमत हचाचा खरेदी नुकसानीचा मनाशी हिशेब करीत तो बेहेडाच्या आणखी जवळ गेला.

त्या बुडालेल्या घोडीला उद्देशून तो थरथरत्या, कण्हलेल्या आवाजात म्हणाला,

" अगं आंधळे चांडाळणी ! रांडे ! स्वत: बुडालीस . . . मलाही बुडवीत होतीस . . . हडळींनी कुठं नेलं तुला ? सैतान तुला जुपील न हाकारील. पण हाकारील कशानं ? हे घे . . . हा आसूडही जा घेऊन ! " आपला जांभळा आसूड त्याने बेभानपणे डोक्यावर गरगर फिरवून बेहेडाच्या मधोमध भिरकावून दिला.

प्रथम तो आसूड पाण्यावर आदळला आणि आत शिरला. त्यानंतर त्या अथांगतेत अदृश्य होऊन गेला . . .

---

## १५

क्रांतिकारक कझाक फौजेवर कालेदिनने विजय मिळवल्यानंतर मिलेरोवाला पळून जाणे भाग पडलेल्या डॉन लष्करी क्रांतीकारक समितीने आपल्या राजकीय भुमिकेचा खुलासा करण्याची त्वरा केली. कालेदिनविरूद्ध आणि प्रतिक्रांतीकारक युक्रेनी रादाविरूद्ध § कारवाया करणाऱ्या नेत्याला ह्या समितीने पुढील निवेदन रवाना केले.

खारकोव

१९ जानेवारी, १९१८

लुगान्स्क, क्र. ४४९ कडून
(वेळ सायंकाळी ८–२०)

डॉन कझाक क्रांतिकारक समितीची विनंती आहे की, पेट्रोग्राडमधील जनता कमिसार्स परिषदेला आपणा पुढील ठराव कळवावा.

कामेनस्काया इथे आघाडीच्या लोकांच्या अधिवेशनाच्या ठरावानुसार कझाक लष्करी क्रांतिकारक समिती असा ठराव करीत आहे की :—

(१) कझाकांच्या सोव्हिएटची मध्यवर्ती कार्यकारी समिती, किसान सैनिक आणि कामगार ह्यांचे नियुक्त प्रतिनिधी आणि त्यांनी निवडून दिलेली जनता कमिसार्स परिषद ह्यांना रशियन सोव्हिएट प्रजासत्ताकाची मध्यवर्ती शासकीय संस्था म्हणून मान्यता देण्यात यावी.

---

§ युक्रेनी संसद

(२) कझाकांच्या सोव्हिएटांचे अधिवेशन, डॉन प्रदेशातील सैनिक आणि कामगारांचे नियुक्त प्रतिनिधी ह्यांनी डॉन प्रदेशात प्रादेशिक शासन स्थापन करावे.

टीप : डॉन प्रदेशातील जमिनीचा प्रश्न हेच अधिवेशन सोडवील.

हे निवेदन मिळताच क्रांतिकारक फौजांच्या मदतीला 'रेडगार्डस्' च्या तुकड्या रवाना करण्यात आल्या. परिणामी, कर्नल चेर्नेत्सोवच्या फौजांचा धुव्वा उडवण्यात येऊन क्रांतिकारक फौजांची परिस्थिती सुरक्षित बनवण्यात आली. पुढाकार क्रांतिकारक समितीच्या हाती आला. झ्वेरेवो आणि लिखाया सर केल्या-नंतर साबलिन आणि पेत्रोवच्या हाताखालील 'रेडगार्डस' तुकड्यांनी चढाई सुरू केली आणि आपल्या शत्रूला नोवोचेरकास्ककडे पिटाळून लावला.

तगानरोगजवळ येणाऱ्या सिवेरच्या क्रांतीकारक फौजांचा कर्नल कुत्यूपोवच्या हाताखालील स्वयंसेवक पथकांनी पराभव केला. त्यांनी एक तोफ, २४ मशिनगन्स आणि एक चिलखती गाडी एवढे गमावले. परंतु सिवेर्सच्या फौजांचा ज्या दिवशी पराभव झाला आणि त्यांना माघार घेणे भाग पडले त्याच दिवशी तागानरोग-मधील बाल्टिक कारखान्यातील कामगारांनी उठावणी केली आणि कॅडेटस्ना शहराबाहेर पिटाळून लावले.

सिवेर्सने आपल्या फौजांची जमवा जमव केली. चढाईचा पवित्रा घेतला आणि स्वयंसेवकांना तगानरोगकडे मागे लोटले.

यश सोव्हिएट फौजांच्या साहजिकच पथ्यावर पडत होते. तीन बाजूंनी ते 'व्हाईटगार्डस्' वर बुर्जी करीत होते. १८ जानेवारीला कोर्नीलोव्हने कालेदिनला तार पाठवली. त्यात कळविले होते की, स्वयंसेवक सेना रोस्तोव खाली करीत असून कुबानच्या दिशेने निघाली आहे.

२९ तारखेला सकाळी ९ वाजता आतामान प्रासादात डॉन सरकारची असाधारण बैठक झाली. कालेदिन सर्वात शेवटी आला. झोपेच्या अभावाने त्याचा चेहरा ओढलेला आणि कळाहीन दिसत होता. त्याच्या निस्तेज उदास डोळ्याखाली निळी वर्तुळं उमटली होती. त्याची खंगलेली चर्या ढासळणीच्या तवंगाने पिवळट पडलेली होती. कोर्निलोवची तार नोवोचेरकास्कच्या उत्तरेला रेडगार्डस्च्या हल्ल्यांचा मुख्य भार पेलणाऱ्या सेनानींचे अहवाल त्याने हळूहळू वाचले. आपल्या रूंद गोऱ्या तळव्याने तारांचा ढीग नीट करीत आणि आपल्या सुजीर छायाळलेल्या पापण्या न उचलता तो सुस्तपणे म्हणाला,

" स्वयंसेवक सेना माघार घेत आहे. हा मुलूख आणि नोवोचेरकास्कचा बचाव करण्यासाठी आपल्याकडं फक्त १४७ बागनट आहेत. "

त्याची डावी पापणी स्फुरण पावली आणि घट्ट आवळलेले ओठांचे कोपरे थरथरले. आपला आवाज चढवून तो पुढे बोलू लागला –

" आपली परिस्थिती हाताबाहेर गेलेली आहे. लोकांचा आपल्याला पाठिंबा तर नाहीच उलट विरोधच आहे. आपल्याकडं फौज नाही. आणि प्रतिकारात काही अर्थ नाही. विनाकरण बळी देणं, विनाकारण रक्तपात करणं मला नको आहे. माझी अशी सूचना आहे की, आपण राजीनामा द्यावा आणि सत्ता दुसऱ्या कुणाच्या तरी हाती सोपवावी. मी स्वत: डॉन कझाक फौजेचा आतामान म्हणून राजीनामा देत आहे."

खिडकीच्या बाहेर बघणाऱ्या बोगाएवस्कीने आपला चापाचा चष्मा नीट केला आणि मान न वळवता तो म्हणाला,

" मीही राजीनामा देतो !"

" अर्थात एकूण सरकारच राजीनामा देत आहे. आता प्रश्न असा आहे की– सत्ता कुणाच्या हाती सोपवायची ?"

" शहरड्यूमाकडं." कालेदिनने रुक्षपणे उत्तर दिले.

" आपण हे अधिकृत केलं पाहिजे. " सरकारचा एक मंत्री असलेला कारेव मुळमुळीतपणे म्हणाला. थोडा वेळ गाढ विचित्र शांतता पसरली. जानेवारी महिन्यातील उदास सकाळ धूसर तावदानापलीकडे कोमेजून गेली होती. धुके आणि दहिवर ह्यात गुरफटलेले शहर स्वप्नाळू शांतीत होते. जीवनाचा नित्याचा ठेका कानांना ऐकू येत नव्हता. तोफेचा धमधमा ( सुलीनच्या खेड्याजवळ चालू असलेल्या लढाईचा प्रतिध्वनी ) सगळे आवाज बधीर करून टाकीत होता. आणि त्याने शहरात एक प्रकारची संदिग्ध अव्यक्त अबरगत टांगणीला लागलेली होती.

बाहेर कावळे कर्कश भेदक कावकाव करीत होते. पांढरा घंटा मनोरा जणू काय मुडदाच आहे असे ते त्या भोवती घिरट्या घालीत होते. जांभळफूल छटेचे ताजे हिम कॅथेड्रलच्या चौकात पडले होते. अधून मधून कुणीतरी तेथून चालत जाई आणि मधूनच जाणाऱ्या घसरगाडीच्या गर्द खुणा मागे उमटून रहात.

त्या ताणलेल्या शांततेचा भंग करून बोगाएवस्कीने सूचना मांडली की, शहर ड्यूमाकडे सत्ता सुपुर्द करणारा दस्तऐवज तयार करण्यात यावा.

" ह्याबद्दल ड्यूमा सदस्याबरोबर आपण बसलं पाहिजे."

" सगळ्यांना केव्हा सोईचं पडेल ?"

" नंतर. सुमारे ४ वाजता."

जणू ती अवघड शांतता भंग पावली. ह्या खुशीनेच सरकारच्या सदस्यांनी सत्ता सुपुर्द करण्याच्या निरनिराळ्या प्रश्नावर, भेटीच्या वेळेवर चर्चा सुरू केली.

कालेदिन गप्प होता. शांतपणे, एकसुरीपणे तो बोटांच्या नखांनी मेजावर टकटक करीत होता. त्याच्या केसाळ भुवयांखालचे डोळे सुस्त आणि ढगाळले होते. विलक्षण थकिस्तपण, किळस आणि ताण ह्यामुळे त्याची नजर जडावलेली आणि तिरस्काराची होती.

सरकारचा एक सभासद आपल्या सहकाऱ्याबरोबर अस्खलीत वाद घालीत होता. थंड क्रोधाने कालेदिनने त्यांना अडवले.

" सभ्यगृहस्थ हो, थोडक्यात आवरा ! वेळ संपत आल्येय ! अती बोलण्यानं रशियाचं वाटोळं झालय. मी अर्धा तास सुट्टी जाहीर करतो. बोलून घ्या न् . . . न् . . . . शक्य तेवढ्या लवकर संपवून टाका."

तो आपल्या खोलीकडे निघून गेला. बाकीच्यांनी लहान लहान कोंडाळी केली व ते हळूहळू बोलत होते. कुणीतरी शेरा मारला की कालेदिन आजारी आजारी वाटतोय. ती अर्धवट कुजबूज खिडकीजवळ उभ्या असलेल्या बोगाएव-स्कीच्या कानी पडली.

" अलेक्सि माक्सिमोविचच्या दर्जाच्या माणसाला आत्महत्त्या हा एकच बाहेर पडायचा मार्ग आहे."

बोगाएवस्की दचकला आणि झपाट्याने कालेदिनच्या खोलीकडे चालता झाला. थोड्याच वेळात आतामानच्या बरोबर तो परतला. सत्ता अधिकृतरीत्या सोडून देणारा जो दस्तैवज त्यांनीं तयार केला होता तो सुपुर्द करण्यासाठी नगर-ड्यूमाशी चार वाजता संयुक्त बैठक घेण्याचे त्यांनी ठरवले. कालेदिन उठून उभा राहिला. बाकीचे त्याच्या मागोमाग गेले. सरकारच्या ह्या जरा वृध्द सदस्याचा निरोप घेताना कालेदिनच्या दृष्टीला पडले की यानोव कारेवबरोबर कुजबुजत आहे.

" काय आहे ?" त्याने विचारले. यानोव जरा अवघडूनच जवळ आला.

" सरकारी सभासद – बिगर कझाक – प्रवासखर्च मागताहेत." आठ्या घालून कालेदिन कडक स्वरात म्हणाला, "माझ्याजवळ पैसा नाही . . . . ह्या सगळ्याचा मला वीट आलाय."

बोगाएवस्कीच्या कानी हे संभाषण पडले होते. ते जाताना त्याने याकोवला खूण केली.

" माझ्या खोलीकडे ये. स्वेतोझारोवला म्हणावं पडवीत थांब "

कालेदिनच्या मागोमाग ते लगोलग बाहेर पडले. खांदे पाडून कालेदिन तरतरा चालता झाला.

आपल्या खोलीत बोगाएवस्कीने याकोवच्या हाती नोटांचे एक पुडके दिले.

" चौदा हजार आहेत. त्या लोकांना देऊन टाक. "

पडवीत यानोवची वाट बघत थांबलेल्या स्वेतोझारोवने ते पैसे घेतले, त्याचे आभार मानले आणि तो दाराकडे गेला.

दारवानाकडून यानोव आपला फर्गोल घेत होता एवढ्यात जिन्यावर गोंगाट झाल्याचे त्याच्या कानी आले आणि त्याने वळून पाहिले.

कालेदिनचा नकीब मोकदावस्की धावत जिना उतरत होता.

" डॉक्टर बोलवा, लौकर ! "

आपला फर्गोल टाकून देऊन यानोव त्याच्याकडे धावला. ड्यूटीवर असलेला नकीब आणि पडवीत गर्दी केलले अडली ह्यांनी मोलदाव्स्कीला घेरले.

" काय झालं ?" गोरामोरा होत यानोवने विचारले.

" अलेक्सी माक्सिमोविचनी गोळी झाडून घेतल्येय. " मोलदाव्स्की स्फुंदत कठड्यावर कोसळला.

बोगाएवस्की धावत वर गेला. हिव भरल्यासारखे त्याचे ओठ थरथरत होते.

" काय झालं ? काय ?"

एकमेकांना धक्काबुक्की करीत तो घोळका जिन्यावरून वर धावत गेला. धावणारांच्या पायाचे आवाज जिन्यावर सुरेल वाजत होते. बोगाएवस्की धापा टाकीत आकडी आल्याप्रमाणे आवंढे गिळत होता.

सर्वांच्या आधी तो तिथे पोचला. धाडकन् त्याने दार उघडले. चाफेखणीतून तो अभ्यासिकेत धावला. अभ्यासिका आणि त्याला लागून असणारी लहान खोली ह्यांच्या मधला दरवाजा सताड उघडा होता.

तिखट करडा धूर आणि बारुदाचा वास हवेत रेंगाळला होता.

"ओह ! ओह ! आई ग ऽ ! अल्योशा – लाडक्या !" कालेदिनच्या बायकोचा तुटक, भयंकर, न ओळखू यावा असा आवाज ऐकू आला.

फास लागल्यागत आपली गळपट्टी बोगाएवस्कीने ओरबडून उघडली. कारेव खिडकीवर झुकला होता. त्याच्या बोटांनी खिडकीचा मुलामा केलेला गोल पकडला होता. त्याच्या खांद्याची पाती कोटाखाली गदगदा हालत होती. पुनःपुन्हा तो जबरदस्त थरारत होता. जवळच असलेल्या एका वयस्कर माणसाने जनावरासारखे भेसूर भोकाड पसरले. त्याने बोगाएवस्कीच्या खालचा आधारच सुटल्यासारखा झाला.

कालेदिन आपल्या कॅम्पकॉटवर पडला होता. त्याने छातीवर हातांची घडी घातली होती. त्याचे डोके किंचित भिंतीकडे कलले होते. उशीच्या पांढऱ्याशुभ्र अभ्र्यावर दमट निळसर कपाळ टेकलेले होते आणि त्यावर विसावलेला गाल विरोधाभासाने उठून दिसत होता. दिवास्वप्न बघत असल्यागत त्याचे डोळे अर्धोन्मिलित होते. त्याच्या उग्र मुखाचे कोपरे वेदना व्यक्त करावी असे पिळवटले होते. त्याच्या पायाशी त्याची बायको तडफडत होती. तिचा आक्रोश उन्मत्त आणि भेदक होता. बिछान्यात कोल्ट पिस्तूल पडले होते. लालगर्द पातळ धार सदऱ्यातून ओघळून पिस्तुलाला व्यापून गेली होती.

झोकांड्या खात बोगाएवस्की झटकन गुडघ्यावर बसला. आणि कालेदिनच्या उष्ण मृदू छातीला त्याने कान लावला. पुरुषी घामाचा उग्र आंबूस वास त्याला आला. कालेदिनचे काळीज स्तब्ध होते. बोगाएवस्कीचे पंचप्राण त्या क्षणी कानात एकवटले होते. पण त्या कानांना ऐकू येत होती फक्त मनगटी घड्याळाची टिकटिक . . . मृत आतामानच्या पत्नीचे घोगरे गुदमरलेले हुंदके आणि कावळ्यांची अशुभ शोकाची कावकाव !

------




# १६

शुध्दीवर आल्यावर बुनचुकच्या नजरेला पहिले दृश्य दिसले ते म्हणजे आसू आणि हसूने चमकणाऱ्या आन्नाच्या काळ्या डोळ्यांचे.

तीन आठवडे त्याला वात झाला होता. तीन आठवडे एका वेगळ्या असंवेद्य, अफलातून जगात तो भटकत होता. २४ डिसेंबरच्या संध्याकाळी तो भानावर आला. गंभीर, गढूळ डोळ्यानी आन्नाकडे टक लावून बघत तो तिच्याशी संबंधित सर्व गोष्टी आठवण्याचा प्रयत्न करीत होता. पण त्याला फक्त काही भाग तेवढाच आठवत होता. अलीकडे घडलेले बरेच काही अद्याप त्याच्या स्मृतीत खोलवर दुराराध्यपणे लपून राहिले होते.

" प्यायला दे . . . " दूरवरून यावा असा स्वतःचाच आवाज त्याला ऐकू आला. आणि त्याची मौज वाटून त्याने स्मित केले. आन्ना लगबगीने त्याच्या जवळ आली. आवरून धरलेल्या अंतर्गत स्मिताने तिचे मुख उजळून गेले होते.

" माझ्या हातानं पी !" असे म्हणून तिने कप धरण्यासाठी पुढे केलेला त्याचा निर्जीव हात बाजूला केला.

डोके वर उचलण्यासाठी सायास पडल्याने थरथरत तो पाणी प्याला आणि श्रमून त्याने मागे उशीवर अंग टाकले. भिंतीकडे टक लावून तो बघत होता. त्याला काहीतरी बोलायचे होते, पण त्याच्या अशक्तपणाने मात केली आणि त्याला गुंगी आली.

जागा झाल्यावर परत त्याच्या दृष्टीला प्रथम दिसले ते आन्नाचे सचिंत नेत्र. नंतर दिव्याचा केशरी उजेड आणि छताच्या मोकळ्या तक्तपोशीवर त्या दिव्यानं पडलेली वर्तुळे त्याच्या दृष्टीला पडली.

" आन्ना, इकडं ये !"

त्याच्या जवळ जाऊन तिने त्याचा हात हातात घेतला. त्याने क्षीणपणे तो हात दाबला. तिने विचारले,

" आता कसं वाटतय ?"

" माझी जीभ कुणातरी दुसऱ्याची आहे. माझं डोकं कुणातरी दुसऱ्याचं आहे. तसेच माझे पाय. मला वाटतंय की माझ्या वयाला दोनशे वर्ष झालीत." प्रत्येक शब्द तो निगुतीने उच्चारत होता. थोडा वेळ गप्प राहून त्याने विचारले, " मला टायफस झाला होता ?"

" होय !"

त्याचे डोळे खोलीत भिरभिरले आणि त्याने अस्पष्टपणे विचारले, "आपण कुठं आहोत ?"

त्याचा प्रश्न जाणून तिने स्मित केले.

" त्सारत्सिन मध्ये !"

" न् तू . . . तू इथं कशी ?"

" मी तुझ्याबरोबर राहिले. " आणि स्वतःचे समर्थन करण्यासाठी किंवा त्याच्या काही अव्यक्त विचारांना बगल देण्यासाठी ती चटकन् म्हणाली,

" अगदीच अनोळखी माणसात तुला सोडून जाणं आम्हाला शक्य नव्हतं. म्हणून आब्रामसोन न् समितीच्या साथींनी मला तुझी काळजी घ्यायला सांगितलं . . . . तेव्हा अगदी अचानकच मला तुझी सुश्रुषा करावी लागली. "

नजरेने आणि क्षीण हातावाऱ्यांनी त्याने तिचे आभार मानले.

" न् ऋुतोगोरोव ?"

" वोरोनेझवरून तो लुगान्स्कला गेलाय. "

" ग्येवोरकियान्त्स ?"

" तो , . . टायफसनं गेला. "

ते दोघंही गप्प राहिले. जणू काही मृतात्म्याला ते श्रध्दांजली वाहत होते.

" तुझी मला भीती वाटत होती. तू फार आजारी होतास !" ती हळूच म्हणाली.

" बोगोवोई ?"

" त्या सगळ्यांशी माझा संबंध तुटलाय्. त्यातले काही कामेनस्कायाला गेले. पण तू बोलत राहिलास तर ते बराय का ? तुला दूध घ्यायचंय ?"

बुनचुकनं मान हलवली. कष्टाने जीभ रेटीत तो पुढं विचारीत राहिला,

" आब्रामसोन ?"

एका आठवड्यामागं तो वोरोनेझकडं गेला. "

तो कसाबसा कुशीला झाला. त्याचे डोके गरगरले आणि डोळ्यात रक्त उसळून येऊन त्याला वेदना झाल्या. कपाळावरील तिच्या तळव्याचा थंड स्पर्श जाणवून त्याने डोळे उघडले. एक प्रश्न त्याला छळत होता. आपण बेशुध्द होतो मग आपले शरीरधर्म कुणी सांभाळले ? हिने नक्कीच नाय. त्याच्या गालावर अंधूक लाली आली आणि त्याने विचारले,

" तुला एकटीलाच माझं सगळं करावं लागलं ?"

" होय. "

भिंतीकडे तोंड वळवून तो पुटपुटला, " शरम वाटली पाहिजे त्यांना. उंदरं साली. सगळं तुझ्यावर सोडून गेले . . . . "

तापामुळे त्याच्या ऐकण्यात थोडी बहिरेपणाची गुंतागुंत झाली होती. त्सारित्सीन पक्ष समितीने पाठविलेल्या डॉक्टरांनी आन्नाला सांगितले की, तो पूर्णपणे बरा झाला म्हणजेच हा दोष दूर करणे शक्य होईल. त्याची प्रगती मंदगतीने होत होती. त्याला लांडग्यागत खा खा सुटे. पण आन्नाने त्याचे खाणे कडकपणे नेमून दिले होते. ह्या मुद्यावरून त्यांची अनेकदा भांडणे होत.

" मला आणखी थोडं दूध दे ?" तो मागायचा.

" आणखी तुला सोसायचं नाय. "

" मेहेरबानी कर . . . मला आणखी थोडं दे. मी भुकेनं मरावंसं तुला वाटतं ?"

" इल्या, तुला ठाऊकाय की, ठरल्यापेक्षा जास्त मी तुला काही देता कामा नाय !"

मग तो दुखावल्यासारखा गुळणी धरून बसायचा. तोंड भिंतीकडे फिरवायचा. सुस्कारा सोडायचा. बोलणे सोडून द्यायचा. त्याच्यासाठी तिचा जीव कळवळायचा

पण ती माघार घ्यायची नाही. थोड्या वेळाने तो परत कुशी पालटायचा. त्याचा चेहरा दुर्मुखलेला, जास्तच दुःखी दिसायचा. तो काकुळतीने म्हणायचा,

"थोडी खारवलेली कोबी नाय का मिळणार मला ? आन्ना, लाडके, मेहेरबानी करून . . . ऐक तरी . . . मला ते मानवायचं नाय, ह्या सगळ्या डॉक्टरांच्या भाकडकथा आहेत."

पण त्याला नेहमी निग्रहाचा नकार ऐकावा लागे. मग कधी कधी कठोर उद्‌गारांनी तो तिच्या वर्मी घाव घालायचा :

"माझी अशी फजिती करायचा तुला काय हक्क नाय. मी स्वत: मालकिणीला बोलावून सांगन. तू निष्ठूर न् निर्दय बाई आहेस. तुझा तिटकारा यायला लागलाय मला."

"तुझी शुश्रुषा करण्यात मी जे भोगलं त्याचं फार चांगलं बक्षिस मिळतंय मला." तिचाही संयम सुटायचा.

"मी काय तुला सांगितलं नव्हतं माझ्याबरोबर थांब म्हणून. मला असे टोमणे हाणणं चांगलं नाय. स्वताच्या जागेचा तू फायदा करून घेत्येयस. ठीकाय ! नको देऊ मला काय पण ! मरू दे मला ! फारसं बिघडत नाय मेलो म्हणून !"

तिचे ओठ थरथरत पण ती स्वत:ला आवर घालून धीमेपणाने सगळे सहन करायची. त्याची समजूत घालायची. पण एकदा जादा जेवणावरून त्यांचे भांडण झाले तेव्हा त्याच्या डोळ्यात तरळणारे अश्रू पाहून तिचे अंत:करण पिळवटून गेले. "अगदी अगदी पोर आहेस बघ !" असे म्हणून ती धावत स्वयंपाकघरात गेली आणि थाळीभरून वडे घेऊन आली.

"खा – खा – लाडक्या इल्या ! आता रागावू नको. हा जास्तीचा छानपैकी वडा घे !" थरथरत्या बोटांनी तिने एक वडा त्याच्या हातात कोंबला.

बुनचुकला अनावर यातना झाल्या. तो वडा नाकारण्याचा त्याने प्रयत्न केला. पण त्याच्याने टिकाव धरवला नाही. आपले अश्रू पुसून तो उठून बसला. आणि तो वडा त्याने खाल्ला. दाढी वाढलेल्या त्याच्या खप्पड चेहऱ्यावर ओशाळवाणे हास्य पसरले. आपल्या डोळ्यांनी क्षमायाचना करीत तो म्हणाला,

"पोरापेक्षा मी वाईटाय. हे बघ अगदी रडू आलं मला . . ."

त्याची भयंकर हाडाडलेली मान, त्याच्या खुल्या सदऱ्याच्या गळपट्टीतून दिसणारी त्याची खोल गेलेली फांसळ्या दिसणारी छाती. हाडुकलेले त्याचे दंड

इकडे तिने पाहिले. गाढ प्रेमाने आणि अनुकंपेने व्यथित होऊन तिने प्रथमच भावडेपणाने आणि कोवळीकीने त्याच्या सुकलेल्या, पिवळ्या पडलेल्या कपाळाचा मुका घेतला.

पंधरवड्यानंतरच तो खोलीतल्या खोलीत आधार न घेता हिंडू लागला. त्याचे काड्या झालेले पाय डगमगत होते. चालायचे त्याला शिकावे लागले.

" बघ आन्ना ! मी चालू शकतो ! " तो उद्गारला. आणि जास्त जलद चालण्याचा त्याने प्रयत्न केला. पण त्याच्या पायांना देहाचा भार पेलला नाही आणि पायाखालून धरती निसटू लागली. मिळालेल्या पहिल्याच आधारावर टेकून त्याने म्हाताऱ्या माणसागत स्मित केले. त्याच्या चकचकीत गालांची कातडी सुकुत्यांनी आकसली. लहानसे केकाटते हास्य करुन आणि प्रयत्नांनी शिणून तो गादीवर कोसळला.

त्यांच्या खोल्या धक्कयाला लागूनच होत्या. खिडकीतून त्यांना वोल्गाचा हिमशुभ्र विस्तार दृष्टीला पडत होता. त्यापलीकडे रानाची गर्द अर्धवर्तुळे पसरली होती. दूरवरच्या शेतांच्या मृदु आंढुळत्या रेषाकृती दिसत होत्या. आपल्या जीवनात घडून आलेल्या विलक्षण आणि तुफान स्थित्यंतरावर विचार करीत आन्ना अनेकदा खिडकीजवळ उभी रहायची. बुनचुकच्या आजाराने एका विलक्षण प्रकारे त्यांना एकमेकांच्या अगदी निकट आणले होते.

प्रथम लांबच लांब आणि जिकिरीचा प्रवास करून ते त्सारित्सिनला आले तेव्हा रडू कोसळावे असे तिचे जीवन भाराक्रांत आणि दुःखी होते. प्रेमिकाबरोबर जगण्याच्या दुसऱ्या बाजूचे इतके जवळून आणि उघडेनागडे दर्शन ह्यापूर्वी तिला कधीही घडलेले नव्हते. दात घट्ट आवळून तिने त्याचे अंथरूण बदलेले होते. त्याच्या तापलेल्या डोक्यातील उवाकिडे काढले होते. त्याचा अवजड देह तिने धडपडत उचलला होता· त्याचे हाडाडलेले नागडे पुरूषी शरीर, लाडक्या प्राणांची ज्यात जेमतेम धुकधुकी होती ते शरीराचे आवरण इकडे चोरटा दृष्टिक्षेप करताना तिचा थरकाप उडून तिला किळस वाटली होती. तिच्या सर्वस्वाने उठावणी करून बंड पुकारले होते, पण खोलवर आणि निष्ठेने जोपासलेली भावना बरपांगी गलिच्छतेने चिरडली जाऊ शकत नव्हती. त्या शक्तिशाली हुकमतीने आपल्या वेदना आणि दुर्बोधता ह्यांच्यावर मात करायला तो शिकली होती. अखेर शवटी उरली ती . . .

अनुकंपा आणि पुनः पुन्हा पृष्ठभागी झेपावणारी आर्द्र करणारी प्रेमाची धारा.

एकदा बुनचुकने तिला विचारलें,

" हे सगळं झाल्यानंतर तुला माझा तिटकारा बसला असलं नाय का ?"

" ती कसोटी होती !"

" कशाची ? स्वतावर ताबा ठेवण्याची ?"

" नाय. माझ्या भावनांची !"

त्याने तोंड फिरवले आणि आपल्या ओठांची थरथर त्याला किती वेळ तरी आवरता आवरेना. परत त्यांनी हा विषय काढला नाही. शब्द फुकाचे आणि रंगहीन ठरले असतें.

जानेवारीच्या मध्याला त्यांनी वोरोनेझकडे प्रयाण केले.

--------




# १७

१६ जानेवारीच्या संध्याकाळी बुनचुक आणि आन्ना वोरोनेझला पोचली. तिथे त्यांनी दोन दिवस काढले. नंतर त्यांना समजले की, डॉन क्रांतिकारक समिती आणि तिच्या सैन्याला कालेदिनच्या फौजेने कामेनस्कायातून पिटाळून लावले आहे. तेव्हा ते त्या सैन्याच्या पाठोपाठ मिलेरोवोला गेले.

मिलेरोव जिवंत आणि लोकांनी गजबजलेले होते. बुनचुक तिथे फक्त काही तास थांबला आणि पुढील गाडीने त्याने ग्लुबोकायाला प्रयाण केले. दुसऱ्या दिवशी त्याने मशिनगन तुकडीची नायकी परत आपल्याकडे घेतली. त्याच्या दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने लढाईत भाग घेतला. त्या लढाईची अखेर चेर्नेत्सोवच्या सैन्याच्या पराभवात झाली.

चेर्नेत्सोवचा धुव्वा उडवल्यानंतर बुनचुकला अनपेक्षितपणे आन्नाला सोडून जावे लागले. एक दिवस सकाळी सदर ठाण्यावरून ती क्षुब्ध अवस्थेत आणि काहीशा दुःखाने धावत आली.

" तुला ठाऊकाय ? आब्रामसोन इथाय. त्याला तुझी तातडीनं भेट घ्यायचीय. आणखी एक बातमी . . . मी आज जाणाराय . . . ! "

" कुठे ? " त्याने चकित होऊन विचारले.

" आब्रामसोन, इतर काही साथी न् मी लुगान्स्कला प्रचाराच्या कामाला जाणारोत. "

" तर काय आमच्या तुकडीला सोडून चालल्येस ? "

ती हसली आणि आपले लालबुंद मुख त्याच्या छातीवर तिने दाबून धरले.

" सरळ सांग ! मी ' तुकडी, सोडून चालल्येय म्हणून तुला दुःख होत नाय, ' तुला ' सोडून जात्येय म्हणून तुला दुःख होतंय. पण हे काही दिवसापुरतंचाय ! तुझ्या जवळ राहण्यापेक्षा त्या कामात माझा जास्त उपयोग होईल. मशिनगनपेक्षा प्रचाराचं काम मला जास्त जमणाराय. " त्याच्याकडे बेरडाच्या नजरेने बघत ती पुढे म्हणाली, " अगदी बुनचुकसारख्या मुख्यी सेनानीच्या हाताखाली काम करण्यापेक्षा सुध्दा . . . ! "

थोड्या वेळाने आब्रामसोन आला. नेहमीसारखा तो तडफडीत, उतावीळ आणि उत्साहाने रसरसलेला होता. त्याच्या काळ्याकुट्ट केसातील पांढरा झुबका नेहमीसारखाच झळझळीत होता. बुनचुकला पाहून त्याला मनापासून आनंद झाला.

" परत उठलास ? शाबास ! आम्ही आन्नाला परत आमच्या बरोबर घेऊन जातोय " मनकवडेपणानं डोळे किलकिले करून त्याने विचारले, " तुझ्या-कडून काय हरकत नाय ना ? काय नाय ? छान ! मी एवढ्याचसाठी विचारीतलं की त्सारित्सिनमधे तुम्हा दोघांची मैत्री जमली होती."

" तिला सोडताना मला खेद होतोय हे मी नाकारू शकत नाय ! " असे म्हणून बुनचुकने कसनुसे खिन्न स्मित केले.

" वाईट वाटतंय ? हां . . . . समजलो . . . . आन्ना ऐकलस ना ?"

त्याने खोलीत येरझारा घातल्या. वाटेत एका ट्रंकेमागे असलेली धूळभरली कादंबरी उचलली मग अंगाला झटका देऊन तो जायला निघाला.

" तू लौकर तयार होशील ना आन्ना ?"

" तू जा मी आलेच एका मिनिटात," ती जिथं कपडे बदलीत होती त्या पडद्याआडून तिने उत्तर दिले. ती बाहेर आली तेव्हा तिने सैनिकाची खाकी चपकन चढवून कमरेला कातडी पट्टा आवळला होता. त्याचे खिसे तिच्या वक्षःस्थळांच्या किंचित वर गेले होते. तिच्या जुन्या काळ्या स्कर्टला जागोजाग ठिगळे लावलेली होती पण तो अगदी सुस्वच्छ होता. तिने नुकतेच केस धुतले होते. त्यामुळे ते पिसारून अंबाड्यातून सुटले होते. तिने अंगावर फर्गोल चढवला आणि बुनचुकला एक प्रश्न विचारला पूर्वीचा अवखळपणा तिच्या आवाजातून निघून गेला होता. त्या आवाजात आता उदासीनता आणि विनवणी होती.

" आजच्या हमल्यात तू भाग घेणारायस ?"

" म्हणजे ? अर्थात घेणाराय. तुला काय वाटतं मी इथं रिकामटेकडं बसून रहावं ?"

" मी फक्त विचारलं . . . हे बघ. जपून ! माझ्यासाठी ! अं ? मी तुला लोकरी मोजांचा एक जास्तीचा जोड ठेवून जात्येय. सर्दी होऊन देऊ नकोस. पाय कोरडे राहतीलसं बघ. मी तुला लुगान्स्कहून पत्र पाठवीन. "

तिच्या डोळ्यातील चमक एकाएकी मंदावली. त्याचा निरोप घेताना तिने कबूल केले,

" बरं का, तुला सोडून जाताना फार यातना होतायत. लुगान्स्कला मी जायचं म्हणून आब्रामसोननं जेव्हा सुचवलं तेव्हा मला आनंद झाला होता. पण आता वाटतं की तिथं तुझ्याशिवाय सगळं सुनाय ! . . . काही असो. येते मी !"

तिने घेतलेल्या निरोपात एक थंड भावनानिग्रह होता पण आपला निर्धार कोसळेल अशी तिला भीती वाटत होती. हे त्याने ओळखले.

तिला निरोप देण्यासाठी तो दरवाजापर्यन्त गेला. खांदे हलवीत, लगबगीने, मागे वळून न बघता ती चालती झाली. तिला परत हाक मारून बोलवावे असे त्याला वाटत होते पण अखेरीस निरोप घेताना तिच्या डोळ्यातील आर्द्र चमक त्याच्या लक्षात आली होती. तेव्हा आपल्या इच्छेला आवर घालून तो नाटकी उत्साहाने ओरडला,

" रोस्तोवला भेटशीलशी आशा करीतो. नीट रहा आन्ना !"

तिने मुरडून त्याच्याकडे दृष्टीक्षेप केला आणि आपल्या पावलांची गती वाढवली.

ती निघून गेल्यावर बुनचुकला अचानक आपल्या एकाकीपणाची भयंकर जाणीव झाली. तो घरात परत वळला पण तात्काळ घराला आग लागल्याप्रमाणे त्याने बाहेर धाव घेतली. तिथल्या प्रत्येक गोष्टीतून ती प्रकट होत होती. प्रत्येक वस्तूवर तिचा गंध राहून गेलेला होता. विसरलेला हातरुमाल, सैनिकाचे तोसदान, तांब्याचे टमरेल – तिच्या हातांचा स्पर्श झालेले सगळे !

विलक्षण काळजी आणि आपल्यापासून काहीतरी तोडले गेले आहे ही भावना ह्यांचा अनुभव घेत बुनचुक रात्र पडेपर्यन्त खेड्यात भटकत होता. आपल्या नवीन परिस्थितीचा सराव करून घेणं त्याला जमेना.

रेडगार्डस् आणि कझाकांच्या चेहऱ्याकडे तो भकासपणे बघत होता. त्यातल्या काही चेहऱ्यांना तो ओळखत होता आणि इतर अनेक चेहऱ्यांना त्याची ओळख

होती. युध्दाच्या वेळी त्याच्याबरोबर फौजेत असणाऱ्या एका कझाकाने त्याला थांबवले. तो माणूस त्याला ओढून आपल्या घरी घेऊन गेला. अनेक रेडगार्डस् आणि खलाशाबरोबर पत्ते खेळण्यात त्याला सामील व्हायला त्याने बोलावले. तंबाखूच्या धुराने घेरलेली ती माणसे सटासट् पत्ते आपटीत होती. ' केरेन्स्की रूबलच्या' आपल्याजवळच्या नोटा सळसळवीत होती. सतत शिव्या देत, आरडाओरड करीत होती. बुनचुकला मोकळचा हवेची तळमळ लागून राहिली आणि तो बाहेर पडला. एका तासाने हमल्यात त्याला भाग घ्यायचा होता हे त्याच्या पथ्यावर पडले.

------

## १८

कालेदिनच्या निधनानंतर नोवोचेरकास्क इथे २९ जानेवारी ह्या दिवशी 'लष्करी परिषद' बोलवण्यात आली. ( परिषदेचे नाव मालीए असे होते.) ह्या परिषदेने जनरल नाझारोवना प्रांतिक आतामान नेमले. काही थोडे प्रतिनिधी तेवढे हजर होते. ते बहुतेक दक्षिणेकडील जिल्ह्यातील खेड्यांचे होते. ह्या रोडावलेल्या परिषदेने पाठिंब्याचे आश्वासन दिल्यावर नाझारोवने अठरा ते पन्नास वर्षापर्यंत वयाच्या सर्व कझाकांची लष्करभरती पुकारली. कझाकांना धमकावण्यात आले. हुकुमाची तामिली करण्यासाठी खेड्यातून सशस्त्र तुकड्या रवाना करण्यात आल्या तरी कझाकांनी नाखुषीनेच आज्ञापालन केले.

ज्या दिवशी 'मालीए' परिषदेने आपले काम सुरू केले त्याच दिवशी कर्नल तात्सिनच्या हाताखालील ६ वे डॉन कझाक रेजिमेंट बोल्शेव्हिक सैन्याचे कडे फोडून आणि लढत, वाट काढीत रूमेनियन आघाडीवरून नोवोचेरकास्कमधे चालून आले. येकातेरिनोस्लाव पासून रस्त्यात अनेक जागी ह्या रेजिमेंटची हडलहप्पी करण्यात आली होती पण तरी सुध्दा आपल्या अंमलदारानिशी आपल्या पूर्ण संख्याबळाने ते दाखल झाले.

ह्या रेजिमेंटचे समारंभाने स्वागत झाले. कॅथेड्रल चौकात उपकारस्तुतीची प्रार्थना झाली. आपली उत्कृष्ट लष्करी शिस्त टिकवल्याबद्दल आणि डॉनच्या बचावासाठी आपली हत्यारे घेऊन आल्याबद्दल प्रार्थनेनंतर जनरल नाझारोवनी कझाकांचे आभार मानले.

लवकरच हे रेजिमेंट सुलीन रेल्वे स्टेशनाजवळील आघाडीवर रवाना करण्यात आले आणि नोवोचेरकास्कला बातमी आली की, बोल्शेव्हिक प्रचाराच्या प्रभावाखाली ह्या रेजिमेंटने आपल्या ठाण्यावरून आपखुषीने माघार घेतली आणि लष्करी सरकारचा बचाव करायला नकार दिला.

कृती करण्याला परिषद दुबळी होती. सगळ्यांना असे वाटत होते की, बोल्शेव्हिकाविरूध्द लढ्याचा निष्कर्ष लिहून ठेवलेला आहे. उत्साही आणि उमदा असणारा नाझारोव परिषदेच्या बैठकीत वेदनायुक्त चिंतनात गढून गेल्यासारखा हातात डोके धरून बसला होता.

कुजलेल्या खांबाप्रमाणे शेवटच्या आशा कोसळत होत्या. तिखोरेत्स्कायाच्या आसमंतात तोफखान्याचा धमामा ऐकूही येऊ लागला होता. अशी अफवा पसरली होती की, कोर्नेट आवतोनोमोवच्या हाताखालची 'लाल' कझाक सेना त्सारित्सिनहून रोस्तोववर चाल करून येत होती. दोन्ही अंगांनी अग्येलीत सापडलेल्या कॅप्टन चेर्नोवच्या व्हाइटगार्ड तुकडीने रोस्तोवकडे माघार घेतली. गावात राहणे धोक्याचे आहे हे जाणून कोर्निलोवनी ९ फेब्रुवारीच्या दिवशी माघार घेण्याचे ठरवले.

सबंध दिवसभर तेमेरनिक विभागातील कामगारांनी स्टेशनावर आणि अंमलदारांच्या गस्तीवर आडून गोळीबार चालवला होता. संध्याकाळच्या सुमारास रोस्तोवहून सैन्याचे एक मोठे पहाळ बाहेर पडले. मुरडत जाणाऱ्या एकाद्या काळ्या पुष्ट सर्पाप्रमाणे ते पहाळ डॉनकाठी पसरले आणि आक्साईकडे सरपटत निघाले.

मधूनच क्वचित विद्यार्थ्यांचे फिक्या रंगाच्या बटणांचे लांबकोट दिसत होते. पण बहुतेकजण सैनिकी आणि अंमलदाराच्या गणवेशात होते. कॅप्टनस् आणि कर्नलसच्या हाताखाली त्यांच्या पलटणी होत्या. पायतोंगापासून कर्नलपर्यन्त सगळ्या हुद्यांचे कॅडेटस् आणि अंमलदार रांगातून होते. सामान–सुमानाच्या गाड्यांच्या तांड्यामागे निर्वासितांचे घोळके होते. लांबकोट आणि वर जोडे घातलेली नेटक्या वेषातील वयस्कर पुरूष माणसे आणि उंच टाचांचे जोडे घातलेल्या बायका . . . त्यांच्या त्या उंच टाचा बर्फात खोलवर रूतत होत्या.

एका कोर्निलोव पलटणीत कॅप्टन येवगेनी लिस्तनिस्तकी होता. त्याच्या बाजूने रांगेतून एक तरतरीत खड्या लष्कराचा अंमलदार स्टाफ कॅप्टन स्तराबेलस्की सुवोरोव ग्रेनाडियर्सचा पायतोग बचागोव आणि तोंडाचे बोळके झालेला आणि म्हाताऱ्या कोल्हयागत पिकत चाललेल्या लाल केसांचा लेफ्टनंट कर्नल लवीचोव हे चालले होते.

संध्याछाया जमू लागल्या. हवेत गोठवणी होती. डॉनच्या मुखातून दमट खारा वारा वाहत होता. अंगवळणी पडलेल्या ठामपणे लिस्तनिस्तकी त्या घुसळल्या बर्फातून धीमी पावले टाकीत चालला होता. त्या कंपनीच्या अंगावरून पुढे जाणाऱ्याची तोंडे निरखून बघत होता.

कॅप्टन नेझेनत्सेव आणि रखवाली फौजेतील कर्नल कुत्योपोव बाजूच्या रस्त्याने पुढे गेले. प्रीअब्रझेन्स्की रेजिमेंटचा पूर्वी कमांडर असणाऱ्या कुत्युपोवच्या कोटाचे पांख त्याची बटणे तुटून वाऱ्यावर फरफरत होते. टोपी डोक्यावर मागे सरकली होती. लोवीचेवने नेझेन्सेवला हाक मारली.

कुत्युपोवने गर्दन फिरवली. त्याचा चेहरा थोराड, बैलासारखा होता. काळचा डोळ्यांच्या दरम्यानचे अंतर ठसठशीत होते आणि दाढी रूंद, छाटीव होती. नेझेनत्सेवनेही खाद्यावरून मुरडून हाक आलेल्या दिशेने पाहिले.

" पहिल्या कंपनीला चाल जरा वाढवायला सांगा. आम्ही गोठून जाऊ. आधीच आमचे पाय भिजलेत न् या वेगानं कूच करायचं म्हणजे . . . "

" हा आचरटपणाय् ! " स्ताराबेलस्की कर्कश आवाजात गरजला.

त्याला उत्तर न देता कुत्युपोवशी वाद घालीत नाझेन्त्सेव पुढं चालू लागला. थोडयाच वेळात जनरल अलेक्सिएवने त्यांना गाठले. दोन काळचा घोडयांच्या टापांनी बर्फाचा फवारा उधळीत ती गाडी पुढे गेली. थंडीचे निवारण करण्यासाठी आपल्या जागेवर अलेक्सिएव कलते बसले होते. वाऱ्याने त्यांचा चेहरा लाल पडला होता आणि त्यांच्या मिशा भुवयांची शुभ्रता त्यातून उठून दिसत होती. त्यांच्या परिचित चेहऱ्याकडे पाहून अंमलदारांनी स्मित केले.

जाम तुडवल्या गेलेल्या रस्त्यावर जिकडे तिकडे पिवळी डबकी दिसत होती. चालणे जिकिरीचे झाले होते. पावले निसटत होती. दमटपणा बुटातून आत शिरत होता. चालता चालता लिस्तनिस्तकी त्याच्या पुढे चाललेल्या माणसांचे संभाषण ऐकत होता. लोकरी कुडते आणि साधी कझाक मेंढकातडी टोपी घातलेला अंमलदार आपल्या गेंगाण्या आवाजात म्हणत होता,

" पाहिलंत लेफ्टनंट ? राज्य ड्यूमाचे अध्यक्ष न् म्हातारे झालेले . . . त्यांना पायी जावं लागतंय . . . "

" रशिया मसणात चाललाय . . . "

खोकता खोकता कुणीतरी कुत्सितपणे म्हटले, " मसणवट खरीच . . . फरक एवढाच की फरसबंदी ऐवजी बर्फाय न् भरपूर थंडी . . . "

" रात्र कुठं काढायची कुणाला ठाऊकाय का मंडळी ?"

" एकातेरिनोदारला. "

" होय आठीवतं मला. एकदा प्रशियात असंच कूच केलंत. "

" कुबान आपलं कसं स्वागत करतील . . .? काय . . . ? हां . . . हां . . . अर्थात . . . तिथं वेगळीच परिस्थिती असणार . . . "

" चुट्टाबिट्टा आहे का फुंकायला ?" लेफ्टनंट गलावाचेवने लिस्तनिस्तकीला विचारले.

त्या माणसाने हातमोजे काढून लिस्तनिस्तकीने दिलेला चुट्टा घेतला. त्याचे आभार मानले आणि सैनिकाच्या रिवाजाप्रमाणे हातात नाक शिंकरून कोटाला बोटे पुसली.

" लोकशाहीचे शिष्टाचार शिकून घेताय लेफ्टनंट." लेफ्टनंट कर्नल लोविचेव हसून कुत्सितपणे म्हणाले.

" माणसाने हे शिकले पायजेत. त्याला काय इलाज नाय. तुम्ही काय करता ? डझनभर हातरूमाल सांभाळून आणलेत वाटतं ?"

लेफ्टनंट कर्नलनी उत्तर दिले नाही. त्यांच्या लालसर, पिकलेल्या मिशावर चिमुकले हिरवे हिमलोलक चिकटले होते. त्यांच्या लांबकोटातून आत शिरणाऱ्या थंडीने कपाळाला आठ्या घालून ते मधून मधून खाकरत होते.

" रशियाचा बहर !" रस्त्यातून खरडत चाललेल्या रांगांकडे अतीव दयेने नजर टाकीत असता लिस्तनिस्तकीच्या मनात आले.

घोडेस्वारांचा एक कंपू त्यांच्या अंगावरून दौडत गेला. त्यात एका धिप्पाड वळू घोड्यावर कोर्निलोव होते. त्यांची पांढरी मेंढकातडी टोपी आणि बाजूला तिरकस खिसे असलेला फिक्कट हिरवा कोट पुढच्या रांगावरून हिंदकळत गेले. त्यांच्या मागोमाग अंमलदारांनी घोगऱ्या आवाजात ' हुर्रा ' म्हणून गर्जना केली.

" माझं कुटुंब नसतं तर ह्या सगळ्याचं काही वाटलं नसतं . . . " लेफ्टनंट कर्नल लोविचेवना उतार वयाचा खोकला आला आणि जणू काही कुणाची तरी सहानुभूती शोधावी अशी तिरपी नजर लिस्तनिस्तकीकडे टाकीत ते म्हणाले, " मी माझं कुटुंब मागं स्मतेन्स्कला सोडून आलोय. माझी बायको न मुलगी. ह्या नाताळात तिला सतरावं सरलं. तुम्हाला ह्याबद्दल काय वाटतं कॅप्टन ?"

" अम् . . . अं . . . . !"

" तुमचंही कुटुंब आहे का ? तुम्ही नोवोचेरकास्कचे ?"

" नाही. मी डॉन प्रांतातला आहे. तिथं माझे वडील आहेत. "

"माझ्याशिवाय त्या सगळ्यांचं कसं काय निभेल काही समजत नाही . .!" . . लोविचोव पुढं बोलू लागले.

स्तरावेलस्कीनी त्यांना अडवून चिडखोर आवाजात म्हटले, "आम्ही सगळेच कुटुंब मागं ठेवून आलोय. तुम्ही का विव्हळत राहिलाय कळत नाही लेफ्टनंट कर्नल ! काय माणसं आहात तुम्ही ! रोस्तोव तुम्ही सोडलं न् सोडलं तरच . . . !"

" कोण स्ताराबेलस्की का ? प्योत्र पित्रोविच, तगानरोगच्या लढाईत तुम्ही होता ना ?" मागच्या रांगांतून कुणी तरी ओरडला.

स्तराबेलस्कीनी वळून पाहिलं आणि त्यांच्या चिडखोर चेहऱ्यावर खिन्न हसू उमटले.

" अरेच्या ! लादिमीर गिओरगिएविच, तुम्ही कसे काय आमच्या पलटणीत? कुणाच्या पावलावर पाउल ठेवून आलात ? हां . . . हां . . . तगानरोगबद्दल तुम्ही विचारीत होता ? . . . हो . . . होतो मी तिथं . . . . काय म्हटलंत ? अगदी बरोबर . . . ! तो मारला गेला ! "

अनवधानाने हे संभाषण ऐकत असता लिस्तनिस्तकीला आपण यागोदनोयेहून केलेले प्रयाण, आपले वडील आणि आक्सिनिया ह्यांची आठवण झाली. एकाएकी तळमळत्या भावनेने त्याचा गळा दाटून आला. चालण्याच्या ठेक्यात हेलावणाऱ्या बंदुकीच्या नळचा आणि बागनटे, मेंढकातडी टोप्या, टोकदार टोप्या आणि फणा-टोप्या यांच्याकडे बघत तो रखडत जात असताना त्याच्या मनात आले,

' ह्या पाच हजार जातीबाह्य माणसापैकी प्रत्येकाची अवस्था माझ्यासारखीच आहे. न् आपल्या अंतःकरणात आमच्यापैकी प्रत्येकजण द्वेषाचा न अमर्याद क्रोधाचा केवढा भार वाहून नेतोय. सुव्वरांनी आम्हाला रशियाच्या बाहेर फेकून दिलंय. त्यांना वाटतंय की इथंही ते आम्हाला चिरडतील. बघू या ! कोर्निलोव अजूनही आम्हाला मॉस्कोला घेऊन जातील !'

त्या क्षणी त्याला कोर्निलोवचे मॉस्कोतील आगमन आठवले आणि त्या दिवसाच्या विचारात तो आनंदाने गढून गेला.

मागेच – कंपनीच्या पिछाडीला बतारी होती. घोडी फुरफुरत होती आणि तोफांचे अराबे खसखडत होते. अगदी घोड्यांच्या घामाचा भपकाराही लिस्तनिस्तकीच्या नाकपुड्यात शिरत होता.

त्या परिचित चाळवल्या वासाने त्याचे डोके मागे वळले. आघाडीचा गाडीवान एक तरणा कारपोरल होता. लिस्तनिस्तकीकडे बघून त्याने ओळखीचे स्मित केले.

रोस्तोवपासून आग्नेयेला काही कोसावर असणाऱ्या ओलगिन्स्काया प्रदेशात ११ मार्चपर्यन्त स्वयंसेवक सैन्याची जमवाजमव करण्यात आली. पुढची हालचाल कोर्निलोवनी लांबवली. कारण ते जनरल पोपोवच्या आगमनाची प्रतिक्षा करीत होते. डॉन कझाक सेनेचे हे नव्याने नेमणूक झालेले आतामान होते. सोळाशे सैनिकांची तुकडी, पाच तोफा आणि चाळीस मशिनगन्स घेऊन त्यांनी नोवोचेरकास्कहून डॉनच्या पूर्वेकडील माळरानात माघार घेतली होती. आपले सरलष्कर सिदोरिन आणि कझाक चाऊसदफेदार ह्यांच्याबरोबर पोपोव १३ तारखेला सकाळी ओलगिनस्कायाला घोडा फेकीत आले. कोर्निलोवचा जिथे मुक्काम होता त्या घरासमोरील चौकात त्यांनी घोड्याचे लगाम खेचले आणि खोगीराची मूद पकडून जीनावरून टांग काढून घेतली. काळ्याभोर केसाच्या बटा असलेल्या श्यामल तोंडाच्या आणि टिटवीसारखे काळेकरंद डोळे असलेल्या एका तरूण कझाक अडलीने त्यांना पायउतार व्हायला हात दिला. पोपोवने त्याच्या अंगावर घोड्याचे कायदे फेकले आणि धीम्या डौलाने ते पडवीकडे चालू लागले. त्यांच्या मागोमाग सिदोरिन आणि इतर अंमलदार आले. अडलींनी बाजूच्या फाटकातून घोडी आवाडाकडे नेली. त्यातील एक अडली फेंगड्या पायांचा आणि रिसाल्यातील होता. तो घोड्यांना तोबरे चढवीत होता. आणि टिटवीसारख्या काळाकरंद डोळ्यांचा काळ्याभोर केसांचा गडी इकडे सैपाकघरातील मोलकरणीशी संधान बांधून राहिला होता. तिची त्याने कशावरून तरी मस्करी केली आणि डोईला नखरेलपणे रुमाल बांधलेली, उघड्या पायात बरजोडे चढवलेली ही गुलाबी गुलछडी त्याच्या अंगावरून आणि एका डबक्यातून कुणगीकडे जाताना घसरत आणि खिदळत होती.

वयस्कर आणि दिमाखदार पोपोवनी घरात प्रवेश केला. दिवाणखान्यात आल्यावर आपला कोट त्यांनी साक्षेपाने कार्यकुशल असणाऱ्या एका अडलीच्या हवाली केला. चाबूक अडकवून दिला आणि दणदणीत आवाजात बराच वेळ आपले नाक शिंकरले. अडली त्याना आणि सिदोरिनला सदरेच्या खोलीत घेऊन गेला जाता जाता ते आपल्या डोक्यावरचे केस नीट बसवीत होते.

ह्या परिषदेसाठी ज्याना बोलावण्यात आले होते ते सेनानी आधीच जमा झाले होते. कोर्निलोव मेजापाशी बसले होते. मेजावर पसरलेल्या नकाशावर त्यानी कोपरे टेकली होती. त्यांच्या उजव्या हाताला स्वच्छ दाढी घोटलेले, ताठ आणि सगळे केस पिकलेले अलेक्सिएव होते. देनिकिनच्या धूर्त डोळ्यात चमक खेळत होती आणि तो रोमानोव्स्की बरोबर कशावर तरी चर्चा करीत होता. देनिकिनशी पुसट साम्य असलेला लुकोम्स्की दाढीचे केस ओढीत खोलीत येरझारे घालीत होता. मार्कोव खिडकीशी उभा राहून आवाडात पहात होता. घोड्याची सरबराई करता करता मोलकरणीशी थट्टामस्करी करणाऱ्या अडलीकडे तो बघत होता.

आताच आलेल्या त्या दोघांनी परिषदेसाठी जमलेल्या सेनानींना अभिवादन केले आणि ते मेजापाशी गेले. त्यांचा प्रवास आणि नोवोचेरकास्क खाली करण्याच्या संदर्भात अलेक्सिएवनी काही जुजबी प्रश्न विचारले. कोर्निलोवनी ज्याना परिषदेसाठी बोलावले होते त्या काही आघाडीवरील अंमलदाराना घेऊन कुत्युपोवने प्रवेश केला.

मेजापाशी शांतपणे बसलेल्या पोपोवकडे रोखून बघत कोर्निलोवनी विचारले,

" जनरल, तुमच्या तुकडीची ताकद किती ते सांगा. "

" दीड हजार समशेर, एक बतारी न् जाम्यानिम्यासकट चाळीस मशिनगन्स्."

" रोस्तोव खाली करणं स्वयंसेवक सैन्याला ज्यामुळे भाग पडलं ती परिस्थिती तुम्ही जाणताच. काल आमची परिषद झाली. आणि आम्ही असा निर्णय घेतलाय की, येकातेरिनोदाच्या दिशेनं कुबानकडे कूच करायचं. तिथं स्वयंसेवकांच्या तुकड्या आधीच लढत आहेत. ह्या वाटेनं आम्ही जायचंय." पेन्सिलीचे बोथट टोक त्यांनी नकाशावरून फिरवले आणि ते घाईघाईने बोलू लागले, " .आपल्या हालचालीला आडकाठी करू पाहणाऱ्या बेशिस्त आणि बेताकद रेडगार्डस् तुकड्यांचा धुव्वा उडवीत कूच करता करता आपण कुबान कझाकांना आपल्यात सामील करून घेऊ."

पोपोवनी जिकडे आकुंचित तिरपा कटाक्ष टाकला त्या दिशेने त्यानी पाहिले. "आमची सूचना आहे की, तुमच्या तुकडीनिशी तुम्ही स्वयंसेवक सेनेला मिळावं न् आमच्या बरोबर येकातेरिनोदारला कूच करावं. आपली ताकद विभागणं आपल्या हिताचं नव्हे."

" मी हे करू शकत नाय, " पोपोवनी तीक्ष्णपणे आणि निर्धारपूर्वक जाहीर केले. त्याच्या दिशेनं किंचित झुकून अलेक्सिएवने विचारले, " का बरं ते विचारू का ?"

" कारण डॉन प्रांताचा मुलूख सोडून देऊन मी कुबान प्रांतात राहू शकत नाय. उत्तरेला आम्हाला डॉनचं संरक्षणाय न् माळरानावर काय घडतं ते आम्ही बघणारोत ! गनीम काय उठावाची कारवाई करेलसं आम्हाला वाटत नाय. कारण लौकरच पाघळणी सुरू होईल आणि डॉन ओलांडून तोफखानाच काय पण घोडदळ पाठवणंही शक्य होईलसं वाटत नाय. जो प्रदेश आम्ही निवडलाय तिथं चंदीवैरण आणि दाणागोटयाची उत्तम रसद असून कोणत्याही क्षणी न् कोणत्याही दिशेनं आम्ही निवडलाय तिथं चंदीवैरण आणि दाणगोटयाची उत्तम रसद असून कोणत्याही क्षणी न् कोणत्याही दिशेनं आम्ही गनिमी कारवाई सुरू करू शकतो."

कोर्निलोवचा मुद्दा ज्या रितीने त्यांनी खोडून काढला त्यात जोरदार आत्म-विश्वास होता. थोडावेळ दम खाण्यासाठी ते थांबले पण कोर्निलोव काहीतरी बोलण्याच्या बेतात असल्याचे बघून त्यांनी निग्रहाने मान हलवली.

" माझं बोलणं पुरं होऊ द्यात, ह्या खेरीज आणखी एक महत्वाची गोष्टाय. आम्ही – वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्यांनी–ती विचारात घ्यायला पायजे. ती गोष्ट म्हणजे आमच्या कझाकांची मनोवृत्ती !" आपला मऊ गोरा हात त्यानी पसरला. सोन्याची अंगठी तर्जनीच्या मासात खोल रूतून बसलेली होती. आपला आवाज किंचित चढवून ते बोलू लागले, " आम्ही कुबानकडे माघार घेतली तर आमची तुकडी फुटण्याचा धोकाय ! कझाक जायला नकार देतील. इकडं दुर्लक्ष करून चालणार नाय की, माझ्या तुकडीत कायमचं आणि सर्वात जबर ताकदीचं पथक कझाकांचंय ! आणि ते नैतिकदृष्टया असे मुळीच विश्वासाचे नैत की . . . उदाह-रणार्थ जसे की तुमचे सैनिकायत ! त्यांना समजत नाय. त्यांना शुध्दच नाहीय. ते मुळी जायचेच नैत. न् माझी सगळी तुकडी गमावण्याचा धोका मी पत्करू शकत नाय." त्यांनी फटकारून उद्गार काढले आणि परत कोर्निलोवना अडवून ते म्हणाले, " माफ करा. मी आमचा निर्णय तुम्हाला सांगितला न् तुम्हाला हे ठाम-पणे सांगतो तो बदलण्याच्या परिस्थितीत आम्ही नाय." ते पुढे म्हणाले, आमच्या सैन्याची फूट करणं हे अर्थातच आमच्या हिताचं नाय. पण ह्या अडचणीतून बाहेर पडण्याचा एक मार्गाय ! माझी अशी सूचनाय की मी जे काही सांगितलं ते विचारात घेऊन हे जास्त रास्त ठरेल की स्वयंसेवक सेनेनं कुबानकडं माघार घेऊ नाय. कझाकांच्या लहरीचं मला भय वाटतं. डॉन पलीकडे माळरानावर स्वयंसेवक सेनेनं डॉन तुकडीला सामील व्हावं. तिथं त्यांना विश्रांती घेता येईल, ताजतवानं होता येईल न् वसंत ऋतूत रशियाहून येणाऱ्या ताज्या दमाच्या स्वयंसेवकांची कुमक मिळेल . . . !"

" छे छे !" कोर्निलोव उद्गारले. वस्तुत: आदल्या दिवसापर्यंत ते ह्याला अनुकूल होते की, डॉन पलीकडच्या माळरानावर जावं. ह्या उलट असलेल्या

अलेक्सीएवच्या मताला त्यानी विरोध केला होता. अलेक्सिएवचे म्हणणे होते, " माळरानाकडं जाण्यात अर्थ नाही. आपल्याकडं जवळ जवळ सहा हजारांचं सैन्य आहे . . .

" दाणागोटयाची काळजी वाटत असेल तर, महाराज, मी आपल्याला आश्वासन देतो की, डॉन पलीकडच्या माळरानापेक्षा जास्त चांगली रसद पुरवेल असा प्रदेश नाही. विशेष म्हणजे तिथल्या खाजगी तबेल्यातून आपल्याला घोडी घेता येतील आणि आपले काही सैन्य घोडयांच्या पाठीवर देता येईल. नंतर आपल्याला लढाईतील चलाणवलाणाचा जास्त नामी मौका मिळेल. रिसाला आपल्याला हवाच न् आज स्वयंसेवक सैन्यात त्याचीच कमी आहे. "

कोर्निलोव त्या दिवशी नेहमीपेक्षा जास्त लक्षपूर्वक अलेक्सिएवचे बोलणे ऐकत होते. त्याच्याकडे अशा नजरेने बघत होते की कोणता मार्ग पत्करावा ह्याबद्दल त्यांचा निश्चय होत नव्हता. दुसऱ्या अधिकारीवाणीचा आधार ते शोधत होते. अलेक्सिएवचे म्हणणे अत्यंत लक्षपूर्वक ऐकून घेण्यात आले.

प्रश्नाचा निकाल तडकाफडकी आणि अगदी स्वच्छपणे लावण्याची सवय असलेल्या त्या म्हाताऱ्या सेनानीने येकातेरिनोदारकडे कूच करण्याच्या बाजूने आपले म्हणणे थोडक्यात मांडले.

" त्या दिशेनं गेल्यास बोल्शेव्हिकांचा वेढा फोडून जाऊन तिथं एकातेरिनोदारजवळ आधीच लढणाऱ्या सैन्याशी हातमिळवणी करणं आपल्याला जास्त सोपं जाईल. " असे म्हणून त्यानी समारोप केला.

" पण आपल्याला यश नाही आलं तर ?" लुकोम्स्कीने सावधपणे विचारले.

अलेक्सिएवने ओठ चावले आणि नकाशावर बोट फिरवीत तो म्हणाला,

" आपल्याला जरी यश आलं नाही तरी कॉकेशस पर्वतात माघार घेण्याची न् तिथं सैन्याची पांगापांग करायची संधी अजून आपल्याला आहे. "

रोमानोव्स्कीने त्याला पाठिंबा दिला. मार्कोवने काही जळजळीत वाक्ये उच्चारली. अलेक्सिएवच्या वजनदार युक्तिवादापुढं काही बोलणं शक्य नाही असा रंग दिसत होता. पण लुमोनस्कीच्या शब्दानी पारडी बरोबर केली.

" जनरल पोपोवच्या सूचनांना माझा पाठिंबा आहे. " तोलून मापून शब्द उच्चारीत त्याने जाहीर केले, " कुबानकडं कूच करण्यातून अशा मोठ्या अडचणी उद्‌भवतील की त्यांचा अंदाज इथून येणार नाही. पहिली गोष्ट म्हणजे आपल्याला दोनदा रेल्वे ओलांडावी लागेल . . . "

नकाशावरून फिरणाऱ्या त्याच्या बोटाच्या दिशेने सर्वांचे डोळे वळत होते. लुकोम्स्की निर्धाराने पुढे म्हणाला,

"आपलं यथास्थित स्वागत करायला बोल्शेव्हिक चुकायचे नाहीत. ते चिलखती गाड्या वापरतील. आपल्याकडे अवजड सामानाच्या गाड्या आहेत आणि ज्यांना मागं ठेवता येणार नाही असे जखमी मोठ्या संख्येनं आहेत. ह्या सगळ्याचा सैन्यावर प्रचंड बोजा पडेल न् त्याच्या आगेकुचीला अडथळा होईल. शिवाय कुबानच्या कझाकांच्या मनात आपल्याबद्दल मैत्रीची भावना आहे ह्यावर विश्वास टाकण्याची तयारी मला समजू शकत नाही. बोल्शेव्हिक सत्तेला विटले असले पाहिजे. ते डॉन कझाक उदाहरण म्हणून आपण घेतले तर आपण दुप्पट सावध राहिलं पाहिजे न ह्या सगळ्या अफवाकडं कमालीच्या शंकेखोरपणे पाहिलं पाहिजे. पूर्वीच्या रशियन सैन्यापासून ज्याचा प्रसार झालाय तेच बोल्शेव्हिक खुपऱ्याचं दुखणं कुबान कझाकांना झालंय. त्यांची आपल्याबाबत वैरभावनाही असेल मी परत सांगतो. माझं मत असं आहे की, आपण पूर्वेला माळरानात गेलं पाहिजे. आपण ताजेतवाने झालो की तिथून बोल्शेव्हिकांना डाटलं पाहिजे."

कोर्निलोवच्या निर्णयाला बहुसंख्य सेनानींनी पाठिंबा दिला तेव्हा त्यांनी वाकड्या वळणाने कुबानमधे जाण्याचे ठरवले. जाताजाता रिसाल्याची सामुग्री म्हणून घोडी गोळा करायची त्यांनी ठरविले. परिषद संपली. पोपोवशी कोर्निलोव दोन शब्द बोलले. थंडपणे त्यांचा निरोप घेतला आणि आपल्या खोलीकडे निघून गेले. त्यांच्या मागोमाग अलेक्सिएव गेला.

कर्नल सिदोरिन पडवीकडे गेले आणि आपल्या नकीबाला त्यांनी उत्साहाने हाक मारली.

"घोडी!"

डबकी ओलांडून येताना आपली समशेर धरून ठेवीत एक तरुण सोनेरी केसांचा कझाक लेफ्टनंट त्यांच्याजवळ आला. अगदी खालच्या पायरीवर थबकून त्याने हलक्या आवाजात विचारले,

"तर काय विचार ठरला, कर्नल?"

"वाईट नाय!" खालच्या स्वरात सिदोरिनने उत्तर दिले. त्याचा आवाज आनंदी होता. "कुबानला कूच करायला आपण नकार दिला. आपण तावडतोब निघायचं. तुम्ही तयार आहात इझवारिन?"

"होय. ते घोडी घेऊन येतायत!"

अडली घोडी घेऊन आले. काळचाभोर केसांची बट आणि टिटवीसारखे डोळे असलेला अडली आपल्या सवंगड्याला डोळा घालीत होता,

" छानाय की नाय ती ?" त्याने घोगऱ्या स्वरात हसून विचारले.

त्या म्हाताऱ्या माणसाने शिष्ट स्मित केले.

" नायटा झालेल्या घोड्यासारखी छानाय !"

" तुला बोलीवलं होतं काय तिनं ?"

" सोड ए च्युत्या ! उपासाचे दिवसायत !"

ग्रिगरी मेलिखोवचा दोस्त असणाऱ्या इझवारिनने पांढरी म्होरकी घातलेल्या आपल्या वेंधळ्या घोड्यावर मांड घेतली आणि रस्त्यावर चलण्याचा हुकूम सोडला. पोपोव आणि सिदोरिन आणि त्यांच्याबरोबर काही सेनानी पुढच्या पायऱ्या उतरून खाली आले. एका चाऊस दफेदाराने जनरल पोपोवचा घोडा धरून ठेवून त्यांना रिकिब सापडण्यात मदत केली. आपला साधा कझाकी चाबूक हलवीत पोपोवनी घोड्याला दुडक्या चालीवर काढले. त्यांच्या मागोमाग रिकिबीत उभे राहून आणि किंचित पुढे झुकून सिदोरिन आणि इतर अंमलदार आणि कझाक येत होते.

दोन दिवस चालत स्वयंसेवकांची सेना मेचेतिनस्कायाला पोचली तेव्हा पूर्वेकडील माळरानाबद्दल कोर्निलोवकडे आणखी अहवाल आले. हे अहवाल प्रतिकूल होते. लढाऊ पथकांच्या सेनानींना कोर्निलोवनी बोलावून घेतले आणि कुबानकडे कूच करण्याचा आपला विचार घोषित केला.

ह्या सैन्यात सामील होण्याचे दुसऱ्यांदा निमंत्रण घेऊन एक जासूद पोपोवकडे रवाना करण्यात आला. हा जासूद स्तारो इवानोव्स्कीजवळ ह्या सैन्याकडे पोचला. उत्तर तेच होते. थंड्या सौजन्याने पोपोवनी नकार दिला. त्यांनी लिहून कळविले की, आपला निर्णय बदलू शकत नाही. आणि सध्या त्यांचा मुक्काम डॉनच्या पूर्वेकडील प्रदेशात राहील.

## १९

नोवोचेरकास्क सर करण्यासाठी दांडगा घेराव घालण्याच्या कारवायीसाठी क्रांतिकारक समितीने गोलुबोवचे पथक पाठविले. बुनचुक त्या पथकाबरोबर गेला. हे पथक २३ फेब्रुअरीला शाखत्नायातून बाहेर पडले. आणि रसदोरस्कायावरून पुढे गेले. रात्रीपर्यन्त ते मेलिखोवस्कायाला पोचले आणि दुसऱ्या दिवशी सकाळी तिथून निघाले. आपल्या घोडयाच्या चौकावर उतावीळपणे चाबूक ओढीत पथकाच्या अग्रभागी घोडा फेकीत चाललेला गोलुबोव तेज चालीने हे पथक घेऊन चालला होता. रात्री त्यांनी खेडयात प्रवेश केला. थोडावेळ घोडयांना दम खाऊ दिला आणि कबऱ्या तारकाशून्य रात्रीच्या अंधारात परत घोडयावर मांड घेतली. बर्फाचे कवचे जमलेला रस्ता घोडयांच्या टापाखाली करकरत होता. क्रिवानस्कायाजवळ त्यांचा रस्ता चुकला पण परत त्याना वाट सापडला. दुसऱ्या एका खेडयातून ते जात असताना पहाट फुटत होती. रस्त्यात अद्याप शुकशुकाट होता. पण चौकाजवळ एका विहिरीच्या द्रोणीतील बर्फ एक म्हातारा कझाक फोडीत होता. गोलुबोवने घोडा त्याच्याजवळ नेला. त्याचे पथक मागेच थबकले.

" नमस्ते म्हातारबुवा ! " सेनानीने त्या कझाकाला अभिवादन केले.

कातडी हातमोजे घातलेला आपला हात त्या माणसाने टोपीपर्यंत उंचावला आणि तुटकपणे तो म्हणाला,

" नमस्ते ! "

" काय आजोबा, तुमचे कझाक नोवोचेरकास्कला निघून गेले काय ? तुमच्या खेडयात लष्करभरती झाली ? "

त्याला उत्तर न देता त्या म्हाताऱ्याने लगबगीने आपला टिकाव उचलला आणि आपल्या आवाडाच्या फाटकातून तो दिसेनासा झाला.

" आगे बढो !" गोलुबोव ओरडला आणि शिव्या घालीत त्याने घोड्याला टाच मारली.

त्याच दिवशी लष्करी परिषद नोवोचेरकास्क खाली करण्याची तयारी करीत होती. डॉन कझाक सेनेच्या नव्याने नेमणूक झालेल्या लष्करी आतामान जनरल पोपोवनी गावातून सशस्त्र दले आधीच काढून घेतली होती आणि सगळी लष्करी रसद हालवली होती. सकाळी बातमी आली की मेलिखोवस्कीहून गोलुबोव बेस्सेरगेनेव्स्कियेकडे कूच करून येतोय. गोलुबोवशी बोलणी करण्यासाठी परिषदेने कॅप्टन सिवोलोबोवला पाठविले. नोवोचेरकास्क हवाली करण्याच्या अटीवर ही बोलणी व्हायची होती. कोणताही विरोध न होता गोलुबोवचा रिसाला अनपेक्षितपणे नोवोचेरकास्कमधे शिरला. कझाकांची मोठी तुकडी सांगाती घेऊन गोलुबोव स्वतः परिषदेच्या सदरठाण्याकडे दौडत आला. ' आ ' वासलेल्या बध्यांचा घोळका फाटकाशी जमला होता आणि जनरल नाझारोवच्या जीनबंदी केलेल्या घोड्याजवळ एक जासूद वाट बघत थांबला होता.

बुनचुकने घोड्यावरून उडी टाकली आणि आपली हलकी मशिनगन पेलली. गोलुबोव आणि इतर कझाकांच्या बरोबर तो धावत त्या घरात गेला. दरवाजा सताड उघडल्याचा आवाज ऐकून त्या प्रशस्त दिवाणखान्यात जमलेले प्रतिनिधी तिथं नव्याने आलेल्या लोकाकडे पांढऱ्याफटक चेहऱ्यांनी बघू लागले.

" उभं ऱ्हा !" कवायतीच्या मैदानावर असल्याप्रमाणे गोलुबोवने कडक हुकूम सोडला, तो कझाकांनी वेढलेला होता. धांदलीने धडपडत तो टांगा टाकीत मेजाच्या टोकाशी आला. त्या करड्या गर्जनेने परिषदेचे सभासद उठून उभे राहिले. ते उठताना खुर्च्या खरडल्याचे आवाज झाले. फक्त नाझारोव बसून होता.

" लष्करी परिषदेच्या बैठकीत खंड पाडायची तुमची हिंमत ?" जनरलने संतप्त आवाजात विचारले.

" तुम्हाला अटक करण्यात आल्येय ! खामोष !" लालबुंद झालेला गोलुबोव नाझारोवच्या अंगावर धावून गेला. त्या सेनानीच्या गणवेशावरील माकूले फाडून काढीत तो कर्कशपणे गरजला, " उभा ऱ्हा – सांगीतोय ! घेऊन जा ह्याला. कुणाला सांगीतोय मी ? मोठे आले लष्करी अंमलदार !"

बुनचुकने आपली मशिनगन दाराशी लावून ठेवली होती. परिषदेच्या सभासदांनी मेंढरागत कळप केला. बुनचुकच्या अंगावरून कझाकांनी नाझारोव परिषदेचे अध्यक्ष कबऱ्या चेहऱ्याचे वोलोशिनोव ह्यांना खेचीत नेले. गोलुबोव त्यांच्या मागोमाग गेला. त्याची समशेर खडखडत होती. चेहरा आरक्त झाला होता. परिषदेच्या एका सभासदाने त्याची बाही पकडून विचारले, "कर्नलसाहेब, कुठं नेताय आम्हाला ?"

दुसऱ्या एकाने गोलुबोवच्या खांद्यावरून मान पुढे करीत विचारले,

"आम्ही मोकळे आहोत ना ?"

"मसणात जा भडव्यो !" त्याना ढकलून देत सेनानी गरजला. बुनचुकजवळ पोचल्यावर तो त्याच्याकडे वळून आणि जमिनीला लत्ताप्रहार करून म्हणाला "मसणात जावा ! मला तुमची गरज नाय ! कसली वाट बघताय ?"

वारे लागून खरखरीत झालेला त्याचा आवाज काही वेळ सगळ्या दिवाणखान्यात घुमत राहिला.

ती रात्र बुनचुकने आपल्या आईच्या घरी काढली. दुसऱ्या दिवशी रोस्तोव सर करण्यात आल्याची बातमी आली. त्याने ताबडतोब रोस्तोवला जाण्याबद्दल गोलुबोवची परवनगी काढली आणि दुसऱ्या दिवशी सकाळी तो घोड्यावर बसून निघून गेला.

रोस्तोवला पोचल्यावर दोन दिवस त्याने लष्करी सदरठाण्यात काम केले, आणि क्रांतिकारक समितीच्या कचेरीला भेट दिली. पण तिथं ना आब्रामसोन होता ना आन्ना होती. गिरफदार केलेल्या व्हाइटगार्डसचा तडकाफडकी निवाडा करण्यासाठी सदर ठाण्यावर क्रांतिकारक निवाडामंडळ स्थापन करण्यात आले होते. ह्या कोडतात एक दिवस बुनचुकने काम केले. छापे घालण्यात भाग घेतला. दुसऱ्या दिवशी परत फारशी आशा न बाळगता तो क्रांतिकारक समितीकडे गेला. जिना चढता चढता त्याला वरच्या खोलीतून आन्नाचा आवाज ऐकू आला. तिचा हास्यध्वनी ऐकताच त्याच्या काळजात रक्त उसळून आले. आपली चाल मंदावून त्याने दार ढकलून उघडले. पूर्वी लष्करी अधिपतीची असणारी खोली तंबाखूच्या धुराने दाटली होती. ओव्हरकोटाची बटणे सुटलेला एक मनुष्य एका लहानशा बायकी मेजापाशी बसून लिहित होता. मेंढकातडी घातलेल्या सैनिक आणि नागरिकांनी त्याच्या भोवती घोळका केला होता. ते गप्पा मारीत धुरांची वर्तुळे सोडीत होते.

दरवाजाकडे पाठ करून खिडकीशी उभी असलेली आन्ना त्याला दिसली. आपल्या गुडघ्याला हातांची मिठी घालून आब्रामसोन खिडकीच्या कट्ट्यावर बसला होता. आणि लाटव्हियन चेहऱ्याचा एक ' रेडगार्ड ' त्याच्या बाजूला उभा होता. करंगळी वाकडी करून तो माणूस चुट्टा वळत वळत बोलत होता. काहीतरी विनोदी प्रसंग सांगत असल्याचे दिसत होते. कारण आन्ना मान मागे फेकून हसत होती. आणि आब्रामसोनच्या हसऱ्या चेहऱ्याला कलिंगडाच्या सालीप्रमाणे सुरकुत्या पडल्या होत्या. त्या रेडगार्डचा दणकट कातीव चेहरा तीक्ष्ण आणि काहीशा उग्र बुध्दिमत्तेने उजळून गेला होता.

बुनचुक तिकडे चालत गेला आणि आन्नाच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, " आन्ना, नमस्ते ! "

तिने वळून पाहिले. तिचा चेहरा आरक्त होऊन गेला आणि तो लालबुंदपणा तिच्या मानेपर्यन्त उतरला. डोळे पाण्याने भरून आले.

" कुठून आलास तू ? आब्रामसोन बघ तरी ! कसा दिसतोय–टांकसाळीतून काढलेल्या नाण्यागत ! न् तुला त्याची काळजी वाटत होती ! " आपली नजर वर करता ती अडखळत बोलत होती. भावना अनावर होऊन ती वळली आणि दरवाजाकडे गेली.

बुनचुकने आब्रामसोनचा उष्ण हात करकचून दाबला. त्याच्याशी दोन शब्द बोलला. आब्रामसोनने विचारलेले प्रश्न त्याने अनुत्तरीतच ठेवून दिले (त्या प्रश्नाचा अर्थही त्याला धड समजला नव्हता.) मग एका खुल्या अमर्याद सुखाच्या हसऱ्या मुखाने तो आन्नाकडे गेला. ती आता भानावर आली होती. हसून त्याचे तिने स्वागत केले. आपल्या अवघडल्या मनःस्थितीने ती किंचित त्रासली होती.

" तर कसा काय आहेस तू ? " तिने विचारले. " केव्हा आलास ? नोवोचेरकास्कहून आलास ? गलुबोवच्या तुकडीत होतास ? काय बातमी ? "

आपली अपलक भारावलेली नजर तिच्या चेहऱ्यावरून न हालवता त्याने तिच्या प्रश्नांची उत्तरे दिली. तिचे स्वतःचे नेत्र बावरले होते, त्याच्या चेहऱ्याकडे ते बघत नव्हते.

" एक मिनिट बाहेर जाऊ या ! " तिने सुचविले.

ते जाण्यासाठी वळले तशी आब्रामसोनने त्यांना हाक मारली.

"लौकर परत येणार ना? तुझ्यासाठी कामाय साथी बुनचुक. तुझा उपयोग करून घ्यायचा आम्ही विचारच करीत होतो."

"तासाभरानं परत येतो !"

रस्त्यावर आल्यावर आन्नाने बुनचुकच्या डोळ्यात रोखून पाहिले. आपला एक हात हलवीत ती रागाने म्हणाली,

"इल्या इल्या . . . किती भयंकर तोल गेला माझा ! एकाद्या लहानशा पोरीगत ! एकतर तू अचानक दिसलास म्हणून आणि दुसरं म्हणजे तुझे माझे हे अर्धवट संबंध! अर्थात आपले कसले संबंध? काव्यमय वचनं दिलेल्या जोडप्याचे? तुला ठाऊकाय? लुगान्स्कमधे आब्रामसोननं एकदा मला बिचारलं होतं – 'तू बुनचुक बरोबर राहत्येस?' मी नाही म्हटलं पण तो तीक्ष्ण नजरेचा माणूसाय. त्याच्या डोळ्यादेखत चाललेल्या गोष्टी त्याच्या नजरेतून सुटत नैत. तो काय म्हणाला नाय पण त्याच्या नजरेवरून मी ओळखलं की त्याचा माझ्या म्हणण्यावर विश्वास नाय म्हणून?"

"पण मला तुझ्याबद्दल सगळं सांग."

"वा ! लुगान्स्कला आम्ही काय तडाख्यानं काम केलं ! दोनशेची तुकडी न् अकरा बागनटं आम्ही जमवली. आम्ही संघटनेचं न् राजकीय काम केलं . . . पण ते सगळं मला तुला दोन शब्दात नाय सांगता यायचं ! तुझ्या अनपेक्षित येण्याच्या धक्क्यातून अजून मी सावरलेली नाय. तू कुठायस . . . रात्रीचा मुक्काम कुठाय ?" तिने विचारले.

"एका साथीच्या घरी !" खोटे बोलताना त्याची जीभ अडखळली कारण रात्र त्याने सदर ठाण्यावर काढली होती.

"आजच्या आज तू आपला मुक्काम आमच्या घरी हालव. मी कुठं राहते ते आठवतं? तू एकदा मला घरी पोचवलं होतंस !"

"मी शोधून काढीन पण . . . तुझ्या घरात गर्दी नाय का होणार ?"

"हे काय वेड्यासारखं बोलणं ! तुझी कुणालाही गर्दी होणार नाय. न् दुसरं म्हणजे ह्या गोष्टीवर बोलण्यासारखी काय ती महत्त्वाची नाय !"

संध्याकाळी आपला बाडबिस्तरा त्याने आपल्या प्रशस्त सैनिकी थैलीत भरला आणि आन्ना जिथे रहात होती त्या गाववेशीच्या रस्त्याकडे तो गेला. दारातच विटांच्या एका लहानशा घरापाशी एक म्हातारी त्याला भेटली. तिच्या तोंडवळ्यात आन्नाशी पुसट साम्य होते. तिच्या डोळ्यात तीच निळसर काळी

चमक होती. नाक किंचित बाकदार होते. फक्त तिची सुरकुत्या पडलेली मातकट कातडी आणि खप्पड चेहरा ह्यावरून तिचे म्हातारपण प्रकट होत होते.

" तुम्ही बुनचुक का ?" तिने विचारले.

" होय."

" या ! आत या ! माझ्या मुलीनं मला सांगितलय तुमच्याबद्दल."

एका लहान खोलीत ती त्याला घेऊन गेली. त्याचे सामान कुठे ठेवायचे ते दाखवले आणि नंतर आखडलेल्या, वाकड्या झालेल्या बोटांनी खोली दाखवीत ती म्हणाली,

" ही तुमची रहायची जागा ! हा बिछाना !"

तिचे यहुदी उच्चार स्पष्टपणे जाणवत होते. तिच्याशिवाय घरात एक लहान मुलगी होती. ती किंचित नाजूक पण आन्नासारखीच खोल डोळ्यांची होती.

थोड्या वेळाने स्वतः आन्ना आली आणि तिच्याबरोबर जिवंतपणा आणि उत्साह आला.

" कुणी आलं होतं ? बुनचुक आला ?"

तिच्या आईने यिडिश भाषेत उत्तर दिले आणि आन्ना निश्चयाने चालत बुनचुकच्या खोलीकडे गेली.

" येऊ का आत ?"

" ये ! ये !" खुर्चीवरून उठून तो सामोरा आला.

" हं मग ? सगळं ठीक ?"

समाधानाने आणि हसऱ्या नजरेने तिने त्याच्याकडे पाहून विचारले,

" काही खाल्लस का नाय ? इकडच्या खोलीत ये !" त्याची बाही पकडून ती त्याला चाफेखणीत घेऊन गेली.

" आई, हा माझा साथी. त्याचं मन दुखवू नका !" असे म्हणून तिने स्मित केले.

पिकलेल्या बाभूळ शेंगा तडकाव्या तसे गोळीबाराचे आवाज रात्री रोस्तोववर घुमत होते. मधून मशिनगनचा दुरटा ऐकू येई. मग सगळे शांत होऊन जायचे. आणि परत रस्त्यावर रात्रीचे—फेब्रुअरी महिन्यातील देखण्या उदास रात्रीचे—शांत आवरण घातले जायचे. त्याच्या साक्षेपाने नीटनेटक्या केलेल्या खोलीत बुनचुक आणि आन्ना खूप उशीरापर्यन्त बसले होते.

" मी माझ्या लहान बहिणीबरोबर इथं रहात होते." ती त्याला सांगत होती, " आम्ही किती साधं रहात होतो पाहिलंस ? अगदी जोगिणींसारखं ! मी शाळेत शिक्षण घेत्येय हे दाखवण्यासाठी कधी सस्ती चित्रं, फोटो काहीसुद्धा इथं लावलं नाही."

" तुमचं कसं चालत होतं ?" त्याने विचारले.

अभिमानाने तिने उत्तर दिले, " मी कारखान्यात काम करून शिकवण्या करायची."

" न् आता ?"

" आई शिवणकाम करते. त्या दोघींना फार थोडं लागतं."

नोवोचेरकास्क कसे सर करण्यात आले त्याबद्दल आणि ती निघून गेल्यापासून त्याने ज्यात भाग घेतला त्या लढायाबद्दलचा तपशील त्याने तिला सांगितला. लुमान्स्क आणि तगानरोगमधील आपल्या कामाबद्दल आपल्याला काय वाटले ते तिने त्याला सांगितले. अकरा वाजता तिच्या आईने तिच्या खोलीतील दिवा मालवला तेव्हा त्याचा निरोप घेऊन ती त्या खोलीतून बाहेर पडली.

---

## २०

डॉन क्रांतिकारक समितीला जोडलेल्या क्रांतिकारक निवाडामंडळात मार्च महिन्यात बुनचुकला काम देण्यात आले. ह्या निवाडामंडळाचे जे अध्यक्ष होते ते गालफडे बसलेले, अविश्रांत कामाने आणि जागरणानी डोळे जडावलेले एक उंच गृहस्थ होते. आपल्या खोलीतील खिडकीपाशी ते बुनचुकला घेऊन गेले. आपल्या मनगटी घड्याळावरून त्यानी बोट फिरविले, ( परिषदेला जायला त्याना उशीर झाला होता. ) आणि बुनचुकला विचारले,

" पक्षात कधी दाखल झाला ? हां . . . हां . . छान . . तू आमचा सरपंच व्हायचंय. आमच्या पूर्वीच्या सरपंचाला आम्ही कालेदिनकडं धाडलंय. कारण तो लाच घ्यायचा. तो निव्वळ होळीचा होळकर न् पाजी सुव्वर होता. तसले लोक आमच्या संघटनात आम्हाला नकोत. आम्ही करतोय ते गलिच्छ कामाय पण पक्षाबद्दल आपल्या जबाबदारीची संपूर्ण जाणीव आपल्याला असली पाहिजे मी काय म्हणतो ते बरोबर समजून घे." ह्या वाक्यावर त्यानी विशेष जोर दिला. "आपली माणूसकी आपण टिकवली पाहिजे. एक गरज म्हणून आपण प्रतिक्रांतिकारकांचं शिरकाण करतोय. पण आपल्या कामाचा आपण डोंबाऱ्याचा खेळ होऊ देता कामा नये. समजलं मी काय म्हणतोय ते ? जा आता लाग कामाला. "

त्याच दिवशी रात्री सोळा रेडगार्डस्च्या तुकडीचा प्रमूख म्हणून बुनचुकने मध्यरात्रीस पाच प्रतिक्रांतिकारकांना गावाबाहेर दोन मैल नेऊन गोळ्या घालून ठार मारले. त्यात ग्नीलोव्स्की खेड्याचे दोन कझाक होते. बाकीचे रोस्तोवचे रहिवाशी होते. त्यानंतर रोज रात्री ते देहांत शासन झालेल्यांना लॉरीत घालून

गावाबाहेर नेत. घाईघाईने खड्डे खणले जात. रेडगार्डस् आणि आरोपी मिळून हे काम करीत. मग बुनचुक आपल्या रेडगार्डसचे पथक ओळीत उभे करायचा आणि बद्द धातूचा व्हावा अशा आवाजात हुकूम सोडायचा,

" क्रांतीच्या शत्रूना . . . " आपलं पिस्तूल हालवून तो वाक्य पूर्ण करायचा, " गोळ्या घाला. "

एक आठवडा हे काम केल्यानंतर तो असा सुकून आणि काळवंडून गेला की, त्याच्या अंगाला जशी राखाडी फासली होती. त्याचे डोळे खोल गेले. कातरपणे फडफड करणाऱ्या त्याच्या पापण्या डोळ्यांची थंड व्याकूळ चमक लपवू शकेनात. आन्ना क्रांतिकारक समितीत काम करायची आणि उशीरा घरी यायची त्यामुळे ती त्याला फक्त रात्रीची भेटे, पण त्याचे आगमन सूचित करणारी परिचित टकटक खिडकीवर होईपर्यन्त ती वाट बघत राही.

एका रात्री तो नेहमीप्रमाणे मध्यरात्रीनंतर परत आला. तिने दार उघडून विचारले,

" जेवणार का ?"

तिच्या प्रश्नाला उत्तर न देता दारूड्यासारखा झोकांड्या खात तो आपल्या खोलीत गेला. अंगावरील ओवरकोट, बूट, टोपी काही न काढता त्याने तसेच स्वतःला बिछान्यावर लोटू दिले. आन्ना त्याच्याजवळ गेली आणि त्याच्या चेहऱ्याकडे तिने रोखून पाहिले. त्याचे डोळे चिकचिकलेले तवंगलेले होते, त्याच्या प्रकटलेल्या दातावर लाळ चमकत होती. टायफसनंतर पातळ झालेले त्याचे केस कपाळावर दमटलेल्या झिंज्या होऊन बसलेले होते.

ती त्याच्या बाजूला बसली. अनुकंपेने आणि वेदनेने तिचे काळीज करवंडून गेले. ती कुजबुजली,

" तुला त्रास होतोय इल्या ?"

तिचा हात त्याने घट्ट दाबला, दात घट्ट आवळले आणि भिंतीकडे कूस वळवली. आणि एक शब्दही न बोलता तो झोपी गेला. झोपेत तो अस्पष्टपणे आणि दुःखाने बरळत होता. उडी मारण्याचा प्रयत्न करीत होता. भयभीत होऊन ती त्याला निरखीत होता. अज्ञात भीतीने शहारत होती. अर्धोन्मिलीत डोळ्यांनी तो झोपला होता आणि पापण्याआडून त्याची गरगरीत पिवळट बुबुळे विलक्षण चमकत होती.

" हे काम सोडून दे. " सकाळी तिने त्याला सांगितलं.

" आघाडीवर जा. तुझी अगदी दशा होऊन गेलेय इल्या. अशा कामानं तुझं मरण ओढवेल."

" चूप !" तो गरजला. क्रोधाने त्याच्या डोळ्यांची उघडझाप होत होती.

" ओरडू नको ! तुला दुखावलं का मी ?"

तो एकदम गप्प झाला. जणू काय तो जे ओरडला त्यातून त्याच्या अंत:करणात साचलेला संताप मोकळा होऊन गेला होता. आपल्या हातांच्या तळव्यांकडे शांतपणे बघत तो म्हणाला,

" मानवी घाण नष्ट करण्याचं काम घाणेरडाय. माणसांना गोळ्या घालून मारणं हे आरोग्याला न मनाला वाईटाय. थुत तिच्यायला . . . !" ती समोर असताना प्रथमच त्याने अर्वाच्च शिवी हासडली. " असल्या गलिच्छ कामामाठी आपण होऊन पुढं येणारे फक्त मूर्ख आणि पशू नाही तर माथेफिरू असतात. नाय का ? आपल्या सगळ्यांनाच फुलांच्या बगीचात रहायचंय, पण तिच्यायला . . . ! फुलं न् झाडं लावण्याआधी घाण काढून टाकली पाहिजे. जमिनीला शेणखत घातलं पायजे. आपले हात घाण व्हायचेच ! " शांतपणे आन्ना परत वळली तरी आवाज चढवून तो म्हणाला, " घाण नष्ट केलीच पायजे पण तरी ह्या कामाबद्दल लोकांना नाक मुरडायची खोड असते." गर्जना करून त्याने मेजावर दाणकन मुठी आपटल्या आणि आपल्या आरक्त नेत्रांची उघडझाप केली.

आन्नाच्या आईने खोलीत डोकावून पाहिले तेव्हा स्वत:ला सावरून घेऊन तो जरा शांतपणे बोलू लागला,

" हे काम सोडून देणार नाय ! इथं माझा उपयोग होतोय हे निश्चित मला दिसू शकतंय. घाण मी धुवून काढीन, जमिनीला शेणखत घालीन म्हणजे ती जास्त सुपीक होईल. जास्त सुफल होईल. कधी तरी सुखी माणसांची पावलं ह्या जमिनीवर पडतील . . . अजून जो जन्माला आला नाय त्या माझ्या मुलाचेही पाय कदाचित इथं पडतील. " त्याने विकट निरानंद हास्य केले. आणि तो पुढे म्हणाला, " असे किती साप – अशा गोचिडी मी ठार मारल्या ! गोचीड म्हणजे शरीर खाणारी कीड ! ह्या हातानं असल्या डझनावारी गोचिडी मी मारल्या !" लांब नखे वाढलेले काळ्या केसांचे हात त्याने पसरले आणि गिधाडाच्या नख्यागत ते आवळले. मग ते हात आपल्या गुडघ्यावर सोडून देऊन तो कुजबुजला, " आग लागो त्याला ? आपण जाळून टाकलं पायजे . . . जाळून टाकलं पायजे . . म्हणजे हवेची घाण करणारा धूर उरणार नाय . . . फक्त मी दमून

गेलोय . . . खराय . . . आणखी थोडं हे झालं की मी आघाडीवर जाईन . . .
तुझं बरोबराय . . . !"

ती शांतपणे म्हणाली, "होय. आघाडीवर जा नायतर दुसरं काम बघ.
खरंच इल्या . . . नायतर तुला वेड लागंल !"

तिच्याकडे पाठ फिरवून तो खिडकीवर बोटांनी तबला वाजवू लागला.

" नाय . . . मी तसा खंबीराय ! असं समजू नको की पोलादाची घडव-
लेली कुणी माणसं असतात. आपल्या सगळ्यांची माती एकचाय! प्रत्यक्ष आयुष्यात
लढाईची भीती न वाटणारा माणूस नाय ! असा माणूस नाय की जो काही न
वाटून घेता—चित्तावर वण न उमटता लोकांना ठार मारंल !

अंमलदाराबद्दल मला खंत वाटत नाय. तुझ्या माझ्या सारखीच त्यांना
वर्गजाणीवाय ! पण काल इतरांबरोबर मला तीन कझाकांना ठार मारावं
लागलं . . . तीन श्रमिक . . . मी एकाच्या मुसक्या सोडवू लागलो . . ." जसा
काही तो दूर दूर जात असल्यागत त्याचा आवाज पोकळ आणि अस्पष्ट होत गेला.
त्याच्या हाताला माझा हात लागला. पुस्तकाच्या चामडी कव्हरासारखा तो
कठीण . . . सगळे घट्टे पडलेला. काळा तळवा ओरखाडे उठलेला . . . टेंगळं
आलेला . . . छोडो ! जातो मी . . ." तटकन त्याने बोलणं तोडून टाकले आणि
आन्नाची नजर चुकवण्यासाठी पाठ फिरवली. काथ्याचा फास आवळला गेल्यागत
झालेला गळा त्याने चोळला.

आपले बूट त्याने ओढून घेतले. एक ग्लास दूध प्याला आणि तो बाहेर गेला.
वाटेत त्याला आन्नाने गाठले. आपल्या हातात त्याचा दणकट हात घेऊन ती उभी
राहिली. नंतर तिने तो हात आपल्या जळत्या गालावर दाबला आणि बाहेर
अंधारात धाव घेतली.

× × ×

हवा उबदार झाली डॉनच्या मुलुखात वसंतऋतू दार ठोठावू लागला होता.
हाइदामाक्स§ आणि जर्मनांनी मागे पिटाळून लावलेल्या यूक्रेनी रेडगार्डस्च्या
तुकड्या एप्रिल महिन्याच्या सुरवातीला रोस्तोवला येऊ लागल्या. खून, लुटालूट, घरे

---

§ युक्रेनियन राष्ट्रवादी सेना

मनाला येईल तशी ताब्यात घेणे हे प्रकार गावात घडू लागले, नीतिमत्ता संपूर्ण भ्रष्ट झालेल्या अशा काही विशिष्ट पथकांची शस्त्रे काढून घेणे क्रांतिकारक समितीला भाग पडले. चकमकी आणि गोळीबारांची देवघेव ह्या खेरीज हे काम तडीला जाऊ शकले नाही नोवोचेरकास्कच्या आजूबाजूला कझाक हालचाल करू लागले होते. हिवरावर कळचा फुटाव्यात तसा मार्च महिन्यात कझाक आणि परदेशी ह्यांच्यात चकमकीचा उद्रेक झाला. इथे तिथे उठावण्या गरजू लागल्या. प्रतिक्रांतिकारकांची कट कारस्थाने उघडकीला आणण्यात आली. पण रोस्तोव आपले उत्कट आणि ओतप्रोत जीवन जगत होते. सैनिक, खलाशी आणि कामगारांचे घोळके संध्याकाळी हमसडकावरून ये जा करीत. ते सभा भरवीत. सूर्यफुलाच्या बिया खाऊन त्याची फोलपटे ओल्या फरसबंदीवर थुंकीत बायकांच्या मागे लागत. पूर्वीप्रमाणेच माणसे खात होती, पीत होती, झोपत होती, मस्त होती, प्रसवत होती, समुद्राचा खारा वारा घेत होती, महान आणि क्षूद्र वासनांच्या मिठीत जगत होती. दहशतीने ठासून भरलेले दिवस रोस्तोवच्या जवळ येत चालले होते. बर्फपाघळीच्या काळच्या मातीचा आणि दाराशी येऊन ठेपलेल्या लढायातील रक्ताचा वास हवेत ठासलेला होता.

एका निरभ्र प्रसन्न दिवशी बुनचुक नेहमीपेक्षा लौकर घरी आला. आन्ना आधीच घरी आलेली पाहून तो चकित झाला.

“ पण तुला रोज किती उशीर होतो. आज का लौकर आलास ?”

“ मला बरं वाटत नाय !”

त्याच्या पाठोपाठ ती खोलीत आली. त्याने आपले बाहेरचे कपडे उतरले आणि हसून थरथरत्या आनंदाने तो म्हणाला,

“ आन्ना, उद्यापासून मी निवाडामंडळात काम करणार नाय !”

“ काय म्हणतोस ? कुठं जाणारैस ?”

“ क्रांतिकारक समितीकडं. आज माझं क्रिवोशलिकोवशी बोलणं झालं. जिल्ह्यात कुठंतरी मला पाठवायचं त्यानं वचन दिलंय.”

रात्री त्यांनी बरोबरच जेवण घेतले. नंतर तो झोपण्यासाठी लवंडला. त्याच्या क्षुब्ध मनःस्थितीमुळे बराच वेळ त्याचा डोळा लागू शकला नाही. चुट्टा ओढीत त्या टणक बिछान्यावर तळमळत तो पडला होता. निवाडामंडळ सोडून जाताना त्याला हायसे वाटत होते. कारण ह्या ताणाखाली कोसळून पडायला आता आपल्याला फार वेळ लागणार नाही हे त्याने जाणले होते. आपला चौथा

चुट्टा तो संपवीत होता एवढयात दाराची हलकीच करकर त्याच्या कानी पडली. त्याने डोके उचलून पाहता आन्ना त्याच्या दृष्टीला पडली. ती अनवाणी होती आणि तिच्या अंगात फक्त परकर होता. ती उंबरा ओलांडून हळूच त्याच्या जवळ आली. झडपेतील फटीतून चांदण्याचा धूसर हिरवा प्रकाश तिच्या अनावृत्त खांद्या-वर पडला होता. ती त्याच्या अंगावर झुकली आणि आपला गरम हात तिने त्याच्या ओठावर ठेवला.

" सरकून घे . . . बोलू नको !"

ती त्याच्या जवळ लवंडली.

द्राक्षाच्या घडासारखा वजनदार केसांचा झुपका तिने आपल्या कपाळावरून अधीरतेने मागे सारला.

निळसर ज्वाळेने तिचे नेत्र धगधगत होते. ती घोगऱ्या बिव्हळत्या आवाजात कुजबुजली,

" आज नाय तर उद्या तू माझ्यापासून हिरावला जाशील . . . माझ्या सगळ्या शक्तीनिशी मला तुझ्याशी प्रेम करायचंय. " स्वतःच्याच निर्धाराने ती गदगदून शहारली. " चल – आटप लौकर !"

बुनचुकने तिचे चुंबन घेतले. पण धास्तावून – त्याची जाणीव व्यापून टाकणाऱ्या भयंकर शरमेने त्याच्या लक्षात आले की आपण नपुसक आहोत. त्याची मुंडी हालू लागली. छळणुकीने त्याचे गाल पेटून निघाले. क्षणभराने आन्नाने त्याच्या मिठीतून स्वतःला सोडवून घेतले आणि क्रोधाने त्याला ढकलून दिले. तिरस्काराच्या आणि किळस आलेल्या स्वरात ती हेटाळणीने कुजबुजली,

" जमत नाय . . . जमत नाय तुला . . . ? का . . . का तुला बरं नाय ? शीः ! किती गलिच्छ ! सोड मला !"

तिची बोटे त्याने इतकी घट्ट आवळली की, ती किंचित मोडली. तिच्या विस्फारलेल्या वैरी डोळ्यातील धूसर कृष्णतेकडे पहाताना त्याच्या मानेला लुळे पडल्यागत झटके येत होते. अडखळत तो म्हणाला,

" का ? का मला धिःकारत्येस ? होय. स्वतःला मी जाळून घेतलंय . . . माझी राखुंडी करून घेतल्येय . . . ! ह्या क्षणी, ह्यासाठी सुध्दा मला ताकद उरलेली नाही. मी आजारी नाय . . . समजलं ? समजून घे ! चिपाडागत मी पिळून निघालोय . . . "

तो खोल कण्हला. बिछान्यातून उडी मारत उठला आणि त्याने चुट्टा पेटवला. बराच वेळ खांदे पाडून तो खिडकीपाशी उभा होता. आन्ना उठली. मूकपणे त्याला तिने अलिंगन दिले आणि एकाद्या मातेप्रमाणे प्रशांतपणे त्याच्या कपाळाचा मुका घेतला.

पण एका आठवड्यानंतर आपले तप्त मुख त्याच्या कुशीत लपवीत तिने कबूल केले :

" मला वाटलं . . . मला वाटलं तुला दुसरी कुणी तरी . . . कामानं तू एवढा थकून गेला असशील हे मला कळलं नाय !"

त्यानंतर बराच वेळ प्रेमात पडलेल्या स्त्रीचे कुरवाळणेच नव्हे, मातेचे उतू जाणारे उबदार वात्सल्य बुनचुकला जाणवत राहिले.

त्याला खेड्यात पाठवण्यात आले नाही. त्याला रोस्तोवलाच ठेवून घेण्यात यावे असा पोदत्योलकोवने आग्रह धरला. डॉन क्रांतिकारक समिती कामाच्या धांदलीत खदखदत होती. सोव्हिएटांच्या प्रांतिक अधिवेशनाची आणि डॉन प्रदेशात डोके वर काढणाऱ्या प्रतिक्रांतिकारकाविरूध्द लढा देण्याची तयारी करीत होती.

---

## २१

नदीकाठच्या वळुंजीपलीकडे बेडूक डराँव डराँव करीत होते. ठेंगण्या टेकडीच्या मागे सूर्य अदृश्य होत चालला होता. आणि स्येत्राकोवच्या खेड्यात संध्याकाळचा गारठा मुरत चालला होता. घरांच्या लांबच लांब सावल्या धुळीच्या रस्त्यावर तिरप्या पडल्या होत्या. खेड्यातील गुरे माळरानावरून मंद गतीने ढिसाळ घोळक्याने परतत होती. कझाक बायका झाडाच्या डहाळ्यांनी त्यांना हाकीत चालता चालता गप्पा मारीत होत्या. उन्हानं आताच रापलेली अनवाणी पोरे गल्ल्याबोळातून बेडूक उड्या खेळत होती. म्हातारी माणसे भिंतीच्या वरंडीवर ऐटीत बसली होती.

खेड्याची वासंतिक पेरणी झाली होती. कुठे इकडे तिकडे माणसे अद्याप सूर्यफुलाची आणि सातूची पेरणी करीत होती.

गावाच्या वेशीवरील एका घराजवळ ओक वृक्ष तोडून लाकडांची रास रचलेली होती. त्यावर कझाकांचा एक गट बसला होता. घराचा मालक तोंडावर माताचे वण असलेला एक बंधानी होता. जर्मन युध्दात घडलेला एक प्रसंग तो सांगत होता. एक म्हातारा शेजारी आणि त्याचा जावई हे त्याचे श्रोते शांतपणे ऐकत होते. देखणी असलेली ह्या बंधानीची बायको पायलाण उतरून आली. स्कर्टमधे खोचलेल्या तिच्या गुलाबी रंगाच्या ब्लाऊजच्या बाह्या तिने कोपरापर्यन्त वर गुंडाळून घेतल्या होत्या. त्यामुळे तिचे श्यामल .गोंडस बाहू दृष्टीला पडत होते· तिच्या हातात एक हंडा होता. कझाक बायकांचे वैशिष्ट्य असणाऱ्या मोकळ्या-

ढाकळ्या झपाट्याच्या आणि कुर्रेबाज चालीने ती गोठ्याकडे गेली. डोईच्या पांढऱ्या रुमालाखालून तिचे काही केस सुटले होते. ( दुसऱ्या दिवसासाठी ती चुलीला नुकतीच गोवऱ्या लावीत होती. ) तिच्या पायातले पायताण आवाडात माजलेल्या कोवळ्या गवतावर हलकेच दबून चटपटत होते.

हंड्यात वाहणाऱ्या दुधाच्या धारांचा आवाज कझाकांच्या कानी पडला. घरधनिणीने धारा काढल्या आणि डाव्या हाताची वेलांटी वर वळवून डुकराच्या मुंडीगत किंचित पुढे झुकून तिने काठोकाठ भरलेला दुधाचा हंडा घरात नेला.

" सिम्योन, जरा वासराकडं बघ बरं !" पावलाणावरून ती ओरडून म्हणाली.

" न् मितका कुठाय ?" तिच्या नवऱ्याने विचारले.

" सैतान जाणे मेला कुठं नष्ट झालाय तो !"

तो कझाक शांतपणे उठून उभा राहिला आणि रस्त्याच्या कोपऱ्यावर गेला. तो म्हातारा आणि त्याचा जावई घरी जायला निघाले पण कोपऱ्यावरून त्या कझाकाने त्यांना हाक मारली,

" हृचे बग दोरोफेई गावरिलिच ! हिकडं ये !"

ते दोघेजण त्या कझाकाजवळ गेले. कझाकाने न बोलता माळरानाकडे बोट दाखवले. धुळीच्या उसळलेल्या ढगातून पायदळ, रिसाला .आणि गाड्यांचे पहळ रस्त्यातून कूच करून येत होते.

" सैनिक दिसतायत !" म्हाताऱ्याने आपले डोळे आश्चर्याने किलकिले केले आणि आपला तळवा आपल्या पांढऱ्या भुवयावर धरला.

" ते कुणाचे असावेत ?" कझाक चिंतेच्या स्वरात म्हणाला.

त्याची बायको आवाडाच्या फाटकाबाहेर आली. आपले जाकीट तिने खांद्यावर टाकले होते. माळरानाकडे तिने न्याहाळून पाहिले आणि काळजीने धपापत ती म्हणाली,

" कोणायत ते ? देवादयाळा, कित्तीयत ते !"

" त्यांचा इरादा भला नाय हे नक्की . . .!"

म्हातारा मागे फिरून आवाडात गेला आणि आपल्या जावयाला हाकारून म्हणाला,

" चल आत आवाडात हो ! उगाच उभं राहून टकमका बघायचं अडलं नाय . . . !"

बायकापोरे धावत कोपऱ्यावर आली. त्यांच्या मागोमाग कझाकांचे घोळके आले. खेड्यापासून चार – पाच कोसावर माळरानावरून सैनिकांचे पहळ येत होते. वाऱ्याबरोबर त्यांच्या बोलण्याचे आवाज, घोड्यांची फुरफूर आणि गाडीच्या चाकांचा खडखडात येत होता.

" ते कझाक नैत. ते आपल्यातले नैत !" बंधानी आपल्या बायकोला म्हणाला आणि त्याने खांदे उडवले.

" अर्थात ते कझाक नैते. जर्मनायत का काय ? नाय रशियनायत ! ते बघ-त्यांचं लाल निशाण . . . म्हणजे ते . . . !"

एक उंच कझाक पुढे आला. त्याला हिंवताप लागल्याचे दिसत होते. कारण अंगाभोवती त्याने मेंढकातडी कोट लपेटला होता, आणि पायात नमदी बूट घातले होते.

आपली केसाळ मेंढकातडी टोपी उंचावून तो म्हणाला, "ते निशाण पाहिलं? ते बोल्शेव्हिकायत !"

"तेच ते !"

काही घोडेस्वार पहाळांची आघाडी सोडून खेड्याच्या दिशेने दौडत आले. कझाकांनी एकमेकाकडे दृष्टीक्षेप केले आणि न बोलता ते निघून जाऊ लागले. पोरी आणि मुले चारी दिशांना पांगली. काही मिनिटांत रस्त्यात शुकशुकाट झाला. घोडेस्वारांचा एक घोळका खेड्यात दौडत आला आणि ते तीन कझाक नुकतेच जिथे बसले होते त्या ओक लाकडाच्या ढिगाऱ्याजवळ तो येऊन ठेपला. तो बंधानी फाटकाजवळ उभा होता. घोडेस्वारांच्या म्होरक्याने कुबान टोपी घातली होती आणि पट्टा आवळलेल्या खाकी चपकनीवर गळ्याशी मोठा लाल रुमाल बांधला होता. फाटकापाशी घोडा आणून तो म्हणाला,

" नमस्ते मालक ! फाटक खोल !"

त्या कझाकाचा चेहरा उतरून गेला. टोपी हातात काढून घेत त्याने विचारले,

" तुम्ही कोण लोक म्हणायचे ?"

" फाटक खोल !" तो सैनिक गरजला.

मारक्या डोळ्याचा त्याचा घोडा कायजे चघळीत होता. त्याने कुडाच्या कुपाटीवर पुढची लाथ झाडली. कझाकाने फाटक उघडले आणि घोडेस्वारांनी ओळीत आवाडात घोडे घातले. त्यांच्या म्होरक्याने चपळाईने जिनातून उडी घेतली आणि टांगा टाकीत तो पावलाणापाशी गेला.

इतर पायउतार होण्याआधीच पावलाण गाठून त्याने त्यावर बैठक मारली. चुट्टा पेटवला आणि आपली पेटी कझाकापुढे केली. त्या माणसाने नकार दिला.

" ओढत नाही ?"

" नाय. मेहेरबानी !"

" इथले तुम्ही जुन्या धर्माचे का ?"

" नाय आम्ही आरथोडोक्सवाले. न् तुम्ही कोण म्हणावे ?"

" आम्ही कोण ? दुसऱ्या समाजवादी सेनेचे रेडगार्डस् आहोत."

इतर घोडेस्वार आपल्या घोड्यांचे कायदे हातात धरून लगबगीने पावलाणाजवळ आले. कठड्याला त्यांनी घोडी बांधली. त्यातला एकजण उंचाडा घोड्याच्या शेंडीगत कपाळावर केस पसरलेला होता. तो मेंढवाड्याशी गेला. घराचा मालक असल्यागत त्याने धाडकन् दार उघडले. खाली वाकून त्याने मेंढवाड्याचे कूड चाचपडले आणि शिंगाला धरून एक थोराड मेंढा बाहेर खेचला.

" पेत्रिचेन्को, इकडं ये. हात दे मला.'' तो उंच कृत्रिम तारस्वरात ओरडला.

ऑस्ट्रियन लांब कोट घातलेला एक सैनिक त्याच्या मदतीला धावला. तो कझाक मालक दाढीतून बोटे फिरवीत दुसऱ्याच कुणाच्या तरी आवाडात उभा असल्यासारखा आजूबाजूला भिरीभिरी बघत होता. काही न बोलता तो नुसता खाकरला आणि पावलाण चढून घरात गेला. इकडे तलवारीने गळा चिरलेल्या त्या मेंढ्याने आपल्या बारीक तंगड्या झाडल्या.

कुबान टोपी घातलेला तो सैनिक आणि त्याच्या मागोमाग एक चिनी टोपी घातलेला आणि एक रशियन टोपी घातलेला असे तिघेजण सायवानात गेले.

" रागावू नको रे कझाका !" उंबरठा ओलांडून जाताना तो म्होरक्या बेफिकिरीने ओरडला, " आम्ही भरपूर पैसा देऊ !"

आपल्या तुमानीच्या खिशावर हात थोपटीत तो खदखदा हसला. पण त्या कझाकाच्या बायकोकडे नजर जाताच त्याचे हास्य एकाएकी जिरून गेले. चुल्हचा-

जवळ दात घट्ट आवळून ती उभी होती आणि भयभीत नेत्रांनी त्याच्याकडे बघत होती. त्या सैनिकाची चंचल नजर सायवानातून भिरभिरली चिनी टोपी घातलेल्याकडे वळून तो म्हणाला, " तू ह्या मामाबरोबर जा." त्याने कझाकाकडे बोट दाखवले. " त्याच्याबरोबर जा. तो घोड्यासाठी तुला घास देईल. थोडा घास घेऊ या आपण. "

कझाकाकडे वळून तो म्हणाला, " तुला रगड पैसा देऊ आम्ही. रेडगार्ड कधीही लुटालूट करीत नाहीत. चल चालायला लाग. कझाका चालायला लाग !" त्याच्या आवाजाचा सूर पोलादी होता.

चिनी आणि त्या दुसऱ्या सैनिकाबरोबर कझाक घराबाहेर पडला. जाता जाता तो वळून बघत होता. पावलाण उतरता उतरता त्याला आपल्या बायकोने रडक्या आवाजात घातलेली हाक ऐकू आली. तो पडवीतून धावत गेला आणि त्याने दाराला धक्का दिला. दाराची कडी सहज निखळली. त्या सैनिकाने बाईचे दंड पकडून तो तिला अर्ध अंधाऱ्या चाफेखणीत खेचत होता. आपल्या हाताने त्याच्या छातीवर लोटीत ती प्रतिकार करीत होती. तिच्या कमरेला विळखा घालून, तिला उचलून नेण्याच्या बेतात तो होता. पण त्याच क्षणी दार धाडकन उघडले.

ताडताड पावले टाकीत कझाक आला आणि आपल्या बायकोच्या पुढ्यात उभा राहिला. कणखर आणि हलक्या आवाजात तो म्हणाला,

" तू पाव्हणा म्हणून माझ्या घरात आलायस . . . माझ्या बायकोच्या का वाटंला जातोयस ? हात नाय लावायचा तिला. तुझ्या बंदुकीला मी भीत नाय. तुला हवं ते घेऊन जा. सगळं पळवून ने पण बायकोला हात लावलास तर याद राख. माझा आधी मुडदा पाडायला लागंल . . . ए तू न्यूरा . . !" त्याच्या नाकपुड्या स्फुरण पावत होत्या. बायकोकडे वळून तो म्हणाला, " तू दोरोफेई काकाबरोबर जा. तू इथं थांबण्यात अर्थ नाय !"

सदऱ्यावरचे आपले पट्टे नीट करीत तो सैनिक कुत्सित स्मित करून म्हणाला,

" एवढ्या तेवढ्यानं चिरडीला येतोयस्, कझाका. माणसाला काय थट्टामस्करी करू देशील का नाही ? सगळ्या कंपनीत मी थट्टेखोर म्हणून माहीत आहे. ठाऊक नाही ? मी मुद्दाम केलं. म्हटलं ' कशी काय बाई आहे बघू या ' तर ही बोंबलायला लागली. आम्हाला काही घास देणार का नाही ? काही नाही ? बरं, तुझ्या शेजाऱ्यापाशी आहे का नाही ?"

शीळ घालीत, जोरजोराने चाबूक फिरवीत तो बाहेर गेला. थोड्याच वेळात सगळी तुकडी खेड्यात शिरली. एकूण शंभर बागनटं आणि समशेर होती. खेड्याबाहेर रात्रीचा मुक्काम करण्याची तयारी रेडगार्डस् करू लागले. आपल्या बभंरवशाच्या आणि बेशिस्त सैनिकावर अर्थातच त्याच्या नायकाचा एवढा विश्वास नव्हता की त्यांना रात्रीचा मुक्काम खेड्यात करू द्यावा.

हाइदामाक्स आणि पादाक्रांत केलेल्या मुलुखात बंदोबस्तासाठी असलेली जर्मन फौज ह्यांच्या विरूध्द झालेल्या लढाईत दुसऱ्या समाजवादी सेनेचे तिरासपोल पथक खिळखिळे होऊन गेले. लढत लढत हे पथक मागे डॉन कडे आले. शेपतुखोवका स्टेशनावर ते डब्यातून बाहेर पडले. पण पुढे जर्मन फौज असल्याने हे पथक उत्तरेला वोरोनेझकडे पायी मजल दर मजल करीत निघाले. ह्या पथकात गुन्हेगारी प्रवृत्ती बोकाळल्याने नीतिमत्ता भ्रष्ट होऊन गेलेले हे रेडगार्डसचे पथक वाटेत धांगडधिंगा घालीत होते. १७ एप्रिलच्या रात्री ह्या सैन्यानं सेत्राखोव खेड्याजवळ मुक्काम केला. त्यांच्या नायकाच्या दमदाटीला आणि हुकूमांना न जुमानता त्यांची गर्दी खेड्यात लोटली. मग त्यांनी मेंढरांची कत्तल सुरू केली. दोन कझाक बायावर बलात्कार केले. उगाचच चौकात गोळीबार सुरू केला. त्यात त्यांचा स्वत:चाच एकजण जखमी झाला. आपल्या बरोबर आणलेले स्पिरिट पिऊन रात्री ते बेहोश झाले.

पण इकडे तीन कझाक घोडेस्वार शेजारील खेड्यांना धोक्याचा इशारा देण्यासाठी रवाना करण्यात आले. रात्रीच्या अंधारात कझाकांनी घोड्यांची जीनबंदी केली आणि हत्यारबंद झाले. घाईघाईने आवाडीचे कझाक आणि वयस्कर लोकांच्या तुकड्या बनवण्यात आल्या खेड्यात राहणाऱ्या अंमलदारांच्या आणि सार्जन्ट मेजरच्या हुकूमावरून त्यांनी त्वरेने सेत्राकोवकडे कूच केले. रेडगार्डस् छावणीच्या आजूबाजूच्या डोंगरदऱ्यातून ते लपून बसले. रात्री आजूबाजूच्या सर्व खेड्यातून माणसांचे गट आले.

आकाशात कृत्तिकापुंज फिकटला. पहाटेला चारी बाजूंनी कझाक घोडेस्वारांचा बर्फलोट गर्जना करीत रेडगार्डस्‌वर कोसळला.

एक मशिनगन तडतडू लागली आणि बंद होऊन गेली. परत तिचा तुफान गोळीबार सुरू झाला आणि परत ती शांत झाली.

एका तासात कामगिरी फत्ते झाली. ते पथक निर्दाळण्यात आले. दोनशेहून जास्त लोक गोळीने टिपण्यात आले किंवा कापण्यात आले. सुमारे पाचशे जणांना गिरफदार करण्यात आले. प्रत्येकी चार जिनसान्याच्या दोन बतारी, सर्व्हीस

मशिनगन्स्, हजारो बंदुका आणि लष्करी साहित्यसामुग्रीचा मोठा साठा, हे सर्व कझाकांच्या हाती आले.

दुसऱ्या दिवशी त्या जिल्हयातील प्रत्येक वाट आणि आडवाट चौखूर घोडी फेकणाऱ्या जासूदांच्या लाल बावटयांनी फुलून गेली. खेडयाखेडयातून धूम उसळली. सोव्हिएटा पार उलथून टाकण्यात आल्या. घाईघाईने आतामान निवडण्यात आले. मे महिन्याच्या सुरवातीपर्यन्त डॉन प्रांताचे वरच्या अंगाचे जिल्हे क्रांतिकारक समितीपासून संपूर्णतया फुटून निघाले. ' डॉनचे वरचे खोरे ' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या दाट लोकवस्तीच्या व्येशेन्स्कायाची निवड नवीन जिल्हाकेन्द्र म्हणून करण्यात आली. बारा कझाकी आणि एक युक्रेनी जिल्हा आपल्या कक्षेत घेणारा वरच्या डॉनचा प्रदेश डॉन प्रांताच्या मुख्य केन्द्रापासून फुटून आपले स्वतंत्र जीवन जगू लागला. येलान्स्काया जिल्हयातील एक कझाक घाईघाईने प्रादेशिक आतामान म्हणून निवडण्यात आला. झाखार आकिमोविच आलफियोरोव नावाचा हा जनरल लष्करी अकादमीचा पदवीधर होता. त्याच्याबद्दल अशी अफवा होती की, एका दरिद्री कझाक अंमलदारापासून जनरलच्या हुद्यापर्यन्त त्याने जी प्रगती केली तिचे श्रेय त्याच्या उत्साही आणि हुशार बायकोला होते. लोक म्हणत की, आपल्या गणंग पतिराजाचे कान पकडून तिने त्याला ओढत नेला आणि तीनदा नापास होऊन चवथ्या खेपेला अकादमीची परिक्षा पार होईपर्यन्त त्याला उसंत म्हणून मिळू दिली नाही.

पण सध्या आलिफरोवबद्दल लोक बोलले तरी ते तेवढया पुरतेच. कझाकांची मने इतर विचारात गढून गेली होती.

---

## २२

पुराचे पाणी शेतातून ओसरू लागले होते. कुरणरानाच्या वरंडीजवळची श्यामल धरित्री उघडी पडली होती. पुराने मागे ठेवलेले सुके वेळू, फांदेऱ्या आणि पालापाचोळा तिच्या कडेला लगटले होते. डॉनच्या काठच्या तुडुंबलेल्या रानातील झुळझुळती वळुंजी हिरवी होऊ लागली आणि तिच्या फुलांचे तुरे खाली लोंबू लागले. हिवर वृक्षाच्या कळ्या फुटण्याच्या बेतास आल्या. खेड्यातील शेतमळ्यात नाफरमानी वळुंजीच्या डहाळ्या खाली बेहेडावर झुकल्या होत्या. आणि रेशमी बदकपिलाच्या लवाळ्याप्रमाणे असणाऱ्या त्यांच्या पिवळ्या बोंडकळ्या वाऱ्याने चाळवलेल्या जळात चुबकळत होत्या. उजाडती आणि मावळतीच्या समयी रान-तित्तर आणि बदकांचे थवे ताल्याजवळ अन्नाच्या शोधार्थ झेपावत आणि पाणबुडे पक्षी डोहऱ्यातून खणखणीत सुरात साद घालीत. दोन प्रहरी वाऱ्याने लहरणारे डॉनचे पृष्ठजळ पांढऱ्या पिसांच्या पाणकोंबड्यांना कुरवाळीत असे.

त्या वर्षी अनेक पक्षी स्थलांतराच्या मार्गावर होते. शरावीलाल सूर्योदयाने पहाटे जेव्हा पाणी रक्तरंजित होऊन जात असे तेव्हा आपल्या होड्या वल्हवीत पागांकडे जाणाऱ्या कझाक मासेमारांनी रानबदकेसुद्धा रानातील फासव्यात घेताना पाहिली होती. पण क्रिस्तोनिया आणि म्हातारा मातवेई काशुलिन ह्यांनी खेड्यात आणलेली बातमी म्हणजे सर्वात मोठा चमत्कार होता. आपल्या शेतकामासाठी कोवळ्या ओकची जोडी निवडण्यासाठी ते सरकारी जंगलात गेले होते. गचपानातून वाट काढीत असताना त्यानी एक रानबकरी आणि तिचे करडू ह्यांना चाळवले. त्या वाळकुटच्या पिंगट पिवळ्या बकरीने उंटकटार आणि काटेरान माजलेल्या

तगवडीतून झेप घेतली आणि काही सेकंद त्यांच्याकडे टकाटक बघत ती उभी राहिली. आपल्या शेलाट्या तंगड्या ती घाबरटपणे नाचवीत होती. ते करडू तिला बिलगले होते. क्रिस्तोनियाचा आश्चर्याचा हुंकार ऐकताच ओक वृक्षाच्या रोपट्यातून तिने अशी काही झपाट्याने धूम ठोकली की तिचे धूसर निळे खूर आणि तिची कपिश शेप ही त्या कज्ञाकांच्या नजरेस पडली.

" ते काय होतं ?" आपली कुऱ्हाड खाली टाकीत मातवेई काशुलिनने आश्चर्याने विचारले.

रानाच्या निगूढ शांततेत क्रिस्तोनिया अनिर्वचनीय आनंदाने गरजला,

" ती बकरी असली पायजे. रानबकरी ! कारपाथियन पर्वतात मी अशा बकऱ्या पाहिल्यात. "

" मग लढाईनं त्याना आमच्या माळरानाकडं हुसकलेलं दिसतंय. "

ते मान्य करण्याखेरीज क्रिस्तोनियाला गत्यंतरच नव्हते. " तसंच दिसतंय " तो म्हणाला, " तिच्या बरोबरचं करडू पायलंस ? छान दिसत होतं च्यायला ! जसं आईबरोबर पोरच !"

परत येताना साऱ्या वाटेत ते आपल्या जिल्ह्यात आलेल्या त्या अपूर्व पाव्हण्यावर चर्चा करीत होते. म्हाताऱ्या मातवेईला शंका येऊ लागली,

" ती बकरी म्हणावी तर तिला शिंगं कुठं होती ?"

" तुला शिंगं कशाला हवीत ?"

" मला शिंगं नकोयत !" मी एवढंच विचारीलं की "ती बकरी होती तर बकरीगत दिसत का नव्हती ? शिंगाखेरीज बकरी कधी पाहचलेयस ? हा मुद्दाय ! कदाचित एकाद्या जातीची मेंढी असंल !"

" मातवेई आजोब, तुला आता म्हातारचळ लागला."

क्रिस्तोनिया रागेजून म्हणाला, " मेलिखोवच्या घरी जा न् बघ. त्यांच्या ग्रिगरीकडे बकरीच्या तंगडीचा बनवलेला चाबूकाय. मग तर कबूल करशील का नाय ?"

म्हाताऱ्या मातवेईने त्याच दिवशी मेलेखोवच्या घरी जाण्याचे काम केले. ग्रिगरीचा चाबूक रानबकरीच्या तंगडीच्या कातडीने मढवलेला होता. एवढेच काय पण टोकाला चिमुकला खूर तसाच ठेवला होता आणि त्याला तांब्याचा नाल ठोकला होता.

उपवासमासाच्या शेवटच्या आठवड्यात बुधवारी मिशा कोशेवोई रानाजवळील नदीत, नदीत लावून ठेवलेले पाग तपासण्यासाठी भल्या पहाटेसच गेला. पहाटेपूर्वीच तो घरून निघाला. सकाळच्या गोठवणीत शहारलेल्या भूमीवर पातळ हिमाचे पापुद्रे चढले होते. त्याच्या पावलाखाली ते हिम करकरत होते. आपले भलेमोठे वल्हे खांद्यावर टाकून मिशा चालला होता. त्याची टोपी डोक्यावर मागे बसली होती. पांढऱ्या गरम मोज्यात त्याने आपली तुमान कोंबली होती. उषःकालची उत्तेजक हवा घेत आणि कोवळ्या दमटपणाचा गंध हुंगत तो चालला होता. आपली होडी त्याने ढकलली. आणि उभा राहून वल्हे जोराने ओढीत तो झपाट्याने वल्हवू लागला.

आपले पाग त्याने तातडीने तपासले. त्यातील मासळी काढून घेतली. पाग परत पाण्यात फेकून दिले आणि परतीच्या वाटेने सहजगत्या वल्हवताना चुट्टा ओढायचा विचार केला. सूर्योदयाने अस्मानाला लाली येऊ लागली होती. पूर्वेकडील धूसर निळे आकाश खालून रक्ताचा फवारा उडवल्यासारखे दिसत होते. क्षितिजा-वरून लालीमा पसरला आणि त्याला तांबारलेल्या सुवर्णाचे रूप आले.

आपला चुट्टा शिलगवल्यावर मिशाने पाणबुड्या पक्षांचे संथ उड्डाण न्याहा-ळले. त्याच्या चुट्टयाचा धूर वेलांट्या घेत झाडांच्या फांद्यांना बिलगत होता आणि त्याचे ढग विरून जात होते. त्याने आपली शिकार तपासली. तीन कोवळे स्वरलेट, आठ पौंडांचे कार्प आणि पांढऱ्या मासळीचा ढीग. त्याच्या मनात आले 'ह्यातली काही मासळी विकली पायजे. सुकवलेले पेअरच्या बदल्यात चकण्या लुकेशा ही घेईल. आई ती करील. फळं उकडेल !'

पडतोऱ्यापर्यन्त तो वल्हवीत आला. त्यानं आपली होडी लावली. त्या कुरणरानाच्या वरडीपाशी एक माणूस बसला होता. दणकट तोलीव ओढ देत होडी झपाट्याने वल्हवताना त्याच्या मनात आले. " हा कोण ?" थोडेसे जवळ आल्या-वर गुड्डू त्याच्या नजरेस पडला. तो उकीडवा बसून वर्तमानपत्राच्या सुरनळीचा बनवलेला भला मोठा चुट्टा ओढीत होता. त्याचे धूर्त मिचमिचे डोळे पेंगूळतेने चमकत होते. गालफडावर केसांचे खुंट वाढलेले होते.

" काय हवंय तुला ?" मिशाने त्याला ओरडून विचारले. एखाद्या चेंडूप्रमाणे त्याचा आवाज पाण्यावरून उशी खात गेला.

" जवळ आण होडी !"

" काही मासळी हव्येय काय ?"

" मला कशाला हव्येय मासळी ?"

खोकल्याची उबळ येऊन गुड्डूचा देह घुसळला गेला. तो जबरदस्त थुंकला आणि नाखुषीने उभा राहिला.

एकाद्या बुजगवण्यावर लावल्यासारखा त्याचा ढगळ ओवरकोट त्याच्या अंगावर लोंबलेला होता. त्याच्या टोपीच्या लोंबत्या पांखाखाली त्याचे तीक्ष्ण किडकिडीत कान झाकलेले होते. अलीकडेच तो खेड्यात परतला होता. तो रेडगार्ड होता अशी त्याच्याबद्दल वदंता होती. लष्करातून सुटल्यापासून तो कुठे होता ह्याबद्दल कझाकांनी त्याला विचारले पण ते धोकेबाज सवाल टाळून गुड्डू काही-तरी उडवाउडवीची उत्तरे द्यायचा. युक्रेनमधे रेडगार्डस्च्या पथकात आपण चार महिने काढले. युक्रनी राष्ट्रीय सैन्याकडून आपण कैद झालो, तिथून पळालो आणि आता रोस्तोवजवळ लाल सेनेला सामील झालो. आणि आता विश्रांतीसाठी आणि स्वत:ची फेरतयारी करण्यासाठी आपण मोठ्या मुदतीची रजा घेतली आहे. हें सगळे त्याने इवान अलेक्सिएविच आणि मिशा कोशेवोई ह्यांच्याजवळ कबूल केले.

गुड्डूने आपली टोपी काढली आणि आपल्या खराटद्या केसातून हात फिर-वला. आजूबाजूला न्याहाळून पाहिले आणि होडीजवळ जाऊन तो हलकेच म्हणाला,

" खराब बाताय . . . फार खराब ! दे सोडून तुझी मासेमार ! नायतर आपण आपले मासे मारत राहू न् बाकीचं सगळं विसरून जाऊ !"

" तुझ्याकडं काय बातमी आहे ? सांग मला !" आपल्या ओशट पंजात गुड्डूचा हात दाबून आणि प्रेमळपणे हसून मिशाने विचारले. बरीच वर्षं ते जानी दोस्त होते.

" काल मिगुलिनस्कायाला ' रेडगार्डस् ' चा धुव्वा उडाला. लढत सुरू झाल्येय भाऊ ! आखाडा घुमायला लागलाय !"

" काय ? रेडगार्डस् ? मिगुलिनस्कायाला ते कसे पोचले ?"

" जिल्ह्यातून त्यांचं आगेकूच चाललं होतं. कझाकांनी त्यांची हड्डी नरम केली. कैदींना त्यांनी कारगिनला पाठीवलंय. तिथं लष्करी अदालत सुरू पण झाल्येय. आज तातारस्कीत सगळ्यांची लष्करभरती होणाराय. आज सकाळीच ते घंटा बडीवतील."

कोशेवोईने आपली होडी बांधली. मासळी टोपलीत ओतली आणि लांब टांगा टाकीत तो चालू लागला. त्याच्या पुढे एकाद्या शिंगरागत गुड्डू नाचत चालला होता. त्याच्या कोटाचे पांख उडत होते, हातवारे चालले होते.

" इवान अलेक्सिएवनं मला सांगितलं. आताच त्यानं मला सुट्टी दिली. गिरणी रात्रभर चालूय. त्यानं पक्कचा गोटातून हे ऐकीतलं. व्येशेन्स्कायाचा अंमलदार मोखोवकडं आलाता !"

" आता कसं करायचं ?" असा विचार मिशाच्या मनात आला. लढाईच्या काळात निबर न काळवंडून गेलेल्या त्याच्या चेहऱ्यावर चिंता प्रकटली. त्याने तिरप्या नजरेने गुड्डूकडे पाहिले.

" आता काय होणार ?"

" खेड्यातून निघून जायला हवं !"

" कुठं ?"

" कामेनस्कायाला. "

" पण तिथली कझाकं . . . !"

" मग जरा डावीकडं . . . !"

" कसं जायचं ?"

" मनात असंल तर जाता ईल. नसल मनात तर बस हितं न् जा मसणात !" एकाएकी नाकपुड्या फेंदारून गुड्डू म्हणाला.

" कुठं ? कुठं ? कुठं कुठं ! मला काय पत्ता ? बघ जरासा न् सापडल आडोसा !"

" तणतणू नको ! इवान काय म्हणीतो ?"

" तू इवानला हालवीत बसलास तर . . ."

" हळू . . हळू ! तिथं ती बाई बघत्येय . . . !"

आवाडातून गायी बाहेर हाकारणाऱ्या एका तरुण बाईकडे त्यानी सावधपणे पाहिले. ती ब्रेहाची सून होती. पहिल्याच फाट्यावर मिशा मागे फिरला.

" कुठं चालला ?" गुड्डूने आश्चर्याने विचारले.

" मी चाललो माझं पाग काढायला " मागे न बघता मिशा म्हणाला.

" ते का ?"

" मला ते गमवायचं नाय !"

"तर मग आपण जायचं ?" गुड्डूने आनंदाने विचारले.

मिशाने आपले वल्हे हालवले आणि निघून जाताना तो म्हणाला, "तू इवान अलेक्सिएवकडं जा. मी माझं पाग घरी घेऊन जातो न मग येतो."

× × ×

आपले मित्र असणाऱ्या कझाकांपर्यन्त ही बातमी अलेक्सिएविचने आधीच पोचवली होती. आपल्या धाकट्या पोराला त्याने मेलिखोवकडे धाडले. त्याच्याबरोबर ग्रिगरी आला. इशाराबिशारा न मिळताच क्रिस्तोनिया येऊन हजर झाला. जणू काही येऊ घातलेल्या संकटाची चाहूल त्याला लागली होती. लौकरच कोशेवोईही आला. आणि एकूण परिस्थितीवर त्यांची चर्चा झाली. कोणत्याही क्षणी घाट बडवल्याचा आवाज कानी येईल ह्या जाणीवेने ते सगळे एकदम आणि गडबडीने बोलत होते.

"आपण लगोलग पळालं पायजे. आपले पाग, टांगूल आवरायचे न् धूम ठोकायची !"

"कारण सांग. का पळून जायचं ?" क्रिस्तोनियाने विचारले.

"'का पळून जायचं' म्हणजे काय ? आत्ता लष्कर भरतीचा हुकूम सुटंल न् तू सुटशीलस वाटलं काय ?"

"मी नाय जाणार. बस. संपलं !"

"घेऊन जातील तुला !"

"बघू कसं घेऊन जातात. मी काय नांगराचा बैल नाय, "

आपल्या तिरळ्या बायकोला इवान अलेक्सिएविचने घराबाहेर पाठविले आणि तो रागाने गुरकावून म्हणाला,

"ते तुला घेऊन जातील गुड्डू म्हणीतो ते बरोबराय ! फक्त जायाचं कुठं ? एवढाच प्रश्नाय !"

"ते आधीच मी त्याला सांगितलं !" मिशा सुस्कारा टाकून म्हणाला.

"तुम्हाला काय वाटंल तसं करा. तुमची वरात मला काय करायचीय ?" गुड्डू नाकपुड्या फेंदारून म्हणाला, "मी स्वतः चालता होणार. मला उगाच तळ्यातून मळ्यात न् मळ्यातून तळ्यात करणारे नकोयत. का? कुठं? कधी? कशाला ?

तुमची भादरून तुम्हाला कोठडी दाखवतील. बोल्शेव्हिक म्हणून ! हितं काय बसलायत टिंगलटवाळी करीत ? ह्या अशा वक्ताला ? सगळं मुसळ केरात जाइल !"

भिंतीतून उपटून काढलेला खिळा हातात खेळवीत एकाग्रतेने पण शांत क्रोधाने ग्रिगरी मेलिखोवने त्याला हटकले. रूक्षपणे तो म्हणाला, " इतका घाईला येऊ नको. तुझी बाब वेगळीय्. तुला इथं कसले पाश नैत. मन चाहेल तिकडं तू जाऊ शकतोस ! पण आम्हाला नीट काळजीनं विचार केला पायजे. मला बायको न् दोन मुलायत ! तुला जन्मात भेटायचा नाय असा बारूद मी चाखून बसलोय् !" आपले काळे संतप्त नेत्र त्याने आकुंचित केले. आपले हिंस्त्र बळकट दात विचकून तो कडाडला,

" आगाव भांचोद ! तुझ्या तोंडात तीळ नाय भिजत ! तुझं हे आजचं नाय . . . नेहमीचाय ! तुझ्या अंगावरच्या जाकीटखेरीज कायाय तुझं . . . ?"

" कुणाला दम देतोस ?" गुड्डू ओरडला, " तुझी अंमलदारी दाखवतोय्स होय ? ओरडायचा काम नाय ! मी थुका लावून तुला विचारत नाय !" साळिंद-रासारखा त्याचा चेहरा संतापाने विवर्ण होऊन गेला आणि त्याचे मिचमिचे रागीट डोळे दुष्टपणे चमकू लागले. एवढेच काय पण त्याच्या गालफडावरचे दाढीचे खुंटही थरथरत आहेत असे वाटत होते.

जिल्ह्यात कझाक आणि रेडगार्डस् ह्यांच्या चकमकी चालू असल्याची बातमी इवान अलेक्सिएवकडून ऐकून आपली मनःशांती बिघडवल्याबद्दल ग्रिगरीला संताप आलाच होता. गुड्डूच्या ओरडण्याने तो पिसाळला आणि गुड्डूला त्याने धारेवर धरले. थोबाडीत मारल्याप्रमाणे तो उसळून उभा राहिला आणि आपल्या स्टुलावर चुळबुळत बसलेल्या गुड्डूजवळ गेला. त्याच्या कानफटात ठेवून देण्याची इच्छा कष्टाने आवरीत तो म्हणाला,

" चूप बस रे सर्पा ! दरिद्री शेंबडं ! पाजी हैवान ! कुणाला हुकूम देतो ? घाल जा तुझी गांड तुला कुठं घालायची तिथं ! चल फूट हितनं म्हणजे तुझी घाण जाइल हितून ! न् थोबाड बंद कर, नायतर जन्माची याद राहिल असा घोळवीन भडव्या !"

" दे सोडून ग्रिगरी ! असं करून नाय चालायचं !" ग्रिगरीचा गुद्दा गुड्डूच्या नाकापासून निवारीत कोशेवोईने रदबदली केली.

" ह्या कझाकी सवयी सोडून दे – सोडून दे ! लाज नाय वाटत ? थुत तुझी मेलिखोव ! थुत तुझी !"

कसनुसा खोकत गुड्डू उठून दरवाजाकडे गेला. पण उंबरठ्याशी गेल्यावर त्याच्याने राहवेना. तो मागे फिरला आणि हिंस्त्र स्मित करणाऱ्या ग्रिगरीवर शाब्दिक घाव घालून म्हणाला,

" न् हा रेडगार्डस् मधं होता ! कतलबाज ! तुझ्या सारख्यांना गोळ्या घालून मारलं आम्ही . . . !"

हे ऐकल्यावर ग्रिगरीचाही संयम सुटला. त्याने धक्का मारून गुड्डूला पड-वीत फेकले. त्याच्या फाटक्या सैनिकी बुटाच्या टाचा तुडवीत तो म्हणाला, " चालता हो नायतर तंगडं तोडून देईन हातात !"

" अरे कशाला उगाच ? लहान पोरागत वागताय तुम्ही. " आपली मुंडी नाराजीने हलवीत आणि ग्रिगरीकडे कठोरपणे बघत इवान अलेक्सिएविच म्हणाला. अगदी जिभेच्या टोकावर येणारे रागाचे शब्द गिळून टाकण्याचा प्रयत्न करीत मिशा न बोलता ओठ चावीत बसला होता.

" इतरांनी काय करावं हे सांगण्याचो ह्यानं उठाठेव कशाला करावी ?" आपल्या वर्तनाचे समर्थन करीत ग्रिगरी म्हणाला. पण तो जरा ओशाळलाच होता. क्रिस्तोनियाने त्याच्याकडे आपुलकीने पाहिले आणि त्याच्या नजरेला नजर भिड-ताच ग्रिगरीने एक भाबडे पोरागत स्मित केले. " जवळ जवळ हाणला त्याला पण हाणायला आहे काय ! एक थप्पड दिली तर परत उठायचा नाय !"

" मग काय मंडळी ? काय तरी ठरवलं पायजे !"

मिशा कोशेवोई टक लावून बघत होता त्यामुळे जरा चुळबुळत त्याच्या प्रश्नाला उत्तर देताना इवान मलेक्सिएविच म्हणाला,

" तर मिखाइल ग्रिगरीचं म्हणणं एका – परीनं बरोबराय. उचललं साम न गेले पळून असं कसं आपल्याला करता येईल ? आपल्या घरादाराचा वि करायला हवा. जरा थांब !" मिशाचा अधीर अविर्भाव लक्षात येऊन तो घा म्हणाला, " कदाचित काहीच व्हायचं नाय . . . ! कोण जाणे ! स्येत्राखो त्यांनी पथकं मोडलीन न् दुसरे येणार नैत. आपण थांबू या. पाहू या. मला बा न पोराय. आमचे कपडे विरलेत. घरात आटा नाय. तर मी कसा निघून जाणा त्यांच्याकडं कोण बघणार ?"

चिडलेल्या मिशाने भ्रुकुटी उंचावल्या आणि मातीच्या जमिनीकडे नजर खिळवून त्याने विचारले, " तर मग तुमचा जायचा विचार नाय ?"

" मला वाटतं जरा थांबावं ! पळून काय केव्हाही जाता येईल. तुला काय वाटतं ग्रिगरी ? न् तुला रे क्रिस्तोनिया ?

इवान आणि क्रिस्तोनियाकडून अनपेक्षित पाठिंबा मिळाल्यानं ग्रिगरी जरा हुरूपाने बोलू लागला,

" अर्थातच ! तेच तर मी म्हणतोय. म्हणून तर गुड्डूची फिरकी काढली. ते तेवढं सोपं नाय ! वाजवली टाळी की निघाले असं नाय ! त्यावर विचार करायला हवा . . . मी म्हणतो विचार करायला हवा !"

त्याचे बोलणे संपते न संपते एवढ्यात गिरिजाघराच्या मनोऱ्यावरून घंटेचा टोल घुमला. त्या नादाने चौक, रस्ते, गल्लघाबोळ भरून टाकले. पूरपाण्याच्या पिंगट पृष्ठभागावरून, टेकड्यांच्या खडूळ दरडीवरून तो घंटानाद पसरला. त्याची लहान लहान गोटी फुटून रानात विरून गेली. परत एकदा त्या ध्वनीचा कल्लोळ झाला आणि धोक्याचा तीव्र नाद फुटला.

" ठाण् . . . ठाण् . . . ठाण् . . . ठाण् . . . "

" झाली घंटा !" डोळ्याची फडफड करीत क्रिस्तोनिया म्हणाला. " मी माझ्या घोडीकडं निघालो. पलीकडच्या तीराला जाऊन रानात शिरायचं. मग शोधू देत त्यांना कसं शोधतायत ते !"

" ठीक. मग आता ?" म्हाताऱ्या माणसाप्रमाणे कोशेवोई कष्टाने उठून उभा रहात म्हणाला.

" सध्या तर आपण जात नाय !" इतरांच्या वतीनं ग्रिगरीने उत्तर दिले.

मिशाने परत एकदा भुवया उंचावल्या आणि कपाळावर झेपावलेली केसांची सोनेरी बट मागे सारली.

" ठीकाय . . . अच्छा . . आपले रस्ते वेगळ्या दिशेनं जाताय्तसं दिसतंय." तो म्हणाला.

इवान अलेक्सिएविच दिलगिरीचे स्मित करून म्हणाला, " मिशा, तू तरूण न् भडकू आहेस. तुला काय वाटतं त्यांचं एकमेकाशी परत जमणार नाय ? जमंल ! खात्रीही बाळग !"

इतरांचा निरोप घेऊन कोशेवोई बाहेर पडला. आवाड ओलांडून तो शेजारील मळणीच्या खळ्याकडे वळला. एका खड्ड्यात गुड्डू दबून बसला होता. मिशा ह्या वाटेनं जाईल हे त्याने ताडलेले असावे. त्याला भेटण्यासाठी उठून उभा रहात त्याने विचारले,

" मग ?"

" ते नाय म्हणीतात !"

" मी ते आधीच ओळीखलं होतं. त्यांच्यात जोर नाय . . . न् मिशा . . . . हलकट कुत्ता साला . . . तुझा दोस्त ! दुनियेवर उठलेला करंटा ! डुकरानं, माझा अपमान केला. फक्त त्याच्या अंगात जादा ताकदाय म्हणून. माझ्याजवळ हत्यार नव्हतं म्हणून नाही तर जीव घेतलास्ता त्याचा !" गुदमरलेल्या आवाजात तो म्हणाला.

त्याच्याबरोबर ढांगा टाकीत जाणाऱ्या मिशाने त्याच्या खराटचा केसांकडे नजर टाकली. त्याच्या मनात आले, 'जीव घ्यायलाच पायजे त्या रान बोक्याचा!'

ते झपाझप चालत होते. घंटेचा प्रत्येक टोल त्यांना पिटाळीत होता.

" माझ्या घरी चल !" मिशाने सुचविले, " काय तरी खायला घेऊ न् चालायला लागू. पायी जाऊ या. माझं घोडं मागंच ठेवतो. तुला बरोबर काय नाय घ्यायचं ना ?"

" माझ्याजवळ काय नाय " गुड्डू नाखुषीने म्हणाला. " हवेली नायतर जायदाद घ्यायला मी काय पैसा बाचवला नाय. गेला पंधरवडा तर मजुरीही नाय मिळाली. पण तो ढेरपोटचा थेरडा मोखोव माजू दे त्यावर. मजुरी द्यायची नाय कळलं तर नाचल आनंदानं !"

घंटेचा आवाज थांबला होता. सुस्तावलेली शांतता अढळ होती. रस्त्याच्या कडेच्या राखाडीत कोंबडीची पिल्ले टोचा मारीत होती. वासरे वरांडीखालचा झाडपाला शोधीत होती. मिशाने मागे वळून पाहिले – कझाक चौकातील सभेकडे घाईघाईने निघाले होते. काही जण जाता जाता वर्दीच्या चपकनीची बटणे लावीत होते. एक घोडेस्वार चौकातून घोडा फेकीत गेला. शाळेपाशी गर्दी जमली होती. बायकांनी डोईला पांढरे रूमाल बांधले होते. पांढरे स्कर्ट घातले होते. पुरुषमाणसे एकजात काळ्या वेषात होती.

हंडे घेऊन जाणारी एक बाई त्यांच्या वाटेनं थबकली. शकुनाच्या कल्पनेने त्यांची वाट ओलांडून जायला ती तयार नव्हती.

" चला चला !" ती रागाने ओरडली " तुमची वाट मी ओलांडीत नाय !"

मिशाने तिला नमस्ते केले. खटचाळ स्मित करीत तिने विचारले, तिकडं का नाय जात रे मिशा ?"

" घरी जरा कामाय !"

ते बाजूच्या गल्लीत वळले. मिशाच्या घराचे छप्पर त्यांना दिसत होते. चेरीची सुकलेली डहाळी बांधलेली सारिका पेटी वाऱ्यावर आंदोळत होते. उंचावटयावर पवनचक्कीचे शीड मंदगतीने फिरत होते. शिडाची फाटलेली धांदोटी फडफडत होती आणि छपरावर घातलेले पत्रे किंचित खडखडत होते.

ऊन्ह कडक नव्हते पण उबदार होते. डॉनवरून ताजा वारा वहात होता. बोगातिऱ्योवच्या आवाडात काही बायका मोठया घराला चिखल लिपून चुना देत होत्या. ईस्टरची तयारी चालली होती. त्यातली एक बाई शेण घालून चिखल मळीत होती. ती गोलाकार फिरत होती. तिचा स्कर्ट तिने बराच वर केला होता. त्या रेंदाडातून आपल्या पुष्ट गोऱ्या जांघा ती वर उचलीत होती. आपला स्कर्ट तिने बोटांच्या चिमटीत धरला होता. त्यामुळे गुडघ्यावर मासात घट्ट रुतून बसलेले तिचे सुती गार्टर्स दिसत होते. आपल्या रूपाचे तिला कौतुक होते आणि सूर्य जरी अद्याप क्षितिजाच्या फारसा वर आला नव्हता तरी तिने चेहऱ्यावर रूमाल बांधला होता. दुसऱ्या दोघीजणी आरखिपाच्या सुना होत्या. डोळ्यापर्यन्त तोंडावर रूमाल बांधून त्या केंबळाने शाकारलेल्या छपरापर्यन्त शिडीवर चढल्या होत्या. आणि भिंतीला चुना देत होत्या. बाह्या कोपराच्या वर गुंडाळून त्या कुंचला मागेपुढे ओढीत होत्या आणि चुन्याचे तुषार त्यांच्या अंगावर उडत होते. काम करता करता त्या गाणे म्हणत होत्या. त्यातील मोठी सून मरिया बेगातिऱ्योवच्या एका मुलाची विधवा होती. तिचे मिशाबरोबर उघड उघड संधान होते. तिच्या तोंडावर ठिपके असले तरी ती बाई देखणी होती. ती खालच्या आवाजात गाऊ लागली तिचा आवाज जवळ जवळ मर्दानी ताकदीचा आणि सगळ्या खेड्यात प्रसिध्द होता.

नच दुःख कुणाला इतुके . . . !

दुसऱ्या बायांनी सुराला सुर दिले आणि त्या तिघींच्या आवाजाची कुशल गुंफण होऊन एक खिन्न भोळे करूण गीत उमटले.

' संगरी प्रियाला जितुके
तोफेचा गोलंदाज
सय माझी ज्याला रोज '

मिशा आणि गुड्डू कुपाटीच्या अगदी जवळून जात होते. कुरणातील घोड्यांच्या खणखणीत खिंकाळण्यात मिसळून गेलेले गाणे ते ऐकत होते.

' संदेश अचानक आला
की साजण समरी पडला
पडला ग साजण पडला
झुडतराखालती निजला '

मरियाचे उत्कट कबरे डोळे रुमालाखालून चमकत होते. खाली डोळे वळवून ती मिशाकडे रोखून बघत होती. शिंतोडे उडालेला तिचा चेहरा स्मितानं उजळला होता. खोल मादक आवाजात ती गाऊ लागली.

' त्या बटा कुरळ सोनेरी
फडफडती वाऱ्यावेरी
ते पिंगट गाढे डोळे
टोचती कावळे काळे . . .'

बायकाकडे बघून मिशा कोमल स्मित करीत असे तसे त्याने तिच्याकडे आणि चिखल मळणाऱ्या पेलागेयाकडे हसून पाहिले आणि तो म्हणाला,

" स्कर्ट जरा वर उचल. आम्हाला कुपाटीवरून नीट दिसत नाय ! "

त्याच्याकडे पाहून तिने डोळे बारीक केले.

" बघायचं असलं तर बघायला ईल."

आपले हात कमरेवर ठेवून मरिया शिडीवर उभी होती. आजूबाजूला नजर टाकीत तिने हेल काढून विचारले,

" कुठं गेलाता सख्या ?"

" मासं धरायला !"

" लांब नको जाऊ. आपण कुणगीत जाऊ न् मजा करू या !"

" निलाजऱ्या बये ! "

मरियाने जिभेचा टक्कन आवाज केला आणि हसत हसत आपला ओला कुंचला मिशाच्या अंगावर झाडला. चुन्याच्या थेंबांचे शिंतोडे त्याच्या जाकीटावर आणि टोपीवर उडाले. " गुड्डू तरी आम्हाला उसना दे. घर झाडायला त्याची

मदत होईल." ते पाठमोरे वळले तशी एक बाई ओरडली. तिने स्मित करताच तिचे दुग्धधवल दात प्रकट झाले. मरिया तिच्या कानात काहीतरी कुजबुजली तेव्हा त्या खो खो हसू लागल्या.

"खाजाळू कुत्र्या!" गुड्डू कपाळाला आठचा घालून म्हणाला आणि भरभर चालू लागला. पण खिन्न आणि हळुवार स्मित करीत मिशाने त्याचे म्हणणे दुरूस्त केले.–

"खाजाळू नाय. फक्त आनंदी! मी निघून जातोय पण माझी लाडकी मागं ठेवून जातोय." आपल्या आवाडाच्या फाटकातून आत शिरत तो म्हणाला.

---

# २३

कोशेवोई निघून गेल्यानंतर ते कझाक काही वेळ तसेच न बोलता बसून राहिले. भयसूचक घंटा खेडयात दणाणत होती आणि घराच्या खिडक्यांची लहान तावदाने त्या आवाजाने थरथत होती. इवान अलेक्सिएविच खिडकीच्या तावदानापलीकडे न्याहाळून बघत होता. सकाळच्या उन्हात मांगराची जीर्ण सावली जमिनीवर पडली होती. कोवळया तृणावरील दवबिंदू पांढुरके दिसत होते. काचेतून सुद्धा आकाश नीलवर्ण दिसत होते. क्रिस्तोनियाच्या झिज्या विस्कटलेल्या झुकलेल्या मस्तकाकडे इवानने नजर टाकली.

" कदाचित ही त्याची अखेर तर नसंल ? मिगुलिन्स्कायाच्या लोकांनी लाल सैनिकांचा पिट्टा काढलाय तेव्हा ते आता पुढं नाय यायचे . . ."

" नाय !" ग्रिगरीचा सबंध देह झटका दिल्यागत हालला. " त्यांनी सुरवात केलेय. ते सोडणार नैत. तर मग चौकात जायाचं का आपण ?"

इवान अलेक्सिएविचने टोपी उचलली आणि आपले शंकानिरसन करून घेण्यासाठी विचारले,

" मग आपण गंजलो म्हणावं का कसं ? मिखाइल तापट डोक्याचाय. पण तो चळवळ्याय. त्यानं आपल्याला झाडलंन् !"

कुणीच उत्तर दिले नाही. न बोलता ते बाहेर पडले आणि चौकाच्या दिशेने निघाले.

जमिनीवर नजर लावून इवान अलेक्सिएविच विचारात गढून चालला होता. आपण चुकीचा मार्ग निवडला--विवेकाचा कौल मानला नाही, ह्या विचाराने तो व्यथित होऊन गेला होता. गुड्डूचे आणि मिशाचे बरोबर होते. त्या सर्वांनी का कू न करता जायला हवे होते. आपल्या वागणुकीचे समर्थन करण्याचे त्याचे प्रयत्न निष्फळ होते. कुरणरानातील पातळ बर्फाचा घोड्याच्या टापाखाली चुराडा व्हाव त्याप्रमाण त्याच्या 'आतल्या' खवचट हेटाळणीच्या आवाजाने त्याचे प्रयत्न नेस्तनाबूद करून टाकले. एका गोष्टीचा त्याने खंबीर निर्धार केला आणि तो म्हणजे मिळालेल्या पहिल्या संधीचा फायदा घेऊन बोल्शेव्हिकांच्या हातावर तुरी द्यायची. चौकाकडे चालता चालता त्याने हा निर्णय घेऊन टाकला. पण ग्रिगरीला किंवा क्रिस्तोनियाला त्याने तो बोलून दाखवला नाही. कारण त्याने अस्पष्टसे हे ताडले होते की, ज्यातून जात आहेत तो लढा त्याच्या लढ्यापेक्षा वेगळा आहे आणि खोलगट अंतर्यामी त्याची त्याला भीती वाटत होती. त्या तिघांनीही गुड्डूची सूचना फेटाळून लावली होती. प्रत्येकाने आपल्या कुटुंबाची सबब पुढं केली होती परंतु त्या प्रत्येकाला हे ठाऊक होतं की, ही सबब लंगडी आहे आणि त्यांच्या निर्णयाचे समर्थन करणारी नाही. आता प्रत्येकाला आपण जणू काही हलके आणि लाजिरवाणे कृत्य केल्यासारखे वाटून दुसऱ्याच्या संगतीचा संकोच वाटत होता. ते गप्प होते परंतु मोखोवच्या घरावरून जाताना तो व्यथित करणारा मुग्धपणा इवान अलेक्सिएविचला सहन होईना. स्वतःला आणि इतरांना ताडन करीत तो म्हणाला,

" हे छपवण्यात काही अर्थ नाय. आघाडीच्या बोल्शेव्हिकाकडून आपण माघारी आलो न् आता झुडूपात सरपटत चाललोय. आपल्यासाठी लढायचं असंल तर दुसऱ्यांना लढू दे. पण आपण आपल्या बायांच्या बरोबर राहू या ! "

" माझ्या वाटचं मी लढलोय. आता दुसऱ्यांना पुढं होऊ दे ! " ग्रिगरी सटकन् उद्गारला आणि चालता झाला.

" पण ही माणसं अशी कशी ? " क्रिस्तोनियाने भर घातली, " दरोडेखोराची टोळी ! तसल्या माणसांना का आपण मिळायचं ? असले कसले स्वतःला रेडगार्ड म्हणीवतात. बायकांची इज्जत लुटणारे, कझाकांवर दरोडे घालणारे ! आपण काय करायचं ते आपण पहायला हवं ! आंधळा माणूस ठेचाच खायचा ! "

" हे सगळं तू पाहृयलंयस का क्रिस्तोनिया ? " इवानने खरमरीतपणे विचारले.

"लोक बोलतात . . . !"

"हँ ! लोक . . . !"

ठीकाय. बस्स झालं . . . कुणाच्या कानी पडायला नको !"

कझाकांच्या पाटलुणी टोप्या ह्यांनी चौक गच्च फुलून गेला होता. कुठे कुठे केसाळ काळचा मेंढकातडी टोप्या दृष्टीला पडत होत्या. खेड्यातील सगळी माणसे जमा झाली होती. तिथे बायका कुणीही नव्हत्या. फक्त म्हातारी माणसे, युद्धावर जाऊन आलेले कझाक आणि त्यांच्याहून पोरसवदा मंडळी होती. सगळ्यात जे वयोवृद्ध होते ते काठ्यांवर रेलून उभे होते—सन्मान्य पंच, गिरिजाघर परिषदेचे सभासद, शाळेचे व्यवस्थापक आणि पाद्री—प्रतिनिधी. ग्रिगरीचे डोळे आपल्या बापाची काळी चंदेरी दाढी शोधीत होते. मिरोन ग्रिगोरिएविचच्या शेजारी तो उभा असल्याचे त्याला आढळले. त्याच्या पुढे आपली करडी जाम्यानिम्याची पदके लावलेली चपकन घालून आणि आपल्या गांठ्याळ काठीवर भार देऊन म्हातारे ग्रिशाका उभे होते. पांतिलेई आणि मिरोन बरोबर खेड्यातील सगळी वयस्कर मंडळी होती. त्यांच्या मागे तरुण मंडळी उभी होती. त्यापैकी अनेकजण ग्रिगरीचे युद्धात लढलेले साथी होते. त्या कवचाळ्याच्या पलीकडील बाजूला त्याला आपला भाऊ प्योत्र दृष्टीला पडला. त्याचा सदरा सेंट जॉर्ज क्रुसाच्या नारिंगी आणि काळ्या फितींनी सुशोभित केलेला होता. त्याच्या डाव्या हाताला मितका कोर्शुनोव प्रखोर झीकोवच्या चुट्ट्यावर आपला चुट्टा शिलगावून घेत होता. त्याला मदत करण्यासाठी प्रखोर खोल झुरका घेत होता. त्यामुळे त्याचे ओठ गोल वळले होते. आणि त्याचे वासरागत असणारे डोळे विस्फारले होते. त्यांच्या मागे सर्वात लहान कझाक होते. त्या कोंडाळ्याच्या मध्यभागी एक डगडगते मेज होते. त्या मेजाचे चारी खूर मऊ आणि अद्याप दमट असणाऱ्या मातीत खुपसून ठेवलेले होते.

मेजाजवळ खेड्यातील क्रांतिकारक समितीचे अध्यक्ष बसले होते. त्यांच्या बाजूला जो लेफ्टनंट उभा होता तो ग्रिगरीच्या माहितीचा नव्हता. त्याने डोक्यावर पर खोवलेली खाकी टोपी घातली होती. त्याच्या अंगात माकुले लावलेले कातडी जाकीट आणि खाकी तंगतुमान होती. क्रांतिकारक समितीचे अध्यक्ष त्यांच्याशी चिंतातूरपणे काहीतरी बोलत होते. आणि त्यांचे बोलणे ऐकू यावे म्हणून त्या अंमलदाराने खाली वाकून आपला उंचावलेला कान अध्यक्षांच्या दाढीला लावलेला होता. मधमाशांसारखा सभेत गुंजारव चालू होता. कझाक आपसात बोलत थट्टा-मस्करी करीत होते. पण सगळ्यांच्या चेहऱ्यावर चिंता दिसत होती. जास्त वेळ वाट पहाणे अशक्य होऊन कुणीतरी ओरडले,

" सुरू करू या ! थांबला कशासाठी ? बहुतेक सगळेजण आलेत !"

तो अंमलदार सरळ उभा राहिला. त्याने आपली टोपी काढली आणि स्वतःच्या कौटुंबिक वर्तुळात बोलावे अशा सहजपणे तो म्हणाला,

" गावातील वडीलधारी मंडळी आणि आघाडीच्या कझाक बंधूनो ! सेत्राकोव खेड्यात काय घडलं ते तुम्हा सर्वांच्या कानी आलंचाय ! कसं ?"

" हा कोण ? कुठला ?" क्रिस्तोनिया गडगडून म्हणाला.

" व्येशेनस्कायाचा ! मला वाटतं त्याचं नावाय सोल्दातोव !"

लेफ्टनंट पुढे बोलू लागला,

" एक दोन दिवसापूर्वी रेडगार्डची तुकडी ह्या खेड्यात आली. जर्मनांनी यूक्रेन घेतलंय न् डॉन प्रांताकडं कूच करताना त्यांनी रेडगार्डना रेल्वेवरून मागं पिटाळलं. रेडगार्ड सेत्राकोवमधे शिरले आणि त्यांनी कझाकांची चीजवस्तू लुटायला सुरवात केली. त्यांच्या बायकावर अत्याचार केले, बेकायदेशीर धरपकड केली वगैरे. ही बातमी शेजारच्या खेड्यांना कळली तेव्हा हत्यारं घेऊन ते रेडगार्डवर तुटून पडले. निम्मी तुकडी साफ झाली. बाकीच्यांना कैद केले. कझाकांना भारी लूट मिळाली आता मिगुलिनस्काया आणि कझानस्काया जिल्ह्यांनी बोल्शेव्हिक सरकारं आपल्या प्रदेशातून हुसकलीत. तरणे, म्हातारे सगळे कझाक शांत डॉनच्या बचावाला खडे झालेत. व्येशेनस्कायात क्रांतिकारक समितीची हाकालपट्टी झाल्येय आणि जिल्हा आतामान निवडून देण्यात आलाय. बहुतेक खेड्यातून हे असंच झालेंय."

भाषणातील ह्या मुद्यावर म्हाताऱ्या माणसात खालच्या स्वरात कुजबुज झाली.

" सगळीकडं तुकड्या बनवल्या जातायत. दरोडेखोराच्या नवीन रानटी धाडीपासून जिल्ह्याचा बचाव करण्यासाठी तुम्हालाही आघाडीच्या कझाकांचं पथक बनवावं लागेल. आपण आपलं सरकार तयार करायला हवं. आम्हाला लाल सरकार नको. त्यातून निव्वळ गुंडगिरी येईल. स्वतंत्रता नाय येणार. नांगरमुठ्यांना आम्ही आमच्या बायका बहिणीची इज्जत लुटू देणार नाय. आमच्या ऑरथोडोक्स धर्माची टर उडवू देणार नाय. आमचं पवित्र गिरिजाघर बुडवू देणार नाय. आमची चीजवस्तू – मालमत्ता लुटू देणार नाय. वडिलमंडळी, तुम्हाला हे पटतं ना ?"

" हो ! हो !" म्हणून एकदम सभा गरजली.

अंमलदार जाहीरनामा वाचून दाखवू लागला. आपली कागदपत्रे विसरून अध्यक्ष मेजाजवळून सटकले. चकार शब्द न बोलता वडीलधाऱ्यांचा जमाव ऐकत होता. त्यांच्यामागे असणारे आघाडीचे लोक आपसात कुजबुजत होते.

अंमलदाराने वाचनाला प्रारंभ केल्याबरोबर ग्रिगरी जमावातून सटकला आणि घराच्या दिशेने निघाला. हळुहळू तो विस्सारिओनच्या दिशेने जाऊ लागला.

तो निघून गेल्याचे मिरोन ग्रिगोरिएविच ह्यांच्या नजरेला पडले. त्यांनी पांतिलेयला कोपराने ठोसून म्हटले,

" तुझा धाकटा मुलगा . . . तो निघून चाललाय ! "

पांतेलेय लंगडत त्या कोंडाळ्यातून बाहेर पडला आणि कडव्या आवाजात तो ओरडला,

" ग्रिगरी ! "

त्याचा पोर अर्धवट वळला आणि मागे न बघता थबकला.

" मागं ये पोरा ! "

" निघून का चाललास ? परत ये ! "

जमावातून आवाजांची गर्जना झाली आणि चेहऱ्यांची भिंत ग्रिगरीच्या दिशेने वळली :

" न् तो अंमलदार होता ! "

" तू नाक चढवू नको ! "

" तो स्वता बोल्शेव्हिकाबरोबर होता ! "

" त्यानं कझाक रक्त सांडलंय ! "

" लाल हैवान ! "

त्या आरोळ्या ग्रिगरीच्या कानावर पडल्या. दात रगडीत तो ऐकत होता. त्याची स्वतःशी घालमेल चालू होती. असे भासले की क्षणाभरात तो मागे न बघता चालता होणार. पण त्याची चलबिचल झाली आणि नजर खाली करून तो जमावाकडे परतला तेव्हा पांतिलेय आणि प्योत्रने सुटकेचे निश्वास टाकले.

वडीलधाऱ्या माणसांनी प्रचंड बहुमताने सभा जिंकली. विलक्षण झपाट्याने मिरोन ग्रिगोरिएविचना आतामान म्हणून निवडून देण्यात आले. त्यांचा शिष्याचा

चेहरा पांढरा पडला होता. त्या कवचाळचाच्या मधोमध जाऊन त्यांनी आपल्या अधिकाराची चिन्हे स्वीकारली. पूर्वीच्या आतामानाकडून आतामानचा ताम्रमुठीचा दंड घेतला. ते पूर्वी कधी आतामान झाले नव्हते. लोकांनी जेव्हा त्यांचे नाव पुकारले तेव्हा त्यांची चलबिचल झाली. आपली एवढ्या सन्मानाला पात्रता नाही, आपण अशिक्षित आहोत असे म्हणून त्यानी नकार दिला. पण आता म्हातारी माणसे आग्रह करू लागली.

" दंड घे हातात ग्रिगोरिए विच नाकारू नको ! "

" तू खेड्यातला सगळ्यात उत्तम शेतकरी आहेस ! "

" आमचा माल तू वाया नाय घालवणार ! "

" लक्षात ठेव–सिम्योन सारखं पिण्यात घालवू नको ! "

" तो नाय तसं करायचा ! "

" त्याला रग्गडाय. तो काय घेतो ! "

" मेंढरासारखा फोडून काढू ! "

निवडणुकीची परिस्थिती आणि जिल्ह्यातील अर्धे – युध्दाचे वातावरण हे इतके अप्रूप होते की विशेष आढेवेढे न घेता मिरोन कबूल झाला. निवडणूक पूर्वीसारखी झाली नाही. पूर्वी आतामान खेड्यात यायचा, कझाक कुटुंब प्रमुखांची सभा भरायची व मते मोजली जात. आता सगळे साधे होते, " जे कोर्शुनोवच्या बाजूचेत त्यांनी उजवीकडं व्हा ! " सगळा जमावच त्या दिशेने सरकला. कोर्शुनोव-विरूद्ध आढी असणारा चांभार तेवढा कुरणात उन्मळून पडलेल्या ओक वृक्षासारखा जागच्या जागी एकटाच उभा राहिला.

मिरोनच्या डोळ्याची पापणी लवते न लवते तोच तो दंड त्याच्या हाती कोंबला गेला आणि एकच काला झाला –

" आता व्होडका झाली पायजे ! "

" हे साजरं करायला पायजे ! "

" नव्या आतामानला झेला रं झेला ! "

पण तो अंमलदार मधे पडला आणि उरलेले प्रश्न पध्दतशीर निकालात काढण्यासाठी त्याने सभेला वळण दिले. खेड्याच्या पथकाचा नायक निवडून देण्याचा प्रश्न त्याने काढला. व्येशेनस्कायात त्याने ग्रिगरीबद्दल ऐकले असले पाहिजे कारण त्याने ग्रिगरीची आणि त्याच्या नावाने खेड्याची प्रशंसा चालू केली.

" अंमलदार असलेला नायक असणं चांगलं. आपल्याला लढायला लागल तर आपण जास्त चांगली कामगिरी बजावू न् नुकसानी पण कमी होईल न् तुमच्या खेड्यात बरेच वीर आहेत. माझी इच्छा काय मी तुमच्यावर लादू शकत नाही. पण माझी अशी भलावण आहे की, तुम्ही कोर्नेट मेलिखोवला निवडून द्यावं !"

" कुठला मेलिखोव ? आमच्याकडं दोनायत !"

अंमलदाराने जमावावरून नजर फिरवली. ग्रिगरीचे झुकलेले मस्तक त्याच्या दृष्टीस पडले आणि हसून तो ओरडला,

" ग्रिगरी मेलिखोव ! तुमचं काय मत आहे कझाकानूं ?"

" चांगला माणूसाय !"

" ग्रिगरी मेलिखोव ! दणकट गडी आहे !"

" कोंडाळयाच्या मधे ये ! वडिलधाऱ्यांना तुला बघायचंय !"

मागून पुढे ढकलला गेलेला आणि चेहरा लालबुंद झालेला ग्रिगरी कोंडाळयाच्या मधे आला आणि शिकाऱ्याच्या तावडीत सापडलेल्या जनावरासारखा अवतीभवती बघू लागला.

" आमच्या पोरांची नायकी कर !" मातवेई काशुलिनने काठीचा रपाटा दिला आणि हाताच्या झटक्याने अंगावर क्रूसाची निशाणी केली. " त्यांची नायकी कर. त्यांना वाट दाखव म्हणजे काळविटामागून§ हरणी येतात तसे ते तुझ्या मागोमाग येतील. काळवीट जसा आपल्या कबिल्पाचा बचाव करतो न् त्यांना जनावर माणसांपासून वाचवतो तशी त्यांच्यावर नजर ठेव ! आणखी चार क्रूस मिळव. देव तुला देवो !"

" पांतिलेय प्रोकोफिएविच ! तुझा पोरगा पण पोरगाय !"

" डोस्क्यानं तेजाय !"

" ए लंगड्या सैताना, आज मंडळीना पाजायचं बघ !"

" बापहो ! शांत रहा ! स्वयंसेवकांची हजेरी न घेता भरती सुरू करायची का ? स्वयंसेवक जातील – न् जातील !"

---

§ मुळात लेखकाने " कलहंसामागून हंसी येतात तसे . . . " ही उपमा दिली आहे. – अनुवादक.

" नाय . . , स्वयंसेवक असू द्या !"

" तू हो की पुढं ! तुला कुणी अडवलंय ?"

एवढ्यात खेड्याच्या वरच्या अंगाकडचे चार वयस्कर अंमलदार जवळ आले. त्या आधी नवीनच नेमणूक झालेल्या आतामानशी त्यांची कुजबुजल्या स्वरात खलबतं चालली होती. त्यातला एक तोंडाचे बोळके झालेला ' सुरकुत्या ' ह्या टोपणनावाने प्रसिध्द होता. मामुली कज्जे फिर्यादीत त्याने हयात गुदरली होती. त्याच्या कोर्टात इतक्या वेळा चकरा होत की त्याच्या एकुलत्या एका पांढऱ्या घोड़ीलाही तो रस्ता पाठ झाला होता. तिचा झिंगलेला धनी धडपडत गाडीत चढून बसला आणि आपल्या पातळ किरकिऱ्या आवाजात म्हणाला, ' कोर्टाकडं ' की ती थेट नेमक्या वाटेला लागायची.

' सुरकुत्या ' ने आपली टोपी डोक्यावरून काढली आणि तो लेफ्टनंटजवळ गेला. इतर म्हातारे जवळच थबकले. त्यातील एक गेरासिम बोलदिरेव नावाचा खेड्यात मोठी मानप्रतिष्ठा असलेला भला शेतकरी होता. त्याच्या इतर गुणाखेरीज ' सुरकुत्या ' चा आणखी एक विशेष म्हणजे त्याचे स्वतःच्या आवाजावर प्रेम होते. सर्वात प्रथम तो बोलला,

" महाराज !"

" काय हवंय बापहो ?" नम्रपणे वाकून आपला गुबगुबीत पाळधाचा कान अंमलदाराने पुढे केला.

" महाराज, आपल्याला आमच्या खेड्याची फारशी माहिती दिसत नाय. नायतर नायकीसाठी आपण ग्रिगरी मेलिखोवची निवड केली नसती. ह्या निवडी-विरुध्द आम्हा म्हाताऱ्यांची तक्राराय. तक्रार करण्याचा आमचा हक्काय. ठाऊकाय ? त्याच्याविरुध्द आमची हरकताय !"

" कसली हरकत ? काय झालं ?"

" हा स्वतःच जर रेडगार्डात होता न् त्यांचा एक नायक होता आणि जखमी होऊन त्यांच्याकडून त्याला परतून दोनच महिने झालेत. त्याच्यावर आम्ही कसा काय विश्वास टाकायचा ?"

त्या अंमलदाराचा चेहरा लालबुंद झाला. रक्त उसळून आल्याने त्याच्य कानाची पाळी सुजीर दिसू लागली.

" हे खरं आहे ? मी हे ऐकलं नव्हतं. ह्याबद्दल मला कुणी बोललं नाही !

" हे खराय ! तो बोल्शेव्हिकाबरोबर होता " दुसऱ्या एका म्हाताऱ्याने गंभीरपणे ठासून सांगितले.

" आम्ही त्यावर विश्वास ठेवू शकत नाय !"

" त्याला बदला ! आमचे तरुण कझाक काय म्हणीतात ? ते म्हणीतात की, पहिल्याच लढाईत तो त्यांचा विश्वासघात करंल !"

" बापहो !" चौडे उंचावून आणि आघाडीच्या लोकाकडे शिताफीने दुर्लक्ष करून म्हाताऱ्या मंडळींना उद्देशून तो अंमलदार ओरडला. " बापहो नायक म्हणून आपण आताच ग्रिगरी मेलिखोवला निवडून दिलं. पण ह्यात धोका नाही का ? मला आताच लोकांनी सांगितलं की, हिवाळ्यात हा स्वतः रेडगार्ड बरोबर होता. आपली पोरं न् नातवंडं त्याच्या हवाली कराल काय ? आणि तुम्ही . . . आघाडीचे बंधूहो ! शांत चित्तानं त्याच्या मागोमाग तुम्ही जाऊ शकाल का ?"

कझाकात क्षणभर दिङमूढ शांतता पसरली. आणि दुसऱ्याच क्षणी परस्पर-विरोधी आरोळ्यांचा एकच कालवा उसळला. कुणाला कुणाचा शब्दही समजणं दुरापास्त झालं. आरडाओरड थंडावल्यावर केसाळ भुवयांचा बोगातिऱ्योव पुढे मध्यभागी आला. आपली टोपी काढून घेऊन त्याने आजूबाजूला नजर टाकली.

" माझ्या आपल्या खुळ्या मनाला असं वाटतं. ग्रिगरी पांतिलियेविचला ही जागा आपण देऊ शकत नाही. तो चुकीच्या मार्गानं गेलेलाय. आपण सगळ्यांनी ते ऐकलंय. त्याला आधी आपला विश्वास मिळवू द्यात . . . त्यानं जे केलेय त्याची भरपाई करू द्यात . . . . . मग आपण पाहू. तो चांगला लढणाराय . . . . . आम्हाला ठाऊकाय . . . पण धुक्यात गुरफटलेला सूर्य आम्हाला दिसत नाय. त्याची पूर्वीची चाकरी आम्हाला दिसू शकत नाय. बोलशेव्हिकासाठी त्यानं केलेलं काम आमच्या डोळ्यांना खुपतय !"

" त्याला साधा सैनिक म्हणून जाऊ द्यात !" जवान आन्द्रेई काशुलिन त्वेषाने ओरडला.

" पित्रो मेलिखोवला नायक करा !"

" ग्रिशाला घाला कळपात !"

" आमच्या छातीवर चांगलाच नायक आणून बसवीत होतो !"

" छे छे ! मला ही जागा नकोय ! कशाला झक मारायला मला पुढं घातलंत ?" संतापाने लाल होऊन ग्रिगरी ओरडला. हातवारे करीत तो परत म्हणाला,

"तुम्ही दिलीत तरी ही जागा मला नकोय !" आपले हात पाटलुणीच्या खिशात खुपसून आणि मुंडी खाली घालून तो निघून गेला. त्याच्या मागोमाग आरोळ्या उठल्या,

"हा हा कळलं . . कळलं !"

"गावची ओवाळणी ! चोचीचं नाक फार वर काढून चाललंय !"

"अगागागा !"

"तुर्की रक्त खेळतय कसं पहा !"

"तोंड नाय आवरायचा ! अलंगातल्या अंमलदारांना सुद्धा उत्तरं करीत होता !"

"फिर ए मागं !"

"होः होः . . . हेः हेः !"

"हाण त्याला साल्याला !"

"सोडताय काय त्याला ! आपणच त्याच्यावर गावकी करू या !"

अखेर बऱ्याच वेळाने सभा परत शांत झाली. त्या हमरीतुमरीच्या आवेशात कुणी तरी कुणाला तरी ढकललं. कुणाचे तरी नाकाड फुटले. एका पोराला एकाएकी डोळ्याखाली ठोसा बसला.

अखेरीस शांतता प्रस्थापित झाल्यावर पित्रो मेलिखोवला नायक म्हणून निवडून देण्यात आले. तो डौलाने झळकू लागला. पण एकादा पाणीदार घोडा अती उंच कुपाटीपुढे थबकावा तसा तो अंमलदार अडमडला. स्वयंसेवकाची नावे पुकारण्याचा पुढचा टप्पा आला तेव्हा कुणीच पुढे येईना. सभेच्या सगळ्या कामकाजात जी आघाडीची मंडळी संयमपूर्वक वागत होती ती कचरू लागली. नावे नोंदवण्याला नाराज असलेल्या ह्या मंडळींनी त्या प्रकारची टिंगलटवाळी चालू केली.

"तू का नाय जात रे अनिकुशका ?"

पण अनिकुशका पुटपुटला, "मी फार लहानाय ! . . . अजून मला मिसरूडही नाय फुटली !"

"मस्करी राहू दे ! आमची काय टवाळी करतोस ?" म्हातारा काशुलिन अगदी त्याच्या कानात ओरडला.

" स्वताच्या पोराचं नाव दे !" अनिकुशकाने टोमणा मारला.

" मी दिलंय नाव !"

" प्रखोर झीकोव !" मेजावरून गर्जना आली.

" तुझं नाव घालू का आम्ही ?"

" मला ठाऊक नाय . . . !" त्याने उत्तर दिले.

" तुझं नाव घालतोय आम्ही !"

गंभीर चेहरा करून मितका कोर्शुनोव मेजापाशी गेला आणि तुटकपणे म्हणाला,

" माझं नाव घाल !"

" आणखी कोण ? तुझं काय फेदोत बोदोवस्कोव ?"

" माझं आंड वाढलय !" आपले कालमिकी डोळे खाली करून फेदोत पुटपुटला.

त्याबरोबर आघाडीची मंडळी.ची हसून हसून मुरकुंडी वळली. त्यांनी फेदोतची निर्दय टवाळी सुरू केली.

" बायकोला घे बरोबर ! आंड दुखायला लागलं तर ती नीट करून दील !"

" हा: हा: हा: हा: !" मागचे लोक हसू लागले. त्यांच्या दंतपत्ती प्रकटल्या. हसून हसून डोळ्यांना पाणी आले.

कोंडाळ्याच्या पलीकडच्या बाजूला दुसरीच मस्करी जमावात चालली होती.

" तुला आम्ही आचारी करू. तुझा रस्सा वासाळला तर तुझ्या नरड्यात असा ओतू की आंड दुसरीकडून बाहेर यील !"

" तू पिछाडीलाच न्हा ! तुला जोरात पळायला नाय यायचं !"

पण म्हातारी मंडळी त्रासली. शिव्या देऊ लागली.

" पुरे झालं ! पुरे झालं ! एवढं चेकाळायला काय झालं ?"

" आचरटपणा करायला काळवेळ चांगली काढली !"

" लाज वाटली पायजे पोरानू !" त्यातील एकजण ओरडला, " देवाबिवाचं काय आहे का नाय ? हे देवाला दिसल्याखेरीज राहणार नाय ! माणसं मरतायत् . . . न तुम्ही . . . देवाचा विचार करा !"

" इवान तोमिलिन !" अंमलदाराने आजूबाजूला दृष्टी टाकली.

" मी बंधानी आहे !" तोमिलिनने उत्तर दिले.

" तुझं नाव घालू का ? आम्हाला बंधानीची जरूर आहे !"

" ठीकाय ! घाला तर माझं नाव !"

झाखार कोरोलेव, आनिकुशका आणि इतर जण तोमिलिन भोवती गोळा झाले.

" आम्ही तुला वळुंजीच्या बुंध्यातून तोफ कोरून देऊ. गोळ्या ऐवजी तू भोपळे न् बटाटे झाड !"

थट्टामस्करी, हसण्याखिदळण्यात सुमारे साठ जणांनीं नावे नोंदवली. शेवटचा क्रिस्तोनिया होता. तो मेजाजवळ गेला आणि दाटून म्हणाला,

" माझं नाव घाला. मात्र आधीच सांगतोय की मी लढायचा नाय !"

" मग कशाला नाव देतोयस ?" अंमलदाराने चिडून विचारले.

" मी नजर ठेवीन साहेब ! मला नजर ठेवायचीय !"

" घाला नाव त्याचं . . , !" असे म्हणून अंमलदाराने खांदे उडवले.

दुपारपर्यन्त सभा आटोपली नाही. असे ठरविण्यात आले की, मिगुलिनस्काय खेड्याला कुमक म्हणून दुसऱ्याच दिवशी हे पथक रवाना करण्यात यावे.

× × ×

दुसऱ्या दिवशी सकाळी साठ स्वयंसेवकापैकी सुमारे चाळीस जण चौकात आले. फर्गोल आणि गुडघ्यापर्यन्त येणारे बूट असा डौलदार पोशाख केलेल्या पेत्रोने कझाकांची पाहणी केली. त्यापैकी अनेकांच्या खांद्यावर जुन्या रेजिमेंटचे नंबर लिहिलेले होते त्यांच्या खोगीरावर पडदाळ्या लादल्या होत्या. अन्नपदार्थ, कापड आणि आघाडीवरून आणलेली काडतुसे त्यात भरलेली होती.

त्यांना निरोप देण्यासाठी चौकात बायका, पोरे, म्हातारेकोतारे यांची गर्दी उसळली. आपल्या नाचत्या घोड्यावर आरुढलेल्या पेत्रोने आपल्या अर्ध्या कंपनीच्या रांगा केल्या. घोड्यांचा तो चित्रविचित्र मेळावा, फर्गोल, चपकनी, ताडपत्री पाणकोट घातलेले स्वार ह्यांची त्याने पाहणी केली. आणि कूचाचा हुकूम दिला त्याने आपली तुकडी टेकडीवर चढवली. कझाक उदास नजरेने मागे खेड्याकडे वळून बघत होते. शेवटच्या रांगेतील कुणीतरी एक बार काढला. टेकडीच्या माथ्यावर

गेल्यावर पेत्रोने दास्तान चढवले. आपल्या गव्हाळ मिशा कुरवाळल्या आणि आपला घोडा वळवला. तसा तो तिरपा पुढे गेला. डाव्या हातात आपली टोपी धरून त्याने गर्जना केली,

" स्काड्रन, दौडो ! "

रिकिबीवर खडे होऊन आपले चाबूक गरगरा फिरवीत कझाकांनी घोड्यांना टाच दिली. वारा त्यांच्या चेहऱ्यावर आदळत होता. घोड्यांच्या शेपट्या आयाळी वाऱ्यावर हलत होत्या. रिमझिम पाऊसधारा वाऱ्यावर उधळत होती. ते गप्पागोष्टी, थट्टामस्करी करू लागले. क्रिस्तीनियाच काळाभोर घोडा अडखळला तेव्हा शिव्या घालीत त्याने घोड्यावर चाबकाचे फटकारे ओढून त्याला गरम केला. त्या घोड्याने गर्दनीची कमान केली आणि चौखूर उधळून तो रांगेतून बाहेर फुटला.

कारगिनला पोचेपर्यंत कझाकांची उल्हसित वृत्ती कायम होती. लढाई होणार नाही आणि मिगुलिनस्कायाचे प्रकरण म्हणजे कझाकांच्या प्रदेशात बोल्शेव्हिकांचा यदृच्छया झालेला उद्रेक होता अशी बालंबाल खात्री बाळगून ते घोडी फेकीत होते.

---

## २४

दोन प्रहर टळून गेल्यावर ते कारगिनला पोचले. जिल्ह्यात आघाडीची मंडळी उरली नव्हती. ती सगळी मिगुलिन्स्कायाला गेली होती. चौकातील लेवा-चकिन व्यापाऱ्याच्या दुकानाजवळ पेत्रोने आपली तुकडी पायउतार केली. आणि वस्तीची सोय करण्यासाठी तो जिल्हा आतामानकडे गेला. हा आतामान एक उंच तगडा श्यामल तोंडाचा अंमलदार होता. खांद्याचे पट्टे न लावता त्याने एक लांब-लचक ढगळ सदरा घालून त्यावर कझाकी पट्टा आवळला होता. त्याची पट्टेदार कझाकी 'शारोवारी' (तुमान) पांढऱ्या लोकरी मोज्यात खोचलेली होती. त्याच्या पातळ ओठाच्या कोपऱ्यातून 'पाइप' लोंबत होता. त्याच्या पिंगट चमकत्या डोळ्यात तिरसटलेला खिन्न भाव होता. पायरीवर उभा राहून आणि पाईप ओढीत तो जवळ येणाऱ्या पेत्रोला न्याहाळीत होता. त्या माणसाचा धिप्पाड देह, रुंद पोलादी छाती आणि सदऱ्याखालून दिसणारे पिळदार दंड त्याच्या असाधारण ताकदीची ग्वाही देत होते.

"तुम्ही जिल्हा आतामान का?"

आपल्या छपरी मिशाखालून धुराचा ढग हवेत सोडीत त्या अंमलदाराने गाढ्या मध्य मध्यमाच्या सुरात उत्तर दिले,

"होय मीच जिल्हा आतामान. आपली तारीफ?"

पेत्रोने आपले नाव सांगितले. त्याचा हात हातात घेऊन हलवीत आतामानने आपले मस्तक किंचित झुकविले.

" माझं नाव फ्योदर दिमित्रिएविच लिखोविदोव !"

गुसिनो लिखोविदोव खेड्यातील कझाक असणारा फ्योदर दिमित्रिएविच लिखोविदोव हा मुळीच असातसा नव्हता. कॅडेट कॉलेजात आपले शिक्षण पूर्ण केल्यानंतर तो बरेच दिवस अदृश्य झाला होता. काही वर्षांनंतर तो एकाएकी आपल्या खेड्यात अवतीर्ण झाला आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या परवानगीने त्याने फौजी चाकरीची मुदत पूर्ण केलेल्या कझाकांतून स्वयंसेवक दलाची भरती चालू केली. आज कारागिन खेडे असलेल्या प्रदेशात त्याने हिंमत बहाद्दर कझाकांचे स्क्वाड्रन जमविले आणि त्यांना पर्शियाकडे तो घेऊन गेला. तिथे हे कझाक एक वर्षभर शहाचे हुजूरहशम म्हणून राहिले. पर्शियन क्रांतीच्या वेळी लिखोविदोव शहाबरोबर पळाला आणि आपल्या बहुतेक माणसांशी संपर्क तुटल्याने परत एकाएकी कारागिनमधे अवतीर्ण झाला. आपल्याबरोबर त्याने आपल्या तुकडीची उरलीसुरली चीजवस्तू आणली. शहाच्या पागेतील तीन देवजात अरबी घोडे, उंची गालिचे, किमती जवाहिर, बहारीचे आणि गुलजार रंगांचे रेशीम वगैरे बरीच लूट त्याने आणली. एक महिनाभर त्याने पिण्याचा जल्लोष आणि जिवाची चंगळ केली. आपल्या 'शारोवारी'च्या खिशातून दाबून पर्शियन सोने काढले आणि खिसे रिकामे केले. देखण्या, सडपातळ पायांच्या आणि हंसाप्रमाणे मान उंचावणाऱ्या तिस्मागर्दन शंखावळी घोड्यावर बसून तो खेड्यात दौड करायचा. लेवोचकिनच्या दुकानाच्या पायऱ्यावर घोडा चढवून माल निवडायचा. खाली न उतरताच दाम मोजायचा आणि दुसऱ्या दाराने घोडा बाहेर काढायचा. जेवढा अचानक आला तेवढाच अकस्मात लिखोविदोव परत गुप्त झाला. त्याचा अतूट जोडीदार असणारा त्याचा अडली कझाक नाच्या पांतेलुशका हाही त्याच्या बरोबर गुप्त झाला. ते घोडे, पर्शियाहून जे काही आणले होते तेही सगळे लुप्त होऊन गेले.

सहा महिन्यानंतर लिखोविदोव अलबेनियात उपटला आणि कारगिनमधील त्याच्या मित्रमंडळींना विचित्र टपालशिक्के पडलेली, निळ्या पर्वतावलीची चित्रे असलेली कार्डे त्याच्याकडून येऊ लागली. नंतर तो इटलीला गेला.

बालकन देश, रुमेनिया, पश्चिम युरोप इकडे त्याने दौरा काढला. प्रवास करता करता तो पार स्पेनपर्यन्त गेला. लिखोविदोवच्या नावाला एक गूढ वलय प्राप्त झाले. खेड्यात त्याच्याबद्दल नानाप्रकारच्या वदंता पसरल्या. त्याच्याबद्दल लोकांना एवढेच ठाऊक होते की, राजेशाही वर्तुळात त्याची घसट आहे. सेंट

पिटर्सबर्गमधील बडी धेंडे त्याच्या परिचयाची आहेत आणि तो 'रशियन जनता§ संघाचा' एक महत्त्वाचा सदस्य आहे. पण परदेशातील त्याच्या कार्याच्या स्वरूपाबद्दल कुणाला काहीही माहिती नव्हती.

परदेशातून परतल्यावर लिखोविदोवने गव्हर्नर जनरलच्या घरी तळ ठोकला. कारगिनमधील त्याच्या परिचितांनी वर्तमानपत्रात त्याचे जे छायाचित्र पाहिले ते पाहून आश्चर्याने जिभेचा 'ट'त्कार करीत ते म्हणाले, "अरे वा रे वा! फ्योदोर दिमित्रिएविच अगदी हवेत चाललाय! कोणत्या लाटमंडळीशी ह्याचे व्यवहार आ!" त्या छायाचित्रात लिखोविदोव गव्हर्नर जनरलच्या बायकोला बग्गीत चढायला हात देताना दिसत होता. त्याच्या श्यामल चोचदार नाकाच्या सर्बियन चेहऱ्यावर स्मित होते. आपल्याच कुटुंबातील एक समजून लाटसाहेब स्वतः त्याच्याकडे बघून स्मित करीत होते. मोतद्दाराने बोटांच्या टोकावर लगाम धरले होते आणि पुढे झेप घेण्याच्या आवेशात असणारे घोडे ताण देऊन कायजे चघळीत होते. आपला एक हात केसाळ मेंढकातडी टोपीला लावून आणि दुसरा हात लाटसाहेबाच्या कुटुंबाच्या बगलेखाली देऊन लिखोविदोव उभा होता.

अनेक वर्षांच्या अनुपस्थितीनंतर १९१७ च्या अखेरीस लिखोविदोव कारगिनमधे उगवला आणि तिथे त्याने बरेच दिवस राहण्याच्या बेताने आपले घर थाटले. आपल्या बरोबर तो बायको आणि पोर घेऊन आला होता. त्याची बायको यूक्रेनी किंवा पोलीश होती. चौकात चार खोल्यांचे लहानसे घर घेऊन त्याने संसार थाटला आणि कोणत्या तरी अज्ञात योजना शिजवीत हिवाळा काढला.

सबंध हिवाळाभर त्याच्या घराच्या खिडक्या सतत उघड्या राहिल्या होत्या. (आणि 'डॉन'च्या मानाने तो हिवाळा असाधारण कडक होता.) लिखोविदोव स्वतःला आणि आपल्या कुटुंबाला अशाप्रकारे धट्टपणा आणीत होता की, ते पाहून कझाकांना अचंबा वाटला.

सेत्राखोव प्रकरण झाल्यानंतर १९१८ च्या वसंतऋतूत त्याला आतामान म्हणून निवडून देण्यात आले. आणि तेव्हाच लिखोविदोवचे अमर्याद कर्तृत्व लोकां-

---

§ झारशाही रशियातील एक राजतंत्रवादी संघटना. यहुदीविरोधी प्रचार आणि कत्तल त्याचप्रमाणे राजकीय विरोधकांचे शिरकाण वगैरे त्यांचा कार्यक्रम होता. आता असे आढळून आले आहे की, ह्या संघाला झारशाही शासनाकडून पैशाची बरीच मदत मिळत असे.

पुढे प्रकटले. खेडेगावाचा कारभार अशा कणखर हाती आला की, एका आठवड्या-नंतर म्हातारी माणसेही मुंड्या हलवू लागली. कझाकांना त्याने अशी काही टिपेची तालीम दिली की एका सभेत त्याचे भाषण झाल्यानंतर म्हातारी माणसे बैलाच्या कळपागत डुरकावण्या फोडीत उद्गारली, "महाराज, तुमचं भलं होवो! आमचा तुमच्या पायाशी मुजराय! तुमचं अगदी बरोबराय!" (लिखोविदोव मधुभाषणी होता. निसर्गाने त्याला जशी हुशारी तशीच ताकद दिली होती.

नव्या आतामानने आपली कामे कडवटपणे पार पाडली. त्याचा पहिला बंदोबस्त म्हणजे रेडगार्डसची कत्तल झाल्याच्या दुसऱ्याच दिवशी त्याने जिल्ह्या-तील प्रत्येक आघाडीचा माणूस सेत्राकोवला रवाना केला. जिल्ह्यातील एकूण रहिवाशात तिसरा हिस्सा असलेल्या परदेशी लोकांची जाण्याची आधी इच्छा नव्हती. तर सैनिकांनी निषेध केला. पण लिखोविदोवने आपला आग्रह सोडला नाही. डॉनच्या बचावात ज्यांनी भाग घेतला नाही त्या सगळ्या नांगरमुठ्यांना तडीपार करण्यात यावे ह्या त्याने सुचविलेल्या हुकूमावर वडिलधाऱ्यांनी सह्या केल्या. दुसऱ्या दिवशी गाणी म्हणणाऱ्या अकॉर्डियन वाजवणाऱ्या सैनिकांनी भर-लेल्या डझनावारी गाड्या मिगुलिनस्कायाच्या दिशेने निघाल्या.

परदेशी लोकापैकी काही तरुण सैनिक तेवढे मशिनगन रेजिमेन्टमधे चाकरी केलेल्या वासिली स्तारोझिनच्या नेतृत्वाखाली रेडगार्डस्ना सामील होण्यासाठी पळून गेले.

पेत्रो जवळ येत असताना त्याच्या चालण्याच्या ढंगावरून लिखोविदोवने हे ओळखले की, हा खालून वर चढत गेलेला अंमलदार आहे. तेव्हा त्याला त्याने आत घरात पाचारण केले नाही तर औदार्याच्या परिचितपणाची झाक दाखवून म्हटले;

"बाळा, तुम्हाला मिगुलिनस्कायात करण्यासारखं काही नाही. तुमच्या शिवाय सगळं पार पडलंय. काल संध्याकाळी आम्हाला तार आली. परत फिरा न् पुढच्या हुकूमाची वाट बघा. कझाकांना चांगलं हलवा! एवढं तातार्स्कीसारखं मोठं खेडं न् फक्त चाळीस लढणारे? त्यांच्या बखोटया जरा पिरगळा. साले बदमाश! सवाल आहे तो त्यांच्याच कातडीचा! अच्छा! नीट जा!"

आपला अवजड देह अनपेक्षित सहजतेने सावरीत तो घरात गेला. त्याचे साधे कझाक पायताण लाकडी पावलाणावर खरडत गेले.

चौकात असलेल्या आपल्या कझाकांकडे पेत्रो परतला. त्यांनी त्याच्यावर प्रश्नांचा भडीमार केला.

" काय झालं ?"

" काय ठरलं ?"

" मिगुलिनस्कायाकडं जायचं का ?"

" आमच्या बायकांना आमची आठवण येत असंल !"

" लगोलग निघू या !"

आपल्याला वाटलेले समाधान लपविण्याचा प्रयत्न न करता पेत्रोने हसून उत्तर दिले,

" घराकडं ! आपल्याशिवाय त्यांनी सगळं पार पाडलंय !"

कझाक हसले आणि घोळक्याने आपल्या घोड्यांकडे गेले. पाठीवरून मोठा थोरला बोजा उतरल्यागत क्रिस्तोनियाने सुस्कारा सोडला आणि तोमिलिनच्या पाठीवर थाप मारून तो म्हणाला,

" तर घराकडं जायचं बंधानो !"

एकूण परिस्थितीचा विचार करून त्यांनी ठरविले की, कारगिन इथे रात्रीचा मुक्काम न करता ताबडतोब परत फिरायचे. विस्कळीत आणि पांगलेल्या गटांनी ते खेड्याबाहेर पडले. कारगिनला येताना ते अनिच्छेने घोडी चालवीत होते. क्वचितच ते घोड्यांना टाच देत, पण परतीच्या मार्गावर त्यांनी घोडी जाम पिटाळली. पावसाच्या अभावाने तडकलेली भूमी घोड्यांच्या टापाखाली बद्द घुमत होती. डॉनच्या आणि दूरवरच्या टेकड्यांच्या ओळीपलीकडे निळी विद्युल्लता क्षितिजावर फुटून उधळत होती.

मध्यरात्री ते तातार्स्कीत पोचले. टेकडीच्या उतारावरून ते दौडत असताना आनिकुश्काने आपली ऑस्ट्रियन बंदूक झाडली आणि त्याच्या पुनरागमनाचा पुकार करणारी गोळ्यांची फैर झडली. त्यांना उत्तर म्हणून खेड्यातील कुत्री भुंकू लागली. आपल्या घराच्या वासाने एक घोडा फुरफुरला आणि खिकाळला. खेड्यात ते वेगवेगळ्या दिशेने पांगले.

पेत्रोचा निरोप घेताना मार्तिन शामिल सुटकेच्या स्वरात रेकून म्हणाला,

"ठीक. लढाई संपली ! चांगलं झालं !"

अंधारात पेत्रोने स्मित केले आणि घराच्या दिशेने घोडा फेकला.

पांतिलेय बाहेर आला आणि त्याने त्याचा घोडा धरला. त्याच्यावरचे जीन उतरवून तो तबेल्याकडे नेला. तो आणि पेत्रो एकदमच घरात शिरले.

" सगळं संपलं ?"

" हा . . . हा . . . !"

" देवाची कृपा ! परत काय कानावर न पडो !"

झोपेत उबलेली दाऱ्या उठली. नवऱ्याला जेवण वाढायला ती गेली.

ग्रिगरी आपली केसाळ छाती खाजवीत अर्ध्या कपडयातच आपल्या चाफेखणीतून बाहेर आला. पेत्रोला डोळा घालून तो थट्टेने म्हणाला, "एवढयातच त्यांचा फडशाही पाडला ?"

" आता उरल्यासुरल्या रशशाचा फडशा पाडतो !"

" तू रशशाचा फडशा पाडशीलच. विशेष म्हणजे मी मदत केल्यावर !"

× × ×

ईस्टरपर्यन्त युध्दाचा काहीही वास आवाज आला नाही. पण ईस्टरच्या शनिवारी व्येशेनस्कायाहून एक जासूद घोडा फेकीत खेडयात आला. आपला फेसाळलेला घोडा त्याने कोर्शुनोवच्या फाटकाशी सोडला. आवाडातून तो धावत गेला. पावलाणावर त्याची समशेर खडखडत होती.

" काय बातमी ?" पिरोन ग्रिगोरिएविचनी त्याचे स्वागत करून विचारले.

" मला आतामान हवेत. तुम्हीच ना ते ?"

" होय."

" कझाकांना ताबडतोब हत्यारबंद करा. पोदत्योलकोव रेडगार्डसना घेऊन नागोलिनस्काया जिल्हयात येतोय. हे फर्मान !"

घामाने भिजलेले आपल्या टोपीचे अस्तर उलटे करून त्याने लखोटा बाहेर काढला.

बोलण्याचा आवाज ऐकून म्हातारे ग्रिशाका नाकावर चष्मा चढवीत बाहेर आले. प्रादेशिक आतामानकडून आलेले फर्मान त्यांनी वाचले. कोरीवकाम केलेल्या कठडयाला रेलून जासूद बाहीने आपल्या सुकलेल्या तोंडावरची धूळ पुसत होता.

इस्टरच्या रविवारी उपवास सोडून लष्करभरती झालेले कझाक घोडयावर स्वार होऊन खेडयाबाहेर पडले. जनरल आलफियोरोवचे फर्मान कडक होते. त्याने दम भरला होता की, जो जाणार नाही त्याचे कझाकी हक्क काढून घेतले जातील. तेव्हा पोदत्योलकोववर चालून जाणारी तुकडी मागच्या सारखी चाळीसाची नव्हती तर एकशेआठ जणांची होती. त्यात बोल्शेव्हिकाना तडाखा देण्याच्या इच्छेने झपाटलेली अनेक वडीलधारी मंडळीही होती.

मातेवेई काशुलिन आपल्या पोराबरोबर निघाला होता. आवदेइच ब्रेख पहिल्या रांगेत आपल्या कुचकामी घोडयावर बसून निघाला होता. अचाट गोष्टी सांगून तो कझाकांची करमणूक करायचा. म्हातारा माक्साएव आणि इतर वयस्कर मंडळीही निघाली. तरुण लोक चालले होते कारण त्याना जायलाच हवे होते. त्यांची वडीलधारी माणसे शिकारीच्या आवेशात निघाली होती.

ग्रिगरी मेलिकोव शेवटच्या रांगेतील घोडयावर होता. आपल्या पाणकोटाची फडा त्याने टोपीवर ओढून घेतली होती.

धूसर आभाळातून रिमझिम पाऊस पडत होता. हरितवेष धारण केलेल्या माळरानावरून भारावलेले ढग चालले होते.

ढगाळलेल्या डोंगरमाथ्याखाली एक गरुड तरंगत होता. आपले पंख मुद्दाम फटकारीत तो पूर्वेकडे वाऱ्यापुढे उडत उडत गेला आणि दूर अंतरावर विरत जाणारा त्याचा चमचमता पिंगट ठिपका झाला.

माळरान आर्द्रपणे चमकत होते. मधूनमधून हनुमन्ताची रोपटी आणि गेल्या वर्षीच्या कडूदवण्याची बेटे होती. करडे थडग्यांचे उंचवटे उतारावर राखण करीत होते.

कारगिनच्या वेशीवर ते उतरले तेव्हा बैल चरायला नेणारा एक पोरगा त्यांना भेटला. अनवाणी पायाने तो चाबूक परजीत धावत होता. घोडेस्वार पाहून तो थबकला. ते आणि चिखलाचे शितोडे उडालेली त्यांची घोडी ह्यांना त्याने निगूतपूर्वक न्याहाळले.

"कुठलारे तू?" तोमिलिनने विचारले.

"कारगिनचा!" डोक्यावर घेतलेल्या कोटातून हसत हसत त्या पोराने धीटपणे उत्तर दिले.

"तुमचे कझाक गेले का?"

" गेले. रेडगार्डांचा फडशा पाडायला ते गेलेत. काका, तुमच्याजवळ चुट्टयाला थोडी तंबाखू आहे का ?"

" तुला तंबाखू हव्येय ?" घोड्याचे लगाम खेचत ग्रिगरीने विचारले.

तो पोरगा त्याच्याजवळ गेला. वर गुंडाळून घेतलेल्या त्याच्या तुमानीचे पाय जभिले होते. त्यावरचे पट्टे चमकते लाल होते. आपल्या खिशातून ग्रिगरी चंची काढीत असताना पोरगा धीटपणे त्याच्या चेहऱ्याकडं रोखून बघत होता. चलाखीच्या किनऱ्या स्वरात तो सांगू लागला,

" खाली टेकडी उतरून गेलात की मिटाभरात काही मुडदे दिसतील. काल आमच्या कझाकांनी काही लाल कैद्यांना हाकून नेलं न् ठार मारलं. तिकडं त्या झुडुपावळ मी माझी बैलं राखत होतो. त्याना काढताना मी पाहिलं. बापरे ! काय भयंकर ! तलवारी फिरायला लागताच ते किंचाळत धावत सुटले . . . नंतर मग मी जाऊन बघीतलं. एकाचा खांदाच खांडाळला होता. त्याच्या छातीत उडणारं काळीज मी पाहिलं – खालच्या निळ्या गोटया . . . " आपली गोष्ट ऐकून कझाकांना भय वाटत नाही ह्यामुळे चकीत होऊन तो पुन्हा म्हणाला, "भयंकर होतं !" ग्रिगरी क्रिस्तोनिया आणि तोमिलिन ह्यांचे थंड, निश्चल चेहरे पाहून त्याने आपला निष्कर्ष काढला, की ह्याना भयभीती काही वाटत नाही.

त्याने चुट्टा पेटवला. ग्रिगरीच्या घोड्याची ओली गर्दन थोपटली आणि ' मेहेरबानी ' असे म्हणून तो आपल्या बैलांकडे धावला.

रस्त्याच्या कडेला पावसाने भिजून गेलेल्या एका उथळ खड्ड्यात किरकोळ माती टाकलेली होती. त्यात रेडगार्डस्‌चे मुडदे होते. एक काळानिळा पडलेला चेहरा दिसत होता. त्याच्या ओठावर रक्ताचा पापुद्रा होता. शिवरीचा कापूस भरलेल्या निळ्या तुमानीतून एक उघडा पाय जमिनीवर आला होता.

" त्यांना पुरण्याचं काम करवलं नाय. सुव्वर !" क्रिस्तोनिया पुटपुटला. त्याने घोड्यावर चाबूक ओढला आणि ग्रिगरीला गाठले. उतारावर ते दौडू लागले.

" अस्सं ! डॉनच्या मातीतही रक्त वाहिलंय तर !" तोमिलिन स्मित करून म्हणाला. पण त्याची गालफडे झटक्याने आकुंचित होत होती.

———




# २५

तातार्स्की खेड्यातील माक्सिम ग्राझनोव हा कझाक बुनचुकचा गोलंदाज होता. कोत्योपोव स्वयसेवक तुकडीशी झालेल्या चकमकीत त्याचा घोडा गमावला होता. आणि तेव्हापासून हा जबरदस्त पिणे आणि पत्ते खेळण्याच्या मागे लागला होता. त्याचा घोडा (बेलासारखा असलेला आणि पाठाडावर चदेरी लकेर असलेला.) त्याच्या मांडीखाली मारला गेला तेव्हा त्याने जीन सोडवले आणि ते घेऊन तो दोन एक मैल गेला. ह्या गतीने आपण स्वयंसेवकापासून जिवानिशी सुटणार नाही असे आढळून आल्यावर त्याने मौल्यवान पितळी जीनखोड तोडून काढले, दवासन सोडविले आणि आपल्या पथकातील माणसांना लढायला सोडून तो चालता झाला. तो रोस्तोवला आला. आपली चंदेरी परज असलेली समशेर त्याने झटकन् जुगारात घालविली. लढाईत खांडलेल्या एका कॅप्टनकडून त्याने ती मिळवली होती. मग बरोबर आणलेले घोड्याचे वझाड सामानही त्याने गमावले. एवढेच नाही तर आपली पाटलूण आणि कमावलेल्या कातड्याचे बूटही गमावले. बुनचुकच्या मशिनगन गटात तो सामील झाला तेव्हा तो जवळ जवळ नंगा झालेला होता त्याने स्वतःला सावरून घेतलेही असते पण पहिल्याच लढाईत त्याच्या तोंडा-वर काडतूस बसले. त्याचा निळा डोळा त्याच्या छातीवर गळून आला आणि भेंडागत पिचून गेलेल्या डोईच्या मागच्या भागातून रक्ताचे आऊर लोटले. तातार्स्कीचा कझाक, एकेकाळचा घोडेचोर आणि अलीकडे दारूबाज बनलेल्या माक्सिम ग्राझनोवच्या जिवाची अखेर झाली होती.

प्राणांतिक वेदनेने तडफडणाऱ्या त्याच्या देहाकडे बुनचुकने नजर टाकली. त्याच्या मशिनगनच्या नळीवरील रक्त काळजीपूर्वक पुसून काढले. त्यानंतर जवळ जवळ लगेचच माघार घेणे प्राप्त झाले.

कढत मातीत माक्सिमचा देह ताठत ठेवून बुनचुकने मशिनगन ओढत मागे नेली. त्याचा श्यामल देह उन्हात उघडा पडला होता कारण मृत्यूशी झुंजताना माक्सिमने सदरा डोक्यातून काढून टाकला होता.

तुर्की आघाडीवरून अलीकडेच परतलेल्या रेडगार्डस्च्या पलटणीने उपनगरातील पहिल्याच फाटयावर तळ दिला. अर्धकुजल्या लोकरी टोपीतील एका सैनिकाने मशिनगन लावयला बुनचुकला मदत केली. इतरांनी रस्त्यावर ओबडधोबड मेढेकोट उभारले. हे करीत असताना ते थट्टामस्करी करीत गनिमाच्या दिशेने कुचाळकीने आरडाओरड करीत होते,

" आता त्यांना दाखवू इंगा !"

" तोंड ए पोरा !" कुपाटीतून तक्ते उपसणाऱ्या एका धिप्पाड माणसाला कुणीतरी सांगितले.

" हे आले पहा. आपल्याच दिशेनं येतायत." एका कोठाराच्या छपरावर बसलेला एक सैनिक ओरडला.

आन्ना बुनचुकच्या शेजारी जमिनीवर पालथी पडली. रेडगार्डस् तात्पुरत्या आडोशाला लपले.

एकाएकी उजवीकडील रस्त्यावरून पायांचे थाडथाड आवाज आले. नऊ दहा रेडगार्डस् कोपऱ्यावर धावत आले. त्यातील एकजण ओरडला,

" आले रे आले !"

क्षणार्धात फाटयावर शुकशुकाट होऊन चिडीचिप झाले आणि मग धुरोळ्याचा ढग उसळला आणि कुशीत काडबीन दाबून धरलेला, टोपीला पांढरी फीत लावलेला एक कझाक कोपऱ्यावर घोडा फेकीत आला.

आपल्या घोड्याला त्याने असा जबर शक्तीने हिसका दिला की, ते जनावर दुगाण्यावर खालीच बसले. बुनचुकने पिस्तुलातून एक गोळी झाडली. घोड्याच्या गर्दनीवर खाली वाकून कझाक दौडत मागे गेला. मेढेकोटाच्या मागे असलेल्या सैनिकाची आशंकेने चलबिचल झाली. त्यातील दोघेजण भिंतीजवळून धावत गेले आणि फाटकाजवळ पालथे पडले. असे स्पष्टपणे दिसत होते की ती माणसे

मिनिटाभरात कचरून माघार घेणार. ताणलेली शांतता आणि त्यांचे भेदरट दृष्टीक्षेप अस्थिरतेचे द्योतक होते.

त्यानंतर जे घडले त्यातील एक क्षण वज्रलेप ठोसपणे बुनचुकच्या लक्षात राहिला. डोईचा रुमाल मागे सरकलेली आणि केस विस्कटून गेलेली आन्ना ओळखायला येऊ नये एवढी क्षुब्ध होऊन गेली होती. हातात बंदूक घेऊन त्या वाटेवर तिने उडी मारली. आजूबाजूला पाहिले. ज्या घराआड कझाक अदृश्य झाले होते तिकडे खूण करून विचित्र तुटक आवाजात ती किंचाळली, " माझ्या मागनं या !" अनिश्चित अडखळत्या पायाने ती कोपऱ्याकडे धावली.

जमिनीवर पडलेला बुनचुक उभा झाला. अस्फुट आरोळीने त्याचे तोंड विचकले. जवळच्याच सैनिकाकडून बंदूक हिसकावून घेत तो धापा टाकीत आन्नामागे धावला. त्याचे पाय अनावर थरथरत होते. तिला हाक मारून परत बोलवण्यासाठी निःशस्त्र आटापिटा करताना त्याचे तोंड काळवंडले होते. त्याच्यामागे धपाधपा धावणाऱ्या काही सैनिकांच्या धापा त्याला ऐकू आल्या. त्याच्या अवघ्या जीवाला जाणवले होते की काहीतरी भयंकर, असाध्य आता घडून येणार आहे. त्या क्षणीही त्याने हे ओळखले की, इतर तिच्यामागे जाणार नाहीत, आणि तिचे वागणे मूर्खपणाचे, बेफाट आणि सर्वनाशाचे आहे.

कोपऱ्याजवळ तो दौडत जाणाऱ्या कझाकावर भरवेग आदळला. त्यांनी गोळीबाराचा वर्षाव केला. काडतूसांची सणासण. अन्नाच्या तोंडची एक क्षीण वेदनेची किंकाळी आणि ती त्याला रस्त्यावर कोलमडून पडलेली दिसली. तिचे हात फाकले होते. डोळे वटारलेले होते. कझाक परत वळलेले त्याला दिसले नाहीत. बुनचुकच्या मशिनगन जवळ जे अठरा लाल सैनिक होते त्यातले कुणी आन्नाच्या उत्स्फुर्त कृत्यापायी पश्चात उत्साहाने पेटून त्यांचा पाठलाग करताना दिसले नाहीत. त्याच्या पायाजवळ तडफडत असलेली ती आणि केवळ तीच त्याच्या डोळ्यात होती. तिला उचलून घेऊन जाण्यासाठी त्याने तिला पाठीवर वळवली पण तिच्या डाव्या कुशीतून रक्त वहात असलेले त्याने पाहिले. तिच्या निळ्या पोलक्याच्या धांदोटयाची टोके त्या जखमेवर निर्जीव लोंबली होती. तिला डमडम काडतूस लागल्याचे त्याने ओळखले आणि ती मृत्युपंथाला लागल्याचेही त्याने जाणले. तिच्या गढूळल्या डोळ्यात तिचा अंत रेंगाळत होता.

कुणीतरी त्याला बाजूला ढकलले आणि तिला उचलून आवाडात नेले मांगराच्या शीतळतेत तिचा देह त्यांनी ठेवला.

एक सैनिक त्या जखमेवर कापसाचा गोळा दाबून धरीत होता आणि तो रक्ताने भिजला की फेकून देत होता. स्वतःला कह्यात आणून बुनचुकने तिच्या पोलक्याची बटणे सोडली. स्वतःच्या सदऱ्याचा एक तुकडा फाडला आणि त्याची घडी जखमेवर दाबून धरली. पण तो चिंब होऊन रक्त बाहेर येतच राहिले. तिचा चेहरा निळा पडत असलेला, काळे पडलेले ओठ वेदनेने थरथरत असलेले त्याने पाहिले. तिने तोंडाने हवेचा घोट घेतला पण तिची फुफ्फुसे श्वास घेऊ शकत नव्हती. ती हवा परत तोंडावाटे आणि जखमेवाटे बाहेर आली. तिचा फाटलेला सदरा त्याने फाडून काढला. भीडभाड न बाळगता तिचा प्राणांतिक झेंडू फुटलेला देह उघडा केला. त्यांनी ती जखम कशीबशी थोडीशी भरली. काही मिनिटांनी ती शुद्धीवर आली. तिचे खोल गेलेले डोळे गर्द खोबण्यातून क्षणभर टक लावून बघत होते. मग थरथरत्या पापण्यांनी ते झाकले गेले.

"पाणी ! उकडतंय !" ती तळमळत कण्हत म्हणाली. तिला रडू फुटले. "मला जगायचंय ! इल्या ! माझ्या लाडक्या . . . ! आ . . !"

तिच्या कढत गालावर बुनचुकने आपले सुजलेले ओठ दाबले. तिच्या छातीवर त्याने पाणी ओतले. गळपट्टीच्या हाडाजवळील खळगीत ते साचले पण क्षणभरात सुकून गेले. आकांताच्या आगीने ती पेटून गेली होती. तिने धसमुसळेपणाने त्याच्या हातातून स्वताला सोडवले.

"उकाडतंय . . . आग !"

तिची ताकद ओसरल्यावर ती किंचित निवाली आणि कष्टाने शब्दोच्चार करीत म्हणाली,

"इल्या, अरे का पण ? किती साधाय बघ . . . ! तू चमत्कारीय्स ! भयंकर सोपाय . . . ! इल्या माझ्या जीवा . . . तू . . . आई आहे !"

तिने डोळे अर्धवट उघडले. हसताना व्हावेत तसे ते डोळे आकुंचित झाले होते. आपल्या वेदना आणि भयभीतपणा ह्यांना आवर घालण्याची शिकस्त करीत ती अस्फुट बोलू लागली. जसा काही तिचा गळा दाबला जात होता.

"आधी जाणीव . . . तडाखा . . . . आणि आग . . . . आता सगळंच पेटलंय. . ! मला वाटतंय . . मीं मरत्येय !"

दुःखाने त्याने दिलेला नकार लक्षात येऊन तिने कपाळाला आठ्या घातल्या. "नको . . . ! हे कठीणाय . . . आई ग . . . श्वास घ्यायला किती कठीणाय!"

आपल्यावर पडलेला सगळा भार जणुकाही त्याला सांगण्याचा प्रयत्न करीत ती तुटक उद्रेकाने बोलत होती.

तिचा चेहरा पांढराफटक होत चालल्याचे, कानशिले पिवळी पडत चालल्याचे पाहून तो चरकला. तिच्या देहाच्या बाजूला निर्जीव पडलेल्या तिच्या हाताकडे त्याचे डोळे वळले पिकत चाललेल्या काळ्या मनुकेसारखी तिची नखे गुलाबी निळाईत ओथंबत चाललेली त्याला दिसली.

" पाणी ! माझी छाती . . . किती उकडतंय ! "

पाणी आणण्यासाठी तो घरात धावला. तो परत आला तेव्हा मांगरातून आन्नाची घरघरीत धाप त्याच्या कानी पडली नाही. शेवटच्या आचक्याने पिळवटलेल्या तिच्या तोंडावर मावळते ऊन्ह चमकत होते. अद्याप ऊब असलेला ताठरलेला हात जखमेवर दाबलेला होता. हळूच आपला हात तिच्या खांद्याखाली घालून त्याने तिला वर उचलती केली.

तिचे तरतरीत किंचित पिवळ्या ठिपक्यांचे नाक, डोळ्यांच्या उमटलेल्या चिमुकल्या गर्द रेषा इकडे त्याने क्षणभर टक लावून पाहिले. काळ्या भुवयाखालच्या बुबुळातील मावळती चमक बघण्याचा प्रयत्न केला. असहाय्य लोंबलेले तिचे मस्तक जास्तच खाली झुकले आणि तिच्या नाजूक पोरसवदा मानेची धमनी उडायची बंद झाली.

त्या काळ्या अधोन्मिलित पापण्यावर त्याने आपले गार ओठ दाबले आणि तिला हाक घातली,

" माझ्या सखे ! अती लाडक्या आन्ना ! "

आणि तो सरळ उभा राहिला. टाचेवर गर्रकन वळला, अस्वाभाविक ताठपणे चालत गेला. दोन्ही बाजूला दाबून धरलेले त्याचे हातही हालत नव्हते.

---

२६

ह्या घटनेनंतर काही दिवस बुनचुक टायफसमधे वात झाल्यानंतर झाला तसा वागत होता. तो इकडे तिकडे हिंडत होता. नित्याचे व्यवहार करीत होता. खात होता. झोपत होता. पण नेहमी सुन्न, मादक गुंगीत असल्यासारखाच असायचा. सभोवतालच्या जगाकडे तो वेड्यापिशा, सुजीर, शून्य डोळ्यांनी बघायचा. आपले मित्र त्याला ओळखू येत नव्हते. धुंद झिंगल्यासारखा किंवा खंगवणाऱ्या आजारातून उठल्यासारखा तो दिसायचा. आन्ना मरण पावल्या क्षणापासून त्याची भावनाच तात्पुरती ओसरून गेली होती. त्याची कशावरही वासना नव्हती. डोक्यात कसलाच विचार नव्हता. 'बुनचुक खा !' त्याचे साथी त्याला आग्रह करीत. मग तो खायचा त्याचे जाभाड हळूहळू मंदगतीने हलत असे. त्याचे डोळे कुठेतरी शून्यात बघत असत. त्याच्या साथींनी त्याच्यावर नजर ठेवली होती. त्याला इस्पितळात पाठवण्याबद्दल ते बोलत होते.

" तू आजारी आहेस का ?"

" नाय !"

" काय झालं ? दु:ख होतंय ?"

" नाय !"

" चल चुट्टा ओढू या. गड्या, तू काय तिला परत आणू शकत नैस. त्यात काय अर्थ नाय !"

झोपायची वेळ झाली की, ते म्हणत,

" झोपायची वेळ झाली !" मग तो आडवा होई.

वास्तव जगतातून दूर गेलेल्या अवस्थेत त्याने चार दिवस काढले. पाचव्या दिवशी क्रिवोशलिकोव त्याला रस्त्यात भेटला. त्याने बुनचुकच्या दंडाला धरले,

" बरा सापडलास ! मी तुला शोधतच होतो. " तो म्हणाला. बुनचुकला काय झाले आहे ते ठाऊक नसल्याने त्याने त्याच्या पाठीत मैत्रीचा धपाटा घातला आणि सचिंत स्मित करून विचारलं, " काय झालं रे ? प्यालाय्स का काय ? तू ऐकलंस ना की आपली एक मोहीम उत्तरेच्या डॉन प्रदेशात पाठवायचं ठरतंय ? तिथल्या कझाकांची लष्करी एकजूट करायला. पाचांचं कमिशन बसलय. पोदत्योलकोव त्यात पुढाकार घेतोय. उत्तरेचे कझाक म्हणजे आपली एकुलती एक आशा· नायतर आपली इथं गच्छंती होईल. तू जाणार का ? आम्हाला प्रचारक हवेत. तू जाशील ना ?"

" होय !" बुनचुकने थोडक्यात उत्तर दिले.

" झकास ! उद्या आपण निघायचं ! ओर्लोव आजोबाकडं जा. तो आपला ज्योतिषी आहे. "

त्याच संपूर्ण खचून गेलेल्या मानसिक अवस्थेत बुनचुकने प्रयाणाची तयारी केली आणि दुसऱ्या दिवशी – १ मेला – घोड्यावर बसून त्या मोहिमेसाठी तो निघून गेला.

ह्या वेळी डॉन सोव्हिएट शासनाच्या दृष्टीने परिस्थिती कमालीची गंभीर होती. आत घुसलेले जर्मन सैन्य यूक्रेनहून पूर्वेकडे कूच करीत होते. आणि डॉनच्या खालच्या खोऱ्याचा प्रदेश प्रतिक्रांतिकारक उठावणीने खदखदत होता. डॉनच्या पलीकडील माळरानात पोपोव दबा धरून बसला होता. आणि कोणत्याही क्षणी नोवोचेरकास्कवर हल्ला चढविण्याची धमकावणी देत होता. १० ते १३ एप्रिलपर्यन्त सोव्हिएटांचे रोस्तोव प्रादेशिक अधिवेशन भरले होते रोस्तोवला धोका निर्माण करणाऱ्या बंडखोर कझाकांना परतून लावण्यासाठी हे अधिवेशन अनेकदा खंडित झाले. फक्त उत्तरेला क्रांतिच्या ज्वाळा अद्याप धडधडत होत्या. आणि डॉनच्या खालच्या खोऱ्याबद्दल आशा न उरल्याने ह्या ज्वाळांकडे पोदत्योलकोव आणि इतर अनिच्छेने ओढले गेले होते.

डॉनच्या खालच्या खोऱ्यात लष्कर भरती फसली होती. लागुतिनच्या पुढाकाराने पोदत्योलकोवला जनता कोमिसार्सच्या डॉन परिषदेचा अध्यक्ष म्हणून निवडून देण्यात आले. तेव्हा पोदत्योलकोवने असे ठरविले की, उत्तरेकडे जाऊन

आघाडीच्या लोकांची तीन ते चार रेजिमेंटस् उभा करायची आणि तो घेऊन जर्मन आणि खालच्या जिल्हयातील प्रतिक्रांतिकारक ह्यांच्यावर हल्ला चढवायचा. पाच जणांचे असाधारण लष्करभरती कमिशन नेमण्यात आले पोदत्योलकोव ह्या कमिशनचा प्रमूख होता. लष्करभरतीच्या कामासाठी म्हणून खजिनदाराकडून सुवर्ण रूबल्स आणि झारशाही चलन मिळून एक कोटी रूबल्स काढण्यात आले. मुख्यत्वेकरून कामेनस्काय जिल्हयातील कझाक असणारी तुकडी रखवालीचे सैनिक म्हणून घाईगर्दीने उभी करण्यात आली १ मे च्या दिवशी कामेनस्कायाच्या दिशेने जी पहिली मोहीम निघाली तिच्यावर जर्मन विमानातून आगवर्षावही सुरू झाला.

युक्रेनहून माघार घेणाऱ्या रेडगार्डस्ची रेल्वेत गर्दी झाली होती. बंडखोर कझाक पूल उडवून देत होते. गाड्यांची मोडतोड करीत होते. रोज सकाळी जर्मन विमाने नोवोचेरकास्कपासून कामेनस्काया रेल्वेमार्गाच्या डोक्यावरून उडत. गिधाडांच्या झुंडीसारखी खाली झेप घेत आणि रेडगार्डस् तुकड्यावर मशिनगनचा मारा करीत. सैनिक वाघिणींच्या बाहेर पांगत. गोळीबाराचे तिखट आवाज घुमत. स्टेशनातून उकिरड्यांचा वास, लढाई आणि विध्वंसाची दुर्गन्धी ह्यांची सरमिसळ झाली होती. विमाने हवेत उंच भरारी घेऊन जात, बंदुकवाले बारूदाच्या फैरीवर फैरी उधळीत. त्यामुळे गाड्यांच्या आसपासच्या जमिनीवर रिकाम्या काडतुसांचा खच पडत जाऊन अखेरीस ते दृश्य पतझडीत सोनेरा पानांची रास पडलेल्या ओक-वृक्षाच्या रायीसारखी दिसू लागली. जिकडे तिकडे विनाशाच्या खुणा होत्या. जळून गेलेल्या आणि भग्न झालेल्या वाघिणी, तारेच्या खांबाभोवती लोंबणाऱ्या तुटलेल्या तारा, उध्वस्त घरे आणि वादळात वाहून आल्यासारख्या हिमराशी.

मिलेरोवोच्या दिशेने पाच दिवस ही मोहीम रेल्वेमार्गाने हळूहळू पुढे जात होती. सहाव्या दिवशी पोदत्योलकोवने आपल्या डब्यात लष्करभरती कमिशनची बैठक बोलाविली.

" आपल्याला हे असं जाऊन चालणार नाय. मला वाटतं आपण डब्यातून बाहेर पडून उरलेल्या रस्त्यानं पायी कूच केलं पायजे. "

" काय ?" लागुतिन उद्गारला, " आपण पायी रखडत चालायला लागलो की व्हाईट गार्ड सरळ आपल्यावर तुटून पडतील. "

" प्रवास जरा लांबचाचाय !"

नुकताच मोहिमेत सामील झालेला क्रिवोशलिकोव फर्गोल पांघरून गप्प बसला होता. हिवतापाने आणि क्विनाइनने तो पिवळा पडला होता. साखरेच्या एका पोत्यावर तो अंगाची जुडी करून बसला होता. त्या चर्चेत तो भाग घेत नव्हता. तापाने त्याचे डोळे धुसरलेले होते.

" क्रिवोशलिकोव !" नकाशावरून नजर वर न करता पोदत्योलकोवने हाक मारली.

" काय प्रश्नाय ?"

" तू ऐकत नैस ? आपल्याला पायी गेलं पाहिजे नायतर गनिम आपल्याला गाठल. तुला काय वाटतं? आम्हा बाकीच्यापेक्षा तू जास्त शिकलेलायस !"

" आपण पायी जाऊ शकतो " हळूहळू पण स्पष्टपणे क्रिवोशलिकोवने सांगितले. पण एवढयात त्याचे दात लांडग्यागत करकरले आणि तापाच्या झटक्याने तो थरथरू लागला. " बरोबर एवढं सामान नसतं तर जायला हरकत नव्हती. "

दरवाजाजवळ पोदत्योलकोवने त्या प्रदेशाचा नकाशा उलगडला आणि म्रिखिनने तो दोन टोकांनी धरून ठेवला. ढगाळलेल्या पश्चिमेकडून येणारा वारा त्यावर आदळून तो फडफडत होता. असे वाटत होते की वाऱ्यावर तो उडून जाणार.

" ह्या रस्त्यानं जाऊ या !" तंबाखूने डागाळलेली आपली बोटे त्याने नकाशावरून फिरवली, " शंभर–दीडशे मैलाचं अंतर असेल. नाय का ?"

" हां . . . चालतच गेलेलं बरं . . तिच्या आयला !" लागुतिनने रुकार दिला.

" तू काय म्हणीतोस मिखाइल ?"

चिडलेल्या क्रिवोशलिकोवने त्रासून खांदे उडवले.

" माझी हरकत नाय !"

" कझाकांना ताबडतोब गाडीतून उतरायला सांगतो वेळ घालीवण्यात अर्थ नाय !" म्रिखिनने आजूबाजूला सापेक्ष नजर फिरवली. कुणी हरकत घेत नाही असे पाहून त्याने डब्याखाली उडी टाकली.

पावसाची उदासवाणी रिमझिम चालू असता पोदत्योलकोवची मोहीम घेऊन जाणारी गाडी बेलाया कालित्वापासून दूर नव्हती. आपला फर्गोल डोक्यावर

ओढून बुनचुक पडला होता. त्याच डब्यात कझाक चहा करीत होते. हसत खिदळत एकमेकांची थट्टामस्करी करीत होते.

मिगुलिनस्काया खेड्यातील वान्का बोलदिरेव हा थट्टेखोर आणि टवाळखोर होता. आपल्या मशिनगनवाल्या साथींची तो चेष्टा करीत होता.

" इग्नात, तू कुठला रे ?" धूम्रपानाने घोगऱ्या झालेल्या स्वरात त्याने विचारले.

" तांबोवचा !" इग्नातने सौम्य खर्जात उत्तर दिले.

" तू मोरशान्स्कचा का ?"

" नाय शात्स्कचा !"

" हां . . . हां . . . शात्स्कची पोरं भारी धाडसी एकट्याविरुध्द लढायला सातसात पोरं घाबरत नैत !"

ते न्याहरीला बसले न बसले तो परत बोलदिरेवची मस्करी सुरू झाली.

" इग्नात डुकराचं मांस का नाय रे खात ? आवडत नाय ?"

" आवडतं की !"

बोलदिरेवने डुकराच्या अर्वाच्या भागांचे वर्णन करून कझाकांना खूप हसविले. हसत खिदळत त्यांचे खाणे चालू होते.

बुनचुक डोळे मिटून पडला होता. गतकाळात घडलेले प्रसंग तो परत परत जगत होता. तीच वेदना त्याला जाणवत होती. ती वेदना जास्तच तीव्र होत होती. डोंगरी पिंगट रानांची क्षितीज झालर लावलेले बर्फाच्छादित माळरान त्याच्या धूसर डोळ्यांना दिसत होते. आपल्याला तो थंडगार वारा जाणवत आहे आणि आपल्या बाजूला आन्ना उभी आहे असे त्याला वाटत होते. तिचे काळे डोळे, मुखाची करारी पण नाजुक रेषा, तिच्या नाकावरील चिमणे ठिपके, विचारात गढल्यावर तिच्या कपाळाला पडणाऱ्या आठ्या हे त्याला दिसत होते.

तिच्या ओठातून उमटणारे शब्द त्याला आकळत नव्हते. ते शब्द अस्पष्ट होते आणि विलक्षण आवाजानी आणि हास्यध्वनीने ते खंडित होत होते. पण तिच्या डोळ्यातील चमक आणि तिच्या पापण्यांची फडफड ह्यावरून ती काय म्हणत आहे ते तो ताडीत होता. पण एवढ्यात त्याला वेगळीच आन्ना दिसली. तिचा चेहरा निळसर पिवळा होता, गालावर आसवांच्या खुणा होत्या, नाक मुरडलेले होते आणि वेदनेने पिळवटलेले होते. तो खाकरला आणि आपला हुंदका

दाबून टाकण्यासाठी त्याने आपला गळा आवळला. आन्ना त्याला क्षणभरही सोडत नव्हती. कालगतीबरोबर तिचा चेहरा विटत किंवा काळवंडत नव्हता. तिचा चेहरा देह, चाल, अविर्भाव, भुवयांची लकेर हे सारे एकत्रित येऊन ती सजीव आणि संपूर्ण झाली होती. तिचे शब्द, तिची विवश प्रणयाकूल भाषणे, तिच्याबरोबर तो जे जे जगला ते सारेकाही त्याला आठवत होते. आणि ह्या पुनःर्निमितीच्या जोशाने त्याची वेदना दसपटीने उत्कट होत होती.

डब्यातून खाली उतरण्याचा हुकूम झाल्यावर कझाकांनी त्याला उठविले. तो उठला. निर्विकारपणे आपली चीजवस्तू गोळा केली आणि तो बाहेर पडला. सामान उतरवायला त्यानें मदत केली. त्याच निर्विकारपणे तो घोड्याच्या गाडीत बसला आणि निघून गेला.

पाऊस पडत होता. रस्त्याच्या कडेचे खुरटलेले गवत ओले होते. खुले माळरान, उतारावर घळीतून स्वच्छंद वाहणारा वारा, जवळची दूरची खेडी वस्त्या, त्यांच्या मागे रेल्वे एंजिनाचा धूर आणि स्टेशनाच्या इमारतीचे लाल ठोकळे होते. जवळच्या खेड्यातून भाड्याने घेतलेल्या चाळीस गाड्या रस्त्यावरून रखडत चालल्या होत्या. घोडी हळूहळू जात होती. पावसाने चिंब झालेल्या, राडा झालेल्या काळ्या जमिनीचा त्यांच्या गतीला अडथळा होत होता. चिखलाचे काळे ढिसाळ लपके चाकांना चपकत होते. कझाकांच्या अत्याचारापासून बचावण्यासाठी आपली बायकापोरे आणि किडुकमिडुक घेऊन पूर्वेकडे पळून चाललेल्या खाणकामगारांची गर्दी त्यांच्या पुढे मागे होती.

एका रेल्वे जंक्शनपाशी आणखी दोन रेडगार्डसच्या उध्वस्त तुकडीतून जे जगले वाचले होते त्यांनी ह्यांना गाठले. लढाईचा ताण, जागरणे, उपासमार ह्यामुळे माणसांचे चेहरे पार काळवंडून गेले होते त्यांचा नायक असणारा श्शादेनको पोदतियोल्कोवकडे आला. छाटीव इंग्रजी धाटणीच्या मिशा आणि पातळ करडे नाक असणारा त्याचा देखणा चेहरा अगदी ओढलेला दिसत होता. त्याच्या जवळून जात असताना श्शादेनकोने कपाळाला आठ्या घालून श्रांत, संतप्त आवाजात काढलेले उद्गार बुनचुकला ऐकू आले.

" तुला काय वाटतं माझ्या जवानांना मी ओळखत नाही ? आधीच परिस्थिती खराब होती न् आता जर्मन त्यांच्या जोडीला आलेत. भडव्यांची सालडी लोळवली पाहिजे. माझा फौजफाटा पुन्हा कधी मला जमवता येईल ?"

हे बोलणे झाल्यावर आपली घोडागाडी गाठण्यासाठी पोदत्योलकोव ढांगा टाकीत गेला. तो चिडलेला आणि काहीसा गोंधळून गेलेला दिसत होता. क्रिवोश-लिकोव त्याच्या जवळ आला आणि त्याच्याशी तावातावाने बोलू लागला. आपल्या हाताचा वार खाली करीत, काही वाक्यांची फैर सोडत असलेला क्रिवोशलिकोव बुनचुकला दिसला. पोदत्योलकोवचा चेहरा उजळला. त्याने गाडीत उडी मारली. त्याच्या भाराने गाडी जरा करकरली. गाडीवानाने घोड्यांच्या पाठीवर चाबूक ओढला आणि चाकावरून चिखल उधळला गेला.

" जल्दी !" आपले कातडी जाकीट वाऱ्यावर उघडे टाकीत पोदत्योलकोव ओरडला.

———

## २७

अनेक दिवस ह्या मोहिमेचे कूच डॉन प्रांताच्या अगदी केन्द्रस्थानी चालू होते. यूक्रेनी खेडयाच्या रहिवाशांनी त्यांचे अगत्याने स्वागत केले. किराणभुसार सामान ते त्यांना आनंदाने विकत. त्यांना रहायला जागा देत. घोडयांना दाणावैरण देत.

पण कासनोकुत्स्कच्या प्रवासासाठी घोडी भाडयाने घेण्याचा प्रश्न निघताच यूक्रेनी लोक आपली डोकी खाजवू लागले आणि थोडे उजूतजू करून झाल्यावर त्यांनी परखडपणे नकार दिला.

" तुला चांगले पैसे देतो. मग नाक मुरडायला काय झालं ?" त्यापैकी एकाला पोदत्योलकोवने प्रश्न केला.

" तुम्हाला काय वाटतं मला पैसा प्राणाहून प्यार आहे ?"

" आम्हाला तुझे प्राण नकोत. आम्हाला फक्त भाडयानं घोडी आणि एक गाडी दे !"

" ते शक्य नाही !"

" का नाय ?"

" तुम्ही कझाकांवर चालून जाताय ना ?"

" मग त्याचं काय ?"

" समजा काही झालं न् माझी घोडी गमावली तर मग मी काय करू ? घोड्याशिवाय मी कसा जगू ? नाही रे बाबा. तू माझ्या नादी लागू नको. आपण नाही देणार !"

कझाक भूमीच्या ते जसे जवळ येऊ लागले तशी पोदत्योलकोवला आणि इतर पुढाऱ्यांना अबरगत वाटू लागली. प्रथम प्रथम त्यांना गावकऱ्यांचे आनंदी अगत्य जाणवले पण आता ते ह्या मोहिमेबद्दल दुष्टावा आणि धाबरटपणा दाखवू लागले. लोगोलिन्स्क प्रदेशातील एका खेड्यात लोक त्यांना अन्नाची विक्री नाराजीने करू लागले. विचारलेले प्रश्न टाळू लागले. आता त्यांच्या गाड्यांना खेड्यातील पोरासोरांचा आनंदी गराडा पडेनासा झाला. खिडक्यातून शत्रुत्वाचे चेहरे डोकावू लागले. लोक त्यांना बघून दृष्टीआड जाऊ लागले.

" तुम्ही कोण काफीर आहात काय रे ?" मोहिमेतील एक कझाक ओरडला. " असे घुबडागत काय बघीताय आम्हाला ?"

ह्या थंड्या स्वागताने बेभान होऊन गेलेल्या वान्का बोलदिरेवने खेड्यातील चौकात आपली टोपी जमिनीवर फेकून दिली आणि एकादा नायक दिसतो किंवा काय हे आजूबाजूला बघत तो गरजला,

" तुम्ही कोणात ? माणसं का हैवान ? तोंड बंद करून कशाला उभं राहताय भडव्यो ? तुमच्या हक्कासाठी आम्ही रक्त सांडतोय न् तुम्ही नुसते आम्हाला निरखीत बसलाय? साथींनो आता सगळे बरोबरीचे आहेत. आता कुणीही कझाक नाय न् कुणी खं खोल नाय. तुमच्यावर कुणीही हात टाकणार नाय. ताबडतोब अंडी न कोंबड्या घेऊन या. सगळ्याचं दाम आम्ही झारच्या रूबलमधे मोजू !"

सहा यूक्रेनी माणसे त्याचे बोलणे ऐकत उभी होती. नांगराला जुंपलेल्या घोड्यागत त्यांनी मुंड्या खाली घातल्या होत्या. त्याच्या जळजळीत भाषणाचा कुणावरच काही परिणाम झाला नाही.

" नेहमी सारखेच तुम्ही सडलेले खोखोलाहात ! तुमची ढेरपोटं साल्यांनो फुटून जातील !" बोलदिरेवने परत आपली जुनाट टोपी जमिनीवर आदळली. तिरस्काराने त्याचा चेहरा लालबुंद झाला, " हिवाळ्यात फावडभर बर्फ नाय द्यायचे तुम्ही !"

" ओरडायचं काम नाही. " एवढेच बोलून ते सगळे युक्रेनी निरनिराळ्या दिशांनी पांगले.

त्याच खेड्यात एका म्हाताऱ्या यूक्रेनी बाईने एका कझाकाला विचारले, " तुम्ही सगळं पळवून नेता न् आमची खांडोळी करता हे खरं का ?"

डोळ्याची पापणी न लवत: कझाकाने उत्तर दिले, " होय ! खराय ! सगळ्यांचीच काय नाय पण म्हाताऱ्यांची आम्ही जरूर खांडोळी करतो !"

" अरे माझ्या देवा ! न् त्यांची खाडोळी करून तुम्हाला काय मिळतं ?"

" कांजीबरोबर आम्ही ती खांडोळी खातो. अलीकडं सागुतीला चव राहिली नाय. ती तितकीशी चांगली नसते. तेव्हा म्हाताऱ्यांना गाडग्यात घालून आम्ही शिजवतो !"

" तुम्ही मस्करी करताय का काय ?"

" आजी, तो थापा मारतोय !" त्रिखिन मधेच म्हणाला. त्या थट्टेखोराकडे वळून तो दम देत म्हणाला, " काय न् कुणाची मस्करी करायची ते शिकून घे जरा ! असली मस्करी केल्याबद्दल पोदत्योलकोव डोकं मारील तुझं. ह्या गप्पा काय म्हणून पसरवतोय्स ? तो जाऊन सगळ्यांना सांगल की, आम्ही म्हाताऱ्यांची खांडोळी करतो म्हणून !"

चिंतेने व्यग्र झालेल्या पोदत्योलकोवने मुक्कामांची आणि रात्रीच्या विश्रांतीची काटछाट केली. आणि मोहीम त्वरेने पुढे चालवली. वरच्या डॉन जिल्ह्यात त्यांचे आगमन होण्याच्या आदल्या दिवशी त्याचे लागुतिनशी बराच वेळ खलबत झाले.

" आपण फार दूर जाण्यात अर्थ नाय इवान. शक्य तेवढी लौकर आपण लष्कर भरती सुरू करू या. आपण भरती पुकारू न चांगला पगार देऊ करू. मात्र त्यांना आपले घोडे न् जामानिमा आणावा लागंल. लोकांचा पैसा गटारात टाकता नाय येणार आपल्याला. जाता जाता माणसं गोळा करू. मिखाइलोवकाला पोचेपर्यन्त चांगली डिव्हिजन आपल्या हाताखाली जमली पायजे. जमेल का ? तुला काय वाटतं ?"

" कुणास ठाऊक ?" लागुतिन किनऱ्या अनुकंपेच्या स्वरात म्हणाला. आपली आखूड दाढी कुरवाळीत तो पुढे म्हणाला, "आपल्याला उशीर झालाय. मला वाटतं आपल्याला अपेश येणार. अंमलदार तिथं आधीच काम करून राहिलेत. आपण त्वरा करायला हवी . . ."

" आपण त्वरा करतोच आहोत ! तू भिऊ नकोस ! आपण भिता कामा नये !" पोदत्योलकोवने उत्तर दिले. त्याचे डोळे उग्रपणे चमकत होते. " आपल्या

मागोमाग येणारी माणसं आपल्या जवळाएत. आपलं भिऊन कसं चालंल ? आपण वेळेवर पोचू. आपण कोंडी फोडू ! पंधरा दिवसात जर्मन न् व्हाइटगार्डना डॉन-बाहेर पिटाळून लावू !" चुट्टयाचा जोरदार झुरका मारून त्याने स्वतःचे गुप्त विचार प्रकट केले. "आपल्याला उशीर झाला असंल तर आपली हार झाली तशीच डॉनवर सोव्हिएट राजवटीचीही हार झाली. फार उशीर चालणार नाय. आपण तिथं पोचण्यापूर्वी अंमलदारांनी जर तिथं उठावणीचा बनाव घडवला असंल तर मग संपलंच !"

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी त्यांनी कझाक प्रदेशात प्रवेश केला. ते पहिल्या खेड्याच्या जेव्हा जवळ येऊ लागले तेव्हा लागुतिन आणि क्रिवोशलिकोव्ह ह्यांच्या बरोबर अगदी पुढच्या गाडीत बसलेल्या पोदत्योलकोवला माळरानावर गुरांचा कळप दिसला. "त्या गुराख्याला विचारू या !" त्याने लागुतिनला सुचविले.

क्रिवोशलिकोवने ह्या विचाराला पुष्टी दिली.

लागुतिन आणि पोदत्योलकोव गाडीतून खाली उतरले आणि त्या कळपाच्या दिशेने गेले. उन्हात करपलेले कुरणरानातील गवत पिंगटपणे चमकत होते. गवत खुरटलेले होते. फक्त रस्त्याजवळ शिरसाची दणकट वाढ झाली होती. आणि रानटी ओटच्या शेंड्यावरील लोंब्या वाऱ्यावर सळसळत होत्या. कडू दवण्याची एक डहाळी आपल्या हातात चुरगळत आणि त्याचा कडुगंध नाकाने हुंगत पोदत्योलकोव त्या गुराख्याजवळ गेला.

"कसं काय गुराखी ?"

"देवाची कृपा आहे !"

"गुरं चरवतोय्स ?"

"हां !"

आपल्या केसाळ भुवयाखालून तो म्हातारा डोळे विस्फारून त्याच्याकडे बघत होता.

"कसं काय चाललंय ?" पोदत्योलकोवने नेहमीचा प्रश्न विचारला.

"देवाच्या दयेनं नेतोय निभावून !"

"काय बातमी वगैरे ?"

"तसं सांगण्यासारखं काय नाय. न् तुम्ही कुठले ?"

" आम्ही सैनिक आहो. घराकडं निघालोय. "

" कुठल्या खेड्याचे ?"

" अुस्त – खोपेरस्कायाचे. "

" तो पोदत्योलकोव तुमच्या बरोबराय का ?"

" आहे !"

ते उत्तर ऐकून तो म्हातारा घाबरलेला दिसला. त्याचा चेहरा फिकट झाला.

" काय झालं म्हाताऱ्या ?" पोदत्योलकोवने विचारले.

" लोक म्हणीतात की तुम्ही सगळ्या आरथोडोक्सना ठार मारणार म्हणून !"

" मूर्ख ! कोण सांगतं असल्या गोष्टी ?"

" दोन दिवसामागं सभा झालीती. त्यात आतामाननं सांगितलं. त्यानं अफवा ऐकितली नायतर आमची कत्तल करायला पोदत्योलकोव न् कालमिक येतायत असा सरकारचा संदेशा त्याला आला असंल !"

" तुमच्याकडं आतामान परत आला वाटतं ?" पोदत्योलकोवकडे दृष्टिक्षेप टाकून लागुतिनने विचारले. पोदत्योलकोव आपल्या बळकट पिवळ्या दातांनी हातातील गवताचा देठ चावीत होता. " अलीकडंच आम्ही आतामानला निवडून दिलं. सोव्हिएटला टाळं लागलंय !"

लागुतिन आणखी काही प्रश्न विचारणार होता एवढ्यात जवळच एका धिप्पाड बैलाने एका गायीवर झेप घेऊन तिला खाली लोळवली.

" तिच्यायला साला ! तिची पाठ मोडंल !" फुत्कारीत तो गुराखी ओरडला आणि आपल्या वयाला लाजवणाऱ्या त्वरेने त्याने कळपाकडे धाव घेतली. धावता धावत तो ओरडत होता, " नास्तीन्काची गायाय . . . ! तो तिची पाठ मोडंल. काय करतोयस रे ढवळ्या !"

पोदत्योलकोवने हात आडवे पसरले आणि तो गाडीकडे परत वळला. लागुतिन स्वत: उत्तम शेतकरी होता. त्या बैलाने जमिनीवर लोळवलेल्या लहानशा नाजूक गाईकडे त्याने सचिंतपणे सेकंदभर रोखून पाहिले. त्याच्या मनात विचार आला – ' होय. तो तिची पाठ मोडंल ! सैतान !"

त्या बैलाने चढवलेल्या हल्ल्यापासून गाईचा कणा शाबूत राहिलेला आहे अशी खात्री पटल्यावरच तो गाडीकडे परतला. " काय करावं आपण ? डॉनच्या परतीरावरही आतामान परत अधिकारावर आले म्हणावं का काय ?" त्याने मनाशी प्रश्न केला. पण रस्त्याच्या कडेला उभा असलेला एक मस्तवाल बैल पाहून त्याचे विचार परत विचलीत झाले. एका पुष्ट भरदार आसड असलेल्या काळ्या गाईला हुंगत तो बैल आपली भव्य मुंडी हलवीत होता. त्याचे भरदार घरनोळ पायापर्यन्त लोंबले होते. आणि त्याचा आडवा दणकट देह वायोलिनच्या तारेसारखा घट्ट होता. आखूड तंगड्या खांबासारख्या जमिनीत रुतवलेल्या होत्या. त्या बैलाच्या समंदअबलख कातडीवर लागुतिनचे डोळे खिळले. त्याच्या वाणाचे हेव्याने कौतुक करताना एकच विचार त्याच्या सचिंत चित्ताला भेदून गेला, ' आमच्याकडं असे बैल हवेत. आमचे बिचारे गरीब आहेत. ' क्षणभर त्याचे मन व्यापून तो विचार निघून गेला. त्या गाडीकडे जाता जाता कझाकांच्या खिन्न चेहऱ्याकडे त्याने नजर टाकली. कोणत्या मार्गाने जायचे ह्याचा विचार लागुतिन करीत होता.

× × ×

स्वप्नाळू आणि कवी असलेला क्रिवोशलिकोव आजाराने खंगून गेला होता. पोदत्योलकोवला तो म्हणत होता, " प्रतिक्रांतीच्या लाटेपासून दूर जाण्याचा आपण प्रयत्न करतोय पण ती आपल्यावर कोसळत्येय. सपाट किनाऱ्यावर येणाऱ्या भरतीगत ती अंगावर येत्येय. तिच्याशी आपल्याला होड घेता येत नाय !"

परिस्थितीचे संपूर्ण गांभीर्य केवळ पोदत्योलकोवने ओळखले होते. गाडीत तो पुढे वाकून बसला होता आणि मिनिटामिनिटाला गाडीवाल्यावर खेकसत होता,

" आणखी जल्दी ! "

मागच्या रांगात कुणीतरी गाणे सुरू केले. पण ते अचानक ओसरून गेलें. खिदळण्या आणि आरडाओरड्याचा आवाज चाकांच्या खडखडाटावर उठत होता.

गुराख्याकडून मिळवलेली माहिती अचूक ठरली. स्वेचनिकोव खेड्याकडे आपल्या बायकोबरोबर चाललेला कझाक त्यांना भेटला. त्या माणसानं खांद्याला फिती लावलेल्या होत्या आणि टोपीत तुरा खोवलेला होता. पोदत्योलकोवने त्याला काही प्रश्न विचारले आणि त्याचा चेहरा जास्तच काळवंडून गेला.

अलेक्सिएवस्की खेड्यावरून ते पुढे गेले. पाऊस पडू लागला. आभाळ भरून आले होते. फक्त पूर्वेकडे आकाशाचा उन्हात उजळलेला गाढ निळा तुकडा दिसत

होता. एका लहानशा वस्तीकड जाणारा उतार उतरताना, लोक धावत असलेले आणि दूरवरच्या बाजूने गाड्या दौडत असलेल्या त्यांनी पाहिल्या.

" ते पळून चाललेत. त्यांना आपली भीती वाटत्येय . . . "

इतराकडे बघत लागुतिन तंद्रीत असल्यासारखा म्हणाला.

" त्याना परत आणा. हाका घाला त्यांना. साले हैवान !" पोदत्योलकोव उसळून म्हणाला.

आपल्या गाड्यात उभे राहून कझाक आपल्या टोप्या हलवू लागले. कुणी-तरी खच्चून ओरडला, " अरे ए कुठं चालला ? थांबा !"

मोहिमेच्या गाड्या खडखडत वस्तीत शिरल्या. रुंद निर्मनुष रस्त्यावर वारा भिरभिरत होता. एका आवाडात एक बाई गाडीत उशा फेकीत आरडत होती. बोडका आणि अनवाणी असलेला तिचा नवरा घोड्याचे कायदे धरून उभा होता.

इथे त्यांना कळले की, मुक्कामाची जागा शोधायला त्यांनी पुढे पाठवलेल्या माणसाला कझाक गस्तीने कैद करून टेकडीपार नेले आहे. तेव्हा अर्थातच कझाक काही फारसे दूर नव्हते. थोडा वेळ सभा होऊन मागे वळण्याचा निर्णय घेण्यात आला. आपले कूच पुढे चालू ठेवण्याचा प्रथम आग्रह धरणाऱ्या पोदत्योलकोवची अजून चलबिचल होत होती.

क्रिवोशलिकोव अजून तापाने थरथरत गप्प बसून होता. " काय जायचं का पुढं ?" सभेला हजर असणाऱ्या बुनचुकला पोदत्योलकोवने विचारले.

बुनचुकने बेफिकीरीने खांदे उडवले. जोपर्यन्त त्याची गती चालू आहे, त्याच्या पावलातून घोटाळणाऱ्या शोकाच्या भावनेपासून दूर नेणारी गती जोपर्यन्त होती तोपर्यन्त ते पुढे गेले काय आणि मागे गेले काय, त्याला सगळे सारखेच होते पोदत्योलकोव येरझारे घालीत डस्त–मेदवेदीत्साकडे जाणाऱ्या फायद्याबद्दल बोलत होता. पण एका कझाक प्रचारकाने त्याला फटकन् अडवून म्हटले,

" तुला वेड लागलं का काय ? आम्हाला कुठं वेऊन जायची इच्छाय तुझी ? प्रतिक्रांतिकारकाकडं ? आम्ही परत जाणार. आम्हाला मरायचं नाय. ते कायाय? तिकडं पाहिलंस ?" खेड्याच्या वरच्या वाटेवरील चढणीकडे त्याने बोट केले.

त्या सर्वांनी वळून टेकडीकडे न्याहाळून पाहिले. डोंगरमाथ्यावर तीन स्वाराच्या रेषाकृती आकाशाच्या पार्श्वभूमीवर दिसत होत्या.

" ती त्यांची एक गस्ताय !" लागुतिन उद्गारला.

" न ते पहा तिकडं !"

घोडेस्वारांचे आणखी काही गट दिसू लागले. मग टेकडीच्या मागे ते अदृश्य झाले. परत ते दिसू लागले.

पोदत्योलकोवने मागे फिरायचा हुकूम दिला. पहिल्या यूकेनी खेड्यापर्यन्त ते आले. तिथल्या रहिवाशांना कझाकांकडून आगावू इशारा मिळाल्याचे दिसत होते. कारण लपण्याची, पळून जाण्याची तयारी त्यांनी चालवली होती.

सायंकाळ झाली. झिमझिम थंडगार पावसाने त्यांना कातडीपर्यन्त चिंब भिजवले. आपल्या बंदूकी रोखलेल्या धरून माणसे गाडीच्या बाजूने चालत होती. ती वाट एका दरीतून वळसे घेत गेली होती. कुठे ती वर चढली होती तर कुठे खाली उतरली होती. टेकडीच्या माथ्यावर कझाक दिसायचे आणि परत अदृश्य होऊन जायचे.

त्यांच्या दबा धरलेल्या पाळतीमुळे मनावरचे ताण जास्तच वाढत होते. तगवडीत आडव्या गेलेल्या एका खोंड्याजवळ आल्यावर पोदत्योलकोवने गाडीतून बाहेर उडी मारली आणि सैनिकांना उद्देशून तो करड्या सुरात म्हणाला –

" तयारीत असा ! " आपल्या घोडदळ काडबिनीवरची सुरक्षा खिटी त्याने खटकन् मागे केली आणि गाडीच्या जवळून तो पुढे चालू लागला.

वासंतिक पुराचे पाणी खोंड्यात निळे दिसत होते. एका तालीने तयार झालेल्या फोंडाऱ्याला जाऊन ते मिळाले होते. फोंडाऱ्यावर पाण्याला येणाऱ्या गुरांच्या खुराच्या खुणा उमटून फोंडाऱ्याच्या आजूबाजूचा रेंदा चित्रित झाला होता. मोडकळीला आलेल्या तालीला महिरप घातलेले दांडगवत पावसाने लवत आणि सळाळत होते. ह्या जागेवर अचानक हल्ला होईल अशी पोदत्योलकोवची अपेक्षा होती. पण टेहळणी हशमांच्या नजरेला कुणी पडले नाही.

" ते इथं येतीलशी अपेक्षा करू नको." क्रिवोशलिकोव त्याला कुजबुजून म्हणाला. " ते आता हल्ला चढवणार नाहीत. रात्रीपर्यन्त ते थांबतील."

" मला असंच वाटतं ! "

---

२८

पश्चिमेला मेघराशी ओथंबून आल्या होत्या. रात्र पडली. अगदी दूरवर डॉनच्या दिशेने आभाळ लुकलुकत होते. शेंदरी विद्युल्लता जखमी झालेल्या पाखरा-प्रमाणे थरारत होती. जलधरांच्या घनदाट आच्छादनाखालून सूर्यास्त क्षीणपणे चमकत होता. माळरानात शांतता दाटून आलेली होती. ओसरत्या दिनप्रकाशाची शोकाकूल झांजर कंदरीच्या कडेकपारीत रेंगाळली होती. मे महिन्यातील त्या संध्याकाळचा ढंग पतझडीच्या मोसमासारखा होता. अद्याप फुलावरसुध्दा न आलेल्या गवतालाही जीर्णतेचा दर्प येत होता. पोदत्योलकोव चालता चालता तुडुंबलेल्या गवतांचा संमिश्र गंध हुंगत होता. परत परत तो थांबून बुटाला लागलेले चिखलाचे लपके खरडून टाकण्यासाठी वाकायचा आणि परत ताठ होऊन थकिस्तपणे ढांगा टाकू लागायचा. त्याचे कातडी जाकीट उघडे पडले होते आणि दमटपणाने करकरत होते.

रात्र पडल्यानंतर ते पुढील खेड्यापाशी आले. मोहिमेवरील कज्ञाकांनी गाड्या सोडून दिल्या आणि रात्रीच्या मुक्कामासाठी ते निरनिराळ्या घराकडे गेले. पोदत्योलकोवने पहारे बसविण्याचा हुकूम दिला. पण ही 'ड्यूटी,' करायला माणसे मिळण्याची त्यांना अडचण आली. तिघांनी कामावर जाण्याचे साफ नाकारले.

" त्यांना ताबडतोब साथींच्या लष्करी कोर्टात खेचून हुकूम पाळायचं नाकारल्याबद्दल गोळ्या घातल्या पायजेत !" क्रिवोशेलिकोव संतापून उद्गारला. पण

अबरगतीने थकून गेलेल्या पोदत्योलकोवने खिन्न मुद्रा करून म्हटले, " प्रवासानं ते खचून गेलेत. स्वत:चा बचाव ते करू शकणार नैत. आपलं आता भरलंय मिशा !"

लागुतिनने कसेबसे काही कझाक गोळा केले, आणि खेड्याच्या वेशीवर पहारेकरी उभे केले. पोदत्योलकोवने घरांचा फेरफटका केला आणि तो जास्तीत जास्त ज्यांच्यावर विसंबून राहू शकत होता त्या कझाकांशी तो बोलला,

" पोरानं, झोपू नका ! नायतर गनिमाच्या हाती सापडू आपण !" त्याने सांगितले.

सबंध रात्रभर डोके हातात धरून तो मेजाजवळ बसला होता. एखाद्या जखमी श्वापदाप्रमाणे तो जोरजोराने घरघरीत धापा टाकीत होता. पहाटेच्या सुमारास त्याला झोपेने गाठले आणि मेजावर डोके ठेवून तो झोपला. पण अगदी लगोलग पुढील माघारीची तयारी करण्यासाठी तो जागा झाला. दिवस फटफटत होता. तो बाहेर आवाडात गेला. नुकतीच धारा काढून आलेली घराची मालकीण त्याला पडवीत भेटली.

" टेकडीवरून कुणी घोडेस्वार येतायत !" तिने बेफिकीरीने सांगितले.

" कुठायत ?"

" तिकडं गावापलीकडं !"

तो धावत आवाडात आला. खेड्यावर आणि कुरणरानातील वळंजीवर अवगुंठन घातलेल्या धुक्याच्या पलीकडे कझाकांच्या मोठ्या तुकड्या दिसत होत्या. ते भरधाव घोडी फेकीत येत होते. गावाभोवतालचा वेढा आवळीत होते.

दुसऱ्या घरातून कझाकांचे ओघ आवाडात जमू लागले. वासिली मिरोशनिकोव हा एक ठोस बांध्याचा कझाक होता. त्याच्या केसाची मोठी बट कपाळावर झेपावली होती.

पोदत्योलकोवला बाजूला घेऊन तो म्हणाला, " साथी पोदत्योलकोव .... त्याच्याकडून आताच माणसं आली. " त्याने टेकडीकडे हात करून सांगितले " त्यांनी तुला असं सांगायला सांगितलंय की, आपण हत्यारं खाली ठेवायची न् ताबडतोब शरण जायचं. नायतर ते हल्ला चढीवतील !"

" तुझ्या . . . साल्या कुत्तरडीच्या ! तुझी ही हिंमत . . . " पोदत्योलकोवने त्या कझाकाच्या फर्गोलाची गळपट्टी पकडून त्याला ढकलून दिले आणि गाडीकडे

त्याने धाव घेतली. बंदुकीची नळी घट्ट पकडून त्याने ती उचलली आणि कझाकाकडे वळून तो घोगऱ्या भसाडचा आवाजात गरजला, " शरण ? प्रतिक्रांतिकारकाशी कसली बोलणी करायची ? त्यांच्याशी आपण लढायचं ! माझ्या मागनं या ! हत्यारं घ्या !"

बरेचसे कझाक त्याच्या मागोमाग आवाडातून बाहेर धावले आणि घोळक्याने धावत गावाच्या आखरीकडे आले. शेवटच्या घरापाशी ते पोचले एवढ्यात भ्रिखिनने पोदत्योलकोवला गाठले.

" शरमेची गोष्टाय पोदत्योलकोव !" तो किंचाळला. " आपल्या भावाचं रगत आपण सांडायचं ? मागं फीर. आपण काय तरी सलूख करू."

मोहिमेतील फारच थोडी माणसे आपल्या मागे आली आहेत हे पोदत्योलकोवने पाहिले. लढ्याचा प्रसंग पडल्यास हार अटळ आहे हे त्याने सूज्ञपणे ओळखले. तेव्हा त्याने शांतपणे बंदुकीचा बोल्ट काढून घेतला आणि त्याचा हात खाली आला. तो म्हणाला, " काय अर्थ नाय गड्यानुं ! चला मागं खेड्याकडं !"

ते मागे फिरले. सगळी मोहिम एकमेकाला लागून असलेल्या तीन आवाडांत जमली होती. काही मिनिटांनी चाळीस घोडेस्वारांचा एक जथा खेड्यात शिरला. गनिमाचा मुख्य फौजफाटा सभोवतालच्या ठेंगण्या टेकड्यातून मान्याच्या जागा तशाच धरून होता.

शरणागतीच्या अटीवर चर्चा करण्यासाठी पोदत्योलकोव खेड्याच्या आखरीकडे गेला. तो चालत जात असताना बुनचुकने त्याच्या मागून धावत जाऊन त्याला गाठले.

" आपण शरण जायचं ?"

" फौजेचा पालापाचोळा ! दुसरं काय करणार ?"

" तुला काय मरायचंय ?" बुनचुक नखशिखांत थरारून म्हणाला. " त्याना म्हणावं आम्ही शरण येत नाय !" पोदत्योलकोवच्या भोवती आता जमू लागलेल्या कझाक खंद्या वीराकडे दुर्लक्ष करून भसाड्या तारस्वरात तो ओरडला, " त्यांना म्हणावं आम्ही आमची हत्यारं त्यांच्या हवाली करणार नाय !"

टाचेवर तो गर्रकन वळला आणि पिस्तूल हलवीत ढांगा टाकीत निघाला. मुसंडी मारून लढत लढत रेल्वेपर्यन्त जाऊ म्हणून त्याने रेडगार्डस्‌ची मने वळवण्याचा

प्रयत्न केला. पण बहुसंख्य लोक शरणागतीला अनुकूल होते. काही जण मागे फिरले. इतर रागाने म्हणाले,

" तू जा न् लढ ! आम्ही आमच्या भावांना गोळ्या घालणार नाय !"

" हत्यारं सोडून त्यांच्या हवाली होऊ या !"

" आज ईस्टरचा रविवाराय ! न् तुला रगत सांडायचंय ?"

बुनचुक मागे फिरला, आपल्या गाडीजवळ गेला, खाली आपला फर्गोल अंथरून त्यावर तो पडला. आपल्या पिस्तुलाचा दस्ता त्याने हातात घट्ट पकडून ठेवला होता. प्रथम त्याच्या मनात पळून जाण्याचा विचार आला. पण पलायन करणे आणि फरारी होणे हे त्याला पटेना. पोदत्योलकोवच्या परत येण्याची तो वाट बघू लागला

सुमारे तीन तासांनी पोदत्योलकोव परत आला. त्याच्या बरोबर परकी कझाकांचा बराच मोठा जमाव होता. त्यातील काही जण घोड्यावर स्वार होते. काहीजण घोड्याचे कायदे हातात धरून चालले होते तर बाकीचे पायी चालत होते. पोदत्योलकोव आणि त्याचा पूर्वी तोफखान्यातील दोस्त असणाऱ्या स्पिरिदो-नोवच्या मागे गर्दी करून येत होते. मान ताठ ठेवून पोदत्योलकोव ढांगा टाकीत चालला होता. त्याच्याशी काहीतरी बोलत स्पिरिदोनोव कुत्सित हसत होता. त्याच्यामागे एक कझाक घोड्यावर बसून येत होता. पांढऱ्या निशाणाची काठी त्याने छातीशी दाबून धरली होती.

मोहिमेच्या गाड्या जिथे उभ्या होत्या ते रस्ते आणि ती आवाडे नवीन आलेल्या कझाकांनी अडवून टाकली. आवाजाचा एकच कल्लोळ उसळला. त्यापैकी अनेकजण पोदत्योलकोवच्या कझाकांच्या खांद्याला खांदा भिडवून लढलेले कझाक होते. त्यांनी एकमेकांना ओळखल्यावर आनंदोद्गार आणि हसण्याखिदळल्याचा खकाणा उडाला.

" नमस्ते ! कोण प्रखोर ? तू कसा काय इकडं ?"

" आम्ही तुमच्याशी अगदी लढायच्या बेतात होतो !" प्रखोरने उत्तर दिले. " ल्वोवजवळ आपण ऑस्ट्रियनांचा कसा पीछा केला आठवतं ?"

" अरे हा तर आपला भाऊ दानिलो ! भाऊ, येशू थडग्यातून उठला§ !"

" खरंच . . . येशू पुन्हा उठला§ !" ईस्टरच्या शुभेच्छांनी दानिलोने उत्तर दिले. मुके घेतल्याचे मटामट् आवाज उठले. नंतर हे दोन कझाक मिशावरून हात

§ टीप – ईस्टरच्या दिवशी असे म्हणण्याची रशियात प्रथा होती. – अनुवादक

फिरवीत एकमेकाकडे रोखून बघत उभे राहिले आणि मग हसत हसत त्यानी एकमेकांच्या पाठीवर थापा मारल्या.

पलीकडे संवाद चालला होता.

" आम्ही अजून उपास सोडला नाय . . . " एक ' लाल ' कझाक म्हणाला.

" पण तुम्ही पडलात बोल्शेव्हिक ! तुम्हाला कसला आलाय उपास-तापास ?"

" हां हां ! आम्ही भले बोल्शेव्हिक असू. पण तरी आमचा देवावर विश्वासाय !"

" हट् ! थापा मारतोय्स !"

" देवाशपथ !"

" गळचात क्रूसाय ?"

" अर्थात. हा बघ !" त्या रेडगार्डने चपकनीच्या गळपट्टीची बटणे सोडून आपल्या केसाळ छातीवर लटकणारा कळकटलेला तांब्याचा क्रूस काढून दाखवला.

' बंडखोर पोदत्योलकोव ' ची शिकार करण्यासाठी कुऱ्हाडी आणि दांताळी घेऊन आलेली म्हातारी मंडळी एकमेकांकडे अचंब्याने बघू लागली.

" अरे ! आम्हाला कळलं की तुम्ही ख्रिस्ती धर्म सोडून दिला म्हणून !" त्यातील एकजण म्हणाला.

" आम्ही ऐकलं की तुम्ही गिरिजाघरं लुटता, पाद्रयांना ठार मारता !"

" सगळं खोटं !" त्या रुंद तोंडाच्या रेडगार्डने त्यांना ठासून सांगितले. " तुम्हाला त्यांनी खोटं सांगितलं. एवढं कशाला ? मी स्वतः रोस्तोवहून यायच्या आधी गिरिजाघरात जाऊन बाप्तीस्मा घेतला. "

" अरेच्या ! कठीणाय !"

मूळची लांबी कापून अर्धा केलेला भाला हाती घेतलेल्या एका किडकिडीत म्हाताऱ्याने आनंदाने टाळ्या पिटल्या.

रस्त्यावर आणि आवाडातून उत्साहाच्या संभाषणांचा कलकलाट चालला होता. पण अर्ध्या तासाने माणसांची ती थाप गर्दी धक्के देऊन दूर लोटीत काही कझाक घोडेस्वार तिथे आले. त्यातील एक बोकोवस्कीए खेड्यातील रिसाला सार्जन्ट मेजर होता.

" पोदत्योलकोवच्या तुकडीतल्या सगळ्यांनी हजेरीच्या रांगा लावा !" ते ओरडले.

त्यांच्या मागोमाग ज्युनियर कॅप्टन स्पिरिदोनोव आला. त्याच्या अंगात खाकी सदरा आणि खाकी खांदेपट्ट्या होत्या. साखरेच्या गोळ्यासारखा दिसणारा तुरा खोवलेली आपली अंमलदारी टोपी काढून त्याने हातात घेतली आणि बाजूला वळून तो ओरडला,

" पोदत्योलकोवच्या तुकडीतील सगळ्यांनी डावीकडं कुपाटीजवळ उभं रहायचं ! बाकीचे उजव्या बाजूला भाऊ, आघाडीची मंडळी ! तुमच्या पुढाऱ्या-बरोबर आमचं असं ठरलंय की तुम्ही तुमची हत्यारं काढून द्या. तुम्ही हत्यारबंद असेतो लोकांना तुमचं भय वाटतंय. तुमच्या बंदुका -न बाकीची हत्यारं तुमच्या गाड्यातून ठेवून द्या. आम्ही मिळून त्यांची राखण करू. आम्ही तुम्हाला कासनो-कुत्स्कायाला धाडणार आहोत. तिथं तुमची हत्यारं तुम्हाला परत मिळतील !"

रेडगार्ड कझाकात असंतोषाचा जोरदार भुभु:कार उमटला. ' देणार नाय !"

रस्त्यात आणि आवाडात ठासून भरलेल्या गर्दीतून कावरीबावरी कुजबुज सुरू झाली.

स्पिरिदोनोवच्या हाताखालील कझाकाची गर्दी उजवीकडे लोटली. रस्त्याच्या मधोमध रेडगार्डस्‌चा विस्कळीत नाउमेद थवा उरला. आपला फर्गोल खांद्यावर टाकलेला क्रिवोशलिकोव कोंडीत सापडलेल्या श्वापदागत भिरीभिरी बघत होता. लागुतिनने ओठ वेडेवाकडे केले. गोंधळलेली बोलणी सुरू झाली. आपली हत्यारे सोडायची नाहीत असा खंबीर निर्धार केलेला बुनचुक हातातील बंदूक ओढत झपाट्याने चालत पोदत्योलकोवकडे गेला.

" आपली हत्यारं सोडता कामा नैत ! ऐकलंस ?"

" आता फार उशीर झालाय !" आपल्या तुकडीचा हजेरीपट बोटात अस्वस्थपणे चाळवीत पोदत्योलकोव कुजबुजला.

तो हजेरीपट स्पिरिदोनोवच्या हाती आला. त्यावर नजर टाकून त्याने विचारले,

" तुकडीत एकूण एकशे अठ्ठावीस माणसं हवीत. बाकीची कुठायत ?"

" वाटेत ती गळाली !"

" अस्सं ! ठीकाय ! त्यांना हत्यारं उतरायला सांग !"

सर्वप्रथम पोदत्योलकोवने आपली पिस्तुलपिशवी सोडून दिली. ती हवाली करताना तो घोगऱ्या आवाजात म्हणाला,

" माझी समशेर न् बंदूक गाडीतायत ! "

हत्यारे उतरवणे सुरू झाले. रेडगार्डसनी चेंगटपणा करीत आपली हत्यारे काढून दिली. काही जणांनी आपली पिस्तुले कुपाटीत आणि आवाडात लपविण्याचा प्रयत्न केला

" जो हत्यार उतरवून देणार नाय त्याची झडती घेतली जाईल ! " मजेत हसून स्पिरिदोनोव गरजला.

बुनचुकचे अनुकरण करून त्यातील अनेकांनी बंदुकी हवाली करण्याला नकार दिला. त्यांची हत्यारे जबरदस्तीने काढून घेण्यात आली. एका मशिनगनवाल्याने खळखळ उडवून दिली. आपल्या मशिनगनचा खिळा बरोबर घेऊन घोड्यावरून तो खेड्याच्या बाहेर उधळला. त्यानंतर जो एकच गोंधळ उडाला त्यात अनेक जण लपून बसले. स्पिरिदोनोवने तात्काळ पोदत्योलकोववर पाहरे बसवले आणि इतरांनी लपलेल्यांना शोधून काढले. त्यांची नावे पुकारण्यात आली. पण कैदी नाखुषीने हजेरी देत होते. ते ओरडत होते :

" याद्या कशाला तपासताय ? आम्ही सगळे इथेच आहोत ! "

" आम्हाला क्रासनोकुतस्कायाला न्या ! "

" हा खेळ बंद करा ! "

पैशाची संदूक सीलबंद करून कडक पाहऱ्यात कारगिनस्कायाला पाठविण्यात आली. नंतर स्पिरिदोनोवने कैद्यांना जमा केले आणि तात्काळ आपल्या आवाजाचा सूर आणि चेहऱ्यावरील भाव बदलून त्याने हुकूम सोडला,

" दोनाच्या रांगा ! तोंड डावीकडं ! आगे चलो ! रांगेत गडबड नाय पायजे ! "

रेडगार्डस्च्या रांगातून असंतोषाची कुजबुज उठली. नाखुषीने ते चालायला लागले. बघता बघता त्यांनी रांगा मोडल्या आणि विस्कळीत घोळके करून ते चालू लागले.

आपली हत्यारे उतरवून देण्याचे आवाहन आपल्या सैनिकांना उद्देशून पोदत्योलकोवने केले तेव्हा या प्रकरणाची अनुकूल अखेर होईल अशी अद्याप त्याला आशा वाटत होती.

पण कैद्यांना खेडयाच्या बाहेर हाकलण्यात आले तेव्हा त्यांच्यावर बंदोबस्त ठेवणारे कझाक कडेच्या माणसाना आपल्या घोडयांनी दामटू लागले. बुनचुक डावीकडे ढांगा टाकीत चालत होता. लाल भडक दाढी असलेल्या आणि काळाने काळवंडलेली कडी कानात असलेल्या एका म्हाताऱ्या कझाकाने उगाचच त्याच्या अंगावर चाबूक ओढला. त्या चाबकाच्या टोकाचा फटकारा बुनचुकच्या गालावर बसला. त्याने मोहरा वळवून मुठी आवळल्या. पण क्षणभरच. तेवढयात त्याने आता कैद्यांच्या घोळक्यात शिरावे म्हणून त्याहून जबर फटकारा त्याच्यावर आदळला. आत्मरक्षणाच्या मूलभूत प्रेरणेपोटी तो नकळत त्या दाट जमावात शिरला. आपल्या साथींच्या गर्दीत तो घुसला. आन्नाच्या मृत्यूनतर प्रथमच त्याचे ओठ कुत्सीत स्मिताने विलग झाले. जगण्याची इच्छा माणसात केवढी जबर आणि जोमाची असते हे जाणवून त्याला आश्चर्य वाटले.

कझाक बंदोबस्तींनी आता कैद्यांना मारहाण सुरू केली. आपल्या असहाय्य गनिमाला पाहून चवताळलेले म्हातारे त्यांच्या अंगावर घोडी घालीत होते. जिनातून वाकून त्यांना चाबकाने आणि तलवारीच्या बोथट बाजूने त्यांना हाणीत. ज्यांच्या-वर प्रहार होई ते आपोआप धक्काबुक्की करीत, ओरडत आरडत घोळक्याच्या मधोमध घुसत. आपल्या डोक्यावर आपली मूठ नाचवीत एक उंच रेडगार्ड ओरडला, "आमचा जीवच घ्यायचा असलं तर झटपट घ्या. तुमच्या आयला साल्यो ! आमचा छळ का करताय ?"

" तुम्ही वचन दिलं ! त्याचं काय ?" क्रिवोशलिकोव ओरडला. म्हाताऱ्या लोकांचे क्रौर्य जरा मंदावले.

" कुठं नेताय आम्हाला ? एका कैद्याने विचारले.

बोल्शेव्हिकाबद्दल जरा सहानुभूती वाटणाऱ्या एका तरूण आघाडीच्या सैनिकाने खालच्या आवाजात हळूच उत्तर दिले,

" तुम्हाला पोनोमाऱ्योवकडं घेऊन जायचा आम्हाला हुकूमाय ! घाबरू नका भाऊ ! तुमचं काय बरंवाईट व्हायचं नाय !"

ते पोनोमाऱ्योवला पोचले तेव्हा एका लहानशा दुकानाच्या दाराशी स्पिरि-दोनोव उभा होता. एकेक कैदी आत शिरत असताना तो विचारत होता,

" तुझं आडनाव ? नाव ? जन्म कुठला ?"

खूप हाताळून झालेल्या आपल्या फौजी वहीत तो उत्तरे नोंदत होता.

बुनचुकची पाळी आली.

" तुझं आडनाव ?" उत्तराच्या अपेक्षेने कागदावर पेन्सिल टेकवून स्पिरिदोनोवने विचारले. त्या रेडगार्डच्या धुंद चेहऱ्याकडे त्याने पाहिले. थुंकण्याच्या तयारीत बुनचुकने ओठ वळवलेले पाहून त्याला चटकन टाळीत तो ओरडला,

" चल निघ सुव्वर ! निनावी मरशील !"

बुनचुकच्या उदाहरणाने स्फूर्ती लाभून त्याच्या मागून येणाऱ्या दोघांनी आपली नावे सांगण्याचे नाकारले आणि निनावी मरणच पसंत केले.

शेवटचा माणूस आत दुकानात शिरल्यावर स्पिरिदोनोवने दुकानाला टाळे ठोकले आणि भोवताली पाहरे उभे केले.

दुकानाच्या जवळच मोहिमेच्या गाड्यातील लुटीची वाटणी चालली होती. इकडे घाईघाईने फौजी कोर्टमार्शल बनविण्यात आले. ह्या फत्तेमुबारकीत भाग घेणाऱ्या सर्व खेड्यांचे प्रतिनिधी त्यात होते. कोर्टमार्शलचा अध्यक्ष ठोसर बांध्याचा, पिवळ्या केसांचा कॅप्टन वासिली पोपोव हा होता. नेहमीचे भरतकाम केलेले टुवाल अडकवलेल्या एका आरशाखाली तो बसला होता. त्याचे कोपर मेजावर पसरले होते. टोपी डोक्याच्या मागच्या बाजूला सरकली होती. त्याचे स्निग्ध सुस्वभावदर्शी भेदक डोळे कोर्टाच्या एका सदस्यावरून दुसऱ्याकडे फिरत होते. तो आपला प्रश्न परत परत विचारीत होता.

" दादानू, काय शिक्षा द्यायची त्याना ?"

तो वाकला आणि बाजूला बसलेल्या जुनियर कॅप्टन सेनिवच्या कानात कुजबुजला. त्या अंमलदाराने घाईघाईने मान हलवली. पोपोवचे डोळे आकुंचित झाले. त्यातील आनंदीपण मावळले आणि त्याच्या जागी एक थंड निष्ठूर चमक आली. त्याच्या पापण्या झुकलेल्या असल्या तरी ती चमक लपत नव्हती, " आपली घरंदारं लुटायला न कझाकांना नष्ट करायला येणाऱ्यांना, आपल्या देशाशी हरामखोर झालेल्यांना काय शिक्षा द्यायची ?"

पेटीतील स्प्रिंगची बाहुली टपकन बाहेर पडावी तशी उडी मारून उभा रहात एक म्हातारा ओरडला, " गोळ्या घाला त्यांना ! अगदी एकूण एक माणसाला !"

अंगात संचार झाल्याप्रमाणे तो मुंडी हलवीत आपल्या कडव्या नजरेने चहूबाजूला भिरीभिरी बघत होता. तोंडावर जमलेल्या थुंकीच्या फेसाने गुदमरून

तो कडाडला, " काय दया माया दाखवू नका साले जुडास ! ठार मारा त्यांना ! खिळे ठोकून क्रूसावर लटकवा ! जाळून टाका ! त्यातले यहुदी ठार करा !"

ओठावर जमलेल्या थुंकीने त्याच्या तोंडून शब्द फुटेना. तो खाली बसला. त्याची पातळ दाढी थरथरत होती. केस विस्कटलेले होते.

" त्यांना हद्दपार केलं तर ?" एका सदस्याने गुळमुळीत सूचना केली.

" गोळ्या घाला !"

" मरणाची सजा !"

" लोकासमक्ष गोळ्या घाला !"

" तण उपटून काढलंच पैजे. "

" ठार करा त्यांना !"

" अर्थात त्यांना गोळ्या घातल्याच पैजेत ! त्यावर चर्चा कशाला हवी ?" स्पिरिदोनोव संतापून म्हणाला.

त्या आरडा ओरड्याने अध्यक्षाच्या चेहऱ्यावरील उरलीसुरली सद्भावी संतुष्टता नष्ट झाली. त्याचे ओठ दगडागत झाले.

" गोळ्या घालण्यात याव्यात ! लिहून घे !" खांद्यावरून मागे बघत आपल्या चिटणीसाला त्याने हुकूम सोडला.

" न् पोदत्योलकोव न् क्रिवोशलिकोव ? त्यांनाही गोळ्याच घालायच्या ? त्यांच्यावर ती मेहेरबानीच होईल !" खिडकीजवळ बसलेला एक लठ्ठ म्हातारा कझाक चवताळून कडाडला. आतापर्यन्त तो दिव्याची वात सारखी करीत बसला होता.

" म्होरके म्हणून त्यांना फांसावर लटकवण्यात यावं. " पोपोवने तुटकपणे उत्तर दिले. आपल्या चिटणीसाकडे वळून त्याने हुकूम सोडला, " लिहून घे ! फर्मान ! आम्ही खाली सह्या करणार . . . "

तो कारकून ( त्याचेही नाव पोपोवच होते ) अध्यक्षाचा दूरचा नातेवाईक होता. सुबक विंचरलेले आपले पांढऱ्या केसाचे मस्तक खाली मेजावर झुकवून तो लेखणीने खरडू लागला.

" दिव्यातलं तेल संपत आलेलं दिसतंय." कुणीतरी खेदाच्या सुरात म्हटले.

तो मेणाचा दिवा वितळून गेला. वातीतून धूर येऊ लागला. छतावरील कोळ्याच्या जळमटात सापडलेल्या माशीची गुणगुण, कागदावर खरडली जाणारी लेखणी, ' कोर्टमार्शल ' च्या एका सदस्याला लागलेली दम्याची जोराची धाप हे आवाज त्या शांततेत स्पष्टपणे ऐकू येत होते.

× × ×

## फर्मान

२७ एप्रिल (१० मे) १९१८

आम्ही खाली सह्या करणार, कारगिनोव्स्काया, बोकोव्स्काया आणि क्रासनोकुत्स्कायाचे लोकांनी निवडून दिलेले प्रतिनिधी :–

| | | |
|---|---|---|
| वासिल्येव्स्की | खेड्याचे प्रतिनिधी | स्तिपान माक्साएव |
| बोकोव्स्काया | खेड्याचे प्रतिनिधी | निकोलाय कुझिलिन |
| फोमिन | खेड्याचे प्रतिनिधी | फ्योदर कुमोव |
| वेरख्ते याब्लोनोव्स्की | खेड्याचे प्रतिनिधी | अलेक्झांदर कुखतिन |
| निझ्ने दुलेन्स्की | खेड्याचे प्रतिनिधी | लेव सिनेव |
| इलिन्स्की | खेड्याचे प्रतिनिधी | सिम्योन वोलोत्स्कोव |
| कोन्कोव्स्की | खेड्याचे प्रतिनिधी | मिखाइल पोपोव |
| वेरख्ने-दुलेन्स्की | खेड्याचे प्रतिनिधी | याकोव रोदिन |
| सावोस्तियानोव | खेड्याचे प्रतिनिधी | अलेक्झांदर फ्रोलोव |
| मिल्युतिनस्काया | गावाचे प्रतिनिधी | माक्सिम फेवराल्योव |
| निकोलाएव | खेड्याचे प्रतिनिधी | मिखाइल ग्रोशेव |
| क्रासनोकुतस्काया | गावाचे प्रतिनिधी | इल्या येलान्किन |
| पोनोमाऱ्योव | खेड्याचे प्रतिनिधी | इवान दियाचेन्को |
| येवलान्तिएव | खेड्याचे प्रतिनिधी | निकोलाइ क्रिवोव |
| मालाखोव | खेड्याचे प्रतिनिधी | लुका येमेलियानोव |
| नोवो झेमत्झेवो | खेड्याचे प्रतिनिधी | मातवेई कोनोवालोव |
| पोपोव | खेड्याचे प्रतिनिधी | मिखाइल पोपोव |

| | | |
|---|---|---|
| आस्ताखोव | खेड्याचे प्रतिनिधी | वासिली शशेगोलकोव |
| ओर्लोव | खेड्याचे प्रतिनिधी | फ्योदर चेकुनोव |
| क्लिमो फ्योदोरोव्स्की | खेड्याचे प्रतिनिधी | फ्योदर चुकारिन |

हे सर्व आज दिनांक २७ एप्रिल (१० मे) १९१८ रोजी पोपोव ह्यांच्या अध्यक्षतेखाली जमलो आहोत.

## – फर्मान –

(१) की, श्रमिक जनतेला लुटणारे आणि त्यांचा विश्वासघात करणारे आणि खाली निर्देशित केलेले एकूण ऐंशी जण ह्यांना गोळ्या घालून ठार मारण्यात यावे. ह्याला दोन अपवाद म्हणजे पोदत्योलकोव आणि क्रिवोशलिकोव हे असून त्यांना ह्या गटाचे म्होरके म्हणून फाशी देण्यात येईल.

(२) की, मिखाइलोव्स्की खेड्यातील कझाक आन्तोन कालितवेंत्सोव ह्याला पुराव्याच्या अभावी निर्दोष सोडून देण्यात येईल.

(३) की, पोदत्योलकोव ह्याच्या तुकडीतून पळून गेलेले आणि क्रासनोकुत्स्काया गावात गिरफदार केलेले कॉनस्तंतिन मेलनिकोव, गावरिल मेलनिकोव, आक्स्योनोव आणि वेरशिनिन ह्यांना ह्या फर्मानाच्या कलम एक प्रमाणे गोळ्या घालून ठार मारण्यात येईल.

(४) की, ह्या फर्मानाची अंमलबजावणी उद्या दिनांक २८ एप्रिल (११ मे) रोजी सकाळी ६–०० वाजता करण्यात येईल.

(५) की, लेफ्टनंट सेनिन ह्यांच्या हवाली कैदी केले जातील. आणि सकाळी ११ वाजेपर्यन्त बंदुका घेतलेले प्रत्येक खेड्यातील दोन कझाक त्यांच्या हाताखाली दिले जातील. ह्या कलमाच्या अंमलबजावणीला कोर्टाचे सदस्य जबाबदार राहतील. प्रत्येक खेड्यातील पाच कझाकांनी ही शिक्षा अंमलात आणायची असून त्यांना देहान्त सजेच्या ठिकाणी पाठविले जाईल.

सही
व्ही. एस. पोपोव
अध्यक्ष, लष्करी विभाग
ए. फ. पोपोव
कारकून

सजा ठोठावण्यात आलेल्यांची यादी कारकुनाने लिहून पूर्ण केली. आणि शेजारील माणसाच्या हाती लेखणी कोंबून म्हटले,

" सही करा ! "

शाईने लडबडलेली लेखणी त्या माणसाने आपल्या खुरटचा काळचा बोटात धरली.

" माझं अक्षर काय चांगलं नाय !" तो कसनुसे हसून म्हणाला.

पुढच्या माणसाने अशीच चाचरत, कपाळाला आठचा घालून आणि एकाग्रतेच्या श्रमांनी घामाघूम होत सही केली. दुसऱ्या एकाने सही करण्यापूर्वी उगाच पुष्कळसे आणि खोटे पवित्रे घेतले. त्यानंतर हे सगळे करताना बराच वेळ बाहेर पडलेली जीभ त्याने तोंडात ओढून घेतली.

पोपोवने स्वाक्षरी ठोकून त्या खाली फर्रकन रेघ ओढली. उठून उभा रहात त्याने आपले घामेजलेले तोंड हातरुमालाने पुसले.

" ह्याला ती यादी चिकटव !" जांभई देत तो म्हणाला.

" परलोकात गेलेला कालेदिन ह्याबद्दल आपल्याला शाबासकी दील !" कारकून भिंतीला कागद चिकटवताना बघत एकजण हसून म्हणाला.

त्या थट्टेला कुणी साद दिली नाही. ते न बोलता त्या घरातून बाहेर पडले.

"प्रभो येशू . . . . !" पडवीतील अंधारात सुस्कारा सोडून कुणीतरी म्हणाले.

---

## २९

दुकानात कोंडलेल्या त्या कैद्यांपैकी कुणालाही दुधाळ तारकाप्रकाशाने उजळलेल्या रात्री झोप आली नाही. संभाषण तेव्हाच विरून गेले. हवेचा अभाव आणि त्यांची स्वतःची चिंता ह्यात ते गुदमरून मेले होते. सारी संध्याकाळ त्यातील एकजण रखवालदाराला म्हणत होता :

" साथी, दार उघड मला बाहेर जायचंय !"

तुमानीतून त्याचा सदरा बाहेर लोंबत होता. केस .विस्कटलेले होते. पाय अनवाणी होते. आपला काळवंडलेला चेहरा किल्लीच्या भोकावर दाबून तो परत परत म्हणत होता,

" दार उघड, साथी !"

" इथं कोण तुझा ' साथी ' नाय !" अखेरीस एका रखवालदाराने उत्तर दिले.

" उघड भाऊ !" कैद्याने संबोधनाची पद्धत बदलून म्हटले.

त्या रखवालदाराने बंदुक खाली ठेवली. आपला चुट्टा संपवला. रात्रीचे भक्ष्य शोधण्यासाठी उडत जाणाऱ्या रानबदकाच्या पंखांची फडफड ऐकली आणि मग दरवाजाच्या फटीला ओठ लावून त्याने सांगितले,

" चड्डीत मूत तुझ्या. कंगाल हैवान ! रात्री काय तुझी पाटलूण कुजत नाय-न् पहाटेला तुला स्वर्गात ती ओली करायला नायतर सुकवायला मिळंल . . . !"

" आपली कंबख्तीय !" असे हताशपणे म्हणून तो रेडगार्ड दरवाजापासून मागे वळला.

खांद्याला खांदा लावून ते बसले होते. पोदत्योलकोव एका कोपऱ्यात स्वत:ला शिव्या घालीत आणि खिशातून आणलेल्या नोटा टरकावीत बसला होता. त्या सर्वात त्याला मरणाची मुळीच भीती वाटत नव्हती. सगळ्या नोटा फाडून टाकल्यावर त्याने पायातले बूट काढले आणि क्रिवोशलिकोवच्या खांद्यावर चापटी मारून तो म्हणाला,

" सगळं आता कळून आलंय . . . त्यांनी गंडवलं आपल्याला. गंडवलं भडव्यांनी !" शेजारी पडलेल्या आपल्या मित्राला उद्देशून तो म्हणाला, " छळवादाय मिखाईल ! मी लहान पोर होतो तेव्हा गारगोटीची बंदुक घेऊन मी बापाबरोबर जंगलात शिकारीला जायचो. चालता चालता वाटायचं की, झाडं म्हणजे डोक्यावर घातलेलं हिरवं छप्परचाय ! मी बदकावर गोळी झाडायचो. नेम चुकला की स्वत:वर अगदी चिडून जायचो. शरमेनं अगदी रडू कोसळायचं. न् आज इथं सगळा चुथडा करून टाकलाय मी. तीन दिवस आधी रोस्तोव सोडलं असतं तर इथं मरणाशी गाठ पडली नसती. त्यांच्या प्रतिक्रांतिकारकाना पार उलटेपालटे केले असते. "

हसण्याच्या प्रयत्नात क्रिवोशलिकोवचे ओठ वेडेवाकडे झाले. तो उत्तरादाखल कुजबुजला,

" गेले उडत ! घेऊ दे आपला जीव ! मला आजून मरायचं भय वाटत नाय. मला भय एवढंच वाटतं की गाण्यात म्हटले तसे परलोकात आपण एक-मेकाला ओळखणार नाय. फ्योदोर तू न् मी तिथं असू पण अनोळख्यागत आपली भेट होईल . . . त्याचं मला भय वाटतं !"

" दे सोडून !" पोदत्योलकोव गहिवरून घोगऱ्या स्वरात म्हणाला. आपल्या दोस्ताच्या खांद्यावर आपला थोराड उष्ण हात ठेवून तो म्हणाला, " ती अडचण नाय !"

लागुतिन कुणाला तरी आपल्या खेड्याबद्दल सांगत होता. आपल्या लांबोड्या डोक्यावरून आपले आजोबा आपली कशी गंमत करीत आणि त्याच आजोबांनी आपल्याला शेजारच्या माणसाच्या कलिंगडाच्या बखळीत पकडल्यावर कसे बदडून काढले होते ते तो सांगत होता.

संभाषणाच्या विस्कळीत तुकड्यात त्या रात्री वेगवेगळे विषय होते.

बुनचुकला दाराजवळ जागा सापडली होती. फटीतून येणारा वारा तो अधाशासारखा खात होता. भूतकाळात गढलेल्या त्याच्या मनात आपल्या आईचा विचार आला. वेदनेची तीक्ष्ण टोचणी जाणवल्याने त्याने आपले विचार बळेच दुसऱ्या दिशेला वळवले. आन्नाची आणि अलीकडच्या दिवसांची तो आठवण करू लागला. ह्यात त्याला एक मोठा दिलासा वाटला, उपशमन मिळाले. मृत्यूची त्याला मुळीच तमा वाटत नव्हती. आपण जीवनाला मुकणार ह्या विचाराने पाठीच्या कण्यातून उठणारी थरथर आणि अंतर्यामी लागून राहणारी तळमळ आता त्याला जाणवत नव्हती. व्यथेचा, वेदनेचा मार्ग जेव्हा संपतो ;श्रांतता जेव्हा एवढी प्रचंड असते आणि शरीर एवढं ठणकत असतं की, तो मार्ग संपल्यावर कोणतीही भावना जाणवणंच अशक्य होतं, अशा वेळच्या ·निरानंद विश्रांतीप्रमाणे तो मृत्यूची प्रतिक्षा करीत होता.

त्याच्या जवळच कैद्यांचा एक गट बसला होता. स्त्रिया, प्रेम त्या प्रत्येकाने अनुभवलेले महान आणि क्षुद्र आनंद ह्याबद्दल ते आनंदाने आणि दुःखाने बोलत होते. आपली कुटुंबे, आपले नातेवाईक, आपले मित्र ह्याबद्दल ते बोलत होते. कोवळ्या दाण्याच्या उत्तम वाणाबद्दल ते सांगत होते की गहू इतका उंच वाढलेला असतो की वर बसलेला कावळाही दिसत नाही. त्याना वोडक्याची आणि स्वातंत्र्याची तळमळ लागली होती. ते पोदत्योलकोवला शिव्या देत. पण पेंगुळलेपणाने त्यापैकी अनेकावर आपल्या कृष्णपंखांचे आच्छादन घातले. शरिराने आणि मनाने थकून गेलेले ते पडल्या पडल्या, बसल्या बसल्या आणि उभ्याउभ्याही झोपी गेले.

पहाट नुकतीच फटफटत होती. एवढ्यात एकाला जागेपणी म्हणा किंवा झोपेत म्हणा रडू कोसळले. लहानपणापासून खाऱ्या आसवांची चव विसरून गेलेली, ओबडधोबड, वयाने वाढलेली माणसे जेव्हा रडू लागतात तेव्हा ते भयंकर असते. ताबडतोब अनेक आवाजांनी त्या पेंगुळलेल्या नीरवतेचा भंग केला.

"चूप साल्या !"

"चूप नायतर गळा घोटतो तुझा !"

"बाईचाय !"

"माणसं इथं झोपलीत न् तू लाजलज्जा सोडून दिलीस का काय ?"

नाकाची सुरसुर करीत त्याने नाक शिकरले आणि तो गप्प झाला. अगदी चिडीचिप होऊन गेले. कुठेकुठे चुट्टयांची लाल टोके चमकत होती, पण कुणीही काही आवाज केला नाही पुरुषी घाम, एकमेकांना दाटून भिडलेली अनेक निरोगी

शरीरे, चुट्टयांचा धूर आणि रात्री पडलेले दहिवर ह्यांच्या गंधाने हवा धुंद झाली होती.

खेड्यातील कोंबड्याने सुर्योदयाची बांग दिली. दुकानच्या बाहेर पावलांचा आवाज आणि लोखंडाचा खणखणाट झाला.

"कोणाय ते?" एका रखवालदाराने सवाल पुकारला.

"दोस्त! पोदत्योलकोवच्या माणसाना पुरायाला खड्डे खणायला निघालोत!" एका तरूण उत्सुक आवाजाने उत्तर दिले.

दुकानातील सगळेच जण तात्काळ खडबडून उठले.

---

## ३०

पित्रो मेलिखोवच्या नेतृत्वाखालील तातास्कीं कझाकांची तुकडी त्याच दिवशी पहाटे पोनोमाऱ्योवला येऊन दाखल झाली. गावात सुनसुनाटतच होता. खेड्यात कझाकी बुटांचा खडखडाट आणि पाणी दाखवायला नेण्यात येणाऱ्या घोड्यांचे आवाज येत होते. खेड्याच्या आखरीकडे लोकांची गर्दी लोटत होती. खेड्याच्या मधोमध पेत्रोने आपली माणसे थांबवली आणि त्यांना पायउतार होण्याचा हुकूम दिला. बरेच कझाक त्यांच्याजवळ आले.

" कुठून आला ?" त्यापैकी एकाने विचारले.

" तातास्कीहून. "

" तुम्ही जरा उशीर केलात. तुमच्या मदतीशिवाय आम्ही पोदत्योलखोवला पकडलंय. "

" कुठायत ते ? हद्दपार केलेत का काय ?"

" कोंबडी डालल्यागत तिथं त्यांना कोंडून घातलंय !" त्या कझाकाने हसून दुकानाच्या दिशेने हात केला.

क्रिस्तोनिया, ग्रिगरी आणि इतर बरेच जण त्या माणसाजवळ गेले. "त्यांना कुठं पाठवायचं ठरलंय ?" क्रिस्तोनियाने चौकशी केली.

" मेलेल्यांना भेटायला !"

" काय ? खोटं सांगीतोस !" त्या माणसाचा फर्गोल पकडून ग्रिगरी म्हणाला.

" तर मग महाराज ह्यापेक्षा चांगली खोटी बात शोधून काढा की तुम्ही " त्या माणसाने उर्मटपणे टोमणा मारला आणि ग्रिगरीच्या बळकट बोटातून स्वतःला काळजीपूर्वक सोडवून घेतले.

" ते पहा तिकडं. फाशीचे तक्तेपण बांधलेत. " दोन [खुरट्या वळुंजीवर टाकलेल्या आडव्या तुळईला लटकणारे दोन दोर त्याने बोट करून दाखवले.

" घोडी बांधा !" पित्रोने हुकूम दिला.

× × ×

आभाळ भरून आले होते. झिमझिम पाऊस पडत होता. खेड्याबाहेर कझाकांची आणि बायकांची थाप गर्दी जमा झाली होती. सहा वाजता देहांत शासनाची सजा अंमलात येईल असे कळलेले पोनोमाऱ्योवचे रहिवाशी एकादे दुर्मिळ आणि मनोरंजक नाटक बघायला जावे अशा हौसेने निघाले होते. बायकांनी सणासुदीचे कपडे केले होते. अनेकींनी आपली पोरेबाळे बरोबर घेतली होती. कुरणरानावर गर्दीचा थवा लोटला. फाशीचे तक्ते आणि सहा फूट खोल खणलेले खड्डे ह्याभोवती त्यांनी गर्दी केली. खड्ड्याच्या एका बाजूला रचलेल्या ओल्या मातीच्या ढिगाऱ्यावर पोरे चढत होती. लौकरच अंमलात येणाऱ्या देन्हात शिक्षेवर लोक उत्साहाने चर्चा करीत होते. बायका दुःखाने आपसात कुजबुजत होत्या.

'कोर्टमार्शल' चा अध्यक्ष पोपोव आला. त्याच्या चेहऱ्यावर झोपेच्या खुणा अद्याप दिसत होत्या. चुट्टा ओढताना आणि त्याचे टोक चघळताना त्याचे बळकट दात प्रकट होत होते. घोगऱ्या स्वरात त्याने कझाक रखवालदारांना हुकूम सोडला –

" कोठडीतून त्या माणसांना घेऊन या. स्पिरिदोनोवला म्हणावं की पहिली तुकडी पाठव. " त्याने आपल्या घड्याळाकडे नजर टाकली आणि तो बाजूला उभा राहून रखवालदार, लोकांना मागे हाकलीत असलेले पाहू लागला. तिथून मागे हाकललेल्या लोकांचे एक रंगीबेरंगी अर्धवर्तुळ तयार झाले होते.

स्पिरिदोनोव कझाकांची एक तुकडी झपाट्याने दुकानाकडे घेऊन गेला. वाटेत त्याला पित्रो मेलिखोव भेटला.

" तुमच्या खेड्यातले काही स्वयंसेवक आहेत का ?"

" स्वयंसेवक कशाला ?"

" गोळ्या घालण्याचं काम करायला !"

" नैत. मिळणारही नैत !" पित्रोने तुटक उत्तर दिले आणि वाट अडवून उभा राहिलेल्या स्पिरिदोनोवला वळसा घालून तो गेला.

तरीपण तातार्स्कीचे काही लोक स्वयंसेवक म्हणून पुढे आले. आपल्या टोपीच्या माथ्याखालून बाहेर पडलेले केस कुरवाळीत मितका कोर्शुनोव झटकन पित्रोपुढे आला आणि आपले हिरवे डोळे आकुंचित करून म्हणाला,

" मी स्वयंसेवक होतो. तू का ' नाय ' म्हणीतलंस ? मी तयाराय. मला काही काडतुसं दे. माझ्याजवळ एकच पट्टाय !"

आन्द्रेई काशुलिन त्याला येऊन मिळाला. त्याच्यावर एक ताणलेला दृष्ट भाव होता. तसाच कालिमक चेहऱ्याचा फेदोत बोदोव्स्कोव पण आला.

कझाकांच्या बंदोबस्तात वेढलेली कैद्यांची पहिली दहाची तुकडी दुकानातून निघाली तेव्हा दाट जमावात एकदम कुजबुज आणि कलकल वाढली.

सगळ्यांच्या पुढे पोदत्योलकोव चालला होता. त्याने रुंद काळा जामा घातला होता. त्याचे कातडी जाकीट सताड उघडे होते. आपली थोराड पावले तो चिखल झालेल्या रस्त्यावर आत्मविश्वासाने टाकीत होता. तो जेव्हा घसरला तेव्हा तोल सावरण्यासाठी त्याने आपला डावा हात किंचित उचलला. त्याच्या बाजूने चाललेल्या क्रिवोशलिकोवचा चेहरा मरणकळेसारखा पांढराफटक पडला होता. तो कष्टाने पाय रखडीत चालला होता. त्याच्या डोळ्यात ज्वराची चमक होती. वेदनेने त्याचे तोंड स्फुरण पावत होते. आपला फर्गोल त्याने खांद्यावर टाकला होता आणि हिंवाने तो प्राणांतिक शहारत होता. का कुणास ठाऊक पण ह्या दोघांच्या अंगावर कपडे तसेच ठेवलेले होते. इतरांचे कपडे उतरवून फक्त आतून घालण्याची वस्त्रे त्यांच्या अंगावर ठेवलेली होती. लागुतिन बुनचुकच्या बाजूने चालत होता. दोघेही अनवाणी होते. त्यांच्या अंगावर त्यांचे सदरे आणि काही कपडे होते. लागुतिनच्या फाटक्या अंतर्वस्त्रातून त्याची पिवळट कातडी दिसत होती. त्याने ओशाळगतीने ती वस्त्रे भोवताली ओढून घेतली होती. बुनचुक रखवालदारांच्या डोक्यावरून दूर अंतरावरील ढगांच्या करड्या आवरणाकडे बघत होता. त्याचे थंड सावध डोळे सापेक्षपणे आणि तणावाने उघडझाप करीत होत. आपल्या सदऱ्याच्या खुल्या गळपट्टीतून हात घालून आपले जाड तळवे तो केसाळ छातीवर फिरवत होता. अप्राप्य पण विचार करायला सुखद अशा कशाची तरी तो वाट बघत होता, असे एखाद्याला वाटले असते. इतर काही जणांच्या तोंडावर विचारशून्य बेफिकिरी होती. पिकलेल्या

केसांचा ओरलोव नावाचा कझाक तिरस्काराने हातवारे करीत कझाक रखवालदारांच्या पायाशी थुंकत होता.

पण दोघा तिघांच्या डोळ्यात इतकी काही मूक आर्तता होती आणि त्यांच्या पिळवटलेल्या तोंडावर इतकी अमर्याद घबराट होती की त्यांच्या दृष्टीला दृष्टी भिडताच रखवालदारसुद्धा आपली नजर दुसरीकडे वळवीत होते.

ते झपाट्याने चालत गेले. अडखळून पडणाऱ्या क्रिवोशलिकोवला पोदत्योलकोवने आपला हात दिला. त्या गर्दीच्या पांढऱ्या रुमाला आणि तांबड्या निळ्या टोप्यांजवळ ते आले. त्यांच्याकडे रोखून बघत पोदत्योलकोवने त्यांना मोठ्याने शिव्या घातल्या. लागुतिनचे डोळे आपल्यावर रोखलेले आहेत हे पाहून त्याने तटकन् विचारले,

" काय झालं ?"

" गेल्या काही दिवसात केस पिकले तुझे !"

" केस पिकणार नैत तर काय होईल ?" पोदत्योलकोव जोराचा सुस्कारा टाकून म्हणाला. आपल्या अरुंद कपाळावरचा घाम पुशीत तो परत म्हणाला, " केस पिकणार नैत तर काय होईल ? पिंजऱ्यातला लांडगाही म्हातारा होतो. मी तर माणूसाय !"

ते आणखी एक शब्दही बोलले नाहीत. घनदाट जुटीने गर्दी पुढे सरकली. उजवीकडे मसणवटीचा लांबलचक काळा व्रण पडलेला होता.

" थांबा " स्पिरिदोनोवने हुकूम सोडला.

पोदत्योलकोव चटकन् एक पाऊल पुढे झाला आणि सर्वात पुढे असलेल्या लोकांच्या रांगांवरून त्याने आपली श्रांत नजर फिरवली. त्यातील बहुतेक पिकल्या केसांचे होते. आघाडीचे लोक विवेकाच्या टोचणीने काहीसे मागे उभे होते.

स्वगत पण स्पष्टपणे बोलताना पोदत्योलकोवच्या छपरी मिशा किंचित थरारल्या,

" बापहो ! आमचे साथी मरणाला कसे तोंड देतात ते बघण्याची मला न् क्रिवोशलिकोवला परवानगी द्या. नंतर आम्हाला फासावर चढवा. पण आत्ता आम्हाला आमचे दोस्त न् साथी बघायचेत. ज्यांची मने कमकुवत आहेत त्यांना बळ द्यायचंय !"

जमाव इतका शांत होता की त्यांच्या टोप्यावर टपटप पडणाऱ्या पावसाचा आवाजही ऐकू येत होता.

कॅप्टन पोपोव पिछाडीला हसत, आपले तंबाखूने डागाळलेले दात दाखवीत उभा होता. त्याने काही हरकत घेतली नाही. म्हाताऱ्यांनी घोगऱ्या स्वरात ओरडून संमती दिली.

" बघू द्या त्यांना. "

" खड्ड्याकडून त्यांना बाजूला घ्या ! "

क्रिवोशलिकोव आणि पोदत्योलकोवनी गर्दीत प्रवेश केला. त्याबरोबर गर्दी दुभंगली आणि एक अरुंद वाट त्यांच्यापुढे खुली झाली. खड्ड्यापासून जरा दूर ते थांबले. चारी बाजूंनी ते घेरलेले होते. शेकडो डोळे त्यांना बघत होते. रेडगार्डस्ना त्यांच्या पाठी खड्ड्याकडे करून कझाकांनी त्यांना वेड्यावाकड्या रांगात उभे केल्याचे ते बघत होते. पोदत्योलकोवला उत्तम दिसत होते. क्रिवोशलिकोवला आपली मान ताणून आणि चौडे उंचावून बघावे लागत होते.

अगदी डावीकडे असलेल्या बुनचुकला त्यांनी ओळखले. तो किंचित वाकून उभा होता. जोरजोराने श्वासोश्वास करीत होता. जमिनीला खिळवलेली नजर वर करीत नव्हता. त्याच्या बाजूला उभा असलेला लागुतिन अजूनही आपली अंतर्वस्त्रे सावरण्याचा प्रयत्न करीत होता. त्याच्या जवळ तांबोवचा इग्नात होता. त्याच्या शेजारी उभा असलेला वान्का बोलदिरेव ओळखू न यावा इतका बदलून गेला होता. जवळ जवळ वीस वर्षांनी तो म्हातारा झाला होता. पाचव्या माणसाला ओळखण्याचा पोदत्योलकोवने प्रयत्न केला. कष्टाने त्याने ओळखले की तो कझानस्कोई खेड्यातील मातेवेई साकमातोव नावाचा कझाक होता. अगदी कामेनस्कोए पासून तो पोदत्योलकोवच्या सगळ्या दुर्दैवात आणि आनंदात वाटेकरी होता. पेत्रो लीसिकोव छातीठोकपणे आणि उध्दटपणे हसत होता. आपल्या आवळलेल्या घाणेरड्या मुठी जमावावर उगारून तो त्वेषाने शिव्या घालीत दम देत होता. शेवटच्या आठव्या माणसाला उचलून न्यावे लागले. त्याने परत मागे झेप घेतली. निर्जीवपणे जमिनीवरून पाय ओढीत त्याने कझाक रखवालदाराला मिठी मारली. आपले आसवानी माखलेले तोंड हालवीत ती मिठी सोडून त्याने हंबरडा फोडला,

" मला जाऊ द्या रे भाऊ ! देवाची शपथाय जाऊ द्या मला ! भाऊ ! भाऊ ! तुम्ही काय करीताय ? जर्मन युध्दात मी चार क्रूस मिळीवलेत ! मला पोरं बाळायत ! मी निष्पापाय ! अरे पण कारे असं करताय . . ., . . ?"

एका उंच कझाकाने त्या माणसाच्या छातीत गुडघ्याची ठोकर मारली आणि त्याला खड्ड्याकडे लोटला. तेव्हा कुठे पोदत्योलकोवने त्याला ओळखले आणि त्याचे अंत:करण गारठले. त्याच्या रेडगार्डस्‌मधला तो सर्वात निर्भय होता. तो मिगुलिनस्कीए खेड्यातील कझाक होता. सेंट जॉर्ज क्रूसाचे चारीच्या चारी वर्ग मिळवलेला तो एक देखणा पांढऱ्या केसांचा कझाक होता.

कझाकांनी त्याला सरळ उभा केला पण तो परत खाली पडला आणि त्या कझाकांच्या पायाज लडबडू लागला. त्याच्या बुटांवर – त्याचे थोबाड ठोकरणाऱ्या बुटांवर – तो आपले ओठ दाबू लागला. आणि करुण गदगदलेल्या आवाजात त्याने हंबरडा फोडला,

" मला मारू नका ! दया करा ! मला तीन लहान पोरायत ! त्यातली एका पोरगी आहे. . . . माझ्या भावांनो . . . माझ्या दोस्तांनो ! "

त्या उंच कझाकाच्या गुडघ्यांना त्याने मिठी घातली. पण त्या माणसाने स्वतःला सोडवून घेतले, मागे उडी मारली आणि आपल्या नाल मारलेल्या बुटाने त्याच्या कानशिलात एक दणदणीत लाथ हाणली. त्याच्या दुसऱ्या कानातून रक्त वाहून आले आणि त्याच्या पांढऱ्या गळपट्टीवर ते ओघळले.

" उभा करा त्याला ! " स्पिरिदोनोव चवताळून ओरडला.

कुणीतरी त्याला उभा केला आणि मागे धाव घेतली. समोरच्या रांगेत गोळीबार तुकडीने आपल्या बंदुका रोखल्या. जमावाने कण्हल्यासारखा हुंकार दिला आणि तो एकदम निःस्तब्ध होऊन खिळून गेला. एका बाईने बेहोषपणे किंकाळी फोडली.

आभाळाचे करडे आच्छादन आणि एकोणतीस वर्षे तो जिथे हिंडला ती करुण धरती पुन्हा एकदा पुनःपुन्हा बघावी असे बुनचुकला वाटत होते. त्याने नजर वर केली तेव्हा सुमारे पंधरा पावलावर एकमेकांना खेटून उभे असलेल्या कझाकांची रांग त्याला दिसली. त्याने एक उंच आकुंचित केलेल्या हिरव्या डोळ्याचा माणूस पाहिला. त्याच्या अरुंद पांढऱ्या भुवयावर केसांचा झुपका लोळत होता. आपले ओठ त्याने घट्ट दाबून धरले होते. त्याचा देह किंचित पुढे झुकला होता. आणि थेट बुनचुकच्या उरावर त्याने नेम धरला होता. ती फैर धडाडण्याच्या किंचित आधी एक पल्लेदार किंकाळी बुनचुकचे कान फाडून गेली. त्याने मान वळवून पाहिले. एक तरूण तोंडावर शिब्याचे ठिपके असलेली बाई छातीशी पोर कवटाळून आणि दुसऱ्या हाताने डोळे झाकून खेड्याच्या दिशेने धावत चालली होती.

विस्कळीत फैर झडल्यानंतर खड्डयाजवळ उभे असलेले आठजण वेडया-वाकडया ओळीत खाली पडले. त्याबरोबर गोळया झाडणाऱ्या माणसांनी त्या खड्डयाच्या दिशेने धाव घेतली. आपण ज्याच्यावर नेम धरला होता तो रेडगार्ड अद्यापही वळवळत स्वतःचा खांदा चावू बघत असलेला पाहून मितका कोर्शुनोवने त्याच्यावर आणखी एक गोळी झाडली. आणि आंद्रेई काशुलिनजवळ तो पुटपुटला,

" बघ साला सैतान ! रगत येईपर्यन्त स्वतःचा खांदा चावलाय अन् न विव्हळता लांडग्यागत मेलाय !"

शिक्षा ठोठावलेल्या आणखी दहा जणांना बंदुकीच्या दस्त्यांनी ढोशीत तेथे आणण्यात आले.

दुसरी फैर झडल्यावर गर्दीतील बायका धक्काबुक्की करीत आपली पोरे आपल्या मागून फरफटत किंचाळत धावू लागल्या. पुरूष 'माणसेही तिथून निघून जाऊ लागली. हत्येचे ते ओंगळवाणे दृश्य मरणारांच्या किंकाळ्या, विव्हळणे, आपल्या पाळीची वाट बघणारांचे हंबरडे हे दृश्य त्या जमावाला भयंकर धडकी भरवणारे आणि भयानक होते. ज्यांनी मन विटेपर्यंत मृत्यूचे दर्शन घेतलेले होते ती आघाडीची माणसे आणि अत्यंत टणक बनलेले म्हातारे एवढेच तिथे उरले.

अनवाणी आणि विवस्त्र केलेल्या रेडगार्डसचे नवीन गट आणण्यात आले. स्वयंसेवकांच्या नवीन रांगा त्यांच्या समोर खडया झाल्या. फैर धडाडली. मग एकच धडाक्याने हवा शुष्क हादरली, आणि जे फक्त जखमी झाले होते त्यांना संपुष्टात आणण्यात आले. मुडद्यांच्या पहिल्या गटावर खड्डयात भराभर माती टाकण्यात आली. आपल्या पाळीची जे वाट बघत होते त्यांच्याजवळ जाऊन पोदत्योलकोव आणि क्रिवोशलिकोव ह्यांनी त्यांना धीर देण्याचा प्रयत्न केला. पण त्यांच्या शब्दातील सगळी अर्थवत्ताच गमावली होती. सुकलेल्या देठावरून पाने तुटून पडावीत तसे ज्यांचे प्राण मिनिटा दो मिनिटात हरपणार होते त्या माणसावर दुसऱ्याच एका शक्तीचे वर्चस्व होते.

आपल्या खेडयाकडे परत जाण्यासाठी ग्रिगरी मेलिखोव त्या गर्दीतून बाहेर पडला आणि त्याचे आणि पोदत्योलकोवचे तोंडास तोंड दिसले. त्याचा पूर्वीचा नेता एक पाऊल मागे हटला आणि त्याने ग्रिगरीकडे निरखून पाहिले,

" तू पण इथं आहेस मेलीखोव ?"

ग्रिगरीचे तोंड निळसर फटफटीत पडले. तो थबकून म्हणाला,

" इथाय ! तू बघीतोचायस !"

" बघीतोय . . . !" कुत्सित हसून पोदत्योलकोव म्हणाला.

ग्रिगरीच्या फिकट तोंडाकडे त्याने एकाएकी तिरस्काराने पाहिले.

" अस्सं ! आपल्या भावांना तू गोळ्या घालतोयस आं ? टोपी फिरवलीस ? किती . . . !" तो ग्रिगरीजवळ जाऊन कुजबुजला, " तेव्हा आमचीही चाकरी करायची न् ह्यांचीही करायची . . . कोण जास्त पैसा मोजील त्याची ? अरे तू आहेस . . . !"

त्याची बाही पकडून ग्रिगरीने धापा टाकीत विचारले,

" ग्लुबोकायाची लढायी आठीवते ? तिथे अंमलदारांना कसं गोळ्या घालून मारलं ते तुला आठीवतं ? तुझ्याच हुकूमानं गोळ्या घालण्यात आल्या. आं ? न् आता तुझी पाळीय. कुंथू नको ! माणसांची चामडी लोळवायचा तुला एकट्यालाच काय अधिकार नाय ! तू संपलास. डॉन कोमिसारांचा अध्यक्ष ! गलिच्छ सुव्वर ! कझाकांचा यहुद्यांना विक्रा केलास ! समजलास ! का आणखी ऐकायचंय !"

संतप्त झालेल्या ग्रिगरीला कवळ घालून क्रिस्तोनियाने बाजूला नेले. " चल परत घोड्याकडं " तो म्हणाला. " आपलं इथं काम नाय ! रे देवा ! लोकांचे हे काय होतंय ?"

ते निघाले. पण पोदत्योलकोवचा उंच आवेशयुक्त आवाज ऐकून ते थबकले. म्हाताऱ्यांनी आणि आघाडीच्या माणसांनी वेढलेला पोदत्योलकोव गर्जना करीत होता,

" तुझे डोळे फुटलेत . . . अडाणचोट ! अंमलदारांनी तुला गंडवलंय . . . आपल्या रक्ताच्या भावांनी तुला जीव घ्यायला भाग पाडलंय. तुला काय वाटत आमच्या मरणानं ह्यांची अखेर होईल ? नाय ! आज तुमची सद्दीय ! पण उद्या गोळ्या खायची पाळी तुमच्यावर येईल ! सगळ्या रशियात सोव्हिएटांची राजवट येईल, लक्षात ठेव माझे शब्द ! दुसऱ्याचं रक्त तुम्ही फुकट सांडताय ! मुर्ख लोक आहात तुम्ही !"

" दुसरे जे येतील त्यांच्याकडं आम्ही बघून घेऊ !" एका म्हाताऱ्याने टोमणा दिला.

" त्या सगळ्यांना गोळ्या नाय घालता येणार आजोबा !" पोदत्योलकोव हसून म्हणाला. " अरे, अख्खा रशिया काय फासावर टांगल काय ? तुमच्या

स्वत:च्या डोक्याचं बघा ! कधीतरी अक्कल सुचंल पण मग फार उशीर झाला असंल !"

" आम्हाला दम देऊ नको !"

" मी दम देत नाय. मी तुम्हाला खरा रस्ता दाखवतोय."

" तुझेच डोळे फुटलेत पोदत्योलकोव ? मॉस्कोनं डोळे फोडलेत तुझे !"

आणखी ऐकायला ग्रिगरी थांबला नाही. त्याचा घोडा जिथं त्याने दावणीला बांधला होता तिकडे त्याने धाव घेतली.

पेशबंद आवळून त्याने आणि क्रिस्तोनियाने खेडयाच्या बाहेर दौड मारली. मागे नजर टाकत टेकडीवर त्यांनी घोडे चढवले.

पण निवांत असलेल्या पोनोमार्योव इथे कझाकांकडून कझाकांची कत्तल चालूच होती. सगळ्या रेडगार्डसना मारून झाल्यावर खड्डे मुडद्यांनी भरून गेले. त्यांच्यावर माती लोटण्यात येऊन पायाने ती चोपण्यात आली. काळे मुखवटे घातलेले दोन अंमलदार पोदत्योलकोव आणि क्रिवोशलिकोवला घेऊन फाशीच्या तक्ताकडे गेले. निर्भयपणे आणि स्वाभिमानाने आपली पुष्ट गर्दन ताठ ठेवून पोदत्योलकोव फासाखालील स्टुलावर चढला. यत्किंचितही चलबिचल न होऊ देता त्याने तो साबणी दोर गळ्याभोवती अडकावून घेतला. क्रिवोशलिकोवला स्टुलावर चढण्यात एका अंमलदाराने हात दिला आणि त्याच्या गळ्यात दोर घातला.

" मरणापूर्वी शेवटचं बोलू द्या आम्हाला !" पोदत्योलकोवने विनंती केली.

" बोलून टाक ! चल आटप !" आघाडीची माणसे ओरडली.

तिथे जो लहानसा गट उरला होता त्याच्याकडे हात करून तो बोलू लागला,

" आमचं मरण बघण्याची ज्यांना इच्छा आहे अशी माणसं किती थोडी उरलीत बघा ! त्यांच्या विवेकाची त्यांना टोचणी लागल्येय. श्रमीक लोकांच्या वतीने त्यांच्या हितासाठी आम्ही कुत्तरडया सेनानीविरूद्ध जिवाची तमा न बाळगता लढा दिला अन् आज तुमच्या हातून आम्हाला मरण येतंय ! तुमची घोर फसवणूक झाल्येय. क्रांतिकारक सरकार येईल न् मग तुम्हाला कळंल की, सत्य कोणाच्या बाजूलाय ! डॉनची अत्यंत गुणी लेकरं ह्या खड्डयात तुम्ही गाडलीत . . . !"

आवाजांच्या गर्जना वाढत गेल्या आणि त्या कल्लोळात त्याचे शब्द विरून गेले. ह्याचा फायदा घेऊन एका अंमलदाराने त्याच्या पायखालच्या स्टुलाला लाथ

मारली. पोदत्योलकोवचा धिप्पाड देह पडला आणि लोंबकळला. पण त्याचे पाय जमिनीला टेकत होते. त्याच्या कंठाशी आवळलेली गाठ त्याला गुदमरून टाकत होती आणि त्याला अंग वर ओढायला लावीत होती. तो चौडचावर उभा राहिला. अनवाणी पायाचे त्याचे चौडे ओल्या मातीत रुतत होते. तो श्वासासाठी धपापत होता. आपले बाहेर येऊ बघणारे डोळे शांत उभ्या असलेल्या जमावावरून फिरवीत तो थंडपणे म्हणाला,

" न् माणसाला नीट फाशी कसं द्यावं ते पण अजून तुम्ही शिकला नैत ... माझ्याहाती हे काम असतं तर तू जमिनीला टेकला नसतास स्पिरिदोनोव ... !"

त्याच्या तोंडातून भरपूर लाळ वाहत होती. मुखवटे घातलेले अमलदार आणि जवळच्या माणसांनी कष्टाने तो अवजड असहाय्य देह स्टुलावर उंचावला.

क्रिवोशलिकोवला आपले भाषण पूर्ण करू देण्यात आले नाही. त्याच्या पायाखालचे स्टुल उडाले आणि तिथे टाकून दिलेल्या फादडचावर जाऊन आदळले.

तो शेलाटा पिळदार देह बराच वेळ पुढे मागे झोके घेत होता. त्याचे मुटकुळे वळत जात होते. अखेरीस त्याचे गुडघे हनुवटीला लागले आणि परत झटक्याच्या शहाऱ्याने ताठ झाले. तो ;अद्याप झगडत होता. पोदत्योलकोवच्या पायाखालील स्टुल दुसऱ्यांदा उडवण्यात आले तरी ह्याची बाहेर पडलेली काळी जीभ अद्याप वळवळत होती. पोदत्योलकोवचा देह परत धाडकन कोसळला. कातडी जाकीटाची शिवण एका खांद्यावर उसवली, पण परत त्याचे चौडे जमिनीला लागले. कझाकांच्या जमावाने कण्हल्याचा आवाज केला. काही जणांनी अंगावर क्रूसाची निशाणी केली आणि ते पळून गेले. तिथे उडालेली त्रेधा आणि तिरपीट इतकी प्रचंड होती की एक मिनिटभर सगळे पोदत्योलकोवच्या काळवंडलेल्या तोंडाकडे टक लावून बघत जागच्या जागी खिळल्यासारखे उभे राहिले.

पण तो अवाक झाला होता. ती गाठ त्याच्या कंठात जाम आवळली होती तो फक्त आपले डोळे गरगरा फिरवीत होता. त्यातून आसवांचा ओघ वहात होता त्याचे तोंड पिळवटले होते. आपल्या यातना कमी व्हाव्यात म्हणून त्याने आपला अवघा देह भयंकरपणे आणि वेदनेने वर उचलला होता.

अखेरीस कुणाला तरी उपाय सापडला. फावडे घेऊन तो त्याच्या खालची जमीन खणू लागला. प्रत्येक झोक्याने ते शरीर अधिकाधिक ताठपणे लोंबकळू लागले. गर्दन लांबत न लांबत गेली.

आणि त्याचे मस्तक खांद्यावर पडले. तो दोर त्याचे वजन जेमतेम सहन करीत होता. त्याने हळूच हेलकावा घेतला आणि तुळईजवळ तो करकरला. त्या तालबध्द हलण्याबरोबर पोदत्योलकोवही झोके खात चारी दिशेने फिरत होता. जणू काय थुंकीच्या आणि आसवांच्या कढत लोटांनी भरून गेलेला आपला लालबुंद चेहरा आणि छाती तो आपल्या मारेकऱ्यांना दाखवीत होता.

---

# ३१

तातार्स्कीहून पळून गेल्याच्या दुसऱ्या रात्री मिशा कोशेवोई आणि गुड्डू कारगिनहून निघाले. माळरान धुक्यात गुरफटले होते. खबळीतून साचलेले धुके खोंड्यातील बेलाग चढणीवरून तरंगत वर येत होते. कोवळ्या गवतातून लाव पक्षी साद घालीत होते. पण वेळू आणि दांडगवत माजलेल्या तळ्यात पूर्ण डवरलेल्या पाणलिली प्रमाणे भव्य अस्मानात चंद्र तरंगत होता.

पहाटेपर्यन्त ते वाट कापीत होते. आकाशगंगा आता ओसरू लागली होती. दंव पडत होते. नीझनी याब्लोनोव्स्कीई खेड्याच्या जवळ ते आले. पण खेडे काही कोस अंतरावर असताना सहा कझाक घोडेस्वारांनी त्यांना गाठले. मिशा आणि गुड्डू वाट सोडून रानात शिरले असते पण गवत ठेंगणे होते आणि चंद्र प्रकाशत होता.

कझाकांनी त्यांना पकडले आणि मागे कारगिनकडे त्यांना त्यांनी पिटाळले. काही न बोलता सुमारे तीनशे यार्ड ते गेले. एवढ्यात एक बार घुमला. गुड्डू अडखळला आणि तिरका तिरका होत गेला. स्वतःच्या छायेला भिणाऱ्या घोड्याप्रमाणे तो तिरका होत गेला. तो पडला नाही पण करड्या कडुदवण्यावर नाक दाबून त्याने जमिनीवर वेडीवाकडी मुरकुंडी मारली. !

पाच मिनिटे मिशा चालत होता. चालता चालता धडपडत होता. कानात घुमणाऱ्या नादाखेरीज त्याला काहीही जाणवत नव्हते. मग त्याने विचारले,

"अरे, मला गोळी का नाय घालत डुकरिच्यानो? असा का छळ करता?"

"चल! चल! पुढं चल! जीभ आवर!" एक कझाक जरा नरमाईनं म्हणाला. "आम्ही नांगरमुठ्यांना ठार केलं पण तुझ्यावर दया केल्येय. जर्मन युद्धात तू बाराव्या रेजिमेन्टमधे होतास का नाय?"

"होतो!"

"तर मग परत बाराव्या रेजिमेंटमधे चाकरी कर. अजून तरुणायस! जराशी चूक केलीस पण त्यानं काय मोठं पाप झालं नाय. आम्ही तुला बरा करू!"

कारगिन इथं तीन दिवसानतर भरलेल्या कोर्टमार्शलने मिशाला 'बरा' केला. त्या काळी शिक्षा ठोठावण्याचे ह्या कोर्टाचे दोन प्रकार होते–गोळी घालणे किंवा भूर्ज वृक्षाच्या फोकाने फोडून काढणे. गोळी घालून मारण्याची सजा ज्यांना ठोठावण्यात येई त्यांना रात्रीच्यावेळी माळरानाकडे नेण्यात येई. परंतु जे सुधारण्याची आशा होती त्यांना चौकात उभे करून सार्वजनिकरीत्या फटके मारण्यात येत.

रविवारी सकाळी लोक जमू लागले. चौक लोकांनी भरून गेला. कुणी बाकावर उभे राहिले, कुणी मांगरावर तर कुणी घराच्या आणि दुकानाच्या छपरावर उभे राहिले. सर्वात आधी ज्याला शिक्षा होणार होती तो अलेक्सान्द्रोव एका पाद्र्याचा मुलगा होता.

हा मनुष्य तळमळीचा बोल्शेव्हिक होता. त्याला त्यांनी गोळीच घातली असती पण त्याचा बाप एक चांगला पाद्री होता. सर्वांना त्याच्याबद्दल आदर होता. तेव्हा त्याच्या मुलाला वीस फटके मारायचे ठरविण्यात आले. त्याची पाटलूण खाली खेचण्यात आली. त्याला बाकावर नागडा झोपवण्यात आला आणि हात बाकाखाली बांधण्यात आले. एक कझाक त्याच्या पायावर बसला. इतर दोघेजण हातात फोकाचे जुडगे घेऊन बाजूला उभे राहिले. त्यानी फटके मारायला सुरवात केली. त्यांचे मारून संपल्यावर तो माणूस उभा राहिला. त्याने अंग झटकले, पाटलूण वर ओढून घेतली. चारी बाजूला वळून तो कमरेत वाकला. आपल्याला गोळी घालण्यात आली असती, ते चुकले म्हणून त्याला आनंद झाला होता. तेव्हा पुनःपुन्हा लवून वाकून तो आपली कृतज्ञता प्रकट करीत होता.

"बाप हो! मेहेरबानी!"

"आनंद वाटला!" कुणीतरी उत्तर दिले.

त्याबरोबर चौकात हास्याचा एवढा स्फोट झाला की जरा दूर अंतरावर मांगरात बसलेल्या कैद्यांनाही स्मित केले.

शिक्षेप्रमाणे मिशाला वीस सणसणीत फटके लगावण्यात आले. पण त्याला वाटणारी शरम जास्त दाहक होती. सगळा जिल्हा लहानथोर ते बघायला जमले होते. मिशाने पाटलूण वर ओढून घेतली आणि ज्यांनी त्याला फोकालला त्या कझाकाकडे वळून तो अगदी रडकुंडीला येऊन म्हणाला,

" हे काय बरोबर नाय !"

" काय बरोबर नाय ?"

विचार आले ते माझ्या डोक्यात अन् त्याचा भुर्दंड माझ्या गांडीला ! जलमाची शरम झाल्येय मला !"

" काळजी नको करू. अरे शरम म्हणजे काय धूराय डोळ्यात जायला ?" त्या कझाकाने त्याचे सांत्वन केले आणि आपल्या कैद्याची कळी खुलवण्यासाठी तो पुढे म्हणाला,

" तू दणकटायस पोरा ! मी तुला हाणले त्यातले दोन फटके चांगले सणसणीत होते. तू रडीतोस का काय ते मला पाहृचचं होतं. परवाच एकाला फोकलला तर हगलाच ! नाजूक आतड्याचा होता !"

दुसऱ्या दिवशी मिशाला आघाडीकडे कूच करावे लागले.

दोन दिवसपर्यंन्त गुड्डूला पुरण्यात आले नाही. जवळच्याच खेड्यातील कझाकांची जोडी आतामानने पाठवली आणि एक उथळ थडगं खणण्यात आले. खड्ड्यात पाय सोडून ते कझाक चुट्टा फुंकीत बसले होते.

" इथली धरती कठीणाय !" एकजण म्हणाला.

" लोखंडागत ! माझ्या जन्मात कधी ही नांगरलेली नाय. वर्षाच्या वर्ष अशीच कठीण होऊन पडल्येय !"

गवतात गठडी वळून पडलेल्या गुड्डूच्या मुडद्याकडे त्यांनी पाहिले,

" बूट काढून घ्यायचे का ?"

" अर्थात. चांगले बूटायत त्याच्या पायात !"

ख्रिस्ती प्रथेप्रमाणे त्याला त्यांनी डोके पश्चिमेला करून खड्ड्यात ठेवले. समृध्द काळी माती त्याच्या अंगावर टाकली.

" नीट तुडवून मातीखाली घालायचा का ?" खड्डा सपाट भरल्यावर त्यांच्यापैकी लहान असलेल्या कझाकाने विचारले.

"काय जरूर नाय ! राहू दे असंच !" सुस्कारा सोडून दुसरा म्हणाला. "देवदूत शेवटची तुतारी फुंकतील तेव्हा त्याला झटकन् उभं राहता ईल !"

दोन आठवडयात त्या लहानशा ढिग्यावर खाजकुयरी आणि कडूदवणा माजला. रान ओट त्याच्यावर नाचत होते. बाजूने शिरसाला आनंदाचे पिवळेपण चढले होते. मालमंडी डोके वर उचलीत होती. मरवा, रानगवत आणि गळणाऱ्या चीकाने हवा गंधित होऊन गेली.

थोडयात दिवसांनी एक म्हातारा माणूस खेडयातून तिथे आला. त्या थड-ग्याच्या माथ्यावर त्याने लहानसे भोक पाडले आणि नुकत्याच तोडलेल्या ओक-वृक्षाच्या लाकडाचा खांब त्यात पुरून वर एक लहानशी छत्री केली. त्या चिमुकल्या छत्रीतून कुमारी मातेचा उदास मुखवटा सौम्यपणे तळपत होता. आणि त्या खाली असलेल्या चौथऱ्यावर जुन्या स्लावनिक भाषेत समाधीलेख लिहिलेला होता,

पेटता कलह वा संकट येता गाढे
करू नका बंधुनो बंधूचेच निवाडे !

तो म्हातारा घोडयावर बसून निघून गेला.

ती लहानशी समाधी माळरानावर राहिली. तिथे अनंत शोकाकूल दर्शन घेत जाणाऱ्या येणाऱ्या प्रवाशांचे डोळे व्याकूळत आणि मनाला एक आगळी दुःखद तळमळ लागून त्यांच्या भावना उचंबळून येत.

पुढे मे महिन्यात दोन माळढोक पक्षांची त्या समाधीच्या आसपास झुंज झाली. निळसर कडूदवण्यांची त्यांनी बरीच नासाडी करून टाकली. जोमावर येणाऱ्या पंद्या गवताचा हिरवा बहर चुरगळून टाकला. मादीसाठी, जगण्याच्या हक्कासाठी, प्रेमासाठी आणि फळण्यासाठी त्यांनी लढत दिली.

त्यानंतर काही दिवसांनी त्या ढिग्याखाली समाधीच्या जवळच जुन्या कडू-दवण्याच्या जाळीदार निवाऱ्याखाली एका माळढोकाच्या मादीने धूम-नील अशी नऊ अंडी घातली. आपल्या तुकतुकीत पंखांचा आडोसा त्यांना घालून ती उबवण्यासाठी ती मादी त्या अंडयावर बसून राहिली.

---

